








नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**









अनुक्रमणिका












मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष



# वैशिष्ट्यपूर्ण व खास ध्येय असलेला एक उद्योग समूह

**शॉपिंग व कमर्शिअल कॉम्प्लेक्स 'रियाद', सौदी अरेबिया**

दूरदृष्टीच्या, द्रष्ट्या व्यक्तीने, म्हणजेच श्री. बी. जी. शिर्के यांनी शिर्के-सिपोरेक्स उद्योग समूहाची स्थापना केली. जेव्हा त्याची सुरूवात केली तेव्हाच, त्यांनी या उद्योग समूहाच्या संपूर्ण ध्येयाची आखणी केलेली होती. स्थापत्य-बांधकाम शास्त्राचे संपूर्णतः औद्योगिकरण करून तंत्रज्ञानाच्या दृष्टीने सर्वोत्कृष्ट व किफायतशीर किंमत असलेल्या दर्जेदार उत्पादनांव्दारे देशाच्या इमारत बांधकाम साहित्याची (मटेरिअल्सची) गरज भागविणे हेच उद्दिष्ट होते.

**आमचे मनुष्यबळ हीच आमची शक्ती :**

आम्ही स्थापत्य शास्त्रज्ञ, अभियंते, रचनाकार, रासायनिक, तांत्रिक, व्यवस्थापन आणि वित्त या सारख्या विविध क्षेत्रातील व्यवसायिक व कामगार मिळून नऊ हजाराहून अधिक व्यक्तींची नेमणूक केलेली असून त्यांच्या प्रशिक्षणाची व्यवस्था केली आहे. पुण्याजवळील मुंढवा येथील आमच्या ५३ एकराच्या प्लॉटमध्ये अत्याधुनिक संशोधन व विकासाच्या सोयी असलेले ९ अत्याधुनिक संपूर्ण सुसज्ज असे एकात्मिक कारखाने आहेत.

**आमची वैशिष्ट्ये :**

अत्याधुनिक पद्धतीने अति जलद गतीने, सर्वांना परवडण्याजोगी उच्च दर्जाची सर्व सोयी-सुविधा असलेली उपनगरे तयार करण्याचे आमचे ध्येय आहे. यासाठी आम्ही अशा मजबूत, त्वरीत उत्पादन करता येण्याजोग्या व परवडण्याजोग्या इमारत बांधकाम साहित्यांची अत्याधुनिक शास्त्र-तंत्राने निर्मिती करतो. बऱ्याच उत्पादनास भारतीय मानक संस्थेचा गुणवत्ता दर्जाप्रत ठरविण्याचा शिक्कामोर्तब आहे. तसेच बी. जी. शिर्के कन्स्ट्रक्शन टेक्नॉलॉजी लि. आय. एस. ओ. ९००१ व सिपोरेक्स इंडिया लि. आय. एस. ओ. ९००२ प्रमाणित कंपन्या आहेत. शिवाय सिपोरेक्स उत्पादनास भारतीय मानक संस्थेचा आय. एस. आय. शिक्कामोर्तब पण आहे. त्यामुळे आमची कामाची सर्वांगिण दर्जाप्रत, गती व किंमत सर्वांना परवडणारी असते. म्हणून देशात-परदेशात सर्वत्र आमच्या मालास मोठ्या प्रमाणावर मागणी आहे.

**आमचे सहभाग :**

आमचा स्वीडनच्या इंटरनॅशनेला सिपोरेक्स-अेबी, स्वीडन यांचेशी सहभाग आहे. तसेच आमच्या विविध उत्पादने व तंत्रज्ञानासाठी.



**सेंट्रल ॲथलेटिक स्टेडियम श्री शिवछत्रपती क्रीडा नगरी, बालेवाडी, पुणे**

अग्रगण्य कंपन्यांशी खालीलप्रमाणे तांत्रिक-सहकार्य आहे.

एल्वा, जर्मनी - ऑटोमेटिक वे-बॅचिंग व मिक्सिंग प्लॅन्टस, पोटेन एस.ए. फ्रान्स - टॉवर क्रेन्स (१ ते ५० टनांची क्षमता, उंची १०० मीटर्स पर्यंत), प्युराक स्वीडन - वेस्ट वॉटर ट्रीटमेन्ट प्लॅन्टस्, रीड सिस्टीमस्, यु. एस. ए. - प्रगत जीआयसी ग्रेन स्टोरेज सायलो सिस्टिमस्

**आमचे मानाचे तुरे :**

● स्थापत्य-बांधकाम शास्त्राचे संपूर्ण औद्योगिकरण ● प्रिफॅब साहित्य ● टर्नकी लंपसम-एक रकमी वट्ट ठेका पध्दती ● एकाच छताखाली आरंभापासून ते पूर्णत्वापर्यंतच्या सर्व महत्वाच्या सेवा ● आधुनिक धान्य साठवणूक व त्यांचे संरक्षण, हाताळणी इ. कोठारांची निर्मिती, उभारणी व स्थापना (इन्स्टॉलेशन) ● ३०० दिवसात क्रीडा नगरीचे बांधकाम-एक जागतीक विक्रम.

**भविष्य-काळातील आमच्या योजना :**

स्थापत्य व बांधकाम शास्त्राच्या औद्योगिकरणाचा सर्वत्र प्रसार-प्रचार. प्रत्येकास निवारा मिळवून देण्याचा प्रयत्न. भारतातील जंगले व नैसर्गिक साधन-संपत्तीचे रक्षण व पर्यावरणाचे संतुलन साधणे इ. इ. महत्वाच्या कामात कार्यरत असलेली शिर्के-सिपोरेक्स ही एक अग्रगण्य संस्था आहे. आमच्या तंत्रज्ञानाने व क्षमतेने गुणवत्तेत वस्तुनिष्ठ दर्जा राखणे हे आमचे ध्येय. उद्याच्या भारताचा एक अंगभूत व अविभाज्य घटक म्हणून नावारूपास येण्याच्या आशेने व आत्मविश्वासाने आम्ही मार्गप्रतिक्षा करीत आहोत.




**SHIRKE शिर्के सिपोरेक्स उद्योग समूह SIPOREX**


७२-७६, मुंढवा इंडस्ट्रिअल इस्टेट, पुणे : ४११ ०३६. फोन : ६७०१५१, ६७०७५५. फॅक्स : (०२१२) ६७१६१२, ६७०३१९
मुंबई : २६२४५७४/६७०३१९, २६२४८९४. बँगलोर : २२७७३६०, २२७७३६१. दिल्ली : ६४६४०७६, ६४६२३०८.
हैद्राबाद : ८४१७३८, ८४६५०८. नागपूर : ५३३५११.





अनुक्रमणिका









प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई
संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५० अंक १२ + वर्ष ५१ अंक १ व २
सप्टेंबर-ऑक्टोबर-नोव्हेंबर १९९७
श्रावण-भाद्रपद-आश्विन-कार्तिक, शके १९१९
किंमत रु. ६०/-
**वार्षिक वर्गणी रु. १६०/- त्रैवार्षिक वर्गणी रु. ४५०/-**



## *नवभारत*ची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* *नवभारत*, ऑक्टोबर, १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



**संपादकीय पत्रव्यवहार :**
वसंत पळशीकर
कार्यकारी संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री.ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)









अनुक्रमणिका

*भारतीय स्वातंत्र्याच्या सुवर्णमहोत्सवाच्या प्रसंगी*

*हार्दिक शुभेच्छा!*



जनता शिक्षण संस्थेचे

# किसन वीर महाविद्यालय

वाई (जि. सातारा)



प्रा. चंद्रकान्त नलवडे

प्राचार्य







अनुक्रमणिका

# नवभारत

## अ नु क्र म



मुखपृष्ठ : सुजित पटवर्धन

अनुक्रमणिका







# निवेदन

ऑक्टोबर १९४७ मध्ये *नवभारत*चा पहिला अंक प्रसिद्ध झाला. *नवभारत*ची स्थापना स्वातंत्र्यप्राप्तीच्या घटनेशी जाणीवपूर्वक जोडलेली होती. राजकीय स्वातंत्र्य मिळाले म्हणजे भारताच्या पुनरुत्थानाच्या वाटेतील एक मोठा अडसर तेवढा दूर झाला; नवनिर्माणाची सारी वाटचाल आता खऱ्या अर्थाने सुरू होणार आहे, हा *नवभारत*च्या संस्थापकांचा दृष्टिकोण होता. *नवभारता*च्या उभारणीसाठी विचारविमर्श, वादसंवाद या स्वरूपाची वैचारिक घुसळण सातत्याने चालू राहावयास हवी; विचारमंथन, टीकाटिप्पणी, वादविवाद निर्वैर वृत्तीने, समंजसपणे, विधायक स्वरूपात होत राहिले पाहिजेत याविषयी त्यांचा कटाक्ष होता. वैचारिक मंथनासाठीचे खुले व्यासपीठ म्हणून *नवभारत*चे प्रकाशन हाती घेण्यात आले.

स्वातंत्र्यलढ्यात ज्यांनी जाणतेपणी भाग घेतला, काँग्रेसच्या झेंड्याखाली चाललेल्या स्वातंत्र्यलढ्यात नाही पण अन्य पक्ष व संघटना यांच्या झेंड्यांखाली स्वातंत्र्यपूर्व काळात ज्यांनी राजकारणात समजून भाग घेतला त्यांचे वय आज पंचाहत्तर व पुढे आहे. सलमान रश्दींच्या 'द मिडनाइट्स चिल्ड्रेन'चेच वय आज पन्नास आहे. पृथ्वीच्या आयुष्याच्या आलोकात (परस्पेक्टिव) पन्नास वर्षांचा काळ म्हणजे पळभर पण नाही असे ठरेल. पण मानवी पिढ्यांच्या चौकटीत हाच काळ दोन-तीन पिढ्यांचा ठरतो. तिसरी पिढी आज स्वातंत्र्याचा अनुभव घेत आहे, तर चौथी पिढी नुकतीच मतदार बनली आहे.

सत्तर-पंचाहत्तर ते पस्तीस-चाळीस या वयाच्या मंडळींचा 'स्वातंत्र्या'चा अनुभव काय राहिलाय? त्यांचे त्यांचे व्यक्तिगत कौटुंबिक आयुष्य, व्यावसायिक व सार्वजनिक जीवन जगत असताना त्यांना आलेला व भावलेला 'स्वातंत्र्या'चा अनुभव, त्याविषयीचे चिंतन जाणून घेण्यास हा प्रसंग चांगला आहे असे आम्हाला वाटले. *नवभारत*च्या एका विशेष अंकाचे आयोजन करावे असे ठरवून आम्ही, विशेषांकात लेखन करण्यासाठी आमंत्रण देणारे पत्र पाठविले. त्या पत्रातील महत्त्वाचा भाग खाली उद्धृत केला आहे.

"या प्रसंगी *नवभारत*चा एक विशेष अंक प्रसिद्ध करण्याचे आम्ही योजिले आहे. विभिन्न क्षेत्रांत पन्नास वर्षांत आपण (देश पातळीवर) काय कामगिरी केली, वा किती व कसा बदल घडून आला यांचा एक सरळ आढावा सादर करण्याची कल्पना नाही. वेगवेगळ्या व्यावसायिक व सार्वजनिक क्षेत्रांत जागरुकपणे, काही ध्येयदृष्टी बाळगून क्रियाशील राहिलेल्या विचारी व्यक्तींनी, त्यांनी स्वातंत्र्याचे काय होताना अनुभवले – त्या अनुभवाने कधी अभिमान वाटला असेल, आनंदाने हृदय उचंबळून आले असेल, कधी विषादाने अंतःकरण विदीर्ण झाले असेल – त्या अनुभवांविषयी, भविष्याकडे पाहात, चिंतनात्मक स्वरूपात स्वतःचे मनोगत व्यक्त करावे अशी आमची इच्छा आहे. केंद्र-राज्य शासने, त्यांची धोरणे व कारभार, राजकीय पक्ष व राजकारणी आणि त्यांचे व्यवहार यांना लक्ष्य करून, त्यांचे कोठे चुकले आहे वा त्यांनी काय करायला हवे याचे विवेचन करणे; तसेच जागतिकीकरण-उदारीकरण, धर्मवादी-मूलतत्त्ववादी शक्तिप्रवाह, ब्राह्मणी व्यवस्था व परंपरा यांच्यावर हल्ला चढविणे, यासाठी या अंकाची योजना नाही. लेखन करणारी व्यक्ती ज्या क्षेत्रात क्रियाशील होती/आहे त्या क्षेत्रात तिने जे अनुभवले, एक संवेदनशील विचारी nodal point या नात्याने, त्यावर भर असावा. त्या अनुभवांचा, त्यावरील चिंतनाचा भाग म्हणून वरील सर्व गोष्टींवर टीकाटिप्पणी येऊ शकेल. विशिष्ट-सामान्य (particular-universal) असा संयोग अपेक्षित आहे."

वेगवेगळ्या क्षेत्रांतील विशेष नामवंत व्यक्ती, पुढारी यांचे लेखन प्रसारमाध्यमांद्वारे लोकांसमोर येतच असते. ही गोष्ट लक्षात घेऊन *नवभारत*च्या गोतावळ्यामधील विविध क्षेत्रांतील व वेगवेगळ्या पिढ्यांमधील ६०-७० व्यक्तींना आम्ही आमंत्रित केले. यांच्यापैकी चोवीस जणांनी *नवभारत*च्या या अंकासाठी लेखन केले आहे. हे सर्व लेखन एका घाटाचे नाही. ते व्यक्तिविशिष्ट असावे हे तर अपेक्षितच होते. स्वातंत्र्यपूर्व काळातही यांच्यापैकी काही व्यक्तींनी डोकावले आहे, आणि तेही त्यांचे वय लक्षात घेता स्वाभाविकच आहे. या सर्वांच्या लेखनामधून पन्नास वर्षांच्या कालखंडावर वेगवेगळ्या कोनांमधून प्रकाशाचा झोत पडलेला आहे. त्याच वेळी त्या त्या व्यक्तीवरही तो पडून लेखकाचे व्यक्तित्व रेखीवपणे मनावर ठसते ही गोष्ट चोखंदळ वाचकांच्या लक्षात येईल.

अनुक्रमणिका

ज्या मित्रांनी आमच्या आवाहनाला प्रतिसाद देऊन लेखन पाठविले त्यांचे आम्ही ऋणी आहोत.

प्रा. अम्लान दत्त यांचे लेखन अलीकडे *नवभारत*मधून प्रसिद्ध होत आले आहे. ध्येये व मूल्ये यांवरील अविचल व जाज्वल्य निष्ठा, तरी कट्टर, मूलतत्त्ववादी आक्रमकतेचा अभाव; व्यासंग मोठा, चौफेर व सखोल आणि त्यामुळेच विनम्र व अनाग्रही वृत्ती; तटस्थ पण सहृदय चिकित्सक नजरेने गेली साठएक वर्षे भारतातील स्थित्यंतरांचे निरीक्षण व त्याविषयी चिंतन, हे अम्लान दत्त यांच्या व्यक्तित्वाचे विशेष. भारतात युरोपीय रनेसां व एनलायटनमेंट (आपल्या भाषेत 'प्रबोधनयुग') त्यांच्या सर्व अंगांनी सर्वाधिक आत्मसात कोणी केले असेल तर बंगाली मंडळींनी. आम्ही प्रा. अम्लान दत्त यांना *नवभारत*च्या या विशेषांकासाठी लेख पाठविण्याची विनंती केली होती. त्यांनी खास *नवभारत*साठी एक छोटा लेख लिहून पाठविला. भारताच्या आजच्या गंभीर स्थितीचे चार-दोन 'रेषां'मध्ये नेमके चित्र रेखाटून त्यांनी भविष्याच्या वाटचालीच्या दृष्टीने दिग्दर्शन व विधायक सूचना केल्या आहेत. एक प्रकारे, या विशेष अंकाचे 'संपादकीय'च त्यांनी लिहिले आहे.

या सर्वांच्या लेखनामधून एक सर्वांगपरिपूर्ण, एकजिनसी व प्रातिनिधिक चित्र उभे राहते असा आमचा दावा नाही. ते बहुजिनसी आहे, आंशिक आहे. ज्या सर्व विभिन्न कोनांमधून या कालखंडाकडे पाहणे शक्य आहे ते सर्व दृष्टिकोण येथे प्रतिबिंबित झाले आहेत असेही नाही.

असे जरी असले तरी, या अनुभवांचे, अंतर्मुख होऊन केलेल्या चिंतनाचे दुहेरी मोल आहे. वाचकांच्या विचारांना अनेक अंगांनी चालना देण्याचे काम तर होईलच; त्याचबरोबर, स्वतःचा स्वातंत्र्याचा अनुभव काय राहिला, या कालखंडाविषयीचे आपले स्वतःचे चिंतन काय, याचीही मनोमन मांडणी करण्यास चालना मिळेल.

अलीकडे श्री. अरुण शौरी या सुविख्यात व प्रभावशाली संपादक-पत्रकार यांचा डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या राजकारण-समाजकारण व व्यक्तित्व यांच्याविषयी *वर्शिपिंग फॉल्स गॉड्स : आंबेडकर अँड द फॅक्ट्स वुइच हॅव बीन इरेज्ड* या नावाचा ग्रंथराज प्रसिद्ध झाला आहे. त्याची गंभीरपणे दखल घेतली जात आहे, हे योग्यच आहे. *नवभारत*च्या जुलै-ऑगस्ट १९९७ च्या अंकातील 'पुतळ्याची विटंबना आणि त्यानंतर' या संपादकीयाचाच विषय, एका प्रकारे, शौरी यांच्या पुस्तकाचा विषय आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे स्थान काय, हा प्रश्न स्वातंत्र्यास पन्नास वर्षे पूर्ण होण्याच्या वर्षी उपस्थित व्हावा ही अनेक अंगांनी महत्त्वाची घडामोड आहे. ती बोलकीही आहे. शौरी यांच्या भूमिकेची, निवाड्याची चिकित्सा हा *नवभारत*च्या विशेषांकाचा एक अंगभूत भागच मानता येईल.

या अंकासाठी जाहिराती देऊन ज्यांनी *नवभारत*च्या कार्यास आपला सक्रिय हातभार लावला आहे त्या सर्व जाहिरातदार-हितचिंतकांचे आम्ही ऋणी आहोत.

'मुद्रा'चे चालक मित्रवर्य सुजित पटवर्धन हे *नवभारत*ची मुखपृष्ठेही करीत असतात व त्यामुळे अंकाचे देखणेपण वाढले आहे, हे वाचकांच्या ध्यानी आले असेलच. *नवभारत*च्या छपाईकडेही त्यांचे लक्ष असते. त्यांचे व 'मुद्रा'तील सर्व संबंधित मंडळींचेही आम्ही ऋणी आहोत.

*संपादक*



---

**चुकीची दुरुस्ती**

※ *नवभारत* (मे-जून १९९७) च्या अंकात प्रा. स.ह. देशपांडे यांचा परिचय 'मुंबई विद्यापीठाचे अर्थशास्त्र विभागाचे निवृत्त प्रमुख' असा करून देण्यात आला होता. चुकीची दुरुस्ती करणारे पत्र प्रा. स.ह. देशपांडे यांनी पाठविले आहे. ते लिहितातः "मी विभाग-प्रमुख कधीच नव्हतो. विभागात (डिपार्टमेंट) एक प्राध्यापक (प्रोफेसर) होतो. मी प्रमुख असलोच तर विभागांतर्गत कृषि-अर्थशास्त्र या उपविभागाचा प्रमुख म्हणायला हरकत नाही. पण 'उपविभागाचा प्रमुख' असे पद विद्यापीठात अधिकृतपणे ओळखले जात नाही." प्रा. स.ह. देशपांडे यांनी चूक दुरुस्त केली याबद्दल आम्ही आभारी आहोत.

# डॉ. बाबासाहेब आंबेडकर : खोटारडे दैवत?

श्री. अरुण शौरी यांचे *वर्शिपिंग फॉल्स गॉड्स : आंबेडकर ॲण्ड धि फॅक्ट्स वुइच हॅव वीन इरेज्ड* हे पुस्तक वाचण्याची उत्सुकता होती. आजवर माहित नसलेल्या कोणत्या गोष्टी, घटना, त्यांचे तपशील, कागदपत्रे शौरींच्या हाती लागली असतील याविषयी तर्क लढवीत होतो. कारण त्या प्रकारच्या पत्रकारितेसाठी त्यांची विशेष ख्याती झालेली आहे. पुस्तक हाती आले तेव्हा ते झटपट वाचण्याइतकाच वेळ होता. पण अखेरीस संपूर्ण पुस्तक वाचणे झाले नाही. पण जेवढे वाचले तेवढ्याने त्यांना काय म्हणावयाचे आहे ते लक्षात आले.

. डॉ. वावासाहेब आंबेडकरांच्या मृत्यूला चाळीसवर वर्षे होऊन गेली आहेत. स्वतःच्या मोठेपणी ज्यांनी त्यांना राजकारणात सक्रिय असताना पाहिले, त्यांचे लेखन त्या त्या वेळी वाचले, भाषणे ऐकली अशी माणसे आज संख्येने कमी आहेत. भारतीय राजकारणात स्वातंत्र्योत्तर काळात क्रियाशील झालेल्या पिढ्यांमधील – पन्नास-पंचावन्न वयाच्या आतील – वहुतेकांनी वावासाहेवांचे लेखनही वाचलेले नसते. १९५७ पूर्वीच्या घटनांमध्ये त्यांना फारसा रसही नसतो. एक प्रतिमा त्यांनी मनात वागविलेली, जोपासलेली असते. अरुण शौरीही याच पिढ्यांमधील एक. राष्ट्रीय पुढाऱ्यांच्या पंक्तीत त्यांना स्थान दिले गेले, 'आधुनिक मनु' म्हणून त्यांचा गौरव केला गेला, दलित राजकारणाच्या ओघात त्यांना एकमेवाद्वितीय महत्त्व प्राप्त झाले, आणि त्यांचे दैवतीकरण केले गेले त्यानंतरच शौरींचा आंबेडकरांशी म्हणजे त्यांच्या प्रतिमेशी 'परिचय' झाला असावा.

आंबेडकरांचे नाव घेऊन, त्यांच्यावरील निष्ठेचा पुनःपुन्हा उच्चार करीत आक्रमक, कट्टर व अलगतावादी राजकारण केले जाऊ लागले तेव्हा, वहुधा, शौरींचे मत विरोधी वनले. आणि खुद्द वावासाहेवांच्याच लेखनाचा, राजकीय चरित्राचा अभ्यास वारकाईने करण्यास मग ते प्रवृत्त झाले. अभ्यासाच्या ओघात जे जे त्यांना आढळले त्याने त्यांना मोठा धक्का वसला असला पाहिजे. आंवेडकर हे एक खोटे दैवत आहे, त्यांचे खरे स्वरूप सर्वांसमोर उघडे केले पाहिजे असे त्यांना तीव्रपणे वाटले. या वाटण्यामधून या पुस्तकाचे लेखन झाले आहे. शौरींचा संताप सात्त्विक आहे व तो प्रामाणिक आहे.

पण तो सर्वस्वी अनाठायी आहे. 'इतिहासाच्या ग्रंथामधून वाद केलेली, पुसून टाकलेली तथ्ये' असे खरोखर म्हणता येते का? याचे उत्तर निःसंदिग्ध 'नाही' असे आहे. कारण, ज्यांना त्यांचे लेखन वाचावयाचे असेल त्यांच्यासाठी ते उपलब्ध आहे. एकत्रित करून उपलब्ध करून देण्याचे काम महाराष्ट्र शासनाने केले आहे. धनंजय कीर यांचे आंबेडकरांचे चरित्र, त्यांच्याविषयी आदरभाव वाळगून लिहिले असले तरी, वस्तुनिष्ठ आहे; ते पुरेसे चिकित्सक नाही असे म्हणता येईल. तात्पर्य काय? आंबेडकरांविषयी जाणूनबुजून घोर अज्ञान पसरवून, तथ्यांवर वोळा फिरवून त्यांचे दैवतीकरण केले गेले आहे असे जे सूचन शौरींनी ग्रंथाला दिलेल्या नावात आहे ते निराधार आहे.

– २ –

डॉ. वावासाहेव आंवेडकरांचे दैवतीकरण केले गेले आहे यात काही शंका नाही. दैवतीकरण हा भारतीय मानसाचा एक विशेष आहे, व्यवच्छेदक लक्षण आहे, असेही म्हणता येईल.

कोणी कोणी त्यांना दैवत वनविले आहे आणि का, याचा विनम्र वृत्तीने, मोकळ्या मनाने शौरी यांनी शोध घेतला नाही. 'शोध पत्रकारिते'च्या गाभ्याशी वहुतेक वेळा एक आत्मप्रौढी आढळते आणि निर्दयताही. कोणाला तरी 'उघडे पाडण्या'त एक मोठे साहस आपण केले आहे, मोठे कर्तृत्व गाजविले आहे, अशी भावना वळावते. शौरी यांच्या लेखनात याचा वास सारखा येत राहतो. आणि हा दुर्गंध आहे.

वावासाहेवांना अनुसरून श्रद्धेने – निःसंदेह श्रद्धेने – आणि त्यांच्याविषयी टोकाची आपलेपणाची भावना वाळगून मुख्यत्वेकरून त्यांच्या समाजातील ज्या लाखो लोकांनी वौद्ध धम्माची दीक्षा घेतली आहे त्यांनी वावासाहेवांचे दैवतीकरण केले आहे. तो त्यांच्या दैवतीकरणाचा, अनेकांपैकी एक प्रकार आहे. त्यांच्या लेखी वावासाहेव हा आजच्या काळातला भगवान








बुद्धांचा अवतारच; असे म्हणण्याने त्यांच्या भावनेला न्याय देणे होईल. नागपूर येथील दीक्षा भूमीवर दर वर्षी लाखोंच्या संख्येने नवबौद्ध दीक्षादिनाच्या दिवशी एकत्र येतात; तसेच, ६ डिसेंबर व १४ एप्रिल या दोन दिवशी दादर येथील चैत्यभूमीच्या जागी दर्शनासाठी प्रचंड रांगा लागतात. ज्या भक्तिभावाने माणसे येतात त्याचा स्पर्श पाहणाऱ्याला उन्नत करून जातो, भलेही त्याच्या ठायी बाबासाहेबांविषयी तो भक्तिभाव नसेना का. भाविकांची ती 'गर्दी' पाहून डोळ्यांचे पारणे फिटते.

बाबासाहेबांचे हे दैवतीकरण कमालीचे हृद्य आहे, सुंदर आहे. भाविकांच्या नजरेत श्रीराम वा श्रीकृष्ण हे जसे 'मर्यादा पुरुषोत्तम' व 'पूर्ण पुरुष' आहेत तसेच बाबासाहेबही या साध्याभोळ्या भाविकांच्या नजरेत पूर्ण पुरुष आहेत. त्यांच्या लेखी त्यांचे ऐतिहासिक व्यक्तित्व व चरित्र कधीच लुप्त झालेले आहे. एक राजकीय-सामाजिक पुढारी म्हणून ते बाबासाहेबांकडे पाहत नाहीत. तुलनाच करावयाची झाली तर ती येशू ख्रिस्त वा महंमद पैगंबर यांच्याशी करायला लागेल.

बाबासाहेबांचे हे दैवतीकरण माझ्या मते विधायक आहे; भाविक अनुयायी भक्तिभावाने त्यांच्यात सर्वगुणसंपन्न श्रेष्ठ नैतिक पुरुषच पाहत असल्याने, ही भक्ती त्यांनाही उन्नतच करीत असते.

– ३ –

आंबेडकरांचे आणखी एका प्रकारचे दैवतीकरण केले गेले आहे. त्यांच्या आधाराने ज्यांना राजकारण, समाजकारण करावयाचे आहे त्या राजकारण्यांनी, बुद्धिवंतांनी यात पुढाकार घेतला आहे. याच जातकुळीचे दैवतीकरण अलीकडच्या काळात, शिवाजीमहाराज, महात्मा फुले, छत्रपती शाहू महाराज, इंदिरा गांधी यांचे केले गेले आहे.

या प्रक्रियेसाठी, या व्यक्तींचे ऐतिहासिकपण कायम ठेवणे ही एक आवश्यक पूर्वशर्त असते. ऐतिहासिकपण कायम ठेवून, त्याच वेळी, आपल्या राजकारण-समाजकारण-विचारकारण यांच्या सोयीने त्यांची एक अधिकृत व एकमेव प्रतिमा सिद्ध करणे ही देखील गरज असते. 'अधिकृत व एकमेव'चा अर्थ असा : समाजातील इतरांनी ती प्रतिमा आम्ही सादर करू तशी स्वीकारली पाहिजे; कोणत्याही प्रकारे चिकित्सा करता कामा नये वा शंका उपस्थित करता कामा नये, असा आग्रह बाळगलेला असतो. या प्रतिमेत बदल करावयाचे सर्व अधिकार राखून ठेवलेले असतात.

अशी प्रतिमा जोपासून, तिच्या आधारे केले जाणारे राजकारण (समाजकारण, विचारकारण हेही राजकारणाचे एक अंग असते) हे स्वभावतः, अपरिहार्यपणे, कट्टर, असहिष्णू व मूलतत्त्ववादी असते. किंबहुना, असे राजकारण करावयाचे असेल तर अशी एक अधिकृत व एकमेव प्रतिमा निर्माण करणे, वा अधिकृत व एकमेव इतिहास रचणे आवश्यक असते. या प्रतिमेचे/इतिहासाचे रक्षण करणेही, अर्थातच, मग अत्यावश्यक ठरते.

ही सारी प्रक्रिया कशी घडते, तिचे स्वरूप काय असते, तिचा वापर कसा व कशासाठी केला जातो, त्यामधून कोणते परिणाम उद्‌भवतात, ते किती घातक असतात, आणि त्यातून कोणती अमानुषता व क्रौर्य यांची निर्मिती होते याचा उत्कृष्ट वस्तुपाठ आपल्याला साम्यवादी राष्ट्रांमध्ये पाहावयास मिळालेला आहे.

बाबासाहेबांचे असे दैवतीकरण करणे ही दलित समाजामध्ये उभारी निर्माण करण्या व टिकविण्यासाठी गरजेचे आहे; अशा दैवताभोवतीच एकजूट उत्पन्न करणे व संघटन बांधणे शक्य आहे, असे समर्थन केले जाते ही परिचयाची गोष्ट आहे. एक प्रकारची अचिकित्सक, निःशंक, सर्वंकष निष्ठा रुजवूनच राजकीय शक्ती निर्माण होऊ शकेल; चिकित्सेला वाव दिल्याने बुद्धिभेद होऊन दुबळेपणा उत्पन्न होतो, असाही युक्तिवाद केला जातो.

दैवतीकरणाच्या प्रक्रियेचे स्वरूप जाणून घेण्याच्या दृष्टीने दोन घटनांचे उदाहरण घेऊ. भारतीय संविधानाचे सारे श्रेय बाबासाहेबांना नाही; अनेक तोलामोलाचे घटनातज्ज्ञ कायदेपंडित एकत्र आले होते, व घटना परिषदेचे अनेकानेक सदस्यही सक्रियपणे सहभागी होते, असे कोणी म्हटले तर गदारोळ उठतो. 'येरवडा करार' या नावाने प्रसिद्ध असलेल्या कराराचे, या घटनेचे एक चित्रण असे केले जाते की, गोलमेज परिषदेमध्ये अस्पृश्य समाजासाठी जे बाबासाहेबांनी महत्प्रयासाने मिळविले ते गांधींच्या प्राणांतिक उपोषणाच्या दबावाखाली त्यांना गमवावे लागले आणि यामुळे पूर्वास्पृश्यांची कधीही भरून न येणारी हानी झाली. विभक्त मतदारसंघ असते तर राजकीय सत्ता कितीतरी अधिक हाती आली असती. दयार्द्र बुद्धीने गांधींचे प्राण बाबासाहेबांनी वाचविले, पण सवर्ण समाजाने कृतज्ञताबुद्धी

अनुक्रमणिका

राखलेली नाही, हाही या चित्रणाचा भाग असतो. आता, जर असे म्हटले की, श्री. चां.भ. खैरमोडे यांच्या आंबेडकर चरित्रातील हकीकत काही वेगळे सांगते, तर 'बघू या तरी, काय वेगळे त्या चरित्रात आहे' असेही म्हटले जात नाही. आम्ही सांगतो तोच एकमेव सत्य वृत्तान्त अशी भूमिका असते.

थोडक्यात, ऐतिहासिक घटनांची सत्यासत्यता निश्चित करण्याच्या ज्या प्रमाण रीती आहेत त्यांचा वापर करून आंबेडकरांच्या चरित्राविषयी, चिकित्सक दृष्टिकोण बाळगून, चर्चा करण्याचा मोकळेपणा आढळून येत नाही. हीच गोष्ट त्यांच्या लेखनाविषयी वा वेगवेगळ्या भूमिका, प्रतिपादने यांच्याविषयी आढळते. बाबासाहेबांचा शब्द अंतिम व प्रमाण अशी भूमिका आढळते.

– ४ –

बाबासाहेबांचे राजकारणी हेतूंनी जे दैवतीकरण केले जात आहे त्यामुळे इतिहासाचा, सत्याचा विपर्यास घडून येत आहे अशी भूमिका घेऊन अरुण शौरी त्यांचे पुस्तक लिहू शकले असते. आंबेडकरांच्या भूमिकांचे, राजकारणाचे, त्या काल-खंडातील इतिहासाचे यथार्थ चित्रण करण्याचे उद्दिष्ट ते डोळ्यांसमोर ठेवू शकले असते. मग तो हल्ला, बाबासाहेबांवर नसून, त्यांची एक विशिष्ट प्रतिमा उभी करून स्वतःचे राजकारण करणाऱ्या राजकारण्यांवर प्रामुख्याने झाला असता. आंबेडकरांविषयी अधिक सम्यक समज उत्पन्न होण्यात शौरींच्या परखड विश्लेषणाची मदतही होऊ शकली असती.

अरुण शौरींचा रोख सरळ सरळ आंबेडकरांवरच आहे. नवभारताची जडणघडण करणाऱ्या राष्ट्रीय पुढाऱ्यांच्या मालिकेत समावेश करण्याची पात्रता नसलेली, किंबहुना राष्ट्राचा घात करणाऱ्यांच्या मालिकेत जिचा समावेश करावा अशी वस्तुतः आंबेडकर ही व्यक्ती होती, असा त्यांचा निवाडा आहे.

हा त्यांचा प्रामाणिक निवाडा आहे ही गोष्ट प्रथमतः मान्य केली पाहिजे. हिंदुत्ववादी राजकारणी शक्तींनी आंबेडकरांची बदनामी करावयाचे ठरविले, आणि या कटकारस्थानानुसार शौरी यांनी ग्रंथलेखन केले असा आरोप केला गेला आहे. या आरोपात तथ्य आहे असे मला वाटत नाही. उलटपक्षी, हिंदुत्ववाद्यांची आजची रणनीती वेगळीच आहे. हिंदुत्ववादी राष्ट्रपुरुषांच्या मालिकेत बाबासाहेबांना मानाचे स्थान देणे, सावरकर, हेडगेवार यांच्या इतकेच आंबेडकरही हिंदुत्ववादी होते असे दाखवून देणे, ही रणनीती आहे. गांधी व काँग्रेस यांच्याशी आंबेडकरांचे शत्रुत्व होते, त्यांच्या विरोधात त्यांनी दीर्घकाळ राजकारण केले याचा फायदा उठवून विशिष्ट प्रकारचे समरसतेचे व बेरजेचे राजकारण करणे ही चाल आहे. शौरींचे पुस्तक त्यांना अडचणीत आणणारे आहे. हा ग्रंथ शौरींनी हिंदुत्ववादी राजकारणाचा भाग म्हणून लिहिला हा आरोप याकारणाने चुकीचा आहे.

शौरींच्या या पुस्तकाच्या संदर्भात दोन इंग्रजी म्हणींची आठवण होते. 'Fools rush in where angels fear to tread' आणि 'Bull in a China shop' या त्या दोन म्हणी होत. शौरींनी स्वतःचे हसे करून घेतले आहे. या पुस्तकाच्या लेखनाने तेच उघडे पडले आहेत. एका विशिष्ट प्रकारची शोध-पत्रकारिता, विद्वत्ता किती कोती असते, अडाणी ठरू शकते याचा नमुनाच जणू सादर करावयाचे शौरींनी ठरविले! 'ग'ची बाधा झाल्याचे तर हे चिन्ह नाही?

– ५ –

अरुण शौरींना आंबेडकर समजलेच नाहीत असे त्यांचे पुस्तक वाचल्यावर लक्षात आले. राजकारणाच्या आखाड्यात उतरण्यामागच्या आंबेडकरांच्या प्रेरणा कोणत्या, हा प्रश्न शौरींनी स्वतःला विचारलाच नाही. त्यांच्या चरित्राचे महत्त्वाचे टप्पे कोणते याचाही विचार शौरींनी केल्याचे दिसत नाही.

बाबासाहेबांचे माध्यमिक शाळेतील शिक्षण, महाविद्यालयीन शिक्षण मुंबईत झाले. १९०७ ते १९१२ या काळात ते एल्फिन्स्टन महाविद्यालयाचे विद्यार्थी होते. मनःपूर्वकतेने ते खूप वाचन करावयाचे, विविध विषयांवरील पुस्तकांचे वाचन करावयाचे असे कीर यांनी नमूद केले आहे. अस्पृश्य म्हणून मिळणाऱ्या मानहानीकारक वागणुकीचा अनुभव बाबासाहेबांना आला असेलच. त्यावर कीर यांनी भर दिलाही आहे. पण मुंबईतले वातावरण, विशेषतः एल्फिन्स्टन शाळेतील व महाविद्यालयातील वातावरण सुधारकी राहिले असणार. मुंबई बेट सतराव्या शतकापासून ईस्ट इंडिया कंपनीच्या अधिकारात होते, आणि पेशवाईतल्या, विशेषतः उत्तर पेशवाईतल्या संकुचित, कट्टर ब्राह्मणी वातावरणापासून मुंबई नेहमीच मुक्त राहिली, या गोष्टी ध्यानात ठेवावयास हव्यात. फेरोजशहा मेथांच्या मुंबईच्या 'अनभिषिक्त राजे'पदाचा हा काळ होता. नामदार गोपाळ कृष्ण गोखले यांचे नेतृत्व अखिल भारतीय पातळीवर








वहरास आले तो हा काळ होता. मोर्ले-मिंटो सुधारणांसाठीच्या वाटाघाटींचा व स्वीकृतीचा हा काळ होता. मुंबईच्या सुधारकी, राजकीयदृष्ट्या अत्यंत जागरूक काळात आंबेडकरांच्या मनाची, बुद्धीची जडणघडण होत होती याकडे कीर यांचेही जायला हवे तेवढे लक्ष गेलेले नाही.

थोर पुरुषाच्या पदवीस आपण पोचणार, आपल्या हातून मोठे कार्य घडणार, आपण पुढारीपण करणार हे आपले भवितव्य आहे, विधिलिखित आहे ही धारणा खोलवर बाबासाहेबांच्या मनात रुजली होती असे श्री. खैरमोडे यांनी त्यांच्या आंबेडकरांच्या चरित्रात म्हटले आहे. १९१२ साली बी.ए.ची पदवी घेतल्या घेतल्या आंबेडकर सातासमुद्रापलीकडे उच्च शिक्षणासाठी जातात हा केवळ अपघात वा योगायोग असू शकत नाही. वरकरणी तसे दिसते, भासते. पण एक जबरदस्त शक्तिशाली प्रेरणा, उच्च आकांक्षा क्रियाशील राहिली असली पाहिजे.

आंबेडकर 'नव्या जगा'चे, आधुनिक जमान्याचे, जन-सामान्यांच्या लोकशाहीचे प्रतीक असलेल्या अमेरिकेत, त्यातही न्यूयॉर्क या महानगरामधील कोलंबिया विद्यापीठात प्रवेश घेतात, आणि अर्थशास्त्र, समाजशास्त्र, राज्यशास्त्र या विषयांमध्ये अध्ययन करणे पसंत करतात याची विशेष नोंद घ्यायला हवी. एम.ए. व पीएच.डी. साठी त्यांनी अर्थशास्त्रीय विषय निवडले. त्यांच्या पीएच.डी. प्रबंधाचा विषय 'नॅशनल डिव्हिडंड ऑफ इंडिया – ए हिस्टॉरिकल ॲण्ड ॲनॅलिटिकल स्टडी' हा होता. हिंदुस्थानवर ब्रिटिशांनी जे राज्य प्रस्थापित केले होते त्याने एका बाजूला शांतता व सुव्यवस्था प्रस्थापित झाली होती ही गोष्ट खरी; पण हिंदुस्थानचे जबर आर्थिक शोषण चालविले होते, आणि त्यामुळे देश दरिद्री बनत चालला होता हा या काळातील हिंदी राजकीय पुढाऱ्यांच्या व अभ्यासकांच्या टीकेचा एक मुख्य मुद्दा होता. दादाभाई नवरोजी यांच्या *पॉव्हर्टी ॲण्ड अन-ब्रिटिश रूल इन इंडिया* या ग्रंथाची येथे आठवण व्हावी. आंबेडकर अमेरिकेत होते. ब्रिटनविरुद्ध बंडखोरी करून, युद्ध करून अमेरिका स्वतंत्र झाली होती.

हा सगळा तपशील अशासाठी दिला की, आंबेडकरांचा मन:पिंड, त्यांची जडणघडण व त्यांची परंपरा लक्षात यावी. त्यांची वृत्ती बंडखोर, व्यक्तिस्वातंत्र्य व समता ही मूल्ये श्रेष्ठतम मानणारी, लोकशाही विचारव्यूहाशी निष्ठा, हिंदुस्थानला स्वतंत्र करण्यासाठी चाललेल्या कार्यात सहभाग देण्याची, त्याच वेळी आपण ज्या अस्पृश्य समाजात जन्माला आलो त्या समाजाचा उद्धार/मुक्ती घडवून आणण्याची आकांक्षा, हे स्वभावविशेष लक्षात येतात.

१९१७ साली आंबेडकर हिंदुस्थानात परतले तेव्हा त्यांची राजकीय विचारप्रणाली कोणती होती असे जर विचारले तर, 'लिबरल लोकशाहीनिष्ठ राष्ट्रवादी' असे उत्तर द्यावे लागेल. मार्क्सवादाचा चिकित्सक परिचय त्यांना अमेरिकेत झाला होता. त्यांचे प्राध्यापक एडविन आर.ए. सेलिगमन यांचे आर्थिक इतिहासविषयक मार्क्सवादी सिद्धान्ताची चिकित्सा करणारे एक पुस्तकही प्रसिद्ध आहे. आंबेडकरांनी मार्क्सवाद विचारपूर्वक नाकारला होता असे म्हणता येते.

आंबेडकर जेव्हा मुंबईला परतले तेव्हा महाराष्ट्रातल्या राजकारणाचे चित्र काय होते? हिंदुस्थानातल्या राजकारणाचे चित्र काय होते? काँग्रेस संघटना जहालांच्या वर्चस्वाखाली आलेली होती. लोकमान्य टिळक हे प्रमुख नेते. महाराष्ट्रात ब्राह्मणेतर पक्ष टिळक पक्षाविरुद्ध संघटित झालेला होता. लिबरल पक्ष टिळक पक्षाच्या विरोधात व ब्राह्मणेतर पक्षासोबत होता. टिळक पक्षाची म्हणजे जहालांची भूमिका ब्रिटिश राजवटीशी झोंबी घेण्याची आणि तरीही पूर्ण असहकाराची वा सरळ सरळ विरोधाची नव्हती. ती 'प्रतियोगी सहकारिते'ची होती. अनेक राष्ट्रवादी व्यक्ती एकाच वेळी काँग्रेसच्या विरोधात आणि ब्रिटिश राजवटीशी सहकार्य करण्याची भूमिका घेत. ही शिष्टमान्य व सन्माननीय भूमिका होती.

राजकारणात प्रवेश होण्यापूर्वी आंबेडकरांचा सार्वजनिक जीवनामध्ये एक अर्थतज्ज्ञ म्हणून प्रवेश झाला. डॉ. धनंजयराव गाडगीळ हे महाराष्ट्रातले अर्थशास्त्रज्ञांच्या अव्वल पिढीतले. आंबेडकर त्यांच्याही आधीचे. अर्थतज्ज्ञ म्हणून ग.वा. जोशी व नामदार गोपाळ कृष्ण गोखले यांनी १९व्या शतकाच्या अखेरीस मान्यता मिळविली होती. वेल्बी आयोगापुढे साक्ष द्यायला गोखले १८९७ साली इंग्लंडला गेले होते. आंबेडकर यांना या प्रकारची मान्यता त्यांच्या विद्वत्तापूर्ण प्रबंधामुळे मिळाली तेव्हा ते अवघे २५-२६ वर्षांचे होते. याच सुमारास माँटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणांतर्गत नेमलेल्या साऊथबरो फ्रँचाइज कमिटीपुढे त्यांची अस्पृश्य वर्गातले एक विद्वान गृहस्थ म्हणून साक्ष झाली. या वेळी ते मुंबईच्या सिडनहॅम कॉलेजात प्राध्यापक होते.

या काळात अलौकिक जाण बाळगणारे दोन मराठी भाषिक संस्थानिक हिंदुस्थानात होते. एक बडोदा संस्थानचे

अनुक्रमणिका






नरेश महाराजा सयाजीराव गायकवाड आणि दुसरे कोल्हापूरकर छत्रपती शाहू महाराज. एकांच्या सहाय्याने आंबेडकरांचे शिक्षण पार पडले. आणि दुसऱ्यांच्या पुढाकाराने आंबेडकरांचा राजकारणात प्रवेश झाला. आंबेडकरांचे शिक्षण संपल्यावर गायकवाडांनी आंबेडकरांच्या पुढच्या आयुष्यात सक्रिय लक्ष घातले असे दिसत नाही; तर शाहू छत्रपतींनी आंबेडकरांची सतत पुष्टी केली. संस्थानिक असल्याने यांना ब्रिटिश राजवटीस राजी राखणे गरजेचे असे. पण एरवी या दोघांचा बाणा स्वतंत्र होता. दूरदृष्टी होती. संस्थानिक असल्याने पडणाऱ्या मर्यादांमध्ये, हे दोघेही नरेश देशभक्त होते.

बाबासाहेबांकडे आलेली भूमिका एकपदरी वा सरळसोट नव्हती. अस्पृश्य समाजाचे नेतृत्व 'मार्गदर्शक, तत्त्वज्ञ व मित्र' म्हणून त्यांनी करावे ही समाजाची अपेक्षा होती. त्यांचीही ती आकांक्षा होती. त्यांच्या विद्वत्तेमुळे, तज्ज्ञतेमुळेही एक भूमिका त्यांच्याकडे चालून आली होती. अस्पृश्यांच्या हितसंबंधांचे प्रवक्तेपण व प्रतिनिधित्व करण्याची, प्रागतिक ब्राह्मणेतर लिबरल या भूमिकेतून राजकारण करण्याचीही संधी चालून आली तेव्हा त्यांनी ती घेतली.

महाराष्ट्रात सनातन्यांची कड घेणारा, आक्रमक व दुराग्रही टिळक पक्ष जर काँग्रेस पक्षात प्रभुत्वपदी नसता, न्या. रानडे व नामदार गोखले यांच्या परंपरेतील नेमस्त लिबरल नेत्यांच्या हाती काँग्रेस असती तर? पण काँग्रेस टिळकपक्षीयांच्या हाती होती, आणि शाहू महाराजांमुळे बाबासाहेबांचा राजकारण-प्रवेश काँग्रेसच्या विरोधी बाजूने झाला.

माँटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणांनी जात-जमात-धर्मवार मतदार-संघांचा व प्रतिनिधित्वाचा मुद्दा हिंदी राजकारणाच्या रंगमंचावरचा एक मुख्य मुद्दा बनविला. राष्ट्रवादाच्या पोटात फुटीर, अलगता-वादी प्रवृत्ती उफाळून आल्या. स्पर्धा वाढली. जागा वाटपावरून एक कट्टर आग्रह बाढीस लागला. आंबेडकरांचा राजकारणातील प्रवेश या पार्श्वभूमीवर झाला, ही गोष्टही विसरून चालणार नाही.

आंबेडकरांवर अंशतः येऊन पडलेल्या, अंशतः त्यांनी बुद्ध्या अंगीकारलेल्या भूमिकेतली गुंतागुंत, अंतर्गत अटळ ताण व विसंवाद, सामाजिक परिस्थितीमधून येणारी दडपणे व पडणाऱ्या मर्यादा यांची समज शौरींपाशी आढळत नाही. अस्पृश्यांसह सर्व ब्राह्मणेतर जातीयांची एक शक्तिशाली चळवळ उभारण्याची आकांक्षा शाहू महाराजांनी बाळगली होती. ती काँग्रेसविरोधी राहावी असे त्यांच्या योजनेत होते जरूर; पण तिचेही दूरगामी उद्दिष्ट स्वयंनिर्णयाचा व स्वयंशासनाचा अधिकार प्राप्त करून घेण्याचेच राहिले असते. केवळ अस्पृश्यांचे पुढारी म्हणून नव्हे तर या चळवळीचे एक नेते म्हणून शाहू महाराज आंबेडकरांकडे पाहत असावेत. पण अतिशूद्रांसोबत शूद्र बनून एकजुटीने क्रांतिकारक सामाजिक सुधारणा व त्याच वेळी राजकीय हक्कांसाठी संघर्ष करणारी चळवळ बांधण्याची तयारी ब्राह्मणेतर नेतृत्वाची नसल्याने, आंबेडकर या चळवळीत टिकून राहणे अशक्य ठरले.

पं. हृदयनाथ कुंझरू, तेजबहादूर सप्रू, बॅ. जयकर आदींप्रमाणे लिबरल राजकारणी म्हणून आंबेडकरांचा सहभाग राहू शकला असता का? या भूमिकेला साजेशी विद्वत्ता व विचारप्रणाली आंबेडकरांपाशी निश्चितच होती. पण अस्पृश्य जातीयांचे प्रवक्तेपण करण्याची एक खास जबाबदारी त्यांच्यावर येऊन पडली होती. ही भूमिका पार पाडण्यात त्यांना रसही होता. त्यांची आकांक्षाही जोडीला होतीच. तिचा आशय व रोख राजकारणी होता.

कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे यांचाही एक नमूना त्या काळी आंबेडकरांसमोर होता. डिप्रेस्ड क्लासेस मिशन या संस्थेमार्फत अस्पृश्यांचे शिक्षण, त्यांची सुधारणा, व त्यांच्या हक्कांविषयी जागृती आणण्याचे कार्य शिंदे यांनी निष्ठेने चालविले होते. कर्मवीरांपाशी राजकीय दृष्टी व जाण जरूर होती. पण ते त्या काळी सरळ सरळ राजकीय चळवळ संघटित करण्याचे काम करीत नव्हते. आंबेडकरांना राजकीय चळवळ उत्पन्न करण्यात रस होता. शाहू महाराजांमुळे त्यांचे पाऊल त्या दिशेने पडलेही होते.

काँग्रेसमध्ये बाबासाहेब न जाण्याची अनेक कारणे होती. महाराष्ट्रात टिळकपक्षाच्या हाती काँग्रेस होती हे एक. काँग्रेस अस्पृश्यांविषयी सहानुभूती प्रकट करण्यापर्यंत आली असली तरी, तिचे मुख्य लक्ष्य सर्वांसाठी राजकीय हक्क प्राप्त करून घेण्याचे होते. उच्चवर्णीयांचे, उच्चशिक्षित वर्गीयांचेच केवळ हितसंबंध साधणे हे तिचे उद्दिष्ट होते हा आरोप खरा नाही. पण ती मुख्यत्वेकरून त्यांची चळवळ होती ही गोष्ट खरीच. अस्पृश्य जातीयांची जागृती, त्यांचे संघटन, त्यांचे राजकारण यांना गौण स्थान होते.

याच सुमारास, १९१९-२० या दोन वर्षांमध्ये महात्मा गांधींनी काँग्रेसचा कायापालट घडवून आणला. खिलाफत

अनुक्रमणिका

चळवळीची पुष्टी त्यांनी केली; तिचे नेतृत्वही केले. आंबेडकर हे हाडाचे लिबरल, सनदशीर घटनात्मक मार्गाचे पुरस्कर्ते तर होतेच, पण त्यांची मते मुस्लिम राजकारणाविषयी प्रतिकूलही होती. धार्मिक मुद्याला प्राधान्य देऊन, धर्मश्रद्ध व अडाणी जनांना रस्त्यावर आणण्याचे राजकारण त्यांच्या पसंतीला उतरणारे नव्हते. असहकाराचा लढाही त्यांना आकृष्ट करू शकला नाही. अस्पृश्य मतदारसंघाची बांधणी करणे, त्यांच्यासाठी विधिमंडळामध्ये राखीव प्रतिनिधित्व मिळविणे, जागांचे वाटप योग्य प्रकारे होईल याविषयी प्रयत्न करणे ही त्यांची राजकीय उद्दिष्टे होती. अस्पृश्यांचे प्रवक्ते म्हणून विधिमंडळावर निवडून जाऊन गोखल्यांसारखे राजकारण करावयाचे लक्ष्य त्यांनी स्वतःसमोर ठेवले असण्याची शक्यता आहे. ती भूमिका त्यांना मानवणारी होती.

पाश्चात्त्य विद्याविभूषित बाबासाहेब आधुनिक, सेक्युलर बुद्धिप्रामाण्यवादी (रॅशनॅलिस्ट) होते. पाश्चात्त्य सभ्यता व संस्कृती त्यांनी, त्या काळी तरी, पूर्णपणे व मनःपूर्वकतेने स्वीकारली होती. जातिव्यवस्था व स्पृश्यास्पृश्यता यांच्याकडे पाहण्याची त्यांची दृष्टी पाश्चात्त्य समाजशास्त्राची होती. महात्मा गांधींनी विचारपूर्वक आधुनिक पाश्चात्त्य सभ्यता व संस्कृती नाकारली होती. त्यांची जीवनसरणी व विचार बरकरणी सनातनी वळणाचे होते. सांसदीय लोकशाहीचे खंडनच त्यांनी केले होते. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचा प्रश्न विधिमंडळातल्या राजकारणाद्वारे, घटनात्मक सुधारणांच्या मार्गाने सोडविण्यावर त्यांचा भर नव्हता. त्यांची स्वातंत्र्य व स्वराज्य यांची कल्पना मूलतः वेगळी होती. ज्या काँग्रेसमध्ये गांधींचे नेतृत्व निर्विवादपणे प्रस्थापित झाले त्या काँग्रेसमध्ये बाबासाहेब जाण्याची कल्पनाच करता येत नाही.

फासे असे पडले होते की, काँग्रेस व गांधी आणि आंबेडकर यांच्यात विरोध व संघर्ष अटळ ठरावा.

– ६ –

ब्रिटिशांनी स्वेच्छापूर्वक केलेल्या सत्तांतराच्या स्वरूपात हिंदुस्थानला राजकीय स्वातंत्र्य प्राप्त झाले. भारत आणि पाकिस्तान अशी दोन स्वतंत्र राष्ट्र-राज्ये स्थापन करून ब्रिटिशांनी सत्तांतर केले. काँग्रेसच्या झेंड्याखाली १९२० नंतरच्या गांधीपर्वात जो स्वातंत्र्यलढा झाला त्याला स्वातंत्र्य-संपादनाचे संपूर्ण वा एकमेव श्रेय देता येत नाही, याचे हे एक ठळक कारण तर आहेच. ब्रिटिश राजवटीच्या काळात वेळोवेळी घटनात्मक सुधारणा होत गेल्या, त्यांच्या द्वारेही स्वातंत्र्याच्या दिशेने पाऊल पुढे पडत गेले. वेगवेगळ्या स्तरांवरील विधिमंडळांमध्ये ज्यांनी विरोधीपक्षीय बाकांवरून वा सरकारपक्षीय बनून सुधारणा राबविल्या त्यांनीही स्वातंत्र्याच्या दिशेने वाटचाल होण्यात महत्त्वपूर्ण कामगिरी बजावली. सशस्त्र क्रांतिकारकांची दहशतवादी कृत्ये, नेताजी सुभाष बोस यांच्या नेतृत्वाखालची आझाद हिंद सेना, नाविकांचे बंड यांचाही काही वाटा आपण मान्य करतोच.

प्रश्न राहतो तो मुस्लिम लीग, हिंदू महासभा, ब्राह्मणेतर चळवळी, अन्य राजकीय पक्ष यांचा. हा प्रश्न का निर्माण होतो? मुस्लिम लीगचे उदाहरण आपण घेऊ. मुस्लिम लीगची स्थापना व्हायच्या आधी वीस वर्षे राष्ट्रसभेची स्थापना झाली. राष्ट्रसभेच्या विरोधात, तिच्या राजकारणाला शह देण्यासाठी मुस्लिम लीगची स्थापना झाली. स्वातंत्र्याचे राजकारण काँग्रेस करीत होती; सत्तेत वाटा मागण्या-मिळविण्याचे राजकारण, ब्रिटिश राजवटीला साथ देत, लीग करीत राहिली. काँग्रेसच्या प्रयत्नांना यश मिळण्यापेक्षा येथे ब्रिटिशांची राजवट टिकून राहणे इष्ट अशी भूमिका लीगची होती. या भूमिकेत १९३५ नंतरच्या काळात फरक पडला. पाकिस्तानची मागणी पुढे आली. मुस्लिम लीगची समर्थक मंडळी औपचारिकतः असे म्हणूच शकतात की, प्रथमपासून आम्ही देशभक्त व राष्ट्रवादी होतोच. पण दीर्घकाळपावेतो तिने ब्रिटिशांची हातमिळवणी करून काँग्रेसच्या स्वातंत्र्यलढ्याचे खच्चीकरण करण्याचे राजकारण केले ही वस्तुस्थिती आपल्याला खुपत राहतेच.

भारताच्या स्वातंत्र्याचा मुख्य लढा काँग्रेसच्या झेंड्याखाली झाला; तो लढा १९२० नंतरच्या काळात लोकलढ्याच्या स्वरूपात व्यापक व तीव्र झाला तेव्हा, या देशावर आपण फार काळ राज्य करू शकणार नाही व करण्याची गोष्ट करणे योग्यही नाही, असे राज्यकर्त्यांच्या मनात ठसले. हिंदी समाजातीलच अन्य जातीजमाती, धर्मीय समूह यांना हाताशी धरून काँग्रेसला शह देण्याचा प्रयत्न अयशस्वी झाला, १९३० चा व पुढे १९४२ चा लढा निर्घृणपणे चिरडून टाकण्यात यश मिळाले तरी काँग्रेसची ताकद वाढलीय हे १९३५ च्या, १९४६ च्या निवडणुकांमध्ये सिद्ध झाले, तेव्हा मग सत्तांतराचा निर्णय झाला. या गोष्टी वास्तविक इतिहास म्हणून आपण स्वीकारतो का, हा खरा प्रश्न आहे. तसा तो आहे हा आपला निवाडा

अनुक्रमणिका






असेल तरच, मुस्लिम लीग जे राजकारण खेळली त्यावरील आक्षेप अर्थपूर्ण ठरतो, ही गोष्ट लक्षात घेतली पाहिजे. म्हणजेच, काँग्रेसप्रणीत स्वातंत्र्यलढ्याशी कोणत्या प्रकारचे संबंध राखले हा मुद्दा महत्त्वाचा ठरतो.

आंबेडकरांच्या राजकीय जीवनातल्या पहिल्या टप्प्यात, म्हणजे १९३० पर्यंत, ते काँग्रेसच्या बाहेर व विरोधातच राहिले तरी, त्यांनी स्वतःची भूमिका स्वतंत्र राखली होती. दुसऱ्या गोलमेज परिषदेमध्ये व नंतरच्या काळात त्यांनी सक्रियपणे काँग्रेसचे व गांधींचे शत्रुत्व केले, व हे शत्रुत्व करीत असताना ब्रिटिश राज्यकर्त्यांची साथ केली असे चित्र दिसते. ब्रिटिश राज्यकर्त्यांशी सहकार्य करण्याची गोष्ट याच काळात लिबरल राजकारण्यांनीही केली. इतरही हिंदू पुढाऱ्यांनी केली. पण एक फरक दिसतो. गांधींचे नेतृत्व, काँग्रेसचा झेंडा, सत्याग्रही लढ्याचा मार्ग याबाबतीत तीव्र मतभेद बाळगीत असतानाही, गांधींचे स्थान, काँग्रेसने चालविलेल्या लढ्यांचे महत्त्व त्यांनी ओळखले व मानले असे आढळते. हा विवेक व हे तारतम्य ज्यांनी बाळगले नाही व बाळगण्याविषयी जे बेपर्वा होते त्या नेते मंडळींमध्ये बाबासाहेबांची गणना करावी लागते. खुद्द बाबासाहेबांनी आपले शत्रुत्व लपवून ठेवले नाही. गांधींविषयीचा त्यांचा अनादर सतत व्यक्त होत राहिला.

१९४६ साली निर्णायक क्षण आला. ब्रिटिशांनी सत्तांतर करावयाचे ठरविले. १९४६ च्या निवडणुकांमध्ये मुस्लिम लीग व काँग्रेस यांनी आपापले बळ दाखवून दिल्यावर, सत्तांतराच्या संदर्भात या दोनच पक्षांची दखल घेण्याची भूमिका ब्रिटिशांनी घेतली. निवडणुकांच्या निर्दय व कठोर परीक्षेत, अस्पृश्य जाणीवांचे खरे व मुख्य प्रवक्तेपण व पुढारीपण आपणच करतो हा आंबेडकरांचा दावा खरा सिद्ध झाला नाही. गांधी व काँग्रेस यांचे शत्रुत्व केल्याची, तीक्ष्ण शब्दांत टीकेची झोड उठविल्याची राजकीय किंमत द्यावी लागणार अशी शक्यता निर्माण झाली. काँग्रेसचे पुढारी आपणांस राजकीयदृष्ट्या संपविणार व आपल्या पाठीशी उभ्या राहिलेल्या स्व-जातीयांना निर्दयपणे दडपणार असे एक चित्र त्यांच्या मनात उभे राहिले. बाबासाहेबांचा धीर सुटल्यासारखा झाला. ब्रिटिश राज्यकर्त्यांनी त्याच्या तोंडाला पाने पुसली. काँग्रेसशी व तिच्या पुढाऱ्यांशी जुळवून कसे घ्यायचे, असा पेच उत्पन्न झाला. ही सर्व हकीकत कीर यांच्या चरित्रातही आहेच. शौरींनी काही तपशील नव्याने भरले आहेत. या वेळी, काँग्रेसच्या हाती राज्य देण्यापेक्षा ब्रिटिशांच्याच हाती सत्ता राहिली तर बरे; काँग्रेसची राजवट हे आमच्या समाजाच्या दृष्टीने परत पारतंत्र्यात ढकलले जाणेच ठरणार आहे, अशा आशयाचे मनोगत बाबासाहेबांनी बोलून दाखविले.

बाबासाहेब राष्ट्रवादी नव्हते; त्यांना हिंदुस्थानचे स्वातंत्र्य नकोच होते; बा ते ब्रिटिशांचे हस्तक होते, या आशयाची टीका करण्यात शौरींचा विवेक पार ढळला यात काही शंका नाही. त्यांच्या टीकेचे हे मुद्दे खोडून काढणे सहजी शक्य आहे. ते काम अनेकांनी एव्हाना केले आहे.

गांधी व काँग्रेस यांना विरोध करण्याच्या, त्यांना शत्रू लेखण्याच्या ओघात विवेक व तारतम्य गमावल्याने आंबेडकरांच्या राजकारणात एक कट्टरपणा, अंधळेपणा, एक दुबळेपण उत्पन्न झाले का; हिणकस म्हणता येईल असे राजकारण त्यांनी केले का, याची चर्चा शौरी यांना उपस्थित करता आली असती. आंबेडकरांच्या राजकारणातील प्रमाद, त्यांच्या राजकीय विश्लेषणामधील त्रुटी व राजकीय भूमिकेची मर्यादा तटस्थपणे जाणून घेणे भविष्यकाळातील दलित राजकारणाच्या दृष्टीनेही गरजेचे व उपकारक कसे आहे हे स्पष्ट करण्याचे काम त्यांना करता आले असते. त्यांच्या राजकीय अनुयायांकडून बाबासाहेबांचे केले जाणारे दैवतीकरण, त्यांच्या प्रत्येक भूमिकेचे, मांडणीचे पूर्ण समर्थन करण्याची गोष्ट कशी मतलबी व आत्मघातकी आहे याचे दिग्दर्शन करता आले असते.

विवेक ढळला की, कट्टरपणा व अंधळेपणा कसा उत्पन्न होतो, व्यक्ती त्यांची शिकार कशी ठरते याचे शौरी हेच एक उत्तम उदाहरण ठरले आहेत. राजकारणी हेतूंनी केलेले दैवतीकरण हे स्वतःच्या चिकित्सेचे लक्ष्य बनविण्याऐवजी, आंबेडकर हेच कसे खोटे दैवत आहेत हे सिद्ध करावयाचा चंग शौरींनी बांधला आणि स्वतःची स्थिती Bull in a China shop अशी करून घेतली.

– ७ –

बाबासाहेबांना ब्रिटिशांनी वाऱ्यावर सोडले. फाळणीवरोबर घटना परिषदेचे त्यांचे सभासदत्व रद्द झाले. भारत स्वतंत्र झाला. त्या क्षणी तरी काँग्रेसच्या पुढाऱ्यांच्या हाती कर्तुम्-अकर्तुम् सत्ता होती.

पुढाकार कोणी घेतला, चक्रे कोणी फिरवली याविषयी आज एकवाक्यता नाही. पण बाबासाहेबांना काँग्रेस श्रेष्ठींनी

सन्मानपूर्वक घटना परिषदेवर निवडून आणले. पुढे त्यांना कायदेमंत्री केले. संविधान तयार करण्याच्या संदर्भात विश्वासाने जबाबदारी सोपविली. या गोष्टी निर्विवाद आहेत.

काँग्रेसच्या नेतृत्त्वाने विवेक व तारतम्य प्रकट केले. आपल्या बाजूने शत्रुत्वावर पडदा टाकला. मन मोठे केले. स्वतंत्र भारताच्या व काँग्रेसच्या इतिहासातील हे एक सोनेरी पान आहे. काँग्रेसने पुरस्कारलेली, आकार दिलेली राष्ट्रवादाची विचारप्रणाली लोकशाहीच्या मूल्यांवर व रीतिभातींवर आधारलेली, सुसंस्कृत, उदार, नैतिक प्रणाली होती.

आंबेडकरांचे दैवतीकरण काँग्रेसने केले नाही; त्यांना गांधींसारखे राष्ट्रपिता म्हटले नाही. तरी काँग्रेसच्या नेतृत्वानेच, त्यांचा 'आधुनिक मनू' असा गौरव करून, राष्ट्रपुरुषांच्या पंक्तीत त्यांची प्रतिष्ठापना केली. याचा अर्थ व महत्त्व याकडे शौरी यांचे ध्यान गेलेले नाही. यामागची दूरदृष्टी, शहाणपण, उदार वृत्ती, लोकशाही निष्ठा (जेथे विरोधी पक्षीयही एका खोल पातळीवर सहकारीच असतो याला स्वीकृती असते) शौरींच्या लक्षात आलेला नाही. आंबेडकरांनी १९३० ते १९४७ या काळात केलेले राजकारण, त्या काळातील त्यांची वक्तव्ये, भूमिका, डावपेच यांचा विसर पडलेला नव्हता. 'झाले गेले गंगेला मिळाले' ही वृत्ती बाळगली. जे गंगेला मिळते ते गंगामाई शुद्ध करून घेते, ही श्रद्धाही यात आहे.

याचा अर्थ पुढीलप्रमाणे करणे युक्त होईल : निवडणुकीच्या रणांगणावर आंबेडकरांना काँग्रेस संघटनेने व तिच्या नेतृत्वाने सतत पराभूत केले, त्यांची अगदी नामुष्की ओढवेपर्यंत पराभूत केले. पण विद्वत्ता, जाण, कर्तृत्व, स्वतंत्र बाणा इत्यादी कसोट्यांवर त्यांचे स्थान सर्वोच्च आहे, त्यांच्या जवळपासही कोणी येत नाही, याची जाण कायम राहिली. अस्पृश्यांचे प्रतिनिधी व प्रवक्ते म्हणून कोण श्रेष्ठतम व सर्वाधिक पात्र, तर आंबेडकर, हे उत्तर आहे, हे तारतम्य गमावले नाही.

अस्पृश्यांमधून पुढे आलेल्या कोणाचे तरी दैवतीकरण व्हावे; त्या दैवतामुळे दलितपीडित, गोरगरीब पूर्वास्पृश्य व्यक्तींच्या ठायी आत्मसन्मान व आत्मविश्वास निर्माण व्हावा, उभारी व उमेद वाढावी, पुरुषार्थ प्रकट करण्याची ऊर्मी उत्पन्न व्हावी, याची गरज होती. आजही आहे. देव्हाऱ्यातील या जागी फक्त एका आंबेडकरांचीच प्रतिष्ठापना होऊ शकते, या सत्याला कमी अधिक मोकळ्या मनाने काँग्रेसच्या नेतृत्वाने दिलेली ती अधिमान्यता होती.

– ८ –

शौरींच्या पुस्तकाचे व त्यांचे वाभाडे काढणारी परीक्षणे वा टीकाटिप्पण्या वर्तमानपत्रांमधून प्रसिद्ध झाल्या आहेत. स्वतःच्या अविवेकी व असमंजस लेखनाने त्यांनीच हे सारे ओढवून घेतले असल्याने 'बिचारे शौरी' असे म्हणावयाचे कारण नाही.

पण शौरींवर तुटून पडणाऱ्या मंडळींनाही काही प्रश्न विचारण्याची गरज आहे. आपल्या तात्कालिक राजकारणासाठी आंबेडकरांचे दैवत निर्माण करून ते वापरणाऱ्यांनाही काही प्रश्न विचारण्यासारखे आहेत.

बाबासाहेब हे एक ऐतिहासिक पुरुष होते. सार्वजनिक जीवनात ते जवळपास चाळीस वर्षे क्रियाशील होते. त्यातही सत्तेच्या राजकारणात त्यांनी जाणीवपूर्वक रस घेतला. त्यांच्या सार्वजनिक जीवनातील उक्ती व कृती यांची खुलेपणाने चिकित्सा व्हावी, नीरक्षीरन्यायाने क्षीर वेगळे काढले जावे, त्यांच्या उक्ती-कृतींमधील हीण जाळून केवळ शुद्ध सुवर्णरूपी बोध ग्रहण व्हावा, ही प्रक्रिया साऱ्या भारतीय समाजाच्या उज्ज्वल भवितव्याच्या दृष्टीने उपकारक ठरणारी आहे. तिचे आपण स्वागत केले पाहिजे. त्यांचे आपण अनुयायी असलो तर, अशी तटस्थपणे चिकित्सा आपणच करावी ही अधिकच उपकारक गोष्ट आहे, ही भूमिका वस्तुतः घेतली जायला हवी. शौरींनी बाबासाहेबांच्या खासगी जीवनात 'डोकावण्या'चा उद्योग केलेला नाही. त्यांची सर्व टीका त्यांच्या उक्ती-कृतींच्या आधारे केली आहे. त्यांच्यावर वेडेवाकडे हेत्वारोप का केले जात आहेत?

पण यापेक्षा महत्त्वाचा प्रश्न असा की, बाबासाहेबांच्या सार्वजनिक जीवनातील वागण्या-बोलण्याची चिकित्सा त्यांच्या मृत्यूनंतर ४० वर्षानंतरही केली जाण्याला त्यांच्या अनुयायांकडून अंतर्मुख होऊन सुरुवात होताना का दिसत नाही? अशी चिकित्सा गांधींची त्यांच्या हयातीत झाली व मृत्यूनंतरही सतत होत आली आहे. त्यांना महामानव मानणाऱ्यांनाही टीका करण्यात अडचण वाटलेली नाही. पं. नेहरूंवरही अशी टीका होत आलेली आहे. या चिकित्सेने समाजाचे भले होत आहे. या थोर पुरुषांच्या उक्ती-कृती, चरित्र व चारित्र्य यांच्यामध्ये त्याज्य, अनुकरण्यास अयोग्य असे काय काय आढळते ते समोर येत आहे. आंबेडकरांपासूनही या देशात लाखो, कोट्यवधी व्यक्ती भविष्यात प्रेरणा घेणार असल्याने त्यांचीही अशी चिकित्सा, सहृदयतेने पण तटस्थपणे, त्यांना मानणाऱ्यांनी






करण्याची विशेष निकड आहे. शौरींचे पुस्तक, त्यांना खोडून काढण्याच्याच बरोबर ही संधीही उपलब्ध करून देते. ती संधी का घेतली जाताना दिसत नाही?

उदाहरणादाखल दोनतीन बाबी घेता येतील. गोलमेज परिषदेत प्रतिनिधी म्हणून निवड होण्यापूर्वी, १९३० साली, बाबासाहेबांनी संयुक्त मतदारसंघच का असावेत याचे विस्ताराने तात्त्विक विवेचन केले होते. त्या वेळी, अस्पृश्यांसाठी विभक्त मतदारसंघ मागणारेही अस्पृश्य समाजाचे नेते होते. दुसऱ्या गोलमेज परिषदेत बाबासाहेबांनी भूमिका पूर्ण बदलली. तत्त्वनिष्ठेमधून घेतलेली भूमिका राजकारणी डावपेच म्हणून बदलणे हे योग्य म्हणता येते का? आधीची भूमिका घेताना जी परिस्थिती होती तिच्या तपशीलात खरोखर इतका फरक पडला होता का? स्वातंत्र्याची चळवळ हिंदुस्थानातील सर्व समाजघटकांनी एक होऊन करू नये; जागावाटप, मतदार-संघाची रचना अशा मुद्यांवरून भांडणे लागून फूट पडावी ही ब्रिटिशांची चाल होती की नाही? जे गोलमेज परिषदेत कमावले ते 'येरवडा करारा'ने खरोखर गमावले का? आंबेडकर स्वतः वाटाघाटींची यशस्वी सांगता झाल्यावर काय म्हणाले? याची खोलवर जाऊन सांगोपांग चर्चा अजूनही का होत नाही?

काँग्रेस व गांधी यांच्याशी आंबेडकरांनी जी टोकाची शत्रुत्वाची भूमिका घेतली ती समर्थनीय म्हणता येते का? स्वातंत्र्यलढ्यापासून काही अंतर कायम ठेवीत असतानाही, त्या लढ्याचे, तो लढा करणाऱ्या काँग्रेसचे, त्या काँग्रेसचे नेतृत्व करणाऱ्या गांधींचे खच्चीकरण करण्याचे ब्रिटिश राज्यकर्त्यांचे प्रयत्न, त्यासाठीचे डावपेच यांचे पुरेसे भान बाबासाहेबांनी बाळगले, व ब्रिटिशांच्या या डावपेचांमध्ये त्यांना साथ दिली नाही, असे म्हणता येते का?

निवडणुकांमध्ये बाबासाहेबांच्या पक्षाचे उमेदवार मोठ्या प्रमाणावर पराभूत झाले. पण याचा अर्थ काँग्रेस ही अस्पृश्यांना गुलाम ठेवण्याच्या पक्षाची आहे; काँग्रेसला साथ देणारे अस्पृश्यही गुलामी पत्करणारेच सर्व आहेत, ती कळसूत्री बाहुली आहेत; काँग्रेसच्या हाती सत्ता आली की पुन्हा 'पेशवाई' अवतरणार, या प्रकारचे निष्कर्ष काढले गेले ते योग्य होते का? काँग्रेसच्या हाती सत्तांतर केले जाऊ नये; सत्तांतर करण्यापेक्षा ब्रिटिशांची राजवट इथे चालू राहावी हे श्रेयस्कर, ही भूमिका विवेकी व समंजस होती का? काँग्रेसच्या नेत्यांविषयी या प्रकारचा संशय मनात बाळगला, अविश्वास प्रकट केला हे चुकले असा नंतर अनुभव आला. त्या अनुभवाच्या 'प्रकाशा'त बाबासाहेबांची भूमिका गैर होती असे म्हणायला हवे की नाही?

– ९ –

बाबासाहेबांनी आयुष्याच्या एका टप्प्यावर, १९२० ते १९३२ पर्यंतच्या काळात, हिंदू धर्मसुधारकाची भूमिका आवर्जून बठविली. हिंदू असण्याचा त्यांना अभिमानही असावा व या धर्माविषयी त्यांना आत्मीयताही असावी असे दिसते. १९३२ च्या आसपास त्यांनी भूमिका बदलली असेही आढळते. गोलमेज परिषदेत विभक्त मतदारसंघाची मागणी करताना, त्या मागणीचे समर्थन करताना अलगत्वाची भूमिका त्यांना सिद्धान्ताच्या पातळीवर मांडावी लागली. या घटनेचा व 'हिंदू म्हणून मी जन्माला आलो असलो तरी, हिंदू म्हणून मी मरणार नाही" या आव्हानात्मक पवित्र्याचा काही संबंध दिसतो. गांधींशी त्यांचे बिनसले, त्याचाही काही संबंध असू शकतो. धर्मांतर करून कोणत्या धर्मात आपण आपल्याला अनुसरणाऱ्या स्वजातीय बांधवांना घेऊन जावे, याचा निर्णय करताना आंबेडकरांनी जी चाचपणी करून पाहिली ती राजकारणी पद्धतीची व आशयाची होती असे म्हणण्यास जागा आहे. बाबासाहेबांचे व्यक्तित्व इतके ओतप्रोत राजकारणी बनले होते की, 'पर्सनल इज पोलिटिकल' ही उक्ती त्यांच्या बाबतीत याही क्षेत्रात खरी होती. कीर यांच्या चरित्रावरूनही ही गोष्ट पुरेशी स्पष्ट होते.

धर्मांतरानंतरही स्वजातीयांच्या, अस्पृश्यांच्या साठी सत्ता-संपादनाचे राजकारण बाबासाहेब करीत राहणारच होते; धर्मांतरानंतर राजकारणसंन्यास घेण्याचा त्यांचा मानस नव्हता. ही गोष्ट जर लक्षात घेतली तर, धर्मांतराने ज्या धर्मात प्रवेश करू त्या (हिंदुस्थानातील) धर्मीय समाजामध्ये धर्मांतरित पूर्वास्पृश्यांचे संख्याबळ व प्रमाण काय राहील, त्यांचे राजकीय वजन किती राहील, वागणूक काय मिळेल, नेतृत्व आपल्याकडे किती राहील या साऱ्या बाबींचा विचार त्यांनी करणे समजू शकते. बाबासाहेबांचे धर्मांतर ही त्यांच्या हिशेबी वैयक्तिक वा खासगी बाब नव्हती; ती एक सामूहिक धार्मिक-राजकीय कृती होती.

भगवान गौतम बुद्धांची शिकवण आणि 'धि बुद्ध ॲण्ड हिज धम्म' या ग्रंथात बाबासाहेबांनी केलेली धम्माची मांडणी यांमध्ये मूलभूत अंतर आहे, आणि बाबासाहेबांनी त्या धम्माचा विशद केलेला आशय हा तथागतांच्या मूळ शिकवणीशी मेळ

खाणारा नाही, असे अनेकांचे प्रामाणिक मत आहे. 'कशाला उगाच वादात पडायचे; नाहीतरी बौद्ध धर्माचा स्वीकार नवबौद्धांनी गंभीरपणे केलाय असे थोडीच आहे?' अशी धारणा असल्याने या विषयाची चर्चा करण्याच्या फंदात कोणी सहसा पडलेले नाही. शौरी यांनी या अंगानेही आंबेडकरांना टीकेचे लक्ष्य बनविले आहे.

इतिहासात जेव्हा जेव्हा समूहांनी नेत्याला अनुसरून धर्मांतर केले तेव्हा तेव्हा त्याची प्रेरणा आर्थिक, सामाजिक व राजकीय राहिलेली आढळून येईल. आंबेडकरांच्या अनुयायांचे धर्मांतर या अंगानेच समजावून घेणे गरजेचे आहे; त्याविषयी तक्रार करणे, त्याची टीकाटिप्पणी करणे हे निरर्थक आहे, ही गोष्ट शौरी यांच्या ध्यानात यावयास हवी होती. सारासार विचार करून, हिशेब मांडून अखेरीस बौद्ध धर्माचा स्वीकार करावयाचे बाबासाहेबांनी ठरविले याचे स्वागत त्यांनी करावयास हवे होते. अखेरीस हिंदू धर्माच्या 'गोतावळ्यात'ला धर्म निवडला या कारणाने स्वागत करावयास हवे होते असे नाही; तर, बौद्ध धर्माची शिकवण आत्मसात करण्याच्या दिशेने नवबौद्ध समाजाची जेवढी वाटचाल होईल तेवढी, ज्या हिंदू धर्माच्या बाहेर ते पडले त्या हिंदुधर्मीय समाजाचेही नैतिक-वैचारिक नेतृत्व करण्याची क्षमता त्यांच्या ठायी उत्पन्न होईल, म्हणून.

भगवान बुद्धांची तात्त्विक-नैतिक शिकवण आणि बाबासाहेबांनी लावलेला त्यांच्या शिकवणुकीचा अन्वयार्थ यात जे मूलभूत अंतर आहे त्यामधून नक्कीच एक पेच उपस्थित झालेला आहे. बाबासाहेबांकडे आधुनिककालीन बुद्धावतार म्हणून भाविकपणे पाहण्याने, व त्यांनी सांगितलेल्या धम्माला नव-बौद्ध धम्म असे म्हटल्याने पेच सुटणार नाही. कट्टर, संकुचित सांप्रदायिक बांधणी करण्यातच जर बाबासाहेबांच्या अनुयायांची (म्हणजे आजच्या नवबौद्ध राजकारणी-धार्मिक पुढाऱ्यांची) संतुष्टी होणार असेल तर गोष्ट निराळी; पण हिंदू, ख्रिश्चन, मुस्लिम, यहुदी इत्यादी विभिन्न धर्मीय समाजांमध्ये, यांच्या पलीकडे असलेल्या आदिवासी, भटक्या-विमुक्त जनजातींमध्ये, नवसंजीवन प्रादुर्भूत करण्याचे सामर्थ्य जर संपादित करावयाची आकांक्षा असेल तर, या पेचाची सर्जनशील सोडवणूक करण्याचे काम केलेच पाहिजे. अशी सोडवणूक करण्याची वेळ येईल तेव्हा बाबासाहेबांचा शब्द प्रमाण व शेवटचा ही 'बाबा वाक्यं प्रमाणम्' वृत्ती, भूमिका व आग्रह सोडून देऊन तटस्थपणे चिकित्सा करावी लागेल.

'बुद्धाचा धम्म' म्हणून बाबासाहेबांनी जी मांडणी केली तिच्यातील गंभीर त्रुटी दाखवून देणारी टीका शौरींनी केली यावरून त्यांना धारेवर धरण्याचे कारण नाही. पण इथेही खेद वाटावा अशी एक बाब आहे. धर्मांतराला एक राजकीय-सामाजिक परिमाण जरूर होते. पण बुद्धिप्रामाण्यवादी, आधुनिक, इहवादी लिबरल राजकारणी असलेल्या आंबेडकरांचा पिंड गाभ्याशी धर्मशील होता. उच्च विद्याविभूषित होण्याच्या ओघात, नंतरच्या राजकारणात तो पूर्णपणे झाकून टाकणारी पुटे त्यावर चढली. पण आयुष्याच्या अखेरीस त्या पिंडाला बाबासाहेब जागले; अत्यंत गंभीरपणे व सश्रद्ध अंतःकरणाने त्यांनी दीक्षा घेतली. आतून पूर्णपणे निधर्मी असताना, जनसामान्य स्वजातीयांचा विचार करून त्यांनी बौद्ध धर्माची दीक्षा घेण्याचे नाटक पार पाडले, असे ज्या कोणाला वाटत असेल त्यांना बाबासाहेबांचे व्यक्तिमत्त्व कळलेच नाही असे म्हणायला हवे. शौरींना ते कळलेले नाही हे उघडच आहे. पण बाबासाहेबांचे अनुयायित्व मिरविणाऱ्याही भल्याभल्यांना ते कळले आहे असे दिसत नाही.

याचे एक ठळक गमक असे की, त्यांच्या मृत्यूला चाळीस वर्षे उलटून गेल्यावरही, धम्माचे तेज व सामर्थ्य आंबेडकरी चळवळीत प्रकट झालेले नाही. राखीव जागा, सवलती व त्या आधारे सत्तेत वाटा मिळवून घेण्याच्या राजकारणाच्या खुंट्यालाच चळवळ बांधलेली राहिलेली आहे. हिंदुत्ववादी धरून, भारतातील सर्व मूलतत्त्ववादी राजकीय चळवळींचा – मुस्लिम, शीख, ख्रिश्चन यांच्यातही अशा चळवळींचा आज जोर वाढला आहे – समर्थ प्रतिवाद आंबेडकरी चळवळ बौद्ध धम्माच्या शिकवणुकीच्या बैठकीवरून करीत नाही हे दुसरे ठळक गमक होय. ती मासलेवाईक 'सेक्युलॅरिस्ट' भूमिकेचा अंगीकार करते, हे तिसरे गमक होय.

– १० –

'वर्शिपिंग फॉल्स गॉड्स' असे म्हणण्यात शौरींचे घोर अज्ञान, असंजसपणा व अविवेक प्रकट झाला. 'वर्शिपिंग आंबेडकर इन ए रॉंग वे अँड फॉर रॉंग रीझन्स' अशी टीका केली असती तर ती गोष्ट प्रस्तुत व अर्थपूर्ण ठरली असती. असो.

पण, शौरी यांनी जे 'मूर्तिभंजन' केले ते शौरी हे ब्राह्मण असल्यामुळे केले, वा हिंदुत्ववादी राजकारणी कट-कारस्थानाचा

भाग म्हणून केले, असा आरोप करणे असत्य व अन्याय्य आहे असे म्हणावयास हवे. हिंदुत्ववादी राजकारणी रणनीती आंबेडकरांची सावरकर व हेडगेवार यांच्याशी 'समरसता' साधून, आंबेडकरी चळवळीला स्वतःच्या मुस्लिमविरोधी राजकारणात सामील करून घेण्याची आहे. शौरींचे लेखन त्यांना संतप्त करणारेच ठरले असेल, हे वर एके ठिकाणी स्पष्ट केले आहे. त्यांची ब्राह्मण जात काढली जाते याचा मग अर्थ काय? सर्व गोष्टींचे खरे व एकमेव मूळ व स्पष्टीकरण जन्मजात जात या घटकातच सापडते ही भूमिका 'ब्राह्मण्या'ची द्योतकच नव्हे काय?

शौरींच्या पुस्तकावर टीकेची झोड उठविणारे अनेक लेख मराठी वृत्तपत्रे व नियतकालिके यांमध्ये प्रसिद्ध व्हावे ही स्वाभाविक व अटळ गोष्ट होती, टीका करणाऱ्यांमध्ये प्रा. य.दि. फडके, बॅ. विठ्ठलराव गाडगीळ, श्री. भाई वैद्य, श्री. गोविंदराव तळवलकर व इतरही अनेक नामवंत मंडळी आहेत, जी जातीने ब्राह्मण आहेत. शौरींच्या प्रतिपादनाचे खंडन करणाऱ्या एकूण सतरा लेखांचे संकलन श्री. विलास वाघ यांनी *ब्राह्मणी आक्रोश* या नावाने पुस्तिकारूपात (सुगावा प्रकाशन, पुणे) प्रसिद्ध केले आहे. शौरींचे खंडन करणाऱ्यांमध्ये ज्या व्यक्ती जातीने ब्राह्मण आहेत त्यांचाही *ब्राह्मणी आक्रोश*च ठरतो ही गोष्ट मग मान्य करावयास हवी. की, आंबेडकरांची टीकाटिप्पणी करणे यालाच फक्त 'ब्राह्मणी आक्रोश' असे म्हणावयाचे, ही व्याख्या सर्वांनी मान्य करावयाची आहे?

आंबेडकरांच्या राजकीय भूमिका, त्यांनी केलेले राजकारण, त्यांचे वैचारिक लेखन यावर जे कोणी टीका करण्याची गोष्ट करतील त्यांच्यावर हिंदुत्ववादी असण्याचा, ब्राह्मणीपणाचा आरोप करून त्यांना व त्यांच्या टीकेला निकालात काढण्याची प्रवृत्ती ही बाबासाहेबांच्या गैर स्वरूपाच्या दैवतीकरणाच्या मुळाशी आहे व ही प्रवृत्तीच त्यांच्या दैवतीकरणाचा गैरफायदाही उठविण्यात रस बाळगणारी आहे.

ज्यांना बाबासाहेबांना खरोखरीच न्याय द्यावयाचा आहे, त्यांच्या विभूतिमत्त्वाचा आदर करावयाचा आहे त्यांनी वरील प्रवृत्तीचा निषेध करावयास हवा. शौरी असोत वा अन्य कोणी टीकाकार असोत, त्यांची जात न काढता, त्यांना हिंदुत्ववादी कट-कारस्थानात सहभागी न ठरविता, त्यांच्या टीकेचा चोख व समर्थ प्रतिवाद करण्याची मोकळीक आहेच ना? प्रतिवाद साधार करता येत नाही असे आढळले तर, टीकेतल्या तथ्यांश स्वीकारणे हेच बाबासाहेबांना न्याय देण्याच्या, खरा आदर व्यक्त करण्याच्या दृष्टीने इष्ट, उपकारक व आवश्यक आहे.

या लेखाच्या आरंभी स्पष्ट केल्याप्रमाणे बाबासाहेबांचे एक लौकिक रूप आहे, आणि एक अ-लौकिक रूप आहे. लौकिक रूपाच्या संदर्भात त्यांचे व्यक्तित्व, चरित्र, कार्य व विचार या गोष्टी टीकाविषय व्हाव्यात याचाच राग मानावयाचे कारण नाही. अशा टीकाटीप्पणीचे स्वागत 'निंदकाचे घर असावे शेजारी' या वृत्तीने करणे सर्वांच्याच हिताचे आहे. अशी टीकाटिप्पणी गंभीरपणे, नम्र भावाने विचारात घेतल्याने समाजाचे व देशाचे पाऊल पुढेच पडते. टीकाटिप्पणी करणाऱ्यांकडूनही एक पथ्य सांभाळले जाणे आवश्यक आहे. अनन्य भक्तिभावामुळे ज्यांच्या दृष्टीला बाबासाहेब अ-लौकिक रूपात दिसतात, त्यांची कोटी दैवताची बनते, त्या सरळ, साध्या, विशुद्ध अंतःकरणाच्या भाविक जनांच्या भावनांची योग्य कदर करण्याइतकी सुजाणता व (बुद्धाची) करुणा बाळगली पाहिजे.

अरुण शौरींनी ही जाण व ही करुणा प्रकट केली नाही हा गंभीर प्रमादच आहे. ते भगवान बुद्धांच्या अष्टांग मार्गावर वाटचाल करणारे एक असे स्वतःला म्हणवितात म्हणून त्यांच्या प्रमादाचे गांभीर्य वाढते.

ऐतिहासिक व्यक्तींना मनोमन असे अ-लौकिक रूप प्रदान करून, अनन्य भक्तिभावाने त्या रूपाची पूजा करणे, दैवत कोटीला त्या व्यक्तीस नेऊन बसविणे ही जगभरच्याच सामान्य जनांची मनःप्रवृत्ती आहे. अशा सामान्य जनांमध्ये श्रेष्ठी वर्गांमधीलही अनेकानेकांचा समावेश असतो. श्रीरामचंद्र वा श्रीकृष्ण ही प्राचीन उदाहरणे आहेतच. पण अलीकडील उदाहरणेही आहेत. भारतात तर ही प्रवृत्ती प्रकर्षाने आढळते. त्यांना स्वतःलाही त्याचा वैताग झाला इतके दैवतीकरण त्यांच्या हयातीत बत्तीस वर्षे गांधींना सहन करावे लागले. जर्नेलसिंग भिंडरांवाले यांना याच प्रक्रियेमधून संतपद प्राप्त झालेले आपण पाहिले आहे. प्रिन्सेस डायनासारख्या विवाद्य व्यक्तिमत्त्वासही, मृत्यूच्या शोकात्म नाट्यामुळे, एक अलौकिक रूप जगभरचे कोट्यवधी लोक उत्स्फूर्तपणे देताना आपण पाहात आहोतच.

अलौकिक रूप – दैवतपण – प्राप्त होणाऱ्या ऐतिहासिक पुरुषांच्या इतिहासातील लौकिक व्यक्तित्वाचा, त्यांच्या चरित्र व कार्य व उक्ती यांचा लोप घडवून आणावयाचा वा लोप



अनुक्रमणिका

घडला आहे असे मानून चालावयाचे, असा संकेत रूढ करणे लोकशाहीच्या भारतातील निकोप वाढीच्या आड येईल, ही गोष्ट एव्हाना स्पष्ट झाली आहे. भारतीय समाज एकात्मही होण्याच्या आड हा संकेत येईल. मात्र, त्याचवेळी, व्यक्तित्वातले व परिस्थितीतले कोणते वेगवेगळे घटक एकत्र आल्याने एखाद्या विवाद्य ऐतिहासिक व्यक्तीस अलौकिक रूप प्राप्त झाले आहे याचे भान बाळगणे, त्या व्यक्तीविषयी मनःपूर्वक आदर बाळगणे व टीकाटिप्पणी करताना निर्वैर, नव्हे सहृदय वृत्ती बाळगणे हा संस्कार आपणा सर्वांनी, विशेषतः विचारकारण, समाजकारण व राजकारण यांत सहभागी असणाऱ्या धुरिणांनी मुरविण्याची नितांत आवश्यकता आहे.

स्वातंत्र्याला पन्नास वर्षे पुरी होत असताना, शौरींच्या पुस्तकाच्या निमित्ताने, हा बोध आपण सर्वांनी आत्मसात केला तर 'वाईटातूनही कधी कधी चांगले निघते' ही म्हण सार्थ ठरेल.

– ११ –

डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे खोटारडे दैवत म्हणावयाचे?

कोणाही ऐतिहासिक पुरुषाचे, मग तो कितीही मोठा, थोर असला तरी, दैवत बनवू नये. लोकशाही समाजवादाच्या विचारप्रणालीशी, विवेकशीलतेशी सुसंगत अशी हीच भूमिका आहे.

पण सामान्य जनांचे म्हणून एक मानस असते. अगदी तथाकथित प्रबुद्ध पाश्चात्त्य समाज घेतले तरी, त्या देशातील सर्वसामान्य लोकांची मनोवृत्ती सश्रद्ध व भाविक आढळते. लोकांना दैवताचा आधार गरजेचा वाटतो. दैवते त्यांच्या डोळ्यांसमोर आदर्शही ठेवीत असतात. या दृष्टीने उन्नत, नैतिक जीवन जगण्याची, पुरुषार्थ प्रकट करण्याची प्रेरणा देण्यासाठीदेखील दैवतांची गरज त्यांना वाटते.

या कारणाने लोकशाही समाजांमध्ये दैवतीकरणाची प्रक्रिया, कदाचित, जास्तच सक्रिय बनते. हाडामांसाची माणसे दैवते बनतात; जास्त करून, ठरवून बनविली जातात. दैवतीकरणाचा धंदाही बनतो, कारण ती अत्यंत फायदेशीर गोष्ट ठरते. शिर्डीच्या साईबाबांचे उदाहरण ठळक आहे. ते एक अवलिया, साधुपुरुष होते. अत्यंत तऱ्हेवाईक, विक्षिप्त असे त्यांचे वर्तन होते असे दिसते. त्यांच्या ठायी लोकांना साधुवृत्ती, शहाणपणा, द्रष्टेपणा यांचा आढळ होत असल्याने, त्यांच्या हयातीतही, त्यांना अनेकानेक भक्त लाभले होते. पण असे दिसते की, स्वतःचे दैवतीकरण त्यांनी कोणाला करू दिले नाही. त्यांच्या मृत्यूनंतर त्यांचे टोकाचे दैवतीकरण केले गेल्याचे आपण पाहतो. राजकारण, सिनेमा, क्रीडा, उद्योग-व्यवसाय या क्षेत्रातील व्यक्तींचे, अगदी सेवाकार्याच्या व परिवर्तनवादी चळवळीच्या क्षेत्रातसुद्धा कोणाकोणाचे दैवतीकरण केले जात असताना दिसते.

बौद्ध धम्माची दीक्षा घेण्याच्या आधी बाबासाहेबांचे एकमेवाद्वितीय पुढारीपण त्यांच्या चळवळीत व पक्षात सर्वमान्य होते; त्यांच्या अनुयायांची संख्या मोठी होती. त्यांच्यावर त्यांच्या अनेक अनुयायांची भक्ती होती. पण त्यांना दैवताचे स्थान प्राप्त झाले नव्हते. धम्माची दीक्षा त्यांनी घेतली व आपल्या लक्षावधी अनुयायांना देवविली/दिली त्या क्षणी त्यांचे स्थान उंचावले, कोटी बदलली. या दैवतीकरणाविषयी आरंभी जे म्हटले आहे त्याची पुनरुक्ती करण्याची गरज नाही.

दैवतीकरणाची आणखी एक प्रक्रिया त्यांच्या मृत्यूनंतर गतिमान झाली. सर्व मोठ्या प्रस्थापित व प्रतिष्ठित राजकीय पक्षांच्या बाहेर, स्वतंत्र व उग्रवादी भूमिकेमधून पूर्वास्पृश्यांचे राजकीय संघटन/चळवळ बांधण्यासाठी उपयोगी व प्रभावी प्रतीक बाबासाहेब हेच होते. सवर्ण त्रैवर्णिक उच्चवर्णीय हिंदू समाजाविषयीचा एक सर्वंकष अविश्वास, संशय व दुस्वास हे त्यांच्या भूमिकेमधील घटक या दृष्टीने कामास येणारेच होते.

बाबासाहेबांचे राजकारण-समाजकारण, त्यांचे लेखन, त्यांची वक्तव्ये यातल्या वेचक गोष्टींच्या भोवती व आधारे त्यांची एक मूर्ती घडविण्यात आली, आणि त्या मूर्तीला दैवतपण बहाल केले गेले. या रूपात आंबेडकरांना पाहता येते; आंबेडकर असे होते असे म्हणणे एका पातळीवर वस्तुनिष्ठही ठरते. सवर्ण हिंदू समाजातील त्रैवर्णिकांपासूनच केवळ नव्हे तर, शूद्र गणल्या गेलेल्या जातींच्या राजकीय संघटना व चळवळी यांच्याशीही एकरूप न होण्याच्या, स्वतःची वेगळी चूल व सवतासुभा कायम ठेवण्याच्या दृष्टीने बाबासाहेबांची ही प्रतिमा विशेष उपयोगाची आहे. पण ती पक्षपाती, मतलबी आणि अर्धसत्य आहे. ती बाबासाहेबांना न्याय देणारी नाही. त्यांचे संक्षेपण करणारी, साऱ्या भारतीय समाजाचे पुढारीपण करण्याच्या दृष्टीने बाबासाहेबांना अ-क्षम करणारी ती प्रतिमा आहे. या प्रतिमेची अधिकृतता, आणि परिपूर्णता सर्वांनी – विशेषतः आंबेडकरी राजकीय संघटना व चळवळी यांच्या बाहेरील मंडळींनी – स्वीकारली पाहिजे असा आग्रहही आढळतो.




अनुक्रमणिका

बाबासाहेबांच्या काही भूमिका (उदा. त्यांची काँग्रेस व गांधी यांच्याविषयी १९३२ नंतरच्या काळात घेतलेली भूमिका), त्यातून त्यांनी ब्रिटिश सत्तेबरोबर केलेल्या तडजोडी वा हातमिळवणी, जोवर तो हिंदुधर्मीय राहील तोवर एकूणातच सवर्ण हिंदू समाज कधी बदलणारच नाही व न्याय देणारच नाही ही ठाम समज पायाभूत गृहीतकृत्य म्हणून रुजवणे, यासारख्या गोष्टींसाठीच जर बाबासाहेबांचे दैवतीकरण केले जात असेल तर, या विशिष्ट स्वरूपातील बाबासाहेबांची पूजा बांधणे ही गोष्ट त्यांना अनुसरणाऱ्या समाजाच्या दृष्टीने अहितकारक व संपूर्ण समाजाच्या दृष्टीने घातक आहे. बाबासाहेबांचे हे दैवतीकरण अर्धसत्य व धोकेबाज या अर्थाने खोटारडे आहे. पण त्यांची मूर्ती या रूपात घडविणाऱ्यांकडे याचा दोष पोचतो. बाबासाहेबांना याचा दोष लागत नाही.

येथेही गांधींचे उदाहरण घेऊन मुद्दा स्पष्ट करता येईल. गांधींना राष्ट्रपिता म्हणणे हे त्यांचे दैवतीकरण करणेच आहे. पण गांधींच्या राजकीय भूमिका व चाली, त्यांची जीवनदृष्टी, मूल्यविचार, तत्त्वज्ञान, त्यांचे अनेकानेक गोष्टींबद्दलचे आग्रह, त्यांचे व्यक्तिगत व कौटुंबिक जीवनातील वागणे-बोलणे इत्यादी साऱ्या गोष्टींवरून सतत वाद होत आले आहेत. इतका विवाद्य व तीक्ष्ण टीकाटिप्पणींचा, खंडनाचा धनी 'राष्ट्रपिता' कसा, असाही प्रश्न कोणी विचारू शकतो. दैवतीकरणाची प्रक्रिया ही तर्काच्या पातळीवरील परस्पर व्यावर्तक गोष्टींनाही एकत्र नांदण्याचा अवकाश ठेवत असते. कारण टीकाटिप्पणी, खंडन, विवाद्यता या सगळ्याच्या पलीकडे पोचणाऱ्या अशा गोष्टी आहेत की, ज्यांच्यामुळे गांधींना राष्ट्रपिता म्हणणे सार्थ ठरते. लोकमानस हे तर्ककठोर नसते, पण पुष्कळदा जास्त शहाणे असते.

बाबासाहेबांच्याही बाबतीत अशीच गोष्ट आहे. त्यांचे दैवतीकरण होणे स्वाभाविक, अटळ व उचित आहे. केवळ पूर्वास्पृश्यांच्या दृष्टीने नाही; तर, सर्व भारतीयांच्या दृष्टीने. दैवतीकरणासाठी त्यांच्या व्यक्तित्वातील, चरित्रातील, कार्यामधील व विचारांमधील काही असे घटक वेचून निवडले पण गेले आहेत की, जे सर्वांना स्वीकृत आहेत वा होऊ शकतात. उदाहरणार्थ, त्यांची विद्वत्ता, त्यांचा स्वाभिमान, त्यांची निडरता, त्यांची लोकशाहीवरील, सनदशीर मार्गावरील निष्ठा, त्यांनी बौद्ध धर्माचा केलेला स्वीकार, राज्यघटना तयार करण्यासाठी घेतलेले परिश्रम व दिलेला मनःपूर्वक सहभाग इत्यादी. त्यांच्या लोकांनी त्यांच्या अ-लौकिक रूपामध्ये त्यांना बुद्धाच्या पंक्तीत बसवले आहे हे एक दैवत-रूप आणि लौकिक रूपात भारतीयांनी भारताच्या राज्यघटनेचे शिल्पकार 'आधुनिक मनू' हे त्यांना दिलेले दुसरे दैवत-रूप*, ही दोन दैवत-रूपे विधायक आहेत, उपकारक आहेत; ती राखली व संवर्धित केली पाहिजेत.

*वसंत पळशीकर*



* हिंदू कोड बिल भारतीय संसदेने पास केले असते तर आंबेडकरांचे स्वप्न पूर्ण झाले असते. हिंदू धर्मात आधुनिक काळाला साजेशी सुधारणा करण्याचे कार्य आपल्या हातून पार पडावे ही त्यांची मनापासूनची आकांक्षा होती. ती पूर्ण झाली असती तर त्यांनी धर्मांतराचा विचार कदाचित सोडूनही दिला असता. ते बिल त्यावेळी पास होऊ शकले नाही, हे एका परी मोठे दुर्दैव होय.



अनुक्रमणिका










राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई



# पन्नास वर्षांनंतर – भविष्याच्या दिशेने

**अम्लान दत्त**

भारतातील ब्रिटिश राजवटीचा अस्त होऊन पन्नास वर्षे लोटल्यानंतरचा हा क्षण, गतकालाचे सिंहावलोकन करण्यासाठी, वर्तमान परिस्थितीचा आढावा घेण्यासाठी, आणि कोणत्या प्रकारच्या भावी कालाच्या बांधणीसाठी भारताने व त्याच्या शेजाऱ्यांनी कटिबद्ध झालेच पाहिजे या गोष्टीचा विचार करण्यासाठी योग्य आहे.

काही बाबतीत पन्नास वर्षांपूर्वीच्या परिस्थितीपेक्षा सद्यस्थिती ठळकपणे वेगळी आहे; काही बाबतींमधील विरोध कमी तीक्ष्ण झाले आहेत, परंतु स्वातंत्र्य मिळाले त्या वेळचे आपले मुख्य प्रश्न, त्यांनी आज अधिकच अक्राळविक्राळ रूप धारण केले आहे. हा क्षण केवळ एखादा समारोह साजरा करण्याचा नाही; खोलवर जाऊन प्रामाणिक शोध घेण्याचासुद्धा हा समय आहे. राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या संघर्षाने आपल्या इतिहासातील एक संस्मरणीय युग भूषविले. तथापि यापुढील संघर्ष काही बाबतीत अधिकच महत्त्वपूर्ण असेल अशी शक्यता आहे.

स्वातंत्र्यानंतरच्या पहिल्या तीन दशकांत भारतामध्ये स्थिर केंद्र सरकार अस्तित्वात होते आणि अत्यंत आदरणीय अशी काही नेतेमंडळी होती. काही घटकराज्यांमध्ये काँग्रेसला बलाढ्य प्रतिस्पर्धी होते. तथापि, सबंध देशाचा विचार करता काँग्रेसचे सर्वश्रेष्ठ स्थान संशयातीत होते. याबाबतीत आजची स्थिती पूर्णपणे भिन्न आहे. आपल्या राजकीय पक्षांची अनंत शकले पडलेली आहेत. संपूर्ण देशात सार्वत्रिक मान्यताप्राप्त आणि स्पष्ट बहुमत असलेला कोणताच पक्ष नाही. देशाच्या काही भागांत भक्कमपणे मान्यता पावलेल्या काही पक्षांना इतर काही भागांत जवळपास पूर्ण अस्वीकृती दर्शविली जात आहे. विचारसरणीतील तफावतीमुळे असे घडत नसल्यामुळे ही गोष्ट थोडीशी विचित्र वाटते. स्वातंत्र्यानंतरच्या सुरुवातीच्या काही वर्षांमध्ये, 'शीतयुद्धा'च्या जागतिक वातावरणामुळे, उजव्या आणि डाव्या पक्षांमधील वैचारिक प्रणालींमधील विरोध टोकदार स्वरूपाचे होते. आज ती परिस्थिती राहिली नाही. उजव्या व डाव्या पक्षांच्या आर्थिक धोरणांमधील अंतर पुष्कळ प्रमाणात कमी झाले आहे. इतके कमी की, ती जुनी डावे-उजवे ही विभागणी बहुतांशी अर्थहीन वाटू लागली आहे, आणि सामाईक 'किमान कार्यक्रमां'बद्दल बरेच बोलले जाऊ लागले आहे. तरीपण, धार्मिक 'मूलतत्त्ववादा'च्या उदयाने एका वेगळ्या प्रकारची गंभीर समस्या उभी ठाकली आहे अशी धास्ती प्रकट करणाऱ्या पक्षांमध्येसुद्धा, आपापसातील राजकीय स्पर्धा निवळत चालल्याची कोणतीच वास्तव चिन्हे दृष्टोत्पत्तीस येत नाहीत.

राजकीय अस्थैर्याशी निगडित आणि अलीकडील काही वर्षांत ऐरणीवर आलेला दुसराही एक क्लेशदायक प्रश्न आहे. सार्वजनिक जीवनातील भ्रष्टाचाराचा प्रसार हा तो प्रश्न होय. या बाबतीतही, स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या सुरुवातीच्या काही वर्षांमधील परिस्थितीशी विद्यमान परिस्थितीची तुलना केल्यास एक फरक ठळकपणे नजरेत भरतो. त्या वेळीही काही मर्यादेपर्यंत भ्रष्टाचार अस्तित्वात होता, पण शिखरस्थानी असलेल्या नेतेमंडळींमध्ये तो इतक्या प्रमाणात बोकाळला नव्हता. नेहरू, पटेल, आझाद, लालबहादुर शास्त्री, बिधानचंद्र रॉय किंवा प्रफुल्ल सेन अशांसारख्या नेतेमंडळींवर 'पुरते भ्रष्टाचारी' असा आरोप गंभीरपणे करता येणे शक्य नव्हते. आता आपल्याला हे चित्र पालटलेले दिसते. प्रायः कोणतीच व्यक्ती संशयातीत वाटेनाशी झाली आहे आणि प्रत्यक्ष पंतप्रधानसुद्धा याला अपवाद नाहीत. आज जगातील सर्वांत मोठा लोकशाही देश म्हणून गणलेल्या भारतामध्ये, सत्तारूढ भ्रष्ट पक्षाला विस्थापित करून मतदार त्या जागी ज्या दुसऱ्या पक्षाला सत्तेवर बसवतात तोही भ्रष्टपणाच्या बाबतीत पहिल्या पक्षापेक्षा तसूभरही कमी नसतो. भाववाढीची अनैतिक प्रतिकृती भ्रष्टाचारवाढीमध्ये आढळते आणि त्याच वेळी बोटचेपे आणि डळमळीत शासन नियमपालनातील कुचराईमध्ये भर घालते.

स्वातंत्र्य संपादन करण्याविषयी भवितव्याला दिलेले अभिवचन पूर्ण केल्याला पन्नास वर्षे पूर्ण होण्याच्या क्षणी,

अनुक्रमणिका

अशा रीतीने, सार्वत्रिक व अगदी उच्चतम नेतृत्वाच्या पातळीपर्यंत पोचलेला भ्रष्टाचार आणि राजकीय अस्थिरता यांनी देश ग्रासलेला असल्याचे चित्र समोर येते. याच्या जोडीला तातडीने लक्ष द्यायला हवे असे इतरही अवघड प्रश्न उपस्थित झाले आहेत. भारताच्या फाळणीमुळे अनेक स्वातंत्र्यसैनिक निराश झाले तरी, त्या घडीला नव्याने जन्माला आलेल्या दोन स्वतंत्र राष्ट्रांमध्ये तरी अंतर्गत एकजूट अभंग राहील अशी आशा त्यांना वाटत होती. ती आशाही काळाच्या कसोटीला उतरली नाही. पाकिस्तान एकसंध राखण्यासाठी धर्माचे बंधन पुरेसे बळकट ठरले नाही. भारताचे विभाजन होऊन पाव शतक लोटण्याच्या आत पाकिस्तानची पूर्व व पश्चिम अशी दोन शकले झाली. भारतातसुद्धा विभाजनवादी शक्ती कडव्या राष्ट्रवाद्यांच्या अटकळीपेक्षा अधिक बलशाली ठरल्या.

स्वातंत्र्याच्या सुरुवातीच्या वर्षांमध्ये ईशान्य भारताच्या कोपऱ्यातील नाग लोकांनी अलग आणि स्वतंत्र नागभूमीची मागणी केली तेव्हा भारताच्या राष्ट्रीय एकात्मतेच्या अधिक मोठ्या प्रश्नाच्या तुलनेत किरकोळ महत्त्वाची बाब म्हणून तिच्याकडे बघणे शक्य होते. जेव्हा काही तामिळींनी भारतीय घटनेच्या प्रतींचे दहन केले तेव्हा योग्यायोग्यतेच्या सर्व निकषांवर ती अधिक गंभीर अशी बाब होती; पण तरीसुद्धा क्षणिक घटना म्हणून तिच्याकडे पाहणे शक्य होते. आणि खरोखरच ती तशी ठरली. काश्मीरच्या भारतामधील सामिलीकरणाचे प्रथम मोठ्या आनंदोत्साहाने स्वागत करण्यात आले. तो आनंदोत्सव काहीसा अकाली असल्याचे सिद्ध झाल्यावर, त्याचा ठपका नाठाळ मुस्लिम अलगतावादावर ठेवण्यात हिंदू राष्ट्रवाद्यांनी समाधान मानले. शिखांच्या एका शक्तिशाली गटाने खलिस्तानच्या मागणीसाठी सुरू केलेली हिंसक चळवळ पाकिस्तानच्या कटकारस्थानातून जन्माला आली असे ठामपणे प्रतिपादिले गेले. बांगला देशातील बंड भारताच्या कट-कारस्थानातून जन्मले असे ठोसपणे म्हणण्याचा प्रयत्न या आधी पाकिस्तान्यांनी केला होता, त्याच्यासारखेच हे थोडेसे होते. आमच्या जनजातीची अलग मायभूमी म्हणून मान्यता मिळावी किंवा स्वायत्त घटक राज्य वा राज्यांतर्गत क्षेत्र हा दर्जा मिळावा यासाठीच्या इतर मागण्या पुढे येत राहिल्या. त्यांची संपूर्ण मोजदाद अनावश्यक आहे. गुरखाभूमी आणि झारखंड यांसाठीच्या चळवळी ही सुलभपणे देता येण्यासारखी उदाहरणे आहेत. यासारख्या अलगतावादी मागण्यांची तितकीच चांगली उदाहरणे आजच्या (उर्वरित) पाकिस्तानमध्येही सापडू शकतात. तेथील बलुची, सिंधी व पठाण आपापल्या जमातींच्या स्वायत्ततेसाठी आंदोलने छेडत आहेत. भारतातील किंवा पाकिस्तानातील किंवा श्रीलंकेतील अशा सर्व चळवळींना, त्या केवळ दिशाभूल करणाऱ्या आणि राष्ट्रविरोधी चळवळी आहेत म्हणून कलंकित ठरविल्याने एकतेचा विविधतेशी मेळ घालण्याचा प्रश्न निश्चितच सुटू शकत नाही. गेल्या पन्नास वर्षांत आपण न सोडवलेला असा हा प्रश्न आहे. या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर जोपर्यंत आपल्याला सापडत नाही तोपर्यंत भविष्यकालातही तो आपल्याला चिंताग्रस्त करीत राहील. दक्षिण आशिया उपखंडातील सर्व स्वतंत्र राष्ट्र-राज्यांचे एक विशाल संघराज्य परस्पर सामंजस्याने, सौहार्दाने व सहकार्याने आकारास आणण्याची एक कल्पना मांडली गेली आहे. त्याच दिशेने वाटचाल करावयास हवी आहे, तोच चिरस्थायी तोडगा आहे, असे म्हटले गेले आहे. कट्टर वास्तववादी या कल्पनेची टर उडवतात हे आपल्याला माहीत आहे. पण अशा विशाल संघराज्याला पर्याय, कदाचित, 'शंभर वर्षांचे युद्ध' हा असेल. या युद्धाच्या ओघात आपल्या स्वातंत्र्यसैनिकांनी ज्या ध्येयांनी प्रेरित होऊन संघर्ष केला ती सर्व ध्येये धुळीस मिळून या उपखंडाचा नाश ओढवेल.

भारत व पाकिस्तान या राष्ट्रांची निर्मिती ही, एका अंगाने शांततापूर्ण रीत्या घडून आलेले सत्तांतर होते. पण, ब्रिटिश राज्यकर्ते सत्ता अशा रीतीने हस्तांतरित करीत असताना, हस्तांतरणाच्या आधी व नंतर बेछूट रक्तपात व निखळ क्रौर्य यांचे देशाच्या एका मोठ्या भागात थैमान माजले होते. विपण्ण करणारी ही घडामोड होती. तेव्हापासून विभिन्न कारणांनी, निमित्तांपोटी व विभिन्न स्वरूपात भारतीय उपखंडात हिंसा प्रादुर्भूत होत आली आहे. एकीकडे आपल्या शहरांमधील धार्मिक व वांशिक दंगलींच्या उद्रेकांची वारंवारिता पश्चात्तापाची पाळी आणणारी आहे तर दुसरीकडे भारताच्या खेड्यांमधून जातीय दंगली ही नित्याची घडामोड होऊन बसली आहे. संयमीवृत्तीचे जाणकार राजकारणी पुढारी जगजीवनराम यांनी एकदा प्रस्तुत लेखकाला असे सांगितले की, हा देश यादवी युद्धाच्या यातना अनुभवीत असून आपल्या खेड्यांमधील जातीय दंगली केवळ त्याचीच एक अभिव्यक्ती आहे. असे जर असेल तर, त्या यादवीयुद्धाचा अंत अजून दृष्टिपथात आलेला नाही. गेल्या अर्धशतकातील बहुतांश कालखंड पाकिस्तानने लष्करी






राजवटीखाली घालवला आहे. मुसलमानांच्या एका गटाने दुसऱ्या गटाच्या केलेल्या निर्घृण कत्तलींच्या अमानुषतेच्या धक्कादायक राड्यामधून बांगला देशाला आपल्या स्वातंत्र्याचा मार्ग काढावा लागला आणि असे अमानुष वर्तन करणारे अजूनही पश्चात्तापविरहित आहेत; आपण ज्या कत्तलींना उत्तेजन दिले त्या कत्तली ही एक गौरवास्पद कामगिरीच होती असे त्यांना वाटते. आणखी एका दिशेने झालेली लक्षणीय वाटचाल म्हणजे काश्मीरपासून श्रीलंकेपर्यंत, साऱ्या उपखंडात विविध प्रकारच्या दहशतवादी गटांचा झालेला प्रसार ही होय. जगाच्या इतर भागांमधील तत्सम घडामोडींशी ही गोष्ट सुसंवादी आहे. त्याचप्रमाणे या खंडित उपखंडातील प्रतिस्पर्धी सार्वभौम राष्ट्रे आपापल्या सैन्याला अद्यावत विध्वंसक शस्त्रास्त्रांनी सुसज्ज आणि बळकट करण्यासाठी आपला 'संरक्षण' खर्च वाढवत चालली आहेत. स्वातंत्र्याची पन्नास वर्षे उलटल्यानंतरही शांतताप्रस्थापनेच्या शक्ती अजून दुर्बल राहिल्या आहेत.

इतर काही देशांशी तुलना करता भारताचा विकासदर जरी नजरेत भरण्याजोगा वाटत नसला तरी गेल्या पन्नास वर्षांमध्ये कृषि व औद्योगिक या दोन्ही उत्पादनांत लक्षणीय वाढ झालेली आहे. श्रीमंत अधिक श्रीमंत झालेले आहेत आणि गरीब अधिक गरीब झालेले आहेत असे म्हटले गेलेले आहे. कदाचित हे पूर्ण आणि अनलंकृत सत्य नसावे. ब्रिटिशांच्या राजवटीत भारतातील दरिद्री जनता इतकी गरीब आणि कुपोषणग्रस्त होती की, आज जर ती अधिक दरिद्री आणि कुपोषित झाली असती तर आपल्या ग्रामीण जनतेच्या सरासरी आयुर्मर्यादेमध्ये आणखी घसरण होण्याचे टाळणे नक्कीच शक्य झाले नसते. तसे घडलेले नाही. अमान्य न करता येणारी गोष्ट अशी की, श्रीमंत अधिक श्रीमंत झालेले आहेत आणि नव्याने मध्यमवर्गीय बनलेल्यांची संख्या बऱ्याच मोठ्या प्रमाणात वाढलेली आहे. वरील कारणांमुळे गरीब लोकांमधील वंचिततेची भावना पूर्वीपेक्षा अधिक तीव्र झालेली आहे. भरीला, उद्योगीकरणामध्ये प्रगती होऊनसुद्धा बेरोजगारांची संख्या वाढलेली आहे. पन्नास वर्षांपूर्वीपेक्षा आजची रोजगार असलेल्यांची संख्या जास्त आहे, पण बेरोजगारांची संख्याही वाढली आहे. हे विधान बुचकळ्यात टाकणारे वाटेल, परंतु लोकसंख्येतील जलद वाढीमुळे असे घडून आले आहे. हे शतक उलटताना भारतापुढे ठाकलेला एक महत्त्वाचा प्रश्न म्हणजे, मोठ्या उद्योगधंद्यांमुळे विशेष प्रमाणात कमी होऊ न शकणाऱ्या बेरोजगारीचा भलामोठा अनुशेष हा होय. केवळ निर्बंधरहित बाजारपेठी अर्थव्यवस्थेची पुष्टी करण्याचे (लिबरलायझेशन) धोरण हा प्रश्न सोडवू शकणार नाही. तरीपण आपल्या समाजाचे स्वास्थ्य या प्रश्नाच्या सोडवणुकीवर निर्णायकरीत्या अवलंबून आहे.

मानवी पर्यावरणाला असणाऱ्या धोक्याच्या जागतिक प्रश्नामध्ये आपणही सहभागी आहोत. आपल्या देशातही पर्यावरण संकटात सापडलेले आहे. भारतामध्ये त्याची काही खास वैशिष्ट्ये आहेत आणि त्यांच्याकडे दुर्लक्ष करणे परवडू शकणार नाही. गेल्या पन्नास वर्षांमध्ये हिमालयाच्या उतरणीवरील प्रदेश गंभीरपणे दखल घेण्याइतपत बेसुमार वृक्षतोडीमुळे उघडे बोडके बनलेले आहेत. जंगलतोडीची ही प्रक्रिया केवळ हिमालयीन प्रदेशांपुरतीच सीमित राहिलेली नाही. परिणाम अनेक आणि विविध प्रकारचे आहेत; आपण त्यांपैकी फक्त एकाचाच उल्लेख इथे करणार आहोत. पावसाच्या पाण्याचा पुरवठा वाढवायला आणि त्या पाण्याच्या प्रवाहाचे नियमन करायला जंगलांची मदत होते. भारतातील अनेक भागांत पाण्याची टंचाई आहे. काही भागांत काटेकोर अर्थाने अशी टंचाई नसते, तरीसुद्धा उपलब्ध पाणीपुरवठ्याच्या विभागणीवरून झगडे चालतात. नद्यांवर मोठे बांध (बराज) घालून किंवा बहुउद्देशीय धरणे बांधून काही प्रदेश बऱ्याच वेळा स्वतःपुरते हे प्रश्न सोडवतात. पण त्याचा परिणाम इतरांना पाण्यापासून वंचित करण्यात होतो. असे घडते तेव्हा प्रादेशिक संघर्ष लवकर तीक्ष्ण बनतात. भारतदेशांतर्गत तसेच भारत – पश्चिम बंगाल – आणि बांगलादेश यासारख्या दोन शेजारील देशांमधील अशी दोन्ही प्रकारची उदाहरणे या संदर्भात देणे सोपे आहे. पर्यावरणीय धोरणाचा भाग म्हणून, इतर अनेक गोष्टींच्या जोडीला, पाण्याची साठवणूक आणि पाण्याचे व्यवस्थापन याविषयीच्या दूरदर्शी, सुजाण धोरणाची आपल्याला गरज आहे. पर्यावरणीय धोरणाची ही फक्त एक बाजू आहे. पन्नास वर्षांपूर्वी हा महत्त्वाचा वादविषय नव्हता; आता त्याच्या महत्त्वाविषयीची आपली जागरूकता वाढवून आपल्या भावी कार्यक्रमांची त्यानुसार जुळणी करण्याची वेळ आली आहे.

आपण आपल्या प्रश्नांची यादी करतो तेव्हा ते मोठे जगड्व्याळ दिसतात. मग त्या प्रश्नांबद्दल काही करता येणे शक्य आहे का, असे विस्मयचकित होऊन आपल्याला वाटू लागते. निराशेपासून बचाव करण्यासाठी आपण अल्पसंतुष्ट

वृत्ती धारण करतो. पण प्रश्न आहेत तिथेच राहत नाहीत; आणि आपण त्यांच्यापासून दूर पळून जायचा प्रयत्न करतो तेव्हा ते आपल्याला अचानकपणे येऊन भिडतात. स्वातंत्र्यानंतर दोन पिढ्यांचा काळ लोटला आहे आणि तिसऱ्या पिढीने पुढे येऊन सत्तापदांवर आरूढ व्हायचा हा समय आहे. पुढची पन्नास वर्षे त्यांची आणि त्यांच्या मुलाबाळांची आहेत. त्यांनी धडाडी दाखवायलाच हवी. भूतकाळावर किंवा आपल्या नियंत्रणापलीकडील शक्तींवर दोषाचा ठपका ठेवून काही साधणार नाही. आपल्यासाठी आपण ज्या प्रकारच्या विश्वाची बांधणी करणार आहोत त्या विश्वातच आपल्याला राहावे लागणार आहे, अशा जाणिवेने तरुणांनी विचार व कृती केलीच पाहिजे. स्वतःच्या आंतरिक शक्तींवरील अवलंबन आणि सामाजिक उत्क्रांतीच्या नव्या अवस्थेला अनुरूप अशा पारस्परिक सहकाराच्या नवीनतर प्रकारांबद्दल प्रयोग करीत राहणे यांना अन्य तर्कशुद्ध पर्याय नाही.

अडचण अशी आहे की, एकीकडे यापूर्वीच कालबाह्य ठरलेल्या जुजबी उपाययोजना लोक सुचवितात, तर दुसरीकडे अपरिचित उपायांना ते संशयास्पद व अवास्तव ठरवतात. या देशात जुन्या धाटणीच्या विचारसरणीतून निसटण्यासाठीच्या संघर्षाची पूर्वी कधी नव्हती एवढ्या मोठ्या प्रमाणात आपल्याला गरज आहे. गोष्टी दैवावर सोपवून देश, येनकेन प्रकारेण, कोणत्याही कठीण स्थितीतून सुटका करून घेऊ शकेल अशी आशा बाळगण्यात अर्थ नाही. खुद्द ते प्रश्न स्पष्टपणे समजून घेऊन त्यावर देशव्यापी वादविवाद घडवून आणल्यानंतर, जबाबदारीची जाणीव ठेवून, सहकारी वृत्तीने प्रयोगशील राहण्याची संकल्पशक्ती हीच आपल्या प्रश्नांवर मात करता येण्यासाठीची पहिली पूर्वअट होय.

आपण काही प्रमुख प्रश्न उदाहरणादाखल घेऊ. भारतातील राजकीय अस्थैर्याविषयी आपण काय करू शकतो? वरचेवर मुदतपूर्व सार्वत्रिक निवडणुका घेणे हे निश्चितच त्याचं योग्य उत्तर मानता येणार नाही. पैसा आणि वेळ व शक्ती यांचा अनुत्पादक व्यय ह्या दोन्ही दृष्टींनी त्या न परवडणाऱ्या आहेत, गरीब देशाच्या कुवतीपलीकडच्या आहेत; आणि, शिवाय, त्यामुळे राजकीय स्वास्थ्य व स्थैर्याची स्थिती पुन्हा प्राप्त होईल अशी हमी मिळत नाही. अनियंत्रित हुकुमशाहीच्या कल्पनेमध्ये या प्रश्नाचे उत्तर शोधण्याचा प्रयत्न काहीजण करतात. पण रोगापेक्षा उपचार अधिक भयानक असे याबाबतीत होऊ शकते. पाकिस्तानने आणि बांगला देशाने हुकुमशाही शासनाचे प्रयोग करून पाहिलेले आहेत. तेथे राजकीय स्थैर्याची स्थिती निर्माण करण्यात ते अयशस्वी झालेले आहेत. हुकुमशाही शासनयंत्रणा भ्रष्टाचार प्रतिबंधक असते असेही नाही. सत्ता भ्रष्टाचार करायला शिकवते. 'आंतरराष्ट्रीय भ्रष्टाचार आकलन (पर्सेप्शन) निर्देशांका'च्या संदर्भात नायजीरिया आणि पाकिस्तान हे दोन हुकुमशाही देश सर्वांत खालच्या स्थानावर आहेत. वांशिक विविधता असलेल्या भारतासाठी हुकुमशाहीचा पेहेराव विशेषच अयोग्य ठरेल. एक सुधारित राज्यव्यवस्था प्रस्थापित करण्याचा आपला प्रयोगसुद्धा लोकशाहीची बैठक राखूनच केला गेला पाहिजे. स्वातंत्र्याच्या मूलभूत हक्कांच्या जपणुकींशी सुसंगत असे शासनयंत्रणेच्या स्वरूपाविषयीचे आणि कार्यपद्धतीसंबंधीचे बदल स्वीकारल्यामुळे लोकशाहीचे लोकशाहीपण नष्ट होत नाही.

लोकशाहीसाठी खुल्या निवडणुका आवश्यक आहेत. स्वतंत्र उमेदवार म्हणून किंवा एखाद्या पक्षाच्या तिकिटावर व्यक्ती निवडणूक लढवू शकेल. एकदा निवडून आली म्हणजे ती व्यक्ती कोणाचे प्रतिनिधित्व करते? निवडून आलेल्या प्रतिनिधीची अंतिम निष्ठा तो किंवा ती ज्या मतदारसंघाचे प्रतिनिधित्व करत असेल त्या मतदारसंघाशी आहे असे दाखवता येते. मुदत संपल्यानंतर संबंधित प्रतिनिधीला पुन्हा प्रतिनिधित्व करण्याची इच्छा असेल तर पुन्हा तोच प्रतिनिधी पाठवायचा का, हे ठरविण्याची संधी त्या मतदारसंघाला असेल. मुदत संपण्यापूर्वीच लोकनियुक्त प्रतिनिधीला परत बोलावण्याचा हक्क मतदारांना असावा. पण या हक्काचा बेजबाबदारपणे व वारंवार उपयोग केला जाऊ नये यासाठी हक्क बजावण्याच्या कडक पूर्वशर्ती व कार्यपद्धती काटेकोरपणे निश्चित करणे मात्र आवश्यक असेल. लोकशाही तत्त्वांशी ही गोष्ट सुसंगत आहे. तिचा अंगीकार करावा का करू नये हा मूलतः एक व्यावहारिक प्रश्न आहे. एखाद्या बहुस्तरीय राजकीय पद्धतीमध्ये भिन्न पातळ्यांवर भिन्न प्रकारच्या तरतुदी तर्कशुद्ध आणि सोयीस्कर ठरू शकतील.

भारतातील संसदीय लोकशाही एका कोंडीत सापडली आहे. कोणताही एक पक्ष संसदेमध्ये आज निरपेक्ष बहुमत गाजवत नाही; आणि कोणत्याही पक्षांची युती भक्कम आणि स्थिर शासन निर्माण करण्याचे आश्वासन देऊ शकत नाही. आपण अशी स्थिती गाठलेली आहे की, जी खूप दीर्घकाळपर्यंत

अनुक्रमणिका

चालू राहण्याची शक्यता आहे. नजीकच्या भविष्यकाळात एखाद्या पक्षाने अधिक अनुकूल स्थिती प्राप्त करून घेण्याचा यशस्वी प्रयत्न केला तरीसुद्धा साधनशुचिता राखून ती स्थिती दीर्घकाळपर्यंत त्याला टिकवता येईल हे असंभवनीय दिसते. लोकशाही तत्त्वांचा त्याग न करता ह्या राजकीय प्रश्नावर मात करणे शक्य आहे का? एक अपारंपरिक, वंडखोर सूचना विचार करण्यालायक आहे. तंतोतंत तशीच नसली तरी काहीशी त्यासारखी योजना भारताच्या एका भूतपूर्व राष्ट्रपतींनी सुचविली आहे आणि नागरी स्वातंत्र्याच्या लढ्यातील सुविख्यात योद्धे न्यायमूर्ती व्ही.एम्. तारकुंडे यांनी तिचा संमतिदर्शक पुनरुच्चार केला आहे.

ही सूचना अंमलात आणण्यासाठी काही स्वीकृत कार्यपद्धती वदलाव्या लागतील आणि घटनेमध्ये योग्य ती सुधारणा करावी लागेल. नवी सूचना अशी : क्रमदेय एक मतदान पद्धतीने (सिंगल ट्रान्स्फरेबल व्होट) किंवा दुसरी योग्य कार्यपद्धती वापरून, पंतप्रधानांना निवडून देण्यासाठी संसदेच्या उभय सभागृहांनी एकत्र येऊन आपला 'एक मतदारसंघ' बनवावा. कोणत्याही सर्वसाधारण मतदारसंघातील सभासदांप्रमाणे, या सदस्यांना आपल्या सदसद्विवेकबुद्धीनुसार मतदान करण्याची मुभा असावी. प्राधान्येकरून प्रमाणशीर प्रतिनिधित्वाच्या तत्त्वानुसार, योग्य आकाराचे मंत्रिमंडळ याच मतदारसंघाने निवडावे, अशी तरतूद करता येईल. मंत्रिमंडळात प्रतिनिधित्व करण्यास नकार देणाऱ्या पक्षांना मात्र साहजिकच वगळले जावे. मंत्रिमंडळातील सदस्यांमध्ये खातेवाटप करण्याचा व त्यांची कर्तव्ये ठरवून देण्याचा अधिकार आणि जबाबदारी पंतप्रधानांवर असेल. मंत्रिमंडळातील सदस्य एका ठराविक संख्येपर्यंत जादा सदस्य स्वीकृत करू (को-ऑप्ट) शकतील. संसदेपुढे ठेवण्यात येणाऱ्या सर्व विधेयकांवर खुले मतदान होईल. एखादे विधेयक फेटाळले गेले म्हणून कोणत्याही मंत्र्याला राजीनामा देण्याची गरज पडणार नाही. संसद दोनतृतीयांश बहुमताने पंतप्रधानांना किंवा दुसऱ्या कोणत्याही मंत्र्याला स्थानभ्रष्ट करू शकेल. मंत्र्यांसकट संसदेच्या कोणत्याही सदस्यावर सामान्य नागरिकांप्रमाणे गुन्हेगारीच्या आरोपाखाली न्यायालयीन खटला भरता येईल. मात्र त्यांच्या कार्यालयीन कर्तव्यांशी सहसंबंधित असलेले काही खास अधिकार त्यांना असतील. अशाप्रकारे, सर्वसाधारण परिस्थितीत, एकदा घटनात्मक पद्धतीने अस्तित्वात आलेली संसद आणि नेमले गेलेले मंत्री त्यांची मुदत पूर्ण होईपर्यंत आपापल्या पदांवर टिकून राहतील.

वर नमूद केल्याप्रमाणे, अलीकडील वर्षांमध्ये आपल्या राजकीय पक्षांच्या विचारव्यूहात्मक भूमिकांमध्ये भेद कमी झाले आहेत. भिन्न पक्षांमधील भेद कृत्रिमपणे तीव्र बनवून ते फुगवून सांगण्यास तत्त्वहीन सत्तासंघर्षच कारणीभूत होत आहे. येथे सादर केलेल्या सूचनेमुळे संसद सदस्यांना आपापले भिन्न दृष्टिकोण खुलेपणाने व्यक्त करण्याची मुभा मिळेल. तरीपण त्याच वेळी सुदृढ लोकशाहीच्या योग्य कार्यवाहीसाठी आवश्यक अशा देवघेववृत्तीने मंत्रिमंडळात असलेल्या भिन्न पक्षीय सदस्यांना महत्त्वाच्या मुद्यांवर चर्चा करायला प्रोत्साहन मिळेल. याच्याच जोडीला छोट्या अल्पसंख्य गटांमधून उगम पावलेली आमूलाग्र सुधारणावादी मते जनमतावर पुरेसा प्रभाव पाडून संसदेच्या व्यासपीठापर्यंत पोचण्यापूर्वी अशी मते विविध स्वरूपात बृहद् समाजाकडून चर्चिली जातील. केवळ कायद्यांनी इतिहास निर्माण करता येत नाही. संसदेच्या बाहेर राहून करण्यात येणाऱ्या कृतींनाही तेवढेच महत्त्व आहे. परंतु लोकशाही तत्त्वांशी सुसंगत असे स्थिर शासन पुरवणे हे संसदेचे एक प्रमुख कार्य आहे.

आपण आता दुसऱ्या एका प्रश्नाकडे येतो. आपल्या समाजावर आणि अर्थव्यवस्थेवर दडपण आणणाऱ्या बे-रोजगारीच्या बोजातून आपण आपली सुटका कोणत्याप्रकारे करून घेणार आहोत? त्या प्रश्नाचे उत्तर अधिक जलद उद्योगीकरणात पाहणाऱ्या काही व्यक्ती आहेत. ते आणखीनच चुकीचे उत्तर आहे. आज खुद्द औद्योगिक देशांमधील बेरोजगारीचा दर उच्च आहे. एक नवी तंत्रविद्यात्मक क्रांती प्रगतिपथावर येत आहे, जिच्यामुळे मोठ्या प्रमाणावर औद्योगिक फेरजुळवणूक लादली जात आहे आणि फेरजुळवणुकीच्या त्या प्रक्रियेतून निरंतर 'स्थित्यंतरजन्य बेकारी' निर्माण होत आहे. बेकारी वाढते हे कारण देऊन आपण तोट्यात जाणारे कारखानेही बंद करण्यास वा कामगारकपात करण्यास मालकांना परवानगी देणाऱ्या धोरणाला हटवादीपणे विरोध करणे म्हणजे आधुनिकी-करणालाच विरोध करणे होय. जागतिक बाजारपेठेमध्ये स्पर्धा करण्यास सक्षम बनणे आणि उच्चतंत्रविद्येचा अव्हेर करणे या दोन्ही गोष्टी आपण एकाच वेळी करू शकत नाही. एकूणात विचार करता, आधुनिक तंत्रविद्या भांडवलसघन असली तरी, काही प्रकारे अनेक क्रियांचे विकेंद्रीकरण ती सुकर करते.

अनुक्रमणिका






भांडवलसंपन्न देशांमधील परिस्थितीत, आणि तेही मर्यादित प्रमाणात, ते तंत्र योग्य आहे. भारत हा भांडवल-दरिद्री देश आहे. शिवाय भारतातील लोकसंख्यावाढीचा दर श्रीमंत देशांमधील तत्सम दरापेक्षा भरीव प्रमाणात उच्च आहे. जपानपेक्षाच नव्हे तर चीनपेक्षासुद्धा तो कितीतरी मोठा आहे. स्वातंत्र्याच्या पहिल्या पन्नास वर्षांमध्ये आपली लोकसंख्या जवळजवळ तिप्पट झाली आहे. लोकसंख्या नियंत्रणाच्या जोमदार धोरणाची आपल्याला गरज आहे. पण त्या आघाडीवरून तावडतोब फलदायी अशा परिणामांची अपेक्षा आपण तार्किकदृष्ट्या करू शकत नाही. पुढील शतकाच्या सुरुवातीच्या वर्षांमध्ये श्रमाच्या बाजारपेठेत जे प्रवेश करणार आहेत ते आधीच जन्माला आलेले आहेत. केवळ रूढार्थाच्या उद्योगीकरणाच्या धोरणावर विसंबून राहून भारतातील बेरोजगारी आणि प्रच्छन्न बेरोजगारी यांच्यापासून आपण सुटका मिळवू शकू, असा विश्वास बाळगणे भ्रामक आहे.

योजनापूर्वक जागतिक बाजारपेठाभिमुख बनवलेले आधुनिक क्षेत्र टिकून राहणार आहे. पण त्याच्या जोडीला दुसऱ्या एका क्षेत्राच्या विकासाला मदत केली गेली पाहिजे. विशेषतः ग्रामीण भागांमध्ये त्या क्षेत्राची असलेली गरज जाणीवपूर्वक मान्य करून, न कुरकुरता, खुशीने हे काम झाले पाहिजे. ते क्षेत्र मुख्यत्वेकरून स्थानिक संसाधनांवर आणि पुरेपूर वापरात नसलेल्या स्थानिक श्रमशक्तीवर अवलंबून असेल आणि त्याचे उत्पादन मुख्यत्वेकरून स्थानिक गरजांच्या प्रत्यक्ष पूर्तीसाठी असेल. असे करणे म्हणजे 'घड्याळाचे काटे उलटे फिरवण्यासारखे आहे; विज्ञान आणि तंत्रविद्येचा अव्हेर करणारी ही वृत्ती आहे,' असे काहीजण म्हणतात. पाश्चात्त्यांचे अनुकरण करण्यात विज्ञान सामावलेले आहे अशा चुकीच्या कल्पनेवर आधारलेली ही एक गैरसंकल्पना आहे. आपल्या पर्यावरणाचे आकलन करण्यासाठी, आणि नैतिक व आध्यात्मिकदृष्ट्या आपल्याला स्वीकार्य वाटेल अशा प्रकारचे जग निर्मिण्याचा प्रयत्न करण्यासाठी, तर्कबुद्धीचे सुसंघटित उपयोजन करण्यामध्ये विज्ञान सामावलेले आहे. जितके दूरपर्यंत आपण भविष्यात डोकावून पाहू शकतो तेथपर्यंत भारतातील मोठी लोकसंख्या, बहुधा निम्म्याहून अधिक लोकसंख्या खेड्यांमध्येच राहील असे निदान करणे वस्तुनिष्ठ होईल. याचाच अर्थ, खेडी मध्यवर्ती महत्त्वाची घटक राहणार आहेत. भारताचे भले इच्छिणाऱ्या आपणा सर्वांसाठी टागोरांनी 'ग्रामीण पुनर्रचना' म्हणून जिला संबोधले आहे ती गोष्ट आपल्या आस्थेचा एक प्रमुख विषय राहील. केवळ अनेक सुटे सुटे ग्रामीण प्रकल्प तयार करून ते एकत्रित करणे असा याचा अर्थ होत नाही. मुख्यत्वेकरून स्थानिक सहकार्याच्या आधारे सामाजिक, आर्थिक आणि सांस्कृतिकदृष्ट्या आपल्या खेड्यांची पुनर्रचना करण्यासाठीचा समग्र आणि सुरचित एकात्मिक स्वरूपाचा सततचा प्रयत्न असा याचा अर्थ आहे.

भारतीय राज्यव्यवस्थेची पुनर्रचनासुद्धा यात अभिप्रेत आहे. स्थिर केंद्र सरकारच्या गरजेविषयी मी या आधी सांगितले आहेच. परंतु केंद्राचे स्थैर्य म्हणजे निरंकुश प्रभुत्व गाजविणारे बलाढ्य केंद्र असा अर्थ अवश्यंभावीपणे होत नाही. गेली पन्नास वर्षे केंद्रामध्ये सत्तेचे केंद्रीकरण ठळकपणे झालेले आहे. ह्याचे कमीत कमी दोन शोचनीय परिणाम झालेले आहेत. ज्यांच्याविना खरोखरीचा विकासही होऊ शकणार नाही आणि खरी लोकांची लोकशाहीपण अस्तित्वात येऊ शकणार नाही अशी स्थानिक स्वावलंबी वृत्ती आणि तलस्पर्शी रचनात्मक उपक्रमशीलता यांच्या वाढीमध्ये सत्तेच्या केंद्रीकरणाने अडथळा निर्माण केलेला आहे. राजकीय पक्षांमधील सत्तासंघर्ष तीव्र करून सत्तेच्या केंद्रीकरणाने आपले राष्ट्रीय राजकारण पण भ्रष्ट केलेले आहे. त्या प्रक्रियेमध्ये हे पक्ष स्वतःच आपापल्या पातळ्यांवर सत्तेच्या केंद्रीकरणाला साधनीभूत बनले आहेत आणि राजकारणाची उपमर्दकारकपणे नीतिमूल्यांशी निलाजरेपणे फारकत करण्यात आली आहे. भ्रष्ट राजकारणी उद्योगव्यवसाय, व्यापार या क्षेत्रांमधील भ्रष्टतेची पुष्टीच करतात आणि एक अभेद्य दुष्चक्र तयार होते. अगदी तळापर्यंत सत्तेचे मूलगामी विकेंद्रीकरण करण्यात काही धोके पत्करावे लागतील पण ते धोके पत्करणे योग्य ठरेल. आपण वर सूचित केलेले आर्थिक विकेंद्रीकरण आणि एकात्मिक ग्रामीण विकास यांचे राजकीय विकेंद्रीकरण हे नैसर्गिक पूरक अंग आहे.

ह्या ठिकाणी आपल्या शिक्षणपद्धतीवर काही विचार मांडणे उपयुक्त ठरेल. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर लगेचच आपल्या नेतेमंडळींनी दहा वर्षांत निरक्षरतेचे निर्मूलन करण्याचा आपला संकल्प व्यक्त करण्यास सुरुवात केली. आता स्वातंत्र्य मिळून पन्नास वर्षे झाल्यानंतर स्थूलमानाने आपली पन्नास टक्के लोकसंख्या अजून निरक्षर राहिली आहे. त्याच वेळेस तिसऱ्या जगातील इतर बहुतांश देशांपेक्षा आपण अधिक मोठ्या संख्येने डॉक्टर, इंजिनिअर आणि इतर प्रकारचे उच्च दर्जाचे कुशल

व्यावसायिक प्रशिक्षित केले आहेत. जागतिक बाजारपेठेमध्ये ही मंडळी स्पर्धा करण्यास लायक आहेत. कितीही अपूर्ण का होईना, पण आपल्या शिक्षणपद्धतीची रचना नवीन मध्यम-वर्गासाठी झाली आहे. ह्या पद्धतीमुळे, फार थोडे अपवाद वगळल्यास, काही प्रमाणात शिक्षण मिळालेल्या आपल्या ग्रामीण तरुणांना इतर कशाही पेक्षा शहरात काम हवे असते. सुशिक्षित बेकारांच्या सतत वाढीमुळे ही प्रवृत्ती फक्त सीमांत प्रमाणात बदलली आहे. आपल्या भावी कार्यक्रमपत्रिकेवर ग्रामीण पुनर्रचना ही प्रमुख बाब म्हणून आपण ठेवणार असलो, तर आपल्या शिक्षणपद्धतीच्या आमूलाग्र पुनर्रचनेची तातडीची गरज आहे.

जिच्याविना भारताला शांती, सामाजिक न्याय किंवा आंतरिक स्वातंत्र्य यांपैकी काहीच लाभणार नाही अशा 'सांस्कृतिक क्रांती'चा भाग म्हणून ह्या सर्व गोष्टी अवतीर्ण झाल्याच पाहिजेत. कायदेविषयक आणि संस्थात्मक सुधारणा आवश्यक आहेत, पण त्या पुरेशा नाहीत. अंतिमतः, कोणतीही भौतिक पुनर्रचना जाणिवेच्या नवजागृतीने किंवा, ऐतिहासिक महत्त्वाच्या वाक्प्रचाराची उसनवारी करून म्हणावयाचे झाल्यास, नव 'प्रबोधना'ने (एनलायटनमेन्ट), तसेच प्रचलित मानकांच्या (नॉर्म्स) आणि नीतिमूल्यांच्या टीकात्मक फेरतपासणीने, आणि भावी कालाविषयीच्या सर्जनशील दर्शनाने (व्हिजन) उचलून धरून भरभक्कम केली नाही तर आपली उद्दिष्टे अपेक्षेप्रमाणे पार पडणार नाहीत. त्या भविष्यकाळी, साम्राज्यवादाच्या युगात शतखंडित झालेली मानवजाती, सर्वनाश टाळावयाचा एकमेव पर्याय म्हणून, मानवमात्रांचे एकमेकांशी तसेच निसर्गाशी पुनर्मिलन होण्यासाठी धडपडत असेल. नवीन पिढीतील अधिक जागरूक समूह त्या धडपडीत सहभागी होण्याचा बहुमान संपादित करू शकतात.





अनुक्रमणिका








अनुक्रमणिका










# स्वातंत्र्याची पन्नास वर्षे



अनुक्रमणिका










# 'भारत शेतीप्रधान देश आहे'

**रत्नाकर पटवर्धन**

काही वर्षांपूर्वीची गोष्ट. ज्या वेळी नाशिकच्या गोदातटाकी जाणे तसे शक्य होते. नदीचं पाणी इतकं गढूळलेलं नव्हतं. पण त्याची सुरुवात मात्र झाली होती.

साने गुरुजी, गांधीजी, खलील जिब्रान आणि इतर अशा वाटेल त्या वाचनामुळं मी अंधळा होतो. आणि तसलेच कसलेतरी पुस्तक वाचून त्याच्या धुंदीतच मी नदीकाठी फिरायला गेलो असेन.

संध्याकाळ होती. सूर्य मावळतीला, पाणी चमकणारे, मंद वारा सुटलेला अशी काहीतरी परिस्थिती होती. कोणाचं वावर होतं कोणास ठाऊक. पडीक होतं. झाडं अगदी तुरळकच होती. पण होती. वाभळीची आणि हिवराचीच का असेनात. ते दृश्य छान वाटत होतं. माझा मूडच चांगला होता. सगळं त्यामुळं खोटं खोटं असलं तरी मोहक खासच होतं.

तिथं एक पोतं पांघरलेली म्हातारी हिंडत होती. शेळ्या चारत होती. त्या तिच्याभोवती हिंडत होत्या. हाही भाग वरील दृश्याशी छानसा सुसंगत होता. मला त्या शेळ्या वागडताना दिसल्या.

होता होता ती म्हातारी एका झाडाजवळ पोचली. 'कोयत्याचं पातं चमकलं' असं अगदी म्हणता येणार नाही, पण कोवळी पाने असलेल्या दीड इंच व्यासाच्या एका फांदीनं एकाएकी तिच्यापुढं मान टाकली. एवढा वेळ बागडत आहेत असे वाटणाऱ्या शेळ्या एकदम जणू हिंस्र होऊन तिच्यावर तुटून पडल्या.

झाडाची पानं फोटोसिंथेसिस कसा करतात, कण कण ऊर्जा जमवून झाड कसं वाढतं, एक-दीड इंच जाड फांदी तयार व्हायला काय काय घडावं लागतं, याची मला खडान् खडा माहिती होती. शिवाय माझं मन त्या दृश्यानं अगदी हुळहुळं झालं होतं.

"अहो बाई!" मी स्वतःला म्हणताना ऐकलं. "काय फांद्या तोडताय झाडाच्या? असं करून चालेल का? झाडं वाढायची कशी अशानं? आँ! थोडा तरी विचार करा!" आणि मग मला छानसं जखमी वाटायला लागलं. मागं वळून आणि कोयता गालाजवळ धरून ती म्हातारी, चित्रातली कोकरू घेतलेली काश्मिरी तरुणी उभी राहिलेली दाखवतात तशी उभी राहिली.

"यऽऽवया!" ती उद्गारली. "ही झाडं? इडं तर पलाट पडेल हायेत. ही कोण ठिवणार आता?"

दारू प्यायलेल्या माणसाला मुस्काडीत मारल्यावर होश येते तसं माझं झालं. खुरट्या गवतात दडलेले अनेक चौकोनी डोक्याचे सीमादर्शक दगड एकाएकी जागृत होऊन त्यातून डोकावून आमच्याकडे पाहू लागले.

'बाई, तुजप्रत नमस्कार असो' मी म्हणायला हवे होते. 'माझी धुंदी उतरवल्याबद्दल आभार!' आणि मगच मी मागे फिरायला हवे होते. पण एवढे अवधान मला कुठले असायला? मी नुसताच बावचळलो आणि कसाबसा घरी परतलो झालं.

– २ –

माझा शेत-शेजारी, बांधभाऊ सदा गायकवाड. जातीनं महार. मला येता-जाता पाहून म्हणायचा "भाऊ, पोराला कुठं नोकरी पाहा!"

हा मुलगा जवळपास माझ्या मुलाएवढाच. गुरांमागं हिंडायचा. बापाला शेतीत मदत करी. पण शेतीला मुळात पाणी बेताचं. त्यामुळं चार-सहा महिने रिकामे हिंडणे त्याच्या नशिबी होते. एका ओळखीच्या गॅरेजमध्ये 'हेल्पर'ची जागा होती. ती सदाला सांगितली. पण त्याचं पुढं काहीच घडलं नाही. बऱ्याच दिवसांनी मीच होऊन विचारलं, "कारे सदा, पाठवत नाही का पोराला कामाला?" सदा ओशाळला. "न्हाई जात तो," तो म्हणाला. म्हटलं, "का बरं?"

"हात काळे व्हत्यात म्हंतो!" तो म्हणाला.

गुरांमागं हिंडून, खेड्यातल्या शाळेत जाऊन या पोराला बारावीला चोपन्न टक्के मार्क पडले. माझ्या मुलाला ट्युशन लावून, अभ्यास करकरून सत्तर टक्के मार्क पडले. सदाचा मुलगा केव्हा केव्हा शेतात काम करताना दिसतो. माझा मुलगा मर्चंट नेव्हीत!

अनुक्रमणिका

– ३ –

उडत उडत दूर जाणारा क्रौंच पक्षी पाहिला आणि महाशय फुकुओका यांना नैसर्गिक शेतीचे रहस्य उलगडले असे त्यांनी लिहिले आहे. अशीच एक लोणकढी थाप महाशय व्यास यांच्याबद्दल प्रसिद्ध आहे. त्यांनी म्हणे क्रौंच की क्रौंचीण (मिथुनमग्न असताना) एका दुष्ट (?) पारध्याकडून मारली गेल्याचे पाहिले आणि लगेच रामायण लिहिले. पण व्यासांची गोष्ट आणि रामायण दोन्ही काव्यमय आहेत. शेती ही काय काव्य करायची गोष्ट आहे? महाशय फुकुओका यांची नवीन शेतीप्रकार शोधाबद्दलची जपानी स्टाईलची ती फक्त फर्मास थाप आहे. कृपया ती कोणी खरी मानू नये!

जपान हा पुढारलेला देश आहे. आम्ही त्यांच्या किमान पन्नास, शंभर वर्षे मागे आहोत. आज जे इथं घडतंय तेच तिथं घडल्यामुळंच 'फुकुओका शेती' जन्मली असावी असा आमचा होरा आहे. उडत्या क्रौंच पक्षाचा पार्श्वभाग त्याला कारणीभूत असूच शकत नाही, असे आमचे ठाम मत आहे.

पण मग या नवीन शोधाचे खरे कारण काय? शेतीत काम करावे लागणे ही वंशपरंपरेने मिळणारी अमानुष, भयानक आणि 'नॉन प्रॉडक्टिव्ह' शिक्षा भोगण्यास सर्व लोकांनी जाहीर नकार दिल्याने 'फुकुओका शेती' चा जन्म जपानमध्ये झाला असावा हे उघड सत्य आहे असे आम्हाला वाटते.

शेतमजूर शेतात काम करीत नाहीत, कितीही पैसे दिले तरी नीट काम करीत नाहीत, अशी सर्व मालकमंडळींची तक्रार आहे.

आमचा जळगावकडचा, खंदा व पिढीजाद शेतकरी असलेला मित्र सांगतो की, आमच्याकडे सालदारच (भडवा!) खुषीत असतो. आठवड्यातून दोन वेळा मांस-मच्छी खातो, रोज दारू पिऊन टेर होऊन पडतो. बरं, त्याला मुलंबाळं खूप. पण फिकीर बिलकूल नाही. जितकी मुलं जास्त तितके कमावते हात जास्त. बरं, कोणाला शिक्षणबिक्षण ही भानगड नाही. हे असे साले बेफिकीर मुर्दाड सालदार. आम्ही शेती करायची कशी?

त्याचं म्हणणं खरं होतं. निदान त्याच्या दृष्टीनं तरी. शेतमजूर वेगळा. मालक वेगळा.

आम्हाला दरवर्षी द्राक्षाचं उत्पन्न साठ हजार येतं असे सांगणारा एक बहाद्दर भेटला. शेतीतून उत्पन्न निघतं असं कोणी म्हटलं की मी हल्ली कान टवकारतो. तो म्हणाला, आमची दोन एकर बागायत आहे. म्हटलं, अरे वा! आणि औषधं, खतं, पाणी यांचा खर्च किती धरायचा? म्हणे, असेल दहा-वीस हजार, नक्की कोणास ठाऊक! घरी माणसं किती? नऊ, मी धरून. इतर सगळे शेतातच काम करतात. म्हटलं मग प्रत्येकी रोजंदारी किती धरायची? तो म्हणाला, "हॅ:! असा हिशेब करून मागं काही उरेल का?" आम्हाला त्याचेही म्हणणे पटले. त्याच्या दृष्टीने ते खरंच आहे. काही उद्योग केला, खटपट केली तर त्याचा हिशोब निदान आकर्षकपणे मांडायला काय हरकत आहे? आणि दुसरं येतंय काय त्याच्या घरच्यांना! तोच तसे म्हणाला. नुसतं बसून खाण्यापेक्षा बरं शेतकाम केलेलं.

अशाच एका शेतकऱ्याला नैसर्गिक शेती (मी स्वतः त्यात 'फेल' गेलो असतानाही) पटवून देत होतो. तो नंतर आश्चर्याने म्हणाला, "म्हंजे शेतात काहीच करायचं नाही?" म्हटलं, "नाही. नुसतं मिळेल ते उत्पन्न घ्यायचं." "अरे बाबा!" तो उद्गारला, "आधीच वर्षातले निम्मे दिस आमची पोरं नुसती गलोली घेऊन हिंडत्यात वावरामधी. शेतीचं कामच नाही म्हटल्यावर काय व्हायचं हो त्यांचं?"

त्याचंही म्हणणं बरोबर वाटलं. काहीतरी जोखड हवंच माणसाला. भले उत्पन्न न निघेना का शेतातून!

कूळकायदा आणून मायबाप सरकारनं म्हणे कुळांना, म्हणजे गरीबगुरीब जनतेला न्याय मिळवून दिला आणि त्यांचा फायदा करून दिला. ही पण एक (लोणकढीच) थाप आहे. वास्तविक या मार्गाने सरकारने त्या काळच्या वरच्या थरातील लोकांच्या गळ्यातले जोखड काढून टाकले आणि एक प्रचंड, बेफिकीर असा पांढरपेशा वर्ग तयार केला. अर्थात हे तेव्हाच्या बावळट लोकांच्या लक्षात आले नाही. माझे आजोबाच सव्वीस वर्षं त्या कायद्यामुळे कोर्टात रखडले आणि तरी शेवटी त्यांच्या गळ्यातले जोखड गेले ते गेलेच. काय हे दुःख!

शेतीकाम करण्याची इच्छा नसणे ही प्रगतीची खूण आहे असे आता आमचे मत आहे. शेतीकाम मजुराने करावे अशी इच्छा असणे ही गोष्ट बैलाला नांगराला जुंपण्यापेक्षा वेगळी नाही. मग म्हणाल की, देश कसा चालायचा. जेव्हा गुलामगिरी कायद्याने रद्द करण्यात आली त्या वेळीही इंग्लंडच्या पार्लमेंटमध्ये असेच प्रश्न उपस्थित केले गेले होते. गुलाम नाहीत तर उसाच्या शेतीत काम कोण करणार? शेतीकामास नकार देणाऱ्यांकडे याचे उत्तरदायित्व नाही असे वाटते. याचे उत्तर






शेतीत काम कधीच न करणाऱ्या पांढरपेशी, राजकारणी, समाजधुरंधर आणि अर्थकारणी लोकांनी (त्यांना गरज वाटल्यास) शोधायचे आहे. शारीरिक कष्टाच्या कामास नकार देणे ही प्रगतीची खूण आहे एवढे खास. भले त्यामुळे सगळेच बुडणार का असेनात.

– ४ –

आमचे एक मित्र. त्यांचे वडील 'एकुलते एक' होते म्हणे. त्यांच्या नावावर शंभर एकर जमीन. फार चांगला माणूस. अजून लोक नाव घेतात. त्यांच्यावर देवदयाही खूप. त्यांना मुलं-मुली मिळून सातजण. त्यांचीही ठेप चांगली. सगळ्यांची खाय-प्यायची चंगळ. घरचं गाईचं दूध इ. इ. या प्रत्येकाला आज आहेत पाच-पाच मुलं. तिसऱ्या पिढीत बेचाळीस माणसं. जमीन अर्थात शंभरच एकर. वर फक्त कर्ज. "लई मोठी जमीन व्हती. यवडा वारदाना!" अशी अजून आठवण निघते. "काय टेचात ऱ्हायचो आम्ही!"

– ५ –

त्या वेळी स्ट्रॉबेरी होती सहाशे रुपये किलो. आमच्या शेतकरी मित्रानं विचार केला, आपण का लावू नये ही स्ट्रॉबेरी? गेला बाजार शंभर रुपये मिळाले किलोमागे तरी फार झाले. यांचा कामाचा झपाटा फार. बँकेचं कर्ज काढलं. हा हा म्हणता जमीन तयार केली. चर खणले. 'वेड' तयार केले. त्यावर स्प्रिंकलर वसविले. बागभर छोटीछोटी कारंजी चक् चक् चक् करत पाणी फेकू लागली. कर्ज झालं आठ लाख रुपये. महामूर पीक आलं. पण सर्वांकडेच आलं. शिवाय असं ठरलं की, यांचं बियाणं एकसारख्या दर्जाचं नव्हतं. एक कॅनेडियन, एक ऑस्ट्रेलियन असा प्रकार. बाजारात असल्या मालाला उठाव नाही असे झाले. 'एक्स्पोर्ट' करायचे जमलेच नाही. 'ती क्वालिटी' म्हणे नव्हती. वीस रुपये भाव मिळाला. पुढे तो पाच रुपये झाला. भावाभावांत भांडणे झाली. मागे फक्त एक प्रश्न उरला की, बँकेचं कर्ज फेडायचं कोणी?

– ६ –

माझ्या शेतात राखणीला राहणारा गडी महादू. त्याला आदिवासी म्हटलं तर म्हणतो, "आमी मवळे. मराठा आहोत." पण त्याला आदिवासींतून कोणीच वेगळा काढू शकणार नाही. गडी साऱ्या मुलखाचा आळशी. पण माझ्या 'डू नथिंग फार्मिंग'ला चालतो. शिवाय कोणी मिळतच नाही कामाला तर करता काय! असो. पण हा बोलायला फार तयार. माझ्या मराठी शब्दसंपत्तीला दहा-पाच शब्द नवीन देईल असा. पाटाला लहान पाट फुटतो त्याला हा नाकं म्हणतो. झाडांची आळी साफ करायला 'चोखळणे' म्हणतो. त्याच्याशी बोलायला मला मजा वाटते. मला औषधी झाडपाल्याची खूप माहिती आहे असे तो म्हणतो. मात्र ते इलाज मलेरिया, डिसेंटरी अशा ऐहिक आणि फालतू रोगांवरचे नाहीत. साप अंगणात येणे, अंगात येणे, भूतबाधा होणे यांवरचे ते इलाज आहेत. आमच्या जमिनीत एक घोणस दिसत असे. आमच्या भागात याला परड म्हणतात. डिवचला गेला तर प्रेशर कुकरसारखी तो शिट्टी वाजवतो. साप विषारी पण सहसा माणसाला चावत नाही. हा साप खूप जाड असतो. महादू तर त्याचे वर्णन मांडीएवढा जाड असे करायचा. अर्थात महादूची मांडी सापाएवढीच जाड आहे हे खरंच. हा साप मला खूप दिवसांत दिसला नाही. चौकशी केली तर महादू रुबाबानं म्हणाला, "मग! बंदोबस्त करून टाकलाय मी त्याचा!"

"मारू नको म्हटलं होतं ना मी तुला?" मी म्हणालो. "मारला नाही हो, पण आता तो इकडं दिसणार नाही!" महादू ठामपणानं म्हणाला. असा महादू.

त्याची एक तक्रार अशी की, आमच्या जमिनीकडे 'शिणशिणात फार!' म्हणजे इथं बोलायलाच कोणी नाही. त्याला मी अनेकदा म्हणालो की, "म्हतारीला घेऊन ये," तर म्हणे "मग माजं घरदार कोण पाहील हो!" आता तेही खरंच आहे. महादूची जमीन बारा एकर. हरसूलकडे. पण जमीन डोंगरउताराची. पाणी नाही. म्हणून तो माझ्याकडे राखणीला! माझी जमीन चार एकर.

रिकाम्या डोक्यानं तासन् तास अन् दिवसन् दिवस बसून राहून याचं कसं होणार म्हणून मलाच काळजी वाटू लागली. शेवटी त्याला एक ट्रान्झिस्टर ऊर्फ रेडू घेऊन दिला. महादू खूष.

मात्र त्याच्या डोक्याला खुराक नव्हताच असं नाही. महादूला मुलं नाहीत. नुसत्या 'कारी'च – म्हणजे मुलीच. तिनांतल्या दोघी नवऱ्याकडं राहतात. मात्र धाकट्या मुलीचं लग्न करून एक घरजावई महादूनं आणला होता. हेतू असा की, 'जमीन कसाया कोणी तरी हवं!'







अनुक्रमणिका

पण हे जावईबापू निघाले पराक्रमी. दारू पिणे, बायकोला मारहाण करणे, नुसते बसून खाणे – सर्वच गुण त्याच्यात निघाले. माझ्या शेतात 'डू नथिंग' करताना, विड्या पिताना महादूला आपलं तेच व्यवधान होऊ लागलं. 'माज्या घरी कसं असंल. माज्या बायकूचं कसं व्हील अन् माझ्या पुरीचं कसं व्हील.' जावई कामाला इतका कच्चा की, महादू सांगे "हा मोव्हाची फुलं बी येचत नाय!" या महादूच्या घरच्या भानगडीनं मलासुद्धा त्रास होऊ लागला. उठसूट माझ्याकडून घे पैसे अन् पळ घरी असं महादू करू लागला! म्हटलं, "अरे, असं कसं चालंल महादू. पैसे तर उसने घेतोसच, वर इथं राखणीला कोणी नाही!" तर महादू म्हणे, "मग काढूनच टाक मला. मी तरी काय करू? माजा जीवच धाकधूक करतोय. जावय माजा म्हतारीला हाणतोय दारू पिऊन!" "मग तू असा जाऊन काय रक्षण करणार तिचं? तुझे गाववाले काय म्हणतात?" मी विचारले.

"म्हणतात बुवा त्याला म्हतारीला मारू नको म्हणून. पण लई वेकार तो जावई. अहो पोरगी गरवार (गर्भार) तरी मारतोय! लोक म्हणत्यात, बुवा तुमचा घरचा मामला हाय, आमी काय बोलावा?"

महादूचा सुरकुतलेला चेहरा. त्याचे एकाच बाजूचे बरेच दात पडलेलं वाकडं तोंड आणि पडलेले खांदे असं रूप घेऊन, चित्र काढायचं मॉडेल असतं तसा तो आपला गप उभाच राहिला.

त्याच्याकडे अंगावर माझे बरेच पैसे होते. त्याला एकदम काढून टाकणे मला शक्य नव्हते. शिवाय त्याची अडचण खरी होती. त्याला त्या वेळी काही म्हणणे मला प्रशस्त वाटेना. शेवटी जो प्रश्न सुटत नाही तो तसाच लोंबकळत ठेवावा, या तत्त्वाला अनुसरून मी तो विषय तात्पुरता बंद केला.

मात्र एक दिवस मळ्यावर गेलो तर महादूची बायको ऊर्फ 'म्हतारी' तिथं हजर. तिच्या डोक्याला बँडेज. तेही रक्ताळलेलं. चौकशी करता कळालं की, जावयाला पोरीला मारताना पाहून ती मधे पडू गेली तो तिला त्यानं ढकललं आणि तिचं डोकं फुटलं.

"आम्ही आता इथंच राहणार भाऊ!" म्हतारीनं जाहीर केलं. मग तिनं जावयाच्या गुन्ह्यांची जंत्री वाचली. मी म्हटलं, मग पोलिसात तक्रार का नाही देत? तर म्हणे, दिली होती. पोलीस त्याला ठाण्यावर घेऊन गेले. "लई ठोकाया लागले त्येला तर पोर मधे पडली. म्हणे माजी काई तक्रार नाई. सोडा त्याला!" आता ते तक्रार घेतच नाहीत.

मग मी त्यांना खूप कायदेशीर, सनदशीर मार्ग सांगितले. त्या दोघा म्हातारा-म्हातारीनं मला दुजोरे दिले. मला जरा बरं वाटलं. मग म्हटलं, "का रे – मग काडीमोड का घेत नाही तुम्ही? तुमच्यात तर ते चालतं ना?"

पण त्यांनी तोही मार्ग चोखाळला होता म्हणे. जावई त्याला तयार होता. तो म्हणे, "माजी आजवरची मजुरी द्या शेतकामाची. तुमचे देजचे पैसे कापून घ्या त्यातून. मी अन् माजी पोरं जातो माज्या घरी!"

"पोरं घेऊन जाणार तो?" मी उद्गारलो.

"मग?" बस; एवढेच उत्तर.

"किती आहेत?" मी विचारते. "चार होती. दोन गेली. हे तिसरं!" महादू झटकन हिशेब पुरा करीत म्हणाला.

महादूची ही बहुप्रसवा मुलगी जेमतेम चार फूट उंच आहे.

"दे सोडून म्हणावं नवरा." मी तर्कखाष्ट सल्ला दिला.

"एकटी पोर नावो. काय करील सांगा!" अहं, अहं, अहं! महादू हसत की रडत म्हणाला.

"आम्ही आता जाणारंच नाही तिकडे," महादूची बायको म्हणाली. "अन् जमीन तुमची?" मी विचारले. "आता काय करायची जमीन. आमाला काय पोरंबाळं नाई. आमी इथंच मरनार!" महादू परत हसत की रडत म्हणाला.

"आणि पोर तुमची? आणि तिची पोरं?" मी विचारले.

"आता काय करावा? मी म्हटलं, काय हवं ते करा. मी येतच नाय तिकडं!" महादू बायकोकडे पहात म्हणाला. "मीही नाय जानार परत," म्हातारी बँडेजला हात लावीत उद्गारली.

कठीण वळणाशी येऊन पुन्हा संवाद तिथंच थांबला.

पुन्हा माझी मळ्याची साप्ताहिक फेरी झाली. पाहतो तर महादू एकटाच काडी चावत बसला होता. "हे काय, म्हातारी कुठं आहे?" मी विचारले. "गावाकडचा मानुस आला होता ना हो!" महादू सांगू लागला. "तो म्हनं पोर अडली आहे तिकडे. बलावलंय तुम्हाला."

"आणि म्हातारी गेली?" "मग? आईचा जीव ना वो." अहं, अहं, अहं! "रेडू घेऊन गेली संग!" महादू म्हणाला. "रेडू घेऊन गेली! का बरं?" मी आश्चर्याने विचारले. "म्हणे म्हंजे जावई तरास नाई देणार काई दिवस. तो तिला म्हणे, म्हताऱ्याला रेडू कशाला लागतोय?"






"म्हणजे म्हणून मारत होता पोरीला अन म्हातारीला तो?" मी विचारलं.

"आता जावई ना हो तो आपला. काय सांगावं त्याला?" अहं, अहं, अहं! महादू म्हणाला.

मी डोक्याला हात लावला. मी मळ्यातून परतलो तेव्हा महादू परत एकटाच उरला होता.

– ७ –

ठिकाण पोलिस स्टेशन. मला राजारामचा – आमच्या शेतकरी मित्राचा – फोन आला की, माझ्या मुलाला पोलिसांनी स्टेशनवर नेलंय. लगेच तिथं ये. आणि पैसे घेऊन ये. दोन हजार रुपये.

धावतपळत मी तिथं पोचलो. राजारामचा मुलगा विजय तिथं बाकावर बसला होता. चेहरा रागावलेला. मारही खाल्ला होता की काय कोणास ठाऊक. स्वतः राजाराम इन्स्पेक्टरसमोर बसला होता. अगदी दीनवाणा. मला पाहताच चटकन उठला. माझा दंड धरून चौकीबाहेर पडला. अगदी हळू आवाजात म्हणाला, "आणलेस पैसे?" मी ते मुकाट्याने त्याच्या हातात दिले. त्याचे हात थरथरत होते. म्हटलं, "काय झालं?" "जुनंच रे दुखणं!" तो म्हणाला. "माझ्या शेताला रस्ता नाही. या वर्षी द्राक्षं तर खूप आली. डोक्यावरून किती माल वाहणार? मी परवानगी काढायला गेलो शेजाऱ्याची. इकडं विजूनं ट्रॅक्टर घातला शेतात. झाली मारामारी. आता हा सुटला नाही तर सगळंच मुसळ केरात जाईल. मालाचं लोडिंग व्हायला हवं. व्यापारी तयार आहे. माल पाठवायचा आहे इंग्लंडला! इन्स्पेक्टर म्हणतो, दोन हजार द्या!"

तो पैसे घेऊन चौकीत शिरला. इतका वाकून की मला वाटलं, तो आता मुजरा करतोय इन्स्पेक्टरला. राजारामचे वय पंचावन्न. त्याची गेली वीस तरी वर्षं कोर्टात केस चालू आहे – शेताचा रस्ता वादात पडलाय म्हणून. मूळ कोर्टात निकाल विरुद्ध गेलाय. मात्र अपिलात रस्ता नक्की मिळेल असं राजारामचं मत आहे. त्याचे वकीलच तसे म्हणाले म्हणतो.

खूप वेळ वाट पाहत बाहेर थांबल्यावर विजू आणि राजाराम बाहेर आले. आता राजाराम विजूची मिनतवारी करीत असावा असे दिसले.

"काका" – मला पाहून विजू म्हणाला, "बाबा मध्ये पडले म्हणून, नाहीतर चेचलाच असता ट्रॅक्टरखाली भडव्याला."

"फार भडक डोक्याचा आहे आमचा छोकरा!" आता राजाराम विजूच्या शिवीकरता माझी जणू अजिजी करावी तसा म्हणाला. "पगार झाला की देऊन टाकतो तुझे पैसे. द्राक्षाला भाव आला तर आधीसुद्धा!"

– ८ –

"शेती ही जीवनपद्धती आहे," एकजण मला सांगत होते. त्यांच्या शेतातल्या बंगल्याच्या व्हरांड्यात आम्ही वेताच्या खुर्च्यांमध्ये बसलो होतो. ते पाईपने तंबाखू ओढीत होते. ते मध्ये धूर सोडायचे थांबले म्हणून पाहिलं तर चांदीच्या खिळ्यानी त्यांचं पाईपच्या वाटीचं उत्खनन चालू होतं. "इट्स ए वे ऑफ लाइफ," वरचेच विधान जणू अधिक सुबोध करीत ते म्हणाले. "यू नो व्हॉट आय मीन, आय सपोझ." त्यांनी पाईपची वाटी तळहातावर आपटली. मग पुनः तंबाखू त्यात भरून त्यांनी खूप धूर उत्पन्न केला. मला आमच्या बुवाजी नावाच्या वारली शेतगड्याची आठवण झाली. सगळा मिळून सत्तर पौंड असलेला बुवाज्या मी दहा वर्षांचा असताना म्हातारा होता. द्राक्षाच्या कामात तो पटाईत होता. तो चिलीम प्यायला जमिनीवर मोठ्या रुबाबात बसायचा. गायक गाणं सुरू करताना बसतो तसा. मग वर जिवणी करून चिलीम दोन तळहातांत धरून फक् फक् फक् करीत धूर सोडायचा. इतका धूर, इतका धूर की त्या ढगात तो गायब होऊन जायचा.

माझ्याशी आता बोलणाऱ्या सायबात आणि बुवाज्यात तेवढेच एक साम्य मला दिसले. नाही म्हणायला आणखी एक गोष्ट होती म्हणा. बुवाज्या गुढग्यापर्यंतचे आखूड धोतर नेसायचा आणि माझ्याशी बोलणारे गृहस्थ तशीच गुढग्यापर्यंत पोचणारी, तळाला दशा निघालेली बावळट पण अमेरिकन आणि शिवाय फॅशनेबल चड्डी घालून बसले होते.

"इट्स नॉट धंदा, यू नो!" ते पुढं म्हणाले. "धन-दा. यू फॉलो. पैसे मिळण्याचे साधन नाही आहे ते." एका मोठ्या कंपनीचे पूर्वी मॅनेजर असलेले हे गृहस्थ सांगत होते. "इंडस्ट्री आणि शेती आर बेसिकली डिफरंट, यू नो!"

त्यांनी केलेली कार्नेशन फुलांची शेती आणि त्याकरता त्यांनी उभारलेले प्लॅस्टिकचे तंबू आणि पाण्याचे अतिबारीक थेंब छिडकणारे फव्वारे बघून आम्ही नुकतेच परतलो होतो. किती फुले एक्स्पोर्ट केली, त्याचा स्वित्झर्लंडमध्ये भाव किती पडतो वगैरे त्यांनी मोकळेपणी मला सांगितलं होत.

"इन्कमटॅक्स चुकवण्याकरता शेती हे मला मान्य नव्हतं," ते म्हणाले होते. "आय टोल्ड माय सन-इन-लॉ. शेती करायची तर मी नीट शेतीच करीन. बट यू मस्ट रिअलाइज द डिफरन्स! इट्स नॉट इंडस्ट्री!"

शेती धन-दा नाही हे सागताना मला किती उत्पन्न डॉलर्समध्ये मिळाले हेही त्यांनी सांगून टाकले होते.

मला अस्वस्थ वाटू लागले होते. खरं तर ती जागा छान होती. रमणीय म्हणायला हरकत नाही अशी. पण तरी मला तिथून बाहेर पडायचे होते. पण त्यांच्या आदरातिथ्यानं, भोंदू मोकळेपणानं, एकांगी पण बव्हंशी तार्किकदृष्ट्या नेमक्या असलेल्या विचारांनी मी भारावलो होतो. कदाचित त्यांनाही श्रोते मिळत नसतील. पण आता मला तेथून बाहेर पडायचे होते.

"इंडस्ट्रीमध्ये सगळं आपल्या हातात असतं. जरा कामगार संघटनांना आणि सरकारी माणसांना हँडल करता आलं की झालं! इथं तसं नाही. तुमचा ताबा कशावरच नाही. कधी पाऊसच नाही तर कधी ढगच जास्त, तर कधी कामाला माणूसच नाही. आय थॉट इट वॉज अ चॅलेंज फॉर मी. मी बिझिनेस मॅनेजमेंटचा पहिला ग्रॅज्युएट आहे, डू यू नो? आमची बॅच पहिली. आणि मी काम करतो शेतात. हांऽऽ! रिमेंबर. दॅट्स द की. की टु लाँग लाइफ. पहिलं उत्पन्न काय घेतलं ठाऊक आहे मी? बांबू. इट्स ग्रेट. नो रिस्क. पाच एकर साला बांबूच लावा म्हटलं. तेव्हा मला काहीच माहिती नव्हतं बरं शेतीचं. जस्ट आय ॲक्युमेन. आणि मग मला स्ट्राइक झालं की, विथ माय विझिनेस कॉन्टॅक्ट्स... कार्नेशन फ्लॉवर्स! नथिंग लाइक इट! पैसे खूप लागतात. पण हां, पैशाशिवाय शेती नाही. लक्षात ठेव. तुझी नैसर्गिक शेती नं फुकुओका, ऑल वुलशिट! यू नीड मनी इन लॅक्स, इन मिलियन्स ॲण्ड देन यू हॅव धिस!" ते नाटकीपणाने समोर दोन्ही हात पसरून म्हणाले, "मग देता घेशील किती – वगैरे म्हणायचं!... वेल, – यू डोंट ड्रिंक, आय सपोझ," ते म्हणाले. "नॉट ईव्हन विअर?"

"नाही. मी निघतोच आता," मी उठत म्हणालो. "पण काहो, ही फुलं आपल्या मार्केटमध्ये खपतील का?"

"इंडियन मार्केट?" ते असा चेहरा करून म्हणाले की जणू मी त्यांना, तुम्ही रस्त्यावर शौचाला बसता का, असे विचारले असावे. "व्हॉट नॉन्सेन्स! आय डोंट इव्हन थिंक ऑफ इट! तुला ते जेव्हा समजेल तेव्हा खरं! नोबडी शुड एव्हर गो देअर! एम ॲट एक्स्पोर्ट. मी सर्वांना नेहमी सांगत असतो, एक्स्पोर्ट, एक्स्पोर्ट – दॅट इज द की!'

"तुमचं म्हणणं बरोबर आहे," असे म्हणत मी त्या प्लॅस्टिकच्या नंदनवनातून बाहेर पडलो.

– ९ –

उन्हाचा भयंकर रखरखाट. कोरड्या गरम वाऱ्यानं उडणारी धूळ. घाम जागच्या जागी वाळून अंगावर मिठाचा थर उरत होता. अशा वातावरणात आम्ही त्या वस्तीजवळ पोचलो. चहाच्या टपरीत चौकशी केली. धोतऱ्याच्या सोग्यानं घाम पुसणाऱ्या काळ्याढोण माणसाने नेमका पत्ता सांगितला.

शेतात शिरायचे फाटक बंद. त्याच्या पत्र्यावर भ्रष्ट मंत्री आणि सरकारी अधिकारी यांनी येथून पुढं येऊ नये अशी ताकीद. आत पुन्हा मैदान. लाल जांभळी कावेच्या थराची माती झालेली. गरम आणि कोरडी ठाक. मग छोटी घरं लागली. घुमटासारखी. एस्किमोंच्या ईग्लूची, म्हणून वर्फाची, म्हणून कोकाकोलाची आठवण झाली. कोरड्या ओठावरून जीभ फिरवली. बाटलीतले कोमट पाणी प्यालो. त्या घरांमध्ये आणि बाहेर खूप पाट्या लावलेल्या होत्या. सूर्यऊर्जा, वाऱ्याची ऊर्जा, पोल्युशन, पर्यावरण नासाडी, वाया जाणाऱ्या नैसर्गिक स्रोतांबद्दल, शेतीबद्दल, ठिंवक सिंचनाबद्दल, पाण्याबद्दल असं वरंच काय काय तिथे लिहिले होते. उद्यमशीलता, उद्योग, उद्योजक, अमेरिकेच्या थापा असंही वरंच काही होतं. मोठ्या माणसांची वाक्यं ठिकठिकाणी टांगली होती. साधारण सर्व आठवी-नववीच्या मुलांकरता असावं असं वाटलं.

ज्यांना भेटायला आलो ते गृहस्थ भेटायला वराच वेळ लागला. तिथल्याच एका सपाटसर टेकडीवर प्रत्यक्ष काम करताना ते भेटले. अर्धी चड्डी व वनियन घातलेले. आरडाओरडा वराच चालला होता. पण तो नेहमीचा असावा. त्यांच्या हातात कुदळ होती. चेहऱ्यावर स्मित होतं. 'कॉंटूर वंडिंग' करत होते म्हणे! मुरूम फार टणक लागला होता.

आम्ही काम पाहायला आलो आहोत म्हटल्यावर म्हणाले, "गप्पा मारायला मला वेळ होत नाही." पण आम्ही किती दुरून आलो आहोत हे सांगितल्यावर विरघळले. मग खूप बोलले. गांधी आणि आइनस्टाईन यांचा सुवर्णमध्य काढायचा त्यांचा प्लॅन होता. किंवा आहे. बाबा आमट्यांच्या *ज्वाला*








*आणि फुले* आणि कसली कसली आठवण झाली. शूर योद्धा माणूस वाटला. त्यांनी काहीही सांगितले असते तरी ऐकले असते इतके त्यांचे कौतुक वाटले. फक्त स्वतःच नाही तर त्यांची बायकामुलेसुद्धा त्यांच्या रणात सामील. सर्व 'सरकारी' गोष्टींबद्दल, राजकारणाबद्दल, आर्थिक उलाढालीबद्दल कडवटपणे बोलले. आंतरराष्ट्रीय व्यापार आणि बाजारपेठ यांमधील खोटेपणाबद्दल पोटतिडिकेने बोलले. अमेरिका आणि तिची संस्कृती याचा ज्वलंत द्वेष त्यांना होता असे दिसले. त्यांचा अभ्यास खूप होता. पण त्याचा जणू त्रास झाला होता. पण त्यांची नजर त्या माळावरून फिरताना मात्र त्यांना हिरवळ दिसत असावी असे वाटले.

शेवटी, जेवायला थांबा म्हणाले. मग आणखी गप्पा झाल्या. त्यांचे सर्व म्हणणे बरोबर होते आणि कोणतीही कल्पना चूक नव्हती. पालापाचोळ्याच्या गोवऱ्या थापून त्या जाळायची चूल, पवनचक्कीने पाणी उपसणे, आपल्या जागेपासून पाच किलोमीटरमध्ये मिळणाऱ्या वस्तूंपासून नवीन प्रकारचे घर-वजा झोपडी बनवणे. सर्व बरोबर होते. पण ते करण्याचा धबडगा ऐकून छाती दडपत होती. एक मात्र पटत होते की, माणूस निधडा.

त्यांनी आम्हाला खूप काही पत्रके दिली. काही झेरॉक्स पुस्तकांच्या प्रती किंमत देऊन घेतल्या. आमची जाण्याची वेळ झाली. "तुम्ही जमीन घेतली आहे वाटतं?" त्यांनी विचारले. म्हटलं, "तुम्हांला कसं कळालं!" तर म्हणे, "मी ऐकतोय ना तुमचं बोलणं! माझ्या बऱ्याच मित्रांनी घेतली आहे जमीन. ते तुमच्यासारखंच बोलतात, उंटावरून शेळ्या हाकणं वगैरे!"

"मग त्यांचा अनुभव काय?" मी विचारले.

"त्यांचं आमचं सारखंच. तुम्हीही त्यातलेच!" ते म्हणाले. "कोणी भेटले की मी विचारतो त्यांना 'काय म्हणतंय तुझं ब्लॅक होल?' बस एवढंच!" मग ते गदगदून हसू लागले. माझ्याकडे त्यांनी टाळी मागितली. मी ती दिलीही.

घरी परतत असताना, एखादी नवीन वस्तू पुनःपुन्हा काढून पाहावी तसा मी त्या उपमेचा सारखा विचार करत होतो. सर्व काही गिळून पुन्हा तसंच आऽऽवासून उभं राहिलेलं 'कृष्ण विवर' परत परत माझ्या डोळ्यांपुढे उभे राहत होते.





# आदिवासी आणि जंगले हेच माझे गुरू

**कुसुम कर्णिक**

माझी सामाजिकतेकडे झालेली वाटचाल वेगळी असेल असे जाणवते. मानसशास्त्राचे अध्ययन करत असताना, मनोरुग्णांबरोबर वावरताना, त्यांना मदत करताना आढळले की, काही घरांचे वातावरण हे मयसभेसारखे बनते. तिथे ज्या गोष्टी नाहीत त्या आहेत आणि आहेत त्या नाहीत असे भासवले जाते; आभास, मिथ्ये (myths) निर्माण होतात. यात संवेदनशील आणि दुबळी (जिला तडजोड करणे कठीण होते) व्यक्ती गोंधळते, भांबावते; तिचे वास्तव भासमय आणि अस्पष्ट होऊ लागते. पण ती वेगळा मार्ग न घेता अ-तडजोड परिस्थितीला पोचते. आणि मग ती कुटुंबात-गटात प्रथमतः वेगळी-नाजूक-अयोग्य आणि शेवटी वेडी ठरत जाते. हे का घडते याच्या पाठीमागे गेले तेव्हा वाटले की, या कुटुंबांची जीवनमूल्यांबाबतची परिस्थिती गोंधळाची असते. आणि मग वाटले की, समाजाची परिस्थितीही अशीच गोंधळाची आहे. एक विचार करायचा, दुसरे बोलायचे आणि तिसरीच कृती करायची अशी ही परिस्थिती आहे. आणि ती 'तशीच असते' पासून ते 'तशीच असावी' इथपर्यंत धारणा दिसते. चर्चेत स्वातंत्र्य, समता, बंधुता, न्याय, श्रम, प्रेम ही जीवनमूल्ये नाहीत असे कोणी म्हणत नाही. पण व्यवहार मात्र याला धरून नसतो. याचा अनुभव ठायी ठायी येतो. आणि मग मनात विचार आला की, ही वस्तुस्थिती कळल्यावर माझी पुढची वाटचाल काय असायला हवी, तर हे सारे बदलण्याकरिता, समाजपरिवर्तनाकरता मला काहीतरी करायला हवे. इथून माझी सामाजिक कृतीची सुरुवात झाली.

लहानपणी घरच्या मध्यमवर्गीय ब्राह्मणी वातावरणाशी झगडा देऊन राष्ट्र सेवादलात जात राहिले. स्वातंत्र्यपूर्व काळातला










जन्म, पण स्वातंत्र्ययुद्धाच्या काळात वय कमी असल्याने त्यात मी नव्हते. पण सेवादलाचे संस्कार रुजले होते. नंतरच्या आयुष्याच्या वेगात सेवादलाचा हात सुटला. शिक्षण, प्रशिक्षण, पुढचे जीवन यांत पूर्ण गुंतायला झाले. वातावरणाचा फार मोठा प्रभाव व्यक्तीवर पडत असतो. रोजचे जीवन, त्यातल्या व्यक्तिगत अडचणी, यश-अपयश हेच फार मोठे मानणारे वातावरण समाजजीवनावर एक जाड थर पसरते आणि मग जीवनाचे प्रवाहीपण, समष्टीचे अस्तित्व खूप धूसर बनते. विचार अपुरे, तोटके आणि स्व-केंद्रित बनतात.

१९६० च्या दशकात शहरातील परिस्थिती बदलत होती. उद्योगधंद्याला उपयुक्त अशा मूलभूत सोयी-सुविधा नेहरूसरकारने उभ्या केल्या होत्या. त्याच्या आधारावर कारखाने सुरू झाले. मध्यमवर्गीय, शिक्षित उच्चवर्णीयांपुढे नव्या संधी निर्माण झाल्या आणि एक सुबत्ता निर्माण झाली. नोकऱ्या मिळायला लागल्या, पगार वाढत गेले. जुन्या काटकसरीच्या आणि जपणुकीच्या जीवनाची कदर न उरावी अशी परिस्थिति आली. आता रेलचेल असताना जुनी काटकसरीची विचारसरणी दळभद्री ठरू लागली. साधेपणा म्हणजे मूर्खपणा ठरू लागला. स्वातंत्र्य म्हणजे उपभोगाची परवानगी असे वाटू लागले. दिवसेंदिवस साधन-सुविधा वाढत जाऊन आज आता त्यांचेच साम्राज्य सुरू आहे. बाजार ही गोष्ट पूर्वी जीवनाचा मोठा भाग नव्हती; पण आता बाजार, त्यातल्या आकर्षक, रंगी-बेरंगी वस्तू, त्या आपल्याला जरुरीच्या असोत वा नसोत, महत्त्वाच्या ठरल्या आहेत. पंचेंद्रियांना अधिकाधिक सुख कसे देता येईल याकरता मोठ्या प्रमाणावर सामाजिक गुंतवणूक होते आहे. पूर्वी सांस्कृतिक केंद्रे असलेली शहरे वा विभाग आता बाजारपेठा बनले आहेत.

या साऱ्या समृद्धीकडे आम्ही कसे बघितले आणि बघतो आहोत हा प्रश्न महत्त्वाचा असूनही अडगळीत पडला आहे. या प्रगतीची किम्मत कोण भरते आहे याचा विचार सुटला आहे. जो बुडला तो बुडला, उठला तो उठला, मेला तो मेला अशी वृत्ती रुजत आहे. ज्याचे त्याचे नशीब हे म्हणणे ज्याचा फायदा होतोय त्याला सोयीचे, सोसणारे आणि मनातला सल कमी करणारे आहे. पण जो बुडतोय त्यालाही वाटते की, आपण फायदावाल्या गटात गेलो की सारे नंदनवन आहे, त्याकरिता तेथे जाण्याची धडपड करावी. हे मोठ्या धोक्याचे लक्षण आहे. यातून असलेली व्यवस्था मजबूत होते आहे. सर्वांना या प्रकारचे लाभ मिळणार आहेत, फक्त त्याला योग्य अशी परिस्थिति निर्माण व्हायला हवी आहे, हा आभास आज अस्तित्वात आला आहे.

सामाजिक कृतीच्या क्षेत्रात मी पडले आणि जीवनाला एक नवे वळण, अपूर्व असा जिवंतपणा, मुक्तपणा आला. जाणिवांना भिंती उरल्या नाहीत. ही जाणीव मला घेता येणार नाही, अशी परिस्थिति खूप कमी प्रमाणात उरली. आपली निवड, त्याची जबाबदारी, त्याकरता सोसणे, राबणे करावे लागते; त्यातच स्वातंत्र्य असते आणि आनंद असतो हे अनुभवायला मिळाले. या स्वातंत्र्याच्या अभिव्यक्तीला बंधुतेची जोड मिळाल्याशिवाय, समतेची ड्रव असल्याशिवाय मात्र सामाजिक कृती होऊ शकत नाही हे कळले. देशाला स्वातंत्र्य मिळाले म्हणजे कोणाला मिळाले असा विचार केला तर, मूठभरांचे स्वातंत्र्य बाकी सर्वांना वापरून आपला कारभार चालवते आहे हे स्पष्ट होते. काम करायला लागल्यावर, ठरवून नव्हे, पण तरीही आदिवासी आणि जंगलभागात काम करावयाचा योग आला. आदिवासी भागाची ओळख सुरुवातीच्या काळात जी झाली ती फारच अपुरी आणि एका पालकत्वाच्या दृष्टिकोणातून झाली. पण १९८०-८१ला जेव्हा नव्याने आदिवासी भागात काम सुरू केले तेव्हा मनाशी पक्के ठरवले होते की, मी शिकवणार नाही, तर शिकणार आहे. आणि मग खरोखरच जीवनाची शाळा झाली, बरेच गुरू भेटले आणि खूप शिकायला मिळाले. आदिवासी आणि त्यांचा परिसर, त्यांचा निसर्ग-कोपरा याचे खोलवरचे नाते, त्यांची माणुसकीची समज – ज्यात त्यांच्या भोवतालची माणसे, प्राणी, जीवजंतू, वनस्पती, जंगल, डोंगर, ओढेनाले, सारे सामावले जाते. एकात्मिक जीवनाचा तो एक उत्कृष्ट नमुना आहे हे दिसले. चिपको आन्दोलनाच्या भागात फिरताना आणि काम समजून घेताना पर्यावरण आणि त्याचा मानवी जीवनाशी असलेला संबंध स्पष्ट झाला आणि दृष्टी बदलली. जंगलाचा उलगडा वाढत गेला. मग जंगल-जीवनाचा अभ्यास सुरू झाला. वेगवेगळ्या प्रकारची जंगले, त्याच्याशी जोडलेले प्राणिजीवन याच्याशी संबंध ठेवून, ते सारे टिकवून जगणारे मानवी जीवन, त्यांची वैशिष्ट्यपूर्ण संस्कृती हा एक अभ्यासाचा मोठा विषय आहे. जंगल म्हणजे निव्वळ काही मोठी झाडे, लागवडीचे पट्टे नव्हेत तर ते एक वैशिष्ट्यपूर्ण विश्व आहे. त्यातील सूक्ष्म जीवजंतू, लहानमोठे प्राणी-पक्षी यांचे तेथल्या वनस्पती,

अनुक्रमणिका






माती, पाणी यांच्याशी आणि परस्परांशी नाते असते. अशा नात्याच्या जाळ्यावर त्यांचे नाजूक जीवनबंध अवलंबून असतात. भीमाशंकरसारखे चार स्तरांचे, सदाहरित मेघवन हा एक त्या भौगोलिक परिस्थितीवर आधारलेला आणि त्या परिस्थितीला आधार देऊन टिकवणारा पसारा आहे. या प्रदेशावर त्याचे अस्तित्व तसेच त्याच्यावर या भागाचे टिकाऊ, सातत्याचे अस्तित्व आधारलेले आहे. आणि हे सारे जाणून त्याला विलगून, आईप्रमाणे मानून आणि जपणूक करून राहणारा इथला आदिवासी समाज हे शाश्वततेचे आधार आहेत. या घनदाट जंगलातही देवराया राखणे, वाघाला देवीचे वाहन समजून देवत्व आणि संरक्षण देणे, वनौषधींचा शोध, जतन आणि ते साऱ्या समाजाचे साधन म्हणून ठेवणे अशा अनेक प्रकारे या समाजाने या परिसराला शाश्वतता दिली आहे आणि स्वतःचे अस्तित्व टिकवले आहे. सरिस्कासारख्या राजस्थानातल्या वेताच्या पावसातले जंगल हा वेगळ्या प्रकारचा परिसर आहे. त्याला कांकडवनी, रखतवनी, देववनी, देवओरण अशा चढत्या कमानीच्या वन-वन्य जीव संरक्षणाच्या व्यवस्थेची जोड देऊन शेती आणि पशुपालनावर उत्तम दर्जाचे जीवन तिथल्या गुज्जर जमातीने उभे केले आहे. गरीब तिसऱ्या जगातल्या देशांत अनेक ठिकाणी या प्रकारची उदाहरणे उपलब्ध आहेत.

आज जगात विचारांची दिशा अनिर्बंध आणि संधिसाधू विकासाकडे आहे. जे हातात मिळू शकेल आणि बळाच्या जोरावर ताब्यात ठेवता येईल ते मिळवायचे. कोणत्याही मार्गाने धन, नैसर्गिक संसाधने, राजकीय अधिकार, साऱ्या गोष्टी मिळवणे हे अनैतिक मानले जात नाही. कोलंबसी वृत्तीचे अधिराज्य सर्वमान्य आहे. शास्त्र आज धनिकांचे शस्त्र बनले आहे. पण तरीही या वृत्तीच्या मर्यादा आणि धोकाही जाणवतो आहे. समाज काही प्रमाणात विचार करायला लागलाय की, जीवनाचा आधार अखेरीला नैतिकतेत आहे. मग ही नैतिकता काय आहे? मानव-अधिकार काय आहेत? यावर आता विचाराची सुरुवात होते आहे. एका बाजूने विकासाची काळी अभद्र छाया वेगवेगळ्या प्रकारे भासते आहे. आणि तिच्यापासून मुक्त विकासाची कल्पना काहीजण मांडत आहेत. दक्षिण आफ्रिकेत वंशभेद मिटताना दिसतोय. थोडी सूक्ष्म रूपातली सुचिन्हे आहेत. पण त्याचबरोबर विकासाची दिशा बदलण्या-बाबतीतली असहायता अनेकजण व्यक्त करीत आहेत. सर्वनाश होणार आहे असे अनेकांना जाणवते आहे पण असहायता ग्रासून राहिली आहे. आत्मकेंद्री वृत्ती सोडून स्वतःमध्ये बदल करण्याची जरुरी आहे. या बाबतीतली कमजोर इच्छाशक्ती टाकून ताकदीने समाज उभा राहायला हवाय.

नैसर्गिक संसाधनांनिशी असलेली वसुंधरा हे मानवाचे आश्रयस्थान आहे. या संसाधनाशिवाय जगणे शक्य झाले तर बोटावर मोजण्याइतक्या लोकांनाच ते शक्य होईल आणि म्हणून ती दिशा सोडून एक मानवीय विकास – जो न्यायावर, बंधुतेवर, समानतेवर आधारलेला असेल – त्याच्या दिशेला जायला हवे आहे.

❖❖



# ग्रामीण भागातील रचना आणि संघर्ष

**शिवाजी कागणीकर**

मी इयत्ता चौथीत शिकत होतो. आमच्या शिक्षकांनी १५ ऑगस्ट १९४७ या आपल्या स्वातंत्र्य-दिनाबद्दल बरीच माहिती सांगितली. माझे गुरुजी म्हणाले, "१५ ऑगस्ट हा दिवस उजाडला नसता तर अजुनी आम्ही इंग्रजांचे गुलाम होऊनच राहिलो असतो. एके वेळेला आपल्या देशात सोन्याचा धूर निघत होता. इंग्रजांनी १५० वर्षांत आपल्या देशातील सर्व संपत्तीची लूट करून नेली व आपल्या देशाला भिकेकंगाल बनवले. आपल्या भारतीय जनतेची अन्नान्न दशा करून टाकली." हे सर्व ऐकून मी बाहेरून व आतून संपूर्ण हादरून गेलो. म. गांधी, लो. टिळक, पं. जवाहरलाल नेहरू यांनी कारावास भोगला; देशभक्त भगतसिंग, बाबू गेनूसारखे हुतात्मे झाले म्हणूनच आपण स्वतंत्र होऊ शकलो, असे मनात येऊन या

सर्वांच्या आदरापोटी खूप वेळा माझ्या डोळ्यांतून आनंदाश्रू जात असत. १५ ऑगस्ट व २६ जानेवारी हे दोन्ही राष्ट्रीय सण साजरे करण्यासाठी शाळेत कार्यक्रम आयोजित करीत असत तेव्हा देहभान विसरून या कार्यक्रमांत सहभागी होत असे. माझ्या गुरुजींनी या दिवसांचे महत्त्व सांगितल्या वेळेपासून कोठेही व केव्हाही राष्ट्रगीत जन-गण-मन म्हणत असतील तर एकदम सावधान मध्ये उभा राहून राष्ट्रगीत म्हणू लागलो. जगात आम्ही स्वतंत्र आहोत असे मान उंच करून सांगणाऱ्या तिरंगी झेंड्याला अत्यंत आदराने व अत्यंत नम्र होऊन वंदन करू लागलो. सिनेमा थिएटरमध्ये काही वर्षांपूर्वी सिनेमा संपल्यानंतर राष्ट्रगीत लावत असत. राष्ट्रगीत संपण्यापूर्वीच लोक बाहेर जाण्यासाठी घाईगर्दी करीत असत. हे पाहून मला मनस्वी संताप येऊन, एवढे कसे कळत नाही या लोकांना, असा प्रश्न पडत असे. १९८० पर्यंत दर वर्षी या दोन्ही कार्यक्रमांना नियमित जात राहिलो.

'साधना' साप्ताहिकामध्ये कोणी एका दलित मित्राने आपल्या तिरंगी झेंड्याचा अपमान केल्याची माहिती वाचली तेव्हा मला याबद्दल खूप वाईट वाटले. यांनी असे कसे केले... प्रश्न पडला. बऱ्याच दिवसांपर्यंत मनातले गेले नाही.

पंडित जवाहरलाल नेहरुजींसारखे समर्थ पंतप्रधान आपल्याला मिळाले आहेत. आम्ही सर्वांनी आपले कर्तव्य करावयाचे आहे. नोकरांनी प्रामाणिकपणे काम करावयाचे आहे. शिक्षकांनी मुलांना उद्याचे नागरिक बनवण्याचे काम करावयाचे आहे. पोलिसांनी आपले काम चांगले केले पाहिजे, व मिलिट्रीत असलेल्या सैनिकांनी आपल्या देशाचे संरक्षण केले पाहिजे. शाळा शिकलेल्या लोकांनी इतर अशिक्षित, मागासलेल्या लोकांची सेवा केली पाहिजे. असे आम्ही सगळे करीत गेलो की आपल्या स्वतंत्र देशाचे सुराज्य झाल्याशिवाय राहणार नाही. बऱ्याच पुढाऱ्यांनी आपला देश स्वतंत्र करण्यासाठी प्राणांची आहुती दिली, कारावास भोगला, स्वतःच्या घरावर तुळशीपत्र ठेवून देशासाठी लढले. या स्वतंत्र भारत देशाला जगात मानाचे स्थान मिळवून देण्याची प्रतिज्ञा आपले थोर नेते, सर्वांचे लाडके पंडित जवाहरलाल नेहरू यांनी केली आहे. यांचे हात बळकट करण्यासाठी सर्व भारतीयांनी आपापले कर्तव्य पार पाडले पाहिजे, असे मला सतत वाटत होते.

१९६७ साली कडोली या माझ्या गावी सर्वोदय कार्यकर्ते व श्री. श्रीरंगअण्णा कामत यांसारख्यांनी पुढाकार घेऊन एक श्रमसंस्कार शिबिर आयोजित केले. या शिबिरात बेळगाव जिल्ह्यातील ३०० मुलांनी भाग घेतला. मी पण या शिबिरात भाग घेतला. प्रा. रमेश शिपूरकर, श्री. सुरेश शिपूरकर, श्री. हरिदास दिवाकर, श्री. शटगोंडा देसाई व श्री. लक्ष्मणराव होनगेकर इत्यादी मंडळी शिबिर यशस्वी करण्यासाठी सतत १५ दिवस रात्रंदिवस झटत होतो. शेताला पाणी देण्यासाठी श्रमदानाने कालवा तयार करण्यात आला. याच शिबिरात 'द्या देशाला एक तास', 'तुझ्या कामामधून, तुझ्या घामामधून, उद्या पिकंल सोन्याचं रान', 'घ्या रे, हरिजन, घरात घ्या' ही गाणी म्हणायला शिकवले. या गाण्यांतून व श्री. यदुनाथ थत्तेजी, श्री. सदाशिवराव भोसले व श्री. श्रीरंग कामतअण्णा यांच्या रोजच्या भाषणांतून राष्ट्राबद्दल खूप ऐकायला मिळाले. ही सर्व माणसं आपला देश घडवण्यासाठी प्रयत्न करत आहेत, आपली खूप कामं असतानासुद्धा वेळ काढून तरुण मुलांवर संस्कार करण्याचे काम करीत आहेत, हे पाहून मला खूप आनंद वाटत असे. पांढरीशुभ्र खादी घालणाऱ्या काँग्रेस देशभक्तांच्याबद्दल मनात दिवसेंदिवस आदर वाढीस लागू लागला. माझ्या गावातील पुढाऱ्यांच्या समोरून जाण्याचे धाडस बऱ्याच वर्षांपर्यंत मी करू शकलो नाही. मला तर ही सर्व मंडळी देवपुरुषच आहेत असे वाटत असे. जेव्हा आपल्या देशाचे पंतप्रधान नेहरूजी वारले तेव्हा, माझ्या देशाचे पुढे कसे होणार?, इतके चांगले पंतप्रधान कोण होतील?, असे वाटून सात-आठ दिवस रडू आवरता आले नाही. साने गुरुजींनी लिहिलेले लेख (पाठ्यपुस्तकांतील) वाचून मी पण यांना माझे गुरुजी बनवून टाकले होते. माझ्या पुढील जीवनासंबंधी यांचा आदर्श ठेवण्याचा प्रयत्न करीत होतो. हे अत्यंत अवघड असे काम, सतीचे वाण असे वाटत असे. तरी अभ्यासात मागे पडलेल्या वर्गमित्रांना मदत करून त्यांना पुढे आणण्याचे काम, गुरुजनांची सेवा, आजारी माणसांना औषधपाणी करणे, म्हाताऱ्या माणसांनी काही काम सांगितले तर नाही न म्हणणे, असे मला जमेल तसे करायला सुरुवात केली.

मी कॉलेजात असताना प्रयोगशाळेत विद्यार्थी खूप नासधूस करीत असत. विद्यार्थी बऱ्याच वेळा प्राध्यापक मंडळींचा अपमान करीत असत. हे सर्व बघून मला खूप वाईट वाटत असे. घोळक्यांनी उभे राहून विद्यार्थिनींची छेड काढणे, लहानसं कारण मिळालं की कॉलेज बंद पाडणे अशी कामे विद्यार्थी करताना पाहून, मला माझ्या देशाचे कसे होणार, आता आम्ही






गुलाम नाही, स्वतंत्र भारत देशाचे नागरिक आहोत, आपल्या देशाचा जगात मान वाढावयाचा असेल तर असे करून चालणार नाही, असे सतत वाटत राहिले. त्याचबरोबर काही प्राध्यापक मंडळी वर्गावर नियमित येत नसत. बऱ्यापैकी शिकवतापण येत नसे. खूप रागावणे, विद्यार्थ्यांचा अपमान करणे असे करीत असत. ही शहाणी माणसं असे का करतात, असा प्रश्न मला पडत असे. मी खूप दु:खी होत असे.

१९७२ साली कडोली गावात अखिल भारतीय तरुण शांतिसेनेचे शिबिर झाले. या शिबिरात देशातील वेगवेगळ्या प्रांतांतील ५०० तरुणांनी भाग घेतला होता. यात डॉक्टर मंडळी होती, इंजिनिअर, पदवी परीक्षा संपादन केलेले युवक, प्राध्यापक मंडळी होती; मी पण या शिबिरात श्री. सदाशिवराव भोसले (सर्वोदय कार्यकर्ते) यांच्या सांगण्यावरून भाग घेतला. शिबिर पाच दिवसांचे होते. या शिबिरात श्री. नारायणभाई देसाई, प्रा. पांढरीपांडे सर, श्री. अशोक वंग, श्री. अशोक भार्गव, श्री. दिलीप कामत, श्री. वसंत फुटाणे, जानकीबहन यांची तोंडओळख झाली. या शिबिरात खूप वेगवेगळ्या विषयांवर व्याख्याने झाली व चर्चा झाल्या. 'करो राष्ट्र निर्माण', 'हम इस देशके संतान' अशा गाण्यांतून देशासाठी आता काहीतरी करायला पाहिजे असा संदेश मिळाला. इतकी सर्व मंडळी माझ्या देशाचे भवितव्य उज्ज्वल करण्यासाठी निघालेली पाहून माझे हृदय भरून येऊ लागले. साने गुरुजी, पंडित जवाहरलाल नेहरू, म. गांधी, जयप्रकाश नारायण व संत विनोबा भावे इत्यादी मंडळी नजरेआड होईनाशी झाली. मार्च १९७३ या महिन्यात कडोली भागात प्रा. ठाकुरदास वंग यांच्या मार्गदर्शना-खाली ग्रामदान-ग्रामस्वराज्य अभियान आले. याचे मुख्य संयोजक श्री. सदाशिवराव भोसले होते. मी पण या अभियानात भाग घेतला. या भागातील १५-२० गावांना पदयात्रा करीत या मंडळींच्या बरोबर फिरलो. सभा ऐकल्या. अभियान संपल्यानंतर याच भागातील अत्यंत मागासलेल्या गावात राहून लोकांची सेवा करावयाची अशी प्रतिज्ञा केली.

ग्राम स्वराज्य-ग्रामदान अभियानाच्या वेळेला बऱ्याच गावांतून ग्रामसभा घेऊन ग्रामदान पत्रावर सह्या घेतल्या होत्या. गावं ग्रामदानी बनली होती. अशा गावांतून ग्रामकोष गोळा करण्याचे काम घेतले. जेव्हा सर्वोदय कार्यकर्ते (श्री. सदाशिवराव भोसले) मंडळी मिटींगला असत तेव्हा गावात गावविकासाच्या कामांची यादी तयार होत असे. त्यानंतर प्रत्यक्षात काहीच होत नसे. गावपुढारी मंडळींना ग्रामकोष गोळा करण्याच्या कामात फारसा रस आहे असे दिसत नव्हते. एवढेच नाही तर, या भागातील राजकारणी मंडळी (काँग्रेस पक्ष व महाराष्ट्र एकीकरण समितीचे लोक) श्री. सदाशिवराव भोसले यांचे कार्य या भागात कसे चालणार नाही यासाठी प्रयत्न करताना दिसत होती. एके वेळेला, श्री. भोसलेजींच्या बरोबर काम केलेल्या काँग्रेस कार्यकर्त्यांनी, पक्षीय राजकारणाशिवाय आपल्या भागाचा खरा विकास होणार नाही, असा प्रचार करून सर्वोदयचे काम बंद पाडले. मी या सर्व घटनांमुळे संभ्रमात पडलो. गावातील शेतीवाडीची भांडणं पोलीस स्टेशनला घेऊन न जाता गावातच मिटवावीत, गावात निरुद्योगी कोणी राहणार नाही असे गावाने तयार केलेल्या ग्रामसभेने बघून घ्यायला पाहिजे, गावात दारूबंदी झाली पाहिजे इत्यादी लोकांच्या भल्याचे विचार सांगताना ही राजकारणी मंडळी भोसलेदादांना विरोध का करीत असावीत? नेमके यांना यातून काय साधावयाचे असणार? पांढरेशुभ्र खादीचे कपडे घालून सभा-संमेलनांतून लोकांच्या कल्याणाची संपूर्ण धुरा आपणच वाहून घेतली आहे अशा आविर्भावाची भाषणे करावयाची, प्रत्यक्षात वागताना मात्र एखाद्या गरीब माणसाचे कोणी आधार नसतील तर त्याला खूप त्रास द्यावयाचा, त्याच्यावर खोट्या पोलीस केसेस दुसऱ्याकडून करायला लावावयाच्या; मग तो कंटाळून गाव सोडून तरी जात असे, किंवा नाही जात म्हटले तर गाव सोडायला त्याला भाग पाडावयाचे. तो सोडून गेल्यानंतर त्याचे घर काही दिवसांनंतर आपल्या संबंधितांच्या नावे पंचायतीमध्ये नोंद करून घ्यावयाचे. दोघांमध्ये भांडण लावून द्यावयाचे. त्यांपैकी एकाला आतून फितूर व्हावयाचे व दुसऱ्याला पोलीस स्टेशनमध्ये तक्रार द्यायला लावायची. पोलीस अधिकाऱ्यांच्या मदतीने लोकांकडून पैसे उकळायचे. असे करून लोकांवर एक प्रकारची दहशत कायम ठेवावयाची. असे हे राजकारणी (काँग्रेस पुढारी) गांधीजींचे अनुयायी कसे काय असू शकतात? यासाठीच यांना स्वातंत्र्य पाहिजे होते का? असे प्रश्न मला सतावत.

१९७४ सालची घटना आहे. केदनूर गावात एक माणूस सरकारी दारूदुकान सुरू करीत असल्याची बातमी सर्वोदय कार्यकर्त्यांना मिळाली. गावात दारूदुकान सुरू करू द्यायला नको यासाठी गावकऱ्यांची एक सभा बोलाविली. हे ग्रामदानी गाव होते. श्री. सदाशिवराव भोसलेजींनी याचे वाईट परिणाम

अनुक्रमणिका






किती-किती होतील हे समजावून सांगितले व म्हणाले की, तुम्ही लोक हे दुकान बंद करीत नसाल तर मला सत्याग्रह करावा लागेल. एवढ्यात एक पुढारी उठून उभे राहिले व म्हणाले की, आपल्या सरकारनेच त्याला दारूदुकान काढायला पैसे भरून घेऊन परवाना दिला आहे, याला तुम्ही काय म्हणता? दुसऱ्या कोपऱ्यातून आणखी एक प्रश्न विचारण्यात आला. तो म्हणजे, तो संपूर्ण बेकार आहे; त्याला काम नाही. त्याला दुसरा कुठला तरी उद्योग काढून द्या, म्हणजे तो दारू विकणार नाही! हे ऐकून मी चक्रावलोच.

आपल्या स्वतंत्र भारत देशाचे सरकार १५ ऑगस्ट १९४७ रोजी देशातील सर्व जनतेचे कल्याण करण्याची प्रतिज्ञा करून सत्तेवर आले. तेच सरकार आपल्या लोकांना दारू प्यायला सहज शक्य व्हावे यासाठी दारूदुकानांना परवाने देत आहे. यातून कोणाचे कल्याण होणार? तसेच आपण स्वतंत्र होऊन २७ वर्षे पूर्ण होत होती तरी आपल्या देशातील सर्वांना उद्योग निर्माण करून देण्यास असमर्थ ठरल्यामुळे दारू-विक्रीचा धंदा करून पोट भरून घ्यावयाची पाळी बेकार तरुणावर यावी, याला काय म्हणावे? चार तरी पंचवार्षिक योजनांचा कार्यक्रम संपत आला असणार! आपले सरकार आपल्या सर्व जनतेला का उद्योग निर्माण करून देऊ शकले नाही?

गुजराथ प्रांतातील महाविद्यालयांत व विश्वविद्यालयांत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांनी संस्थाचालकांच्या भरमसाट डोनेशन्स घेण्याच्या विरोधात एक आंदोलन उभे केले. याला जयप्रकाश नारायण यांनी मार्गदर्शन केले. त्याचबरोबर बिहार प्रांतातील विद्यार्थ्यांनी भ्रष्टाचाराच्या विरोधात आंदोलन उभे केले. याचेही नेतृत्व जयप्रकाश नारायण यांनी केले. याचे लोण सर्व देशभर पसरणार या भीतीपोटी त्या वेळच्या आपल्या देशाच्या पंतप्रधान इंदिरा गांधींनी १९७५ साली देशात आणीबाणी लागू करून जयप्रकाश नारायण व सर्वोदय (सर्व सेवा संघातील) चळवळीशी जवळीक असलेल्या सर्व कार्यकर्त्यांना जेलमध्ये टाकून दिले. यात बेळगाव भागातील श्री. सदाशिवराव भोसले, श्री. राम आपटे हे पण होते. या सर्व देशभक्तांनी कोणता असा गुन्हा केला होता? सत्तेवर असलेले सरकार देशाचा कारभार ठीक करीत नाही आहे असे एका त्यागी नेत्याने दाखवून देण्याचा प्रयत्न केला म्हणून लोकशाही सरकारला अशोभनीय असे कृत्य करून आणीबाणी आणली व सर्व देशभक्तांना जेलात डांबून ठेवले. संशयाने लहानमोठ्या कार्यकर्त्यांना वेळी-अवेळी धरून पोलीस स्टेशनमध्ये कोंडून ठेवणे, मार-बडव करणे अशा अनेक अमानुष अत्याचाराच्या, अन्यायाच्या गोष्टी केल्या. या वेळेला बरीच वडिलधारी व जाणकार मंडळी बोलत होती की, इंग्रजांची सत्ता जावी यासाठी ज्यांनी स्वातंत्र्यलढ्यात भाग घेतला त्या वेळेला इंग्रज सरकारनेसुद्धा त्यांच्यावर इतका अत्याचार केला नाही. हे तर आपले सरकार आहे. याला आपले सरकार आणि तेही लोकशाही सरकार कसे म्हणावयाचे? माझ्यासारख्याला प्रश्न पडत होता की, आपल्या सरकारच्या विरोधात ही मंडळी आंदोलन करत आहेत हे चूक आहे? काय नेमके इंदिरा गांधींना म्हणावयाचे असणार? आपल्या देशात लोकशाही सरकार असल्यामुळे आणीबाणीच्या विरोधात आंदोलन करून इंदिरा गांधींची हुकुमशाही मोडून काढली गेली, व परत नव्याने निवडणुका घ्यायला भाग पाडण्यात आले.

लोकांनी हुकुमशाही वृत्ती असलेल्या पक्षपुढाऱ्यांच्या विरोधात मतदानाचा हक्क बजावून अन्यायी-अत्याचारी पुढाऱ्यांना त्यांची जागा दाखवून दिली. आज आपल्या देशात जी लोकशाही आहे तिला खूप मर्यादा असणार. परंतु एकाच वर्षात हुकुमशाही मोडून काढण्याचे सामर्थ्य या लोकशाहीमुळेच माझ्या भारतीय प्रौढ मतदारांत निर्माण होऊन सतत २७ वर्षे सत्तेवर असलेल्या कॉंग्रेस सरकारला खाली खेचले. ऐसपैस सगळीकडे मुळं सोडून बिनधास्त असलेल्या कॉंग्रेस सरकारला हादरा देऊन कोसळवण्याचे महत्त्वपूर्ण काम आपल्या भारतीय जनतेने केले. मला या वेळेला खूप आनंद झाला व नवीन सत्तेवर येणाऱ्या सरकारकडून खूप अपेक्षा बाळगल्या. परंतु शेवटी पदरी निराशाच आली.

१९७७ साली बेळगावजवळील वडगाव, खासबाग व शहापूर येथील दोन कारखान्यांत काम करणाऱ्या १००० पॉवरलूम कामगारांनी आपल्या मागण्या मान्य करून घेण्यासाठी संप केला. काय होत्या त्यांच्या मागण्या? १) ३० ते ४० वर्षे मालकाकडे काम करीत असूनसुद्धा मालकांच्या पुस्तकांत कामगारांचे नाव नोंदवले गेलेले नाही. (तोंडी सर्व काही हिशोब) २) सरकारी पगारी सुट्ट्यांचा पगार मिळावा. ३) दिवाळीला खुशाली म्हणून जे देतात ते बोनस म्हणून द्यावे. या मागण्या मान्य होण्यासाठी या भागातील १०,००० कामगारांना लढ्यात उतरावे लागले. एकूण ७७ दिवस संप चालल्यानंतर या महत्त्वाच्या मागण्या मान्य झाल्या. इतका दीर्घ कालावधीचा संप. अत्यंत हलाखीत दिवस काढणाऱ्या








कामगारांनी उपवास-वनवास सहन करून आपल्या मागण्या मान्य करून घेण्यासाठी जिद्दीने कामगारलढा चालूच ठेवला. जिल्हाधिकाऱ्यांना मोर्चे काढून निवेदने दिली. प्रत्येक वेळेला १० हजार स्त्री-पुरुष कामगार मोर्चात भाग घेत होते. प्रत्येक वेळेला जिल्हाधिकारी निवेदन स्वीकारत असत व सांगत असत की, बंगलोरला कामगारमंत्र्यांना कळवतो. लढा संपेतोपर्यंत कोणीएक मंत्री किंवा विधानसभा, लोकसभा सदस्याने येऊन कामगारांचे काय म्हणणे आहे हे विचारून घेतले नाही. या भागाचे आमदार हे सुद्धा आले नाहीत. मला प्रश्न पडला की, विधानसभेत या भागाचे प्रतिनिधी म्हणून लोक निवडून देतात ते कशासाठी निवडून देत असावेत? पुढारी निवडणुकीला उभा असताना मत मागण्यासाठी जोगवा हातात घेऊन येतो. निवडून गेला की, ५ वर्षापर्यंत या लोकांचे जे प्रश्न आहेत ते विधानसभेत ठेवून चर्चा घडवून आणणे राहिले बाजूलाच, तोंड पण दाखवत नाही. लोकशाही म्हणजे लोकांच्यासाठी लोकांनी निवडून दिलेले लोकांचे सरकार. अशा या सरकारला जनतेचे कल्याण करणारे सरकार कसे म्हणावयाचे? लोकांच्या हाल-अपेष्टा चालूच आहेत. परंतु निवडून गेलेल्या उमेदवाराचा बंगला या वर्षी या शहरात तर दुसऱ्या वर्षी दुसऱ्या शहरात उभा राहताना दिसतो. हे मी एका वेळेला समजू शकेन. कारण या पुढाऱ्यांची वैचारिक बैठक कधीच नव्हती. पण ज्यांनी लोकसेवेचे शिक्षण राष्ट्र सेवा दलातून घेतले, अख्ख्या निपाणी शहरातील सर्व विडी कामगार-वायांचे संघटन उत्तमरीत्या उभे केले, वेळो-वेळी लढे उभारले, समाजवादी पक्षातील सर्वश्री एस.एम. जोशी, ना.ग. गोरे, मधु दंडवते यांचा आशीर्वाद मिळवला, श्री. राम आपटेंसारख्या कामगार-कायद्यात तज्ज्ञ असलेल्या वकिलांच्या मदतीने कामगारांना न्याय मिळवून देण्यात यशस्वी झाले, ते पुढारी जेव्हा जनता दलाच्या तिकिटावर निवडून आले तेव्हा काय झाले? कर्नाटकात 'रोजगार हमी योजना' याचे कायद्यात रूपांतर व्हावे यासाठी श्री. राम आपटे यांनी मसुदा तयार करून यांच्याकडे दिला असता ते काम आजपर्यंतही यांच्याकडून झालेले नाही. हे करण्यासाठी नेमकी कोणती अडचण यांना असावी? बेळगाव भागात वेगवेगळ्या संघटनांतून काम करणाऱ्या कार्यकर्त्यांचे एकवेळचे आदर्श लढाऊ कार्यकर्ते, तसेच पुढील नवीन समाजरचनेच्या दिशेने वाटचाल करणारे आशेचे किरण! परंतु सर्वांच्या वाट्याला निराशा आली!

पॉवरलूमच्या कामगारांना संघटित करून त्यांचा लढा यशस्वी करण्यासाठी काम करणारे तरुण मित्र होते. हे विचारांनी मार्क्सवादी. यांत माझे एक मित्र दिलीप कामत होते. यांच्यामुळे मी पण भाग घेतला. तसे मी ३-४ वर्षे सर्वोदय मंडळींच्या बरोबरीने खेड्यांत फिरून काम केले होते. या भागातले सर्वोदय मंडळाचे काम आणीबाणीच्या वेळी थांबले म्हणून या कम्युनिस्ट विचाराने काम करणाऱ्या तरुण गटाबरोबर कामगारांमध्ये काम करायला गेलो. मला धड सर्वोदय विचार समजत नव्हते ना कम्युनिस्ट विचार. समाजातील गरिबांची मला खऱ्या अर्थाने सेवा करावयाची होती. त्याचबरोबर, त्यांची आर्थिक व सामाजिक स्थिती अत्यंत हलाखीची. हे सर्व चित्र बदलावयाचे असेल तर समाजपरिस्थिती बदलली पाहिजे. सर्वोदय मंडळाचा उद्देश व या तरुण मित्रांच्या गटाचा विचार एकच. परंतु मार्ग वेग-वेगळे. एक अहिंसक, तर दुसरा हिंसक. त्या वेळेलासुद्धा मला अहिंसक मार्ग आवडत होता. परंतु सर्वोदय मंडळाचे काम थांबले होते. तरुण मित्रांचा उत्साह आणि क्रांतीची भडक पद्धतीने ते करीत असलेली मांडणी, समाजातील अंतर्विरोध, या देशातील भांडवलदारवर्ग व यांचीच बाजू घेणारे सरकार यांसंबंधीची मांडणी त्या वेळेपुरती तर खूपच आकर्षक वाटली. कामगारांच्या लढ्यात संपूर्ण ७७ दिवस होतोच. त्यानंतरही काही दिवस संबंध ठेवून होतो. एके दिवशी कामगार युनियनच्या म्हणजे श्रमिक शक्तिसंघटनेच्या ऑफिसमध्ये एक मीटिंग चालली होती. या मीटिंगला मी पण होतो. संघटनेच्या कार्यकर्त्यांनी एक ठराव कामगारांसमोर मांडला. ठराव असा होता की, बँक कर्मचाऱ्यांनी संप पुकारला आहे. त्याला आमच्या युनियनतर्फे पाठिंबा जाहीर करावयाचा आहे. तेव्हा कामगारांनी प्रश्न विचारला की, आमचा ७७ दिवसांचा इतका दीर्घ लढा चालला होता तेव्हा ते कोठे होते? कार्यकर्ते त्यांना समजावून देण्यासाठी म्हणाले की, जगातला सर्व कामगार एक आहे, तेव्हा आम्हाला पाठिंबा द्यावा लागेलच. मी या वेळेला म्हणालो की, कामगारांचे जे म्हणणे आहे ते बरोबर आहे; कार्यकर्त्यांना जे वाटते त्यापेक्षा प्रत्यक्षात कामगारांना जे वाटते (ते एक वेळेला बरोबर नसणार, त्याची योग्य ती उकल झालेली नसणार तरी) ते त्यांना म्हणण्याचे व तसे करण्याचे स्वातंत्र्य द्यायला नको का? माझे म्हणणे ऐकून कार्यकर्त्या मंडळींना खूप राग आला. त्यानंतर कार्यकर्त्यांची स्वतंत्र मीटिंग बोलावली. (कामगारांचा लढा सुरू झाला









तेव्हापासूनच काय बरोबर, काय चूक याचा विचार करण्यासाठी बऱ्याच गुप्त मीटिंगा घेण्याचा पारिपाठ होता व येथे काय चालते ते कोठेच बोलायचे नाही असा दंडकपण होता.) मीटिंगचा विषय होता की, कामगारांना काही सांगावयाचे असेल किंवा त्यांच्याकडून काही करवून घ्यावयाचे असेल तर प्रथम आपल्या कार्यकर्त्यांमध्ये एकमत पाहिजे. तेव्हा मी म्हणालो की, आपल्यात एकमत झाले आणि कामगार ते मान्य करायला तयार नसतील तर? तेव्हा माझे सर्व कार्यकर्ते मित्र म्हणाले की, त्यांना ऐकावेच लागेल; कारण समाजक्रांतीची जी थिअरी आहे ती त्यांना कोठे माहीत आहे? आमच्यामधले वाद वाढत गेले; तसे संबंध पण हळूहळू बदलू लागले. तिरस्काराने बोलणे सुरू झाले. त्याच वेळेला कामगारांना माझ्याबद्दल वेगवेगळे सांगायला सुरुवात झाली. एके दिवशी माझे एक जवळिकीतले कामगारमित्र मला म्हणाले की, तू गांधीवादी आहेस, तेव्हा तू भांडवलधार्जिणा आहेस; यामुळे तू मालकांना कधी फितूर होशील ते सांगता येत नाही. मला हे ऐकून खूप वाईट वाटले. त्या वेळेला माझे मन सांगत होते की, मी असेन गांधीवादी; परंतु कामगारांची किंवा कामगार संघटनेशी प्रतारणा करणारी एकही गोष्ट मी करणार नाही. तसंच करण्याची पाळी आली तर प्राण देईन, परंतु असले हीन कृत्य माझ्याकडून होऊ देणार नाही. संघटना जशी आकार घेऊ लागली तसतसे कार्यकर्त्यांनी संपकाळात खाजगी रीत्या व कधीकधी जाहीर सभेतून उद्या आपण कामगारांच्या भल्यासाठी काय-काय करणार हे सांगितलेले होते. लोकशाही पद्धतीने सर्वकाही निर्णय घेतले जातील हा त्याचा भाग होता. आपण सांगतो एक व करतो दुसरंच, या गोष्टीचं मला खूप दुःख होऊ लागलं. त्याचबरोबर या सर्व कार्यकर्त्यांबरोबर इतके प्रेमाचे व घनिष्ठ संबंध जुळले होते की, मी यांच्यापासून दूर जाऊन राहू कसा शकेन, असा प्रश्न माझ्या मनात सतत येऊ लागला. परंतु हळूहळू कामगारांमधील वातावरणच इतके वाईट करून टाकले की, मला श्रमिक शक्ती संघटना सोडून बाहेर पडावे लागले. खूप वाईट वाटले; कारण कामगारांची मला खूप सेवा करावयाची होती.

कामगारांमध्ये करीत असलेले काम सोडून दिल्यानंतर मी व एक ख्रिश्चन फादर जो चेनकला मिळून शहरापासून दूर असलेल्या गावांतून – जेथे शिक्षणाचे प्रमाण कमी आहे तेथे – रात्रशाळा काढून शिक्षण द्यावयाचे काम नक्की करून, जन-जागरण नावाची संघटना सुरू करून, कानडी गावात कानडी शाळा व मराठी गावात मराठी रात्रशाळा सुरू केल्या. सुरुवातीला बेळगाव व खानापूर या दोनच तालुक्यांमध्ये शाळांचे काम होते. हे दोन्ही तालुके कर्नाटक व महाराष्ट्र या दोन राज्यांच्या सीमाभागात येतात. महाराष्ट्र एकीकरण समितीला हा भाग महाराष्ट्रात घेऊन जावयाचा असल्याने कर्नाटक सरकारच्या विरुद्ध मराठी लोकांत त्यांचे काम होते. आम्ही या गावांना जाऊन रात्रशाळा, व त्याही कानडी शाळा, काढत असलेले त्यांना आवडले नाही. स्थानिक लोकांना हाताशी धरून आमच्या शाळा म्हणजे आमचे काम बंद पाडण्याचा प्रयत्न केला. परंतु आमचे काम बंद पडण्याऐवजी खूपच वाढत गेले. आता बेळगाव जिल्ह्यातील सहा तालुक्यांत जन-जागरण संस्थेचे काम चालू आहे. यात रात्रशाळा, आरोग्यसेवा व बालवाड्या चालवणे या प्रकारचे काम चालते.

कडोली भागात रात्रशाळेचे काम करीत असताना हंदिगनूर या गावात नव्याने हायस्कूल सुरू झाले होते. या शाळेला गणित शिकवणारे शिक्षक मिळाले नव्हते. शाळा अनुदानित नसल्यामुळे संस्थेकडून शिक्षकांना पगार दिला जात नव्हता. १९८४ साली या शाळेतून मुलं दहावीच्या परीक्षेला प्रथमच बसणार होती. गावागावांतून फिरताना मुलांकडून गणित शिक्षक नसल्याचे कळताच संस्थेच्या प्रमुख माणसाला भेटून शाळेत जाऊन दहावीच्या मुलांना शिकवण्याची परवानगी मिळवली. शिकवायला आठवड्यातून दोन दिवस व रोज ४-५ तास मुलांना शिकवू लागलो. या शाळेचे शिक्षक रोज दुपारी मधल्या सुट्टीत चहा करीत असत. मलाही ते बोलावून चहा देऊ लागले. ४-५ दिवस गेल्यानंतर सर्व शिक्षक एकत्रित बसले असता मी मुख्याध्यापकांना विचारले की, चहासाठी माझी पण वर्गणी द्यावयाची आहे, किती ते सांगा? मुख्याध्यापक इतर शिक्षकांकडे हात करून म्हणाले की, या लोकांनी कधी पैसे दिले ते यांनाच विचारा. मला प्रश्न पडला. मग नेमकं काय करत असतील? मुख्याध्यापकच तर सर्व खर्च करत नसतील ना? म्हणून एके दिवशी दुसऱ्या एका शिक्षकांना विचारता त्यांनी सांगितले की, मुख्याध्यापक थोडेच खर्च करतात? मुलांनी शाळा चुकवली की त्यांना दंड करावयाचे. यातून जे पैसे जमतात त्यातून चहाचा खर्च करतात. हे ऐकून मला खूप वाईट वाटले व मी चहा घ्यावयाचा सोडून दिला. शाळेत शिकवायला जात राहिलो. या काळात शिक्षकमंडळींनी






मुलांकडून शाळेची सहल काढण्याचे निमित्त करून, पैसे गोळा केले होते. या पैशामधून आठवड्यातून एक दिवस वस्तीला राहावयाच्या दिवशी पार्टी करीत. यासाठी कोंबडी, लोणी व तांदूळ मुलांकडून वसूल करीत असत. यावद्दल मुलांकडे व शिक्षकांकडे बोलू लागलो. ही गोष्ट मुख्याध्यापकांना आवडली नाही. शाळा बंद पाडण्याचा प्रयत्न करीत आहे असा संस्थेकडे माझ्यावर आरोप करून मला शाळेत शिकवण्याचे बंद करायला सांगितले. वर्ष संपत आले होते. मुलांना मी अजुनी शिकवावे असे वाटत होते. तेव्हा गावात एका घरी जमून गणित शिकण्याची योजना सर्व मुलांनी ठरवली. ही गोष्ट मुख्याध्यापकांना कळली. यांनी पुढाऱ्यांना सांगून वर्ग बंद पाडला.

शाळेत असताना शिक्षकांच्या विरोधात बोलणे मुलांना शक्य नव्हते. परीक्षा संपताच मुलांमध्ये कुजबूज सुरू झाली. या वर्षी प्रत्येक मुलाकडून सहल काढण्यासाठी २००/- रुपये घेतलेले होते, परंतु सहल काही काढली गेली नाही. ८-१० मुलांनी पत्रे लिहून संस्थेच्या प्रमुख माणसाला २००/- रुपयाची गोष्ट कळवली. संस्थेच्या प्रमुख माणसाने यात लक्ष घालून मेच्या सुट्टीत शिक्षकांना बोलावून प्रत्येकाचे पैसे परत करायला लावले. मुलांना याचा खूप आनंद झाला.

सर्वोदय मंडळाने ग्रामीण भागात काम करावयाचे (म्हणजे ग्रामदान-ग्रामस्वराज्याचे) ठरवून कडोली भागातील काही गावांत जाणे-येणे सुरू झाले. यांच्याबरोवर मी पण होतो. यामुळे खेड्यांतील गरीब शेतकरी मंडळींचे प्रश्न खोलात जाऊन समजून घेता आले. खेड्यात जळणाचा खूप मोठा प्रश्न होता. चुलीला लावण्यासाठी बऱ्याच गावांतील लोकांना जळण विकतच घ्यावे लागत असे. आजही विकतच घ्यावे लागते. पूर्वीप्रमाणे आपल्याच शेतातून जळणाची व्यवस्था करण्याचे पूर्णपणे थांवले होते. कारण, असलेली झाडं तोडून संपली होती. तेव्हा प्रत्येक कुटुंबातील बाईला स्वयंपाक करण्याचे काम म्हणजे धर्मसंकट वाटावयाचे. कारण, एक तर, जळण विकत घ्यावयाचे म्हणजे जेव्हा आपल्याला जळण (लाकडाची मोळी किंवा भारा) विकत हवे असे तेव्हा जळण विकण्यासाठी गावात आलेले असेलच असे नसे. जळणाचा भारा आला आहे, परंतु पैसे नाहीत अशीही वेळ येई. यामुळे जे काही परसात, दारात मिळेल, ओले-वाळलेले, हलके-फुलके ते आणून स्वयंपाक करावा लागायचा. यात वेळ भरपूर जावयाचा. ओली लाकडं, यामुळे तासन् तास धुरात बसूनच स्वयंपाक करावयाचा. वेळेवर स्वयंपाक झाला नाही तर नवऱ्याकडून मार खावयाचा. स्वयंपाकासाठी लागणाऱ्या जळणाची व्यवस्था करण्याची जबाबदारी पुरुषाने कधीच आपली मानली नाही. ही सर्व परिस्थिती मी जेव्हा जवळून बघत होतो तेव्हा मला खूप वाईट वाटावयाचे. अशाच वेळेला एके दिवशी एका दैनिक पत्रकात गोबर गॅस-प्लँटसंबंधी माहिती आली होती. योगायोगाने तो लेख वाचायला मिळाला. मला खूप आनंद झाला. अगदी लहानांतल्या लहान शेतकऱ्याजवळ व शेतमजुराजवळसुद्धा दोनापेक्षा जास्त गुरे असतातच. तेव्हा यांना गोबर गॅस-प्लँट बसवून दिला तर स्वयंपाकासाठी जळणाचा प्रश्न सुटेल. यासाठी बेळगाव जिल्हा खादी ग्रामोद्योग संघाकडे जाऊन संघाच्या सेक्रेटरींना भेटलो व यासंबंधी माहिती विचारली. संघाचे सेक्रेटरी कै. श्री. श्रीरंग कामत होते. त्यांनी यासंबंधी माहिती तर दिलीच; एवढेच नाही तर, संघाकडून होईल ती मदत करण्याची तयारी दाखवली.

जेव्हा मी लोकांना भेटून गोबर गॅस-प्लँटबद्दल सांगण्याचा प्रयत्न करत होतो तेव्हा ते मला मूर्खात काढत असत. त्यांना वाटत असे की, या गॅसवर केलेल्या स्वयंपाकाला खूप वास, तोही अत्यंत घाणेरडा, असणार! त्याला चुलीवर केलेल्यासारखी चव असणार नाही. सकाळचा स्वयंपाक संध्याकाळपर्यंत टिकणार नाही. देवाला नैवेद्य म्हणून वापरता यायचा नाही. कसेवसे प्रथम दहा शेतकरी तयार झाले. यांच्याकडे गोबर गॅस-प्लँट [K.V.I. मॉडेल (लोखंडी ड्रम)] संघाच्या मदतीने बसवून दिले. येणाऱ्या गॅसवरती स्वयंपाक होऊ शकतो याची खात्री झाली. केलेल्या स्वयंपाकाला वास नाही; तो चुलीवरच्या स्वयंपाकासारखाच टिकू शकतो; वेळ कमी लागतो; उलट भांडी काळी होत नाहीत, हे कळून आल्यानंतर यांनीच बाकीच्या लोकांना समजावून सांगण्याचा प्रयत्न सुरू केला. या गावातील दोन गांधीवादी शेतकऱ्यांनी सर्वच्या सर्व शेतकऱ्यांनी प्लँट बसवून घ्यावा यासाठी खूप कष्ट घेतले. १९७४-७५ सालापर्यंत कडोली गावातील शंभरपेक्षा जास्त लोकांनी गोबर गॅस-प्लँट बसवून घेतले. हे काम इतरही गावांतून झाले पाहिजे असे मला खूप वाटावयाचे. यासाठी सायकलीवरून या गावाला त्या गावाला जाऊन गोबर गॅस-प्लँटची माहिती सांगण्याचे काम करू लागलो. बऱ्याच वेळेला लोक समजावून घेण्यापेक्षा टर उडवून सायकलीतील हवा काढणे, शेण मारणे असे करू लागले. काही झाले तरी एका गावात एक तरी प्लँट झाला

पाहिजे, यासाठी त्या गावातील सरपंचांना, शेतकरी सहकारी संघाचे चेअरमन यांना भेटून गोबर गॅस-प्लँटची कल्पना त्यांच्या गळी उतरवण्याचा प्रयत्न करू लागलो. एका गावातील शेतकरी संघाच्या चेअरमनने गॅस-प्लँट बांधून घ्यावयाची तयारी दाखवली म्हणून, त्यांच्यासाठी बँकेतून कर्ज मिळण्याची सर्व व्यवस्था करून, त्याला बँकेत येऊन सह्या करण्यासाठी यायला सांगायला कमीत कमी ३० ते ४० वेळा तरी गेलो असणार. बऱ्याच वेळेला ते घरी नसावयाचेच. असले तरी आवाज ऐकताच मागच्या बाजूच्या दाराने निघून जावयाचे. अगदी नाइलाजाने मालकीणबाई बाहेर येऊन ते घरी नाही आहेत असे सांगावयाच्या. शेवटी एकदाचा प्लँट बसवून घेतलां. (हे गाव माझ्या गावापासून २० किलोमीटर अंतरावर आहे.) काही कामासाठी ५ वर्षांनंतर जेव्हा या गावी जाण्याचा योग आला तेव्हा आवर्जून यांच्या घरी गेलो. या घराच्या मालकीणबाईंनी मला बाहेरून येताना पाहून पाण्याचा तांब्या घेऊनच आल्या. म्हणाल्या, हात धुऊन घ्या व भाकरी खायला या. मी आश्चर्यचकित होऊन बघतच राहिलो. मी म्हणालो, मला फक्त एक कप चहा द्या. मालकीणबाई चहाचा कप हातात देता-देता म्हणाल्या, "काय रे बाबा, यापूर्वी भेटला असतास तर माझे डोळे आणखीन दहा वर्षे तरी चांगले राहिले असते. धुरात भाकऱ्या बडवून बडवून डोळे गेले." हे वाक्य ऐकून मला खूप आनंद झाला. यानंतर अगदी गरिबांतल्या गरीब माणसाला गोबर गॅस-प्लँट बसवून घ्यावयाचा असेल तर दीनबंधू नावाचे मॉडेल चांगले आहे असे वाटून याचे तंत्र शिकून घेतले व ४०-५० गवंड्यांना दीनबंधू गोबर गॅस-प्लँट (बायो गॅस-प्लँट) बांधावयाचे तंत्रज्ञान शिकवण्यासाठी जन-जागरण संस्थेच्या मदतीने शिबिरे घेतली. याच संस्थेच्या वतीने आतापर्यंत ७ ते ८ हजार गॅस-प्लँट्स बेळगाव व खानापूर तालुक्यांत बसवले गेले. कडोली गावात सर्वांत जास्त गॅस-प्लँट्स (एकूण ९००) असल्यामुळे १९९५-९६ साली भारतात पहिला नंबर लागला. कडोली भागातील १० गावांत ७५ टक्के पेक्षा जास्त घरी गॅस-प्लँट्स आहेत. गोबर गॅस-प्लँटमुळे स्वयंपाकाला गॅस मिळतो. प्लँटमधून येणाऱ्या स्लरीचा खत म्हणून वापर होतो. या स्लरीमुळे सर्व काडीकचरा सहज कुजवून खत तयार करता येऊ लागले आहे. यामुळे कडोली भागातील जमीन बऱ्यापैकी सुपीक राहिलेली आहे. यासाठी प्रत्येक शेतकऱ्याला गोबर गॅस-प्लँट वरदानासारखा वाटू लागला आहे.

कर्नाटकात नव्याने जिल्हा परिषद निर्माण झाली. सर्व विकासाची कामे या संस्थेकडून होऊ लागली. भारत सरकारने शेतकऱ्यांसाठी सबसिडी देऊन गोबर गॅस-प्लँट बसवून देण्याची योजना आणली. १९८४ सालात शंभरपेक्षा जास्त शेतकऱ्यांनी गोबर गॅस-प्लँट बसवून घेतले. सरकारने देऊ केलेली सबसिडी मिळावी यासाठी जिल्हा परिषदेकडे अर्ज केले. अर्ज करून ५-६ महिने लोटले. सबसिडी मंजूर होतच नाही. चौकशी करताना उद्या या, परवा या, असेच सांगावयाचे. शेतकरी येतात, चौकशी करतात, निघून जातात. काही बोलतच नाहीत. तेव्हा त्यांच्या एजंटाकडून निरोप पाठवून दिले की, साहेबांना जे द्यावयाचे आहे ते देऊन तुमचा चेक घेऊन जा. काही शेतकरी प्रत्यक्षात भेटून बोलणी करताना, एकूण रकमेच्या ३० टक्के एवढी रक्कम दिली तर चेक मिळेल, असे त्यांना सांगितले गेले. सर्व शेतकऱ्यांनी टक्केवारी काही द्यावयाची नाही असा पक्का निर्धार करून अन्याय-निवारण मंचाचे अध्यक्ष श्री. राम आपटे वकील यांच्या मदतीने सबसिडीचे चेक मिळवले. चेक देताना अधिकारी म्हणाले की, हे सगळे केवढ्याला पडले? इतके निर्लज्ज अधिकारी असतात हे मी पहिल्यांदाच पाहत होतो. हे सर्व पाहताना मनस्वी संताप येत होता! परंतु आम्ही काहीच करू शकत नव्हतो, कारण वरिष्ठ अधिकारी पण यात सहभागी होते. काय म्हणावे अशा भ्रष्ट सरकारी नोकरांना? याबद्दल कोणाकडे बोलले तरी प्रत्येकजण म्हणतो की, आता त्यांची टक्केवारी देण्याचा नियमच होऊन बसला आहे. यात लोकप्रतिनिधी (जिल्हा परिषदेमध्ये निवडून आलेले) सुद्धा सहभागी आहेत. तुम्ही काही केले तरी चालणार नाही. याबद्दल जनतेला पण यात काही चुकीचे आहे असे फारसे वाटत नव्हते.

कडोली भागात जन-जागरण संस्थेच्या वतीने रात्रशाळा चालवण्याचे काम १९७८ साली सुरू झाले. शहरापासून दूर असलेल्या व तेथेही अत्यंत मागासलेल्या (आर्थिक व सामाजिक रीत्या) लोकांत काम करावयाचे ठरवून या भागातील ८-१० दलित व बेरड लोकांच्या वस्त्यांतून शाळा सुरू केल्या. एकदोन वर्षांत या लोकांच्या बरोबर जन-जागरण संस्थेच्या कार्यकर्त्यांची जवळीक निर्माण झाली. गावातील सवर्णीय लोक यांच्याबरोबर, जणू ते यांचे गुलामच आहेत, असे १९८० सालापर्यंत वागत होते. आज व्यवहार थोडेसे बदललेले असले तरी मनातील भावना नाहीशा झाल्या असतील असे वाटत नाही.








अनुक्रमणिका

अगसगे या गावी गावच्या गायरानासंबंधात प्रश्न निर्माण झाला. दलितांच्या सहकारी शेती सोसायटीची जमीन या गावातील पुढाऱ्यांनी, सोसायटीच्या अध्यक्षाकडून लिहून घेऊन, ३० एकर जमीन गावाचे गायरान म्हणून नोंद करून घेतली होती. कलेक्टर ऑफिसमध्ये काम करीत असलेल्या एका (गॅझेटेड ऑफिसर) दलित मित्राने या गावातील दलित मित्रांच्या डोक्यात घातले की, ही तुमची जमीन आहे, ती तुम्ही लागवडीखाली आणा. दलितांनी नांगरायला सुरुवात केली. सवर्णीयांनी सर्व गावाला जमवून यांच्यावर बहिष्कार घालावयाचा निर्णय घेऊन या दलित लोकांवरोवर गावातील कोणीच बोलावयाचे नाही, दुकानदाराने माल द्यावयाचा नाही, गिरणवाल्याने दळून द्यावयाचे नाही, लिंगायत-मराठ्यांच्या शेतातून जाऊ द्यावयाचे नाही असे जाहीर केले. असे कोणी करू देतील त्यांना ५०१/- रुपये दंड जाहीर केला. दलित मित्र विचार करू लागले. आपली जमीन परत मिळवायचीच या जिद्दीने त्यांनी यात भाग घेतला होता. आम्ही जन-जागरण संस्थेचे कार्यकर्ते दलितांच्या बाजूने होतो. पुढे कसे करावयाचे याबद्दल चर्चा सुरू झाल्या. अनेक वर्षांपासून बहिष्काराची पद्धत चालत आलेली. कोणालाही आपल्या अंकित ठेवावयाचे असेल तर लहानशा कारणावरून त्यांच्यावर बहिष्कार जाहीर करून वाळीत टाकावयाचे. दंड करावयाचा, तो देता आला नाही तर त्यांची जमीन किंवा घराचा लिलाव करावयाचा. व पैसे वसूल करावयाचे. हे चालत आले होते. या वेळेला पण या पद्धतीने त्यांना चूक झाली म्हणून पाया पडायला लावायचे असा विचार दिसत होता.

जमीन नेमकी कोणाची, याबद्दल माहिती गोळा करून गावाला किंवा या भागातील ५-६ गावांतील लोकांना जमवून चर्चा करून ठरवता येईल यासाठी प्रयत्न करायला आम्ही सुरुवात केली होती. परंतु, बहिष्कार सामूहिक रीत्या जाहीर करून दळण दळून द्यावयाचे नाही, किराणा माल द्यावयाचा नाही, हे काय? या किराणा दुकानमालकांना व गिरण मालकाला जो परवाना मिळाला, तो आपल्या स्वतंत्र भारत देशाच्या घटनेमुळे मिळालेला आहे. कायद्याने तसे हे म्हणू शकत नाहीत. या गोष्टी सांगून या विरोधात संघटित रीत्या लढा द्यावयाचा असा निर्धार केला. चार महिने बहिष्कार चालू राहिला. आपण स्वतंत्र झालो नसतो तर केव्हाच या गावकरी लोकांनी दलित वस्ती संपूर्ण जाळून खाक केली असती. (अजुनी काही ठिकाणी करतात.) गावातील लोकांच्यावर विसंबून जीवन जगणाऱ्यांना बाहेरगावी शेतात मजुरीचे काम मिळाले. हळू-हळू स्वावलंबी झाले. आज हक्काने या लोकांना अंगण झाडायला, शेण काढायला बोलवीत नाहीत, व हे लोक जातही नाहीत. स्वतंत्र भारत देशाच्या घटनेने दिलेल्या हक्कामुळे हे संघटित होऊ शकले. नाही तर....

बेळगाव जिल्ह्यातील हुक्केरी तालुक्यात हिडकल नावाचे धरण बांधण्यात आले आहे. या धरणाच्या पाण्याखाली जाणारी गावं उठवून वेगवेगळ्या डोंगराळ भागांत पुनर्वसन करावयाचे ठरवून त्यांना जावयास सांगितले. तरी अजुनी काही लोकांचे पुनर्वसन व्हावयाचे आहेच. पारंपरिक रीत्या त्यांच्या मालकीच्या असलेल्या घरांची व शेतांची किंमत मन मानेल तशी ठरवून देऊन पाठवून दिली. पैसे प्रत्यक्षात मिळताना त्यात चालावयाचा भ्रष्टाचार पण आहेच. ठरवून दिलेल्या जागेत घर बांधावयाच्या अगोदर या लोकांकडील बरेच पैसे संपून गेले. एका गावाशी, तेथील मातीशी असलेले नाते सोडून कोठेतरी ओसाड, भकास अशा जागेत येऊन राहावयाचे. पिण्याच्या पाण्याची सोय नाही. मुलांचे शिक्षण कसे होणार, व डोंगराळ भागात उतारावरची जमीन करून कितीसे पीक येणार? त्यांच्या मूळ गावात एका एकरमध्ये ५-६ लोकांचे कुटुंब पोसता यावयाचे. येथे प्रत्येकी ३ एकर जमीन असुनसुद्धा वर्षभर पुरेल एवढे धान्य मिळत नाही. या आपल्या स्वतंत्र भारत देशाच्या सरकारने यांच्यावर अशी का पाळी आणली? धरण झाल्यानंतर त्याचा लाभ कोणाला तरी दुसऱ्यांना आणि हे मात्र बळीचे बकरे. असे करण्याचा त्यांना नेमका कोणता नैतिक अधिकार पोहोचतो? असा प्रश्न मला या डोंगराळ भागातील यांच्या वस्त्यांतून फिरताना पडत असे. आजही ह्या प्रश्नाचे उत्तर मिळालेले नाही.

यासाठीच मेधाताई पाटकर यांनी 'नर्मदा बचाव आंदोलन' धरणग्रस्त लोकांमध्ये जागृती करून सुरू केलेले आहे. वेगवेगळ्या खात्यांत सरकारी काम करणाऱ्या अधिकाऱ्यांच्या व मंत्र्यांच्या भ्रष्टाचाराबद्दल श्री. अण्णा हजारे लोकांसमोर स्पष्टपणे मांडून यासाठी पुढचे पाऊल उचलण्यासाठी सर्व भारतीयांना आवाहन करत आहेत. पर्यावरण प्रदूषित व्हावयाचे नसेल व जमिनीची धूप न होता जमिनीत पाण्याचा साठा वाढवयाचा असेल तर झाडे वाचवली पाहिजेत यासाठी चंडीप्रसाद भट्ट यांनी चिपको आंदोलन सुरू केले. श्री. सुंदरलाल बहुगुणा या वयातही सत्याग्रह-उपोषण करून सरकारला समज आणून देण्याचे

अनुक्रमणिका

काम करीत आहेत. असे अनेक संघर्षाचे लढे (उदा., एन्रॉन विरोधात लढा) उभे करून बऱ्याच संघटना भारत सरकारला, सरकार करीत असलेल्या गोष्टी योग्य आहेत की अयोग्य, असा विचार करण्यास भाग पाडीत आहेत. हे सर्व करताना संघटनांचे लोक म्हणत आहेत की, स्वातंत्र्य मिळवण्यासाठी परक्या इंग्रजी सत्तेविरुद्ध लढा करणे तसे सोपे होते, परंतु आपल्याच लोकांच्या सरकारविरुद्ध संघर्षमय लढा करणे सोपे राहिलेले नाही. तरी आज आपण स्वतंत्र भारतदेशाच्या लोकसत्ताक राज्याचे रहिवाशी आहोत. यामुळे अन्यायी सरकारच्या विरोधात लढा देण्याचा आपला अधिकार आहे. तो हक्क म्हणून वापरला पाहिजे. कारण, आज आपण कुणाचे गुलाम नाही आहोत. आपले भारत सरकार हुकुमशाही सरकार नसून लोकशाही सरकार आहे. असे असताना कोणी हुकुमशाही करू लागले तर आपली भारतीय स्वतंत्र जनता त्यांना त्यांची जागा दाखवल्याशिवाय राहणार नाही असे मला वाटते. कारण, हा देश शूरांचा व त्यागी लोकांचा आहे. यांनी आम्हा सर्वांना खूप शिकवलेले आहे, ते वाया जाणार नाही असे वाटते.





# आपले स्वातंत्र्य टिकेल? होय, टिकेल.

**रंगनाथ पठारे**

माझा जन्म स्वातंत्र्यातला. नगर जिल्ह्याच्या पारनेर तालुक्यातल्या जवळे नावाच्या गावात १९५० साली माझा जन्म झाला. तिथून साधारणतः १९६७ पर्यंत, म्हणजे मॅट्रिक होईपर्यंत, मी त्याच गावात राहिलो. तोपर्यंत अपवाद म्हणून एकदा पुण्याला गेलो होतो. एरवी शेजारच्या घोडनदी-शिरूर या गावापर्यंतच 'शहर' या मनातल्या प्रतिमेचा पल्ला होता. आपला देश स्वतंत्र झाल्याचं शाळेत गेल्यावर म्हणजे १९५६ नंतर समजायला लागलं. त्या काळी प्रभातफेऱ्याही गावात उत्साहाने निघत. गावातील प्रौढ माणसं त्यात उत्साहाने सामील होत. जोरजोरात घोषणा देत. (आता बाकी अनेकांसारखंच मला ते आश्चर्यकारक वाटतं.) 'इन्किलाब झिंदाबाद', 'करेंगे या मरेंगे', 'चालीस कोट नहीं दबेंगे' या जुन्या घोषणाही असत. खेरीज पुष्कळांचे जयजयकार, 'झंडा उंचा रहे हमारा' किंवा साने गुरुजींचं 'खरा तो एकचि धर्म, जगाला प्रेम अर्पावे', गांधीजीचं आवडतं भजन – 'वैष्णव जन तो तेणे कहिए। जो पीड परायी जाने रे।।'. तसेच 'नयी तालीम सफाईसे शुरू होती है' असं शाळेच्या भिंतींवर चुन्यानं लिहिलेलं. एकस्वरात सामूहिक गाणी, स्वातंत्र्यदिनाच्या दिवशी सकाळी अंघोळ, त्यातल्या त्यात स्वच्छ कपडे घालणं, तांब्यात विस्तव ठेवून इस्त्री करणं, अशा गोष्टी आठवतात. हे सगळं फार जुनं नाहीय्ये; तरी आता ते पुष्कळ दूर गेलेलं वाटतं.

ब्रिटिशांचं राज्य गेलं म्हणजे नेमकं काय गेलं हे कळायला बराच उशीर लागला. तोवर, जुना ब्रिटिशांचा राज चांगला होता, काठीला सोनं बांधून निर्धोक जाता यायचं असं पुष्कळ बोलायचे. पण प्रत्यक्षात सगळ्या बड्या आणि मध्यम शेतकऱ्यांच्या वाड्यांत लपण्यासाठी बळदं होती आणि ठग-पेंढाऱ्यांच्या कथाही म्हातारे लोक रंगवून सांगत असत. लाहोर हे चार पेठांचं अत्यंत नमुनेदार शहर आहे असं समोरचा शिंपी सांगे, तर शेजारचा मुसलमान बांगडीवाला पॅरिस शहराच्या सौंदर्याचे चित्र उभे करी. तेथील घरेच काचेची आहेत असे नाही तर रस्तेही काचेचेच आहेत असे तो ठासून सांगे. वयाच्या दहाव्या वर्षी, गावाखेरीज उरलेली सारी दुनिया उभी करण्यासाठी कल्पना आणि प्रतिभा यांच्यावरच विसंबून राहावे लागत असल्याने हे सारे फार वेधक वाटत असे. नवनाथाची पोथी, *शिवलीलामृत*, *हरिविजय*, *पांडवप्रताप* अशा पोथ्यांची पारायणे किराणा सामानाचा व्यवसाय करणाऱ्या एका तेल्याच्या घरी होत. ऐकायला म्हातारे, बायाबापड्या, पोरे भरपूर जमत. मीही माझ्या आईसोबत जाई. पाचवी-सहावीत पोथीतल्या कठीण शब्दांचे अर्थ अचूक सांगून तेल्याकडून वाहवा मिळवल्याचे व बायाबापड्यांना चकित केल्याचेही आठवते. मी सातवी-आठवीत होतो, त्या सुमाराला नालाबंडिंगची कामे सुरू झालेली होती. आईसोबत त्या कामावर पंधरावीस दिवस गेलो होतो.









अनुक्रमणिका

तिथं मला इतक्या वेळा भूक आणि तहान लागायची की, वैतागून आईनं मला नेणंच बंद करून टाकलं होतं. त्या वयापर्यंत बरंच काही आडबंतिडवं वाचायला लागलो होतो. गाव जुनं, जहागिरीचं; त्यामुळे कदाचित असेल, तिथं एक जुनं, समृद्ध पण विस्कळीत ग्रंथालय होतं. शिवाजी दादाभाऊ सालके नावाचे गावातलेच एक शिक्षक जरा नादी होते. त्यांनी खूप हौसेनं ते नीट केलं. मी त्यांच्यासोबत अनेकदा असायचो. फायदा व्हायचा. पाहिजे तितकी पुस्तकं वाचायला मिळायची. *गुलबकावली*, *हातीमताई*पासून रूपांतरित इंग्रजी कादंबऱ्या, आपटे, खांडेकर, फडके, नाथमाधव, हडप असे लेखक त्या वयातच वाचले. (नीट कळत होतं असा दावा नाही, पण तो आज तरी कुठं करता येतो?) आणि जुनी मासिकं – रत्नाकर, किर्लोस्कर, चित्रमयजगत् हीही तिथं होती. नंतरचे वि.वि. बोकील, चिं.वि. जोशी हेही तिथंच वाचले. या बेशिस्त वाचनातून खूप सामग्री मिळाली. मुख्य म्हणजे वाचण्याचा आनंद हा सतत राहण्याइतका रुजला.

गावात विठ्ठलमंदिर संस्था होती. तरुण नाट्यमंडळ होतं. निळावंतीची गोष्ट सांगणारा आणि 'हणुमंताची निळी घोडी येता-जाता लिंबं तोडी' म्हणणारा शंकर गोंधळी होता. खेरीज औपचारिक शिक्षण न घेतलेली अनेक सुसंस्कृत माणसं होती; संतांच्या अभंगांची मौखिक परंपरा होती. सणावाराला फेर धरून नाचणाऱ्या, गाणाऱ्या बाया होत्या आणि पहाटेस जात्यावरचे त्यांचे स्वर तर असतच. मारुतीच्या देवळापाठी, विठोबाच्या देवळात, बहिरोबाच्या डोंगरावर, माळ्याच्या मळ्यात अशा अनेक तालमी होत्या. सारीकडं अगदी लहान पोरांपासून तरण्याबांड गड्यांपर्यंत मुलं जमत आणि घुमत. अमका तमक्यावर खार खाऊन आहे असं ऐकलं तर त्याचा अर्थ कळत नसे. घरातल्या घागरीतल्या लोणच्याचा खार खाल्ल्यावर काय होतं, याविषयी कुतूहल वाढे. पैसा दुर्मिळ होता. सधन घरं मोजकी असत. सधनता पिढ्यान् पिढ्या टिकणारी बहुधा नसेच. माझा आजा गणपतबाबा पठारा मेला तेव्हा त्याचं एक फडताळ इंग्लिश ब्रँडीच्या बाटल्यांनी भरलेलं होतं म्हणे. गावात त्याचा दरारा होता. गावात पहिली बैलगाडी – म्हणजे गाडाच होता तो! – त्यानं आणली. त्याआधी शेतमाल डोक्यावरून पाट्यांनी वाहण्याची प्रथा होती. गणपतबाबा मेला तेव्हा त्याच्या भावांनी पहिली गोष्ट केली ती म्हणजे हा गाडा, त्याची चाकं तोडली. ते लाकूड त्याला जाळायला वापरायचं म्हणाले. त्यानं आणलं ते त्याच्याबरोबर जाणार म्हणाले. हा सरळ गणपतबाबा जिवंत होता तोवर मनात साचलेला द्वेष आणि तो व्यक्त करायचं असाधारण कौशल्य. प्रेमभावनाच होती ना! कोण काय म्हणणार? गणपतबाबा मेला आणि आमचं वैभव संपलं. जमीन पाच भावांत वाटली गेली. कष्टाची सवय नसलेले वडील आणि बहुतेक चुलते. टवाळी करण्यासाठी लोक मोठ्या घरचे वगैरे म्हणत. माझ्या जन्माआधी दोन वर्षे आजा वारला. त्यामुळं जन्माला आल्यापासून सगळ्या अभावांची संगत होती. अर्थात आजही अनेकांना ज्या स्थितीत राहावं लागतं ते पाहताना, समजताना स्थिती बरीच चांगली होती असं वाटतं. जातीव्यवस्था होती. पण अनेकजण म्हणतात तितकं वाईट ते नव्हतं. गणपतबाबानं जथ्यासाठी आणलेला न्हावी घोड्यावर बसून आमच्या मळ्यात येई आणि वाटेल तिथून पाहिजे तितका माल हक्काने घेई हे मी पाहिलंय. महारामांगांची स्थिती मात्र वाईट होती. येसकर, जोहार हे पाहिलंय. गावात सगळ्या मोठ्या शेतकऱ्यांचे परंपरेनं घरमहार असत. आमचाही डंबाळे नावाचा होता. तो पायरीनं वागे. आज त्याचा त्रास होतो. त्या वेळी ते कळत नव्हतं. शाळेत असताना काही वेळा खेळायला महारवाड्यात गेलो होतो. पण कोणाच्या घरात गेलो, काही खाल्लं, पाणी प्यालो असं झालं नाही. वर्गातली महारामांगांची मुलं बाहेर वा बाजूला बसत नव्हती. ती वयानं जरा मोठी असत. त्यांतली काही खूप हुशार असत. पण पुढं त्यांच्यापैकी कोणी फार शिकलं नाही. धोंडीभाऊ खुपटे नावाचा एक माझ्या खालच्या वर्गात होता. सातवीला तालुक्यात आला होता. पण पुढं मुंबईला काहीतरी कामाला लागला वगैरे. एक महार शिक्षक होते. ते खूप स्वच्छ आणि टापटिपीने राहात. एक बाईही होत्या आणि त्या मला आवडत.

साधारणतः १९७२ साली मी यशवंतराव चव्हाणांना पाहिलं. पुण्यात. तोवर मी कोणताही मोठा राजकीय नेता प्रत्यक्ष पाहिलेला नव्हता. यशवंतरावांचं भाषण एम.ई.एस. कॉलेजात, खूप कमी गर्दीत आणि अजिबातही पोलिस बंदोबस्त नसतानाचं, ऐकलं. राजकीय नेत्यांभोवती सुरक्षापथकाचा गराडा नव्हता. बांगला देशाच्या मुक्तीनंतर पुण्याला आलेल्या इंदिरा गांधींनाही याच सुमाराला पाहिलं – हल्लीच्या संभाजी पुलावरून उघड्या जीपमधून लोकांचं अभिवादन घेताना. बाकी आधीचे सगळे बघायचे राहिले. गांधीजी आधीच गेले होते. नेहरू वारले तेव्हा मी सातवीत होतो. त्याआधी चीनने भारतावर

आक्रमण केलेले. देशभक्तीची भावना पुन्हा जागृत झालेली पाहिली. गावात ग्रामपंचायतीचा एकमेव रेडिओ होता. तिथं रोज संध्याकाळी मराठी बातम्या ऐकण्यासाठी लोक जमायचे. नेफा, लडाख, बोमदिला, तेजपूर अशी नावं त्या काळात सतत कानांवर असत. कुसुमाग्रजांची 'बर्फाचे तट पेटून उठले, सदन शिवाचे कोसळते। रक्त आपुल्या प्रिय आईचे, शुभ्र हिमावर ओघळते' ही कविता किंवा वसंत बापटांची 'उत्तुंग आमुची उत्तरसीमा इंच इंच लढवू' ही कविता, या फार लोकप्रिय होत्या. त्यागाच्या, पराक्रमाच्या, दुःखाच्या अशा पुष्कळ कहाण्या हवेत असत आणि वर्तमानपत्रांतही. 'सकाळ' हा पेपर इतका माहितीचा की, कोणत्याही पेपराला लोक 'सकाळ'च म्हणत. नेहरू वारले ते सांगायला माझा एक वर्गमित्र आला तेव्हा मी जेवत होतो. त्यानं सांगितलं. मी तसाच जेवत राहिलो. तो खूप रडत होता. जेवल्यावर उठलो आणि त्याला घेऊन बाहेर पडलो. नेहरू, नासर, टिटो, इंडोनेशियाचा सुकार्नो, मलेशियाचा टुंकू अब्दुल रेहमान ही नावं माहीत होती. केनेडीही. १९५७च्या निवडणुकांत तसेच त्याआधी आणि नंतर संयुक्त महाराष्ट्र समितीचा बोलबाला माझ्या गावापर्यंत होता. 'मुंबई, बेळगाव, कारवार, निपाणीसह संयुक्त महाराष्ट्र झालाच पाहिजे' हे मारुतीच्या देवळाच्या दगडी भिंतीवर चुन्यानं मोठ्या अक्षरांत लिहिलेलं होतं. सेवादल, आर.एस.एस. या गोष्टींचा पत्ता मला १९७१ पर्यंत नव्हता. पुण्यात शिकायला गेलो तेव्हा कळलं. त्याआधी कम्युनिस्ट पक्ष मात्र माहीत होता. त्या पक्षाचे भास्करराव औटी हे १९५२ ते १९६२ अशी दहा वर्षे पारनेर तालुक्याचे आमदार होते. ते प्रचारासाठी आले की, लोक जमेपर्यंत चौकातल्या ओट्यावर निवान्त बसत. तेवढ्या वेळात कोटाच्या खिशातल्या विडीच्या बंडलातल्या एक-दोन विड्या ओढून घेत. १९६२ नंतर काँग्रेस पक्ष – बैलजोडी; पुढं गाय-वासरू, हात, चरखा इत्यादी. सगळं बदलत गेलं. शेजारच्या शिरूर तालुक्यात झोपडीचं चिन्ह घेऊन समाजवादी श्यामकान्त मोरे एकदा निवडून आले होते. राजकारण, समाजकारण, लोहिया, डांगे, मधु लिमये हे सगळं, १९६७ नंतर शिकायला प्रथम नगरला गेलो व १९७१ नंतर पुण्याला त्या काळात समजत गेलं. तेही जास्ती नाहीच. माझ्या जगात आणि जगण्यात हे कोणी नव्हतेच. पेपरांतल्या बातम्यांत, हाताशी आलेल्या आडव्यातिडव्या मासिकांत, पुस्तकांत हे सगळे थोडेफार येतील तसे आले. अभ्यास विज्ञानाचा आणि बाकी वाचायचा जडलेला नाद. त्याला शिस्त नव्हती. इतिहास, समाजशास्त्र अशी पुस्तकं अशीच वाचली. कादंबऱ्या जास्ती वाचल्या. टॉलस्टॉयच्या *ॲना कारेनिना*ची संक्षिप्त आवृत्ती १९६६ साली इंग्रजीत, मॅट्रिकच्या वर्गात असतानाच वाचली. कुसुमाग्रजांच्या *विशाखा* मधल्या कविता या सुमाराला सगळ्या तोंडपाठ होत्या. बोरकरांची कविता वाचली होती. रेडिओवरचा सैगल, जोहराबाई अंबालावाली, गीता दत्त, शमशाद बेगम आणि सगळ्यांत आवडणारा तलत् हे त्याच काळातलं. हे सगळं कोणाशी बोलावं किंवा हेच निवडावं याच्यातलं काहीच जवळपास नव्हतं. तरीही ते तसंच झालं. आचार्य जावडेकरांचं *आधुनिक भारत* हातात यायला १९७४ साल उजाडलं.

जगभरातल्या सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक व म्हणून वाङ्मयीन बदलांच्या संदर्भात साठीचं दशक जास्ती महत्त्वाचं, क्रांतिकारी वगैरे मानलं जातं. आपल्याकडंही आपण ते तसंच अनेकदा मानतो. मला सत्तरीचं दशक हे अधिक तसं वाटतं. आपल्या लोकांच्या संदर्भात. (हे, कदाचित, मी त्या वेळी विशीत होतो त्यामुळं वाटत असेल, असा विचार करूनही पुष्कळ पाहिलं, तरी हे असंच वाटतं.) ७१ साली भारत-पाक युद्ध झालं. ७२ला महाराष्ट्रात मोठा दुष्काळ पडला. ७१ साली चार रुपये किलोच्या आसपास असलेलं गोडेतेल ७३ साली आठ रुपयांवर गेलं. दलित चळवळ आणि दलित साहित्य यांचा डंका सत्तरीच्या दशकातच खरा दुमदुमायला लागला. स्वातंत्र्यानंतर शिक्षणाच्या प्रसारातून आलेली ग्रामीण बहुजनांची पिढी तारुण्यात आली. मध्यमवर्गाचं स्वरूप, आधी जे हळूहळू बदलत होतं, त्या बदलाला वेग आला. मूल्यात्मक बदलांनी वेग घेतला. साहित्य, समाजधारणा, नैतिकता यांच्या संदर्भातही खूप वेगळं घडू लागलं. आज आपल्या समाजजीवनात वेगवेगळ्या प्रकारच्या आणि पातळीवरच्या ज्या मूलतत्त्ववादी धारणा प्रबळ झालेल्या दिसतात, त्यांची ठळक सुरुवात सत्तरीच्या दशकात दिसते. पारंपरिक मध्यमवर्गाच्या जोडीला वेगवेगळी पार्श्वभूमी असलेला आणि वेगवेगळ्या सामाजिक थरांतून आलेला नवा मध्यमवर्ग निर्माण होऊ लागला. जगण्यातली स्पर्धा वाढीला लागली. हितसंबंधांचे टकराव, ते जपण्याच्या गोष्टी प्रखर होऊ लागल्या. धर्म, जात, प्रादेशिकता यांच्यांतून शत्रू दिसणे, पाहणे, दाखवणे असे सुरू झाले. मध्यमवर्ग अधिक स्वार्थी आणि आपल्या पोळीवर तूप ओढणारा होऊ लागला

अनुक्रमणिका






किंवा एकूण समाजापासून तुटायला लागला. एरवी मध्यमवर्ग हा समाज, साहित्य, रूढी, परंपरा, नवता, नैतिकता यांचा झेंडा आपल्याच खांद्यावर अशा धारणेत असतो. त्यागभावना, आचारातील शुचिता, समझदारी यांचे जुने आदर्श निस्तेज होऊ लागले. आज हा वर्ग जिथे आहे, तिथवर येण्याची ठळक सुरुवात सत्तरीच्या दशकातच दिसते.

तथाकथित बुद्धिमंत, विचारवंत हे मध्यमवर्गातलेच असतात. (आणि बाजारी संस्कृती न येईपर्यंत लेखकही याच वर्गातला. अर्थात आपल्याकडं ती आली तरी लेखकाचा वर्ग बदलेल असं नाही. आणि मुळात ही भाषा, संस्कृती आता टिकणार कशी ही पुष्कळांना चिंता. तिथं लेखकांचं काय? पण समजा संस्कृती टिकली आणि लेखक निस्तेज झाले तर? या प्रकारची थोडी विचित्र वाटणारी शक्यता मला जास्ती दिसते. असो.) आज मध्यमवर्ग जास्ती संघटित झाला आहे. आपले हितसंबंध जपताना, पगारवाढी घेताना, सुखसोयी ओढताना तो विचारभ्रष्ट झाला आहे. सुखाची साधने स्वतःकडे खेचताना आपण कोणाला लुटत आहोत, किती जणांना जगण्याच्या सामान्य गरजांपासून विन्मुख करीत आहोत, याचे भान त्याला राहिलेले नाही. आधुनिक उत्पादनव्यवस्थेशी संबंधित नसलेला असंघटित वर्ग, बेकार तरुण, रोजी-रोटीसाठी रोजचा झगडा करावा लागणारा सर्वहारा श्रमिक, असा सगळा खूप मोठा समूह आहे. आशा व उमेद वाटावी असे या लोकांच्या संबंधात जेव्हा काहीच घडत नाही तेव्हा मूलतत्त्ववादी हाक त्यांना फार लवकर प्रभावित करते. ते बेधडक त्यात सामील होतात. राजकारण आणि समाजकारण यांतील सत्तास्थानांपासून वंचित असलेले ठिकठिकाणचे वेगवेगळ्या जातिजमातींचे समूह, त्यांना वापरतात. हे सगळे पुढारी त्यांना त्यांचा शत्रू दाखवत असतात. हा शत्रू प्रत्यक्षातल्या शत्रूपेक्षा वेगळाच कोणीतरी असतो व मूलतत्त्ववादी सोयींनुसार बदलतोही.

मध्यमवर्ग विचारभ्रष्ट आणि स्वार्थी झाल्यामुळे तो आपल्या ताटात किती ओढावे याचा विवेक विसरला आहे. म्हणून हा बेकार आणि भणंगांचा समूह विराट रूप धारण करीत आहे. मूलतत्त्ववाद जगण्याच्या सगळ्या क्षेत्रांत घुसला आहे. मध्यमवर्गाला दहशत बसू लागली आहे, तरीही तो आपल्या चुकांकडे बघायला तयार नाही. तो म्हणतो की, 'बघा हो! काय होणार आपल्या लोकांचं? किती असंस्कृत, हीन पातळीला पोहोचलो आहोत आपण? हे कोण आवरणार? या लोकांना समजत कसं नाही?' इत्यादी. पण आपल्या विवेकशून्यतेचा यात फार मोठा वाटा आहे, हे त्याच्या ध्यानात येत नाही. अर्थात हे असं तरी कसं म्हणता येईल? बुद्धिमंत आणि विचारवंत – जे याच वर्गाचा भाग आहेत – त्यांच्या ध्यानात या गोष्टी येत नाहीत असं कसं म्हणायचं? पण ते मूग गिळून बसले आहेत. हे नाकर्तेपण आपल्याला खूप महागात पडणार अशी स्पष्ट चिन्हे दिसत आहेत. दहशतवाद, मूलतत्त्ववाद, अतिरेकी-वाद, वांशिक अहंकार या सगळ्या एकमेकींत गुंतलेल्या, परस्परनिगडित अशा गोष्टी आहेत. तरुणांमध्ये बेकारी वाढणे, त्यांचा भ्रमनिरास होणे यांच्या मुळाशी ज्या अनेक गोष्टी आहेत त्यात मध्यमवर्गाचे नाकर्तेपण, स्वार्थ यांची जागा मोठी आहे. त्यामुळे नक्राश्रू ढाळण्याचा अधिकार या वर्गाला किती हाही प्रश्नच आहे.

जगातल्या सगळ्या गरीब देशांतील नागरिकांच्या स्वातंत्र्याप्रमाणे आपल्या देशाचे, आपल्या लोकांचे आजचे स्वातंत्र्य हे ग्रासलेले स्वातंत्र्य आहे. बाजाराधिष्ठित अर्थनीती, जागतिकीकरण, प्रसारमाध्यमांमधले क्रांतिकारी बदल या सगळ्यांचा प्रचंड दाब एकूण देश म्हणून आपल्यावर आलेलाच आहे. त्याला तोंड देण्याखेरीज आता पर्याय राहिलेला नाही. या सगळ्यात राज्याच्या हातातली सत्ता कमी होऊन ती काही धनाढ्य अशा कंपन्यांकडे जाणे अपरिहार्य आहे. या सगळ्याचा पाठपुरावा करणाऱ्या बुद्धिमंतांची फौजही मोठी आहे. पण आपल्यासारख्या जटिल सामाजिक प्रश्न असलेल्या व एकाच काळात अनेक शतकांत अनेक प्रकारे जगणाऱ्या लोकांच्या देशांत मानवी समूहांचे प्रश्न जास्ती गुंतागुंतीचे आहेत. कल्याणकारी राज्याच्या संकल्पनेचे या सगळ्यात आपण काय करणार आहोत? दुबळ्या घटकांना संरक्षण देण्याच्या धोरणाचे आपण काय करणार आहोत? बाजारी अर्थवादात हे बसत नाही. तिथे कार्यक्षमता प्रधान. एक प्रचंड व सततची शर्यत आहे. त्यात सहभागी होणं ही सगळ्यांची गती. तशी सक्ती आहे. कशासाठी, कोणत्या दिशेनं पळायचं याचा विचार नाही, तो करायला वेळच नाही. तशी संधीच नाही. जगायचं आहे ना; पळा. पळता येत नाही? काही इलाज नाही. त्याला कोण काय करणार, ही नीती. यातून प्रश्न अर्थातच निर्माण होणार. युरोप-अमेरिकेतल्या श्रीमंत देशांतही यातून प्रश्न निर्माण झालेले आहेत. ते बेकारभत्त्याने थोपवता आलेले नाहीत. तिथे मनःपूर्वक कामे करणाऱ्या आशियाई लोकांवर अतिरेकी हल्ले का होत आहेत? ते कमी झालेत असं दिसत नाही. असे हल्ले करण्यासाठी

आपल्याकडे बाहेरच्या लोकांची गरजच नाही, अशी स्थिती आहे.

*ताम्रपट* लिहिण्याच्या निमित्ताने बरंच वाचलं. बऱ्याच जणांना भेटलो, बोललो. स्वातंत्र्यचळवळीत कामं केलेली माणसं वर्षानुवर्षे कोपऱ्यात गेलीत, विस्मृतीत गेलीत. ती तक्रार करीत नाहीत. काहीच बोलत नाहीत. फारच विचारलं तर म्हणतात, काही विशेष नाही हो! आज उगीच तुम्हांला वाटतं. खोट्या बोलघेवड्यांची गर्दी अतोनात आहे. सगळंच बदललंय. गेल्या दहा वर्षांत फार वेगानं बदललंय. जगण्याच्या सगळ्या क्षेत्रांत आपण अंधळेपणाने धावू लागलो आहोत. आपल्या चेहऱ्यांवरची वेदनाही आपण बघत नाही. आपल्या संवेदना बधिर झाल्या आहेत. एक हताश करणारा वेग आहे. आपल्याला काय पाहिजेय हेही कळेनासं झालंय.

प्रगत देशांच्या नजरांत आपण त्यांच्या लोकांसाठीच्या उपयोगी वस्तू आहोत. ते अन्न, वस्त्र, निवारा, हवा, पाणी या आणि यांसाठीच्या सगळ्या नैसर्गिक गोष्टींचा अतोनात नाश करीत आहेत. खाण्यासाठी जितके पाहिजे त्यापेक्षा कितीतरी जास्त पटीने अन्न फेकून देणे, हवेचे प्रदूषण करणारे घातक रासायनिक उद्योग गरीब देशांत उभारणे, त्यांच्या लोकांना भरपूर ऊर्जा देणाऱ्या अणुभट्ट्यांतील किरणोत्सारी कचरा कुप्पांमधून गरीब देशांत पाठवणे, जंगलांची अतोनात तोड, फॅशनसाठी प्राण्यांचा वंशच्छेद, भूगर्भातील सारी खनिज ऊर्जा अतोनात वापरत गरीब देशांचे दिवाळे काढणे, युद्धे करायला लावून गरीब देशांना शस्त्रे विकणे व आपली कारखानदारी चालवण्यासाठी तशी परिस्थिती सतत निर्माण करून पुन्हा विश्वशांतीची जपमाळ ओढणे, गरीब मानवी समूहांना धमकावणे, त्यांच्या संख्येच्या बळाच्या भीतीपोटी त्यांना कुटुंबनियोजनाची साधने पुरविणे व त्यांतील रासायनिक परिणामांतून गरीब देशांतल्या स्त्रियांना वस्तू म्हणून वापरून त्या अभ्यासाचा उपयोग स्वतःच्या लोकांसाठी करणे – असंख्य गोष्टी. स्वातंत्र्य, समता, बंधुता, शांती, मानवता यांचा घोष ते करतात. ही सारी मूल्येही ते मानतात. पण ते त्यांच्या लोकांसाठी. त्यांच्यापुरते. किंबहुना या श्रीमंत देशांतील लोक हीच फक्त माणसे आहेत ही त्यांची गर्भित धारणा आहे. माणसाच्या उपयोगासाठी, उपभोगासाठी साऱ्या सजीव आणि निर्जीव गोष्टी. तशीच या लोकांच्या उपयोगासाठी गरीब देशांतली माणसे. वसाहती देशात लष्कर ठेवून शोषण करण्याचे दिवस इतिहासात गेले, पण त्यापेक्षा प्रभावी व कमी खर्चात अधिक पद्धतशीर शोषण करण्याच्या युक्त्या त्यांना माहीत झालेल्या आहेत. नव्या संगणकयुगात, माहितीच्या पुरात ही प्रवृत्ती आणखी बलिष्ठ होत जाणार.

या साऱ्यांत आपले स्वातंत्र्य टिकेल? या साऱ्याला आपण तोंड देऊ शकू? मला खात्रीने वाटते, देऊ शकू. पुष्कळ प्रश्न आहेत. धर्म, भाषा, संस्कृती, फुटीरता, दहशतवाद. या साऱ्यांच्या मुळाशी श्रीमंत देशांचे आर्थिक व व्यापारी तसेच भू-राजकीय हितसंबंध आहेत. (आपल्याकडं काहीही घडलं की, यापाठी सी.आय.ए. चा हात आहे असं राजकीय नेते म्हणतात. त्या वेळी साधारण मध्यमवर्गीय आपण त्याची थट्टा करतो. पण नीट पाहिलं की, जवळून वा दुरून साऱ्या गोष्टींचा संबंध बड्या देशांच्या हितसंबंधांकडे जातो हे खरंच आहे. आपण त्यांच्या नजरेत त्यांना उपयोगी अशा 'कमोडिटीज' आहोत हे लक्षात घेतलं की, ही संगती तितकी टवाळी करण्याजोगी राहत नाही.) तरीही आपण एक सशक्त संस्कृती आहोत. नव्या काळातले नवे विज्ञान आपण आत्मसात करीत आहोत. आपण अनेक क्षेत्रांत आपली स्वतःची तांत्रिक पक्वता सिद्ध केलेली आहे. बुद्धिमान, शिकलेले मोठे मनुष्यबळ आपल्यापाशी आहे. दुःख, दैन्य आणि अभाव पचवण्याची ताकद आपण सिद्ध केलेली आहे. आपला स्वर चेपणे सोपे राहिलेले नाही. स्वातंत्र्यानंतरच्या पन्नास वर्षांत राज्यकर्त्यांनी काय केले याचा विचार करणे माझ्या आवाक्यातले नाही. पण माणसांनी खूप काही केले आहे असे मी खात्रीने म्हणेन. म्हणूनच आपले लोक या साऱ्या जीवघेण्या पळण्यातही टिकतील. आपली संस्कृती टिकेल. आपण जशी तुर्क, अफगाण, मुघल, पर्शियन, इंग्रजी भाषा, संस्कृती पचवून टिकलो तसेच या नव्या काळात होईल. आजचे आक्रमण आधीच्या सगळ्यांपेक्षा अधिक ताकदवान, प्रभावी आहे. पण प्रत्येक वेळी प्रत्येक नवे आधीच्यापेक्षा प्रभावी असतेच. आधीचे सारे पचवल्यामुळे आपणही ताकदवान झालेलो असतोच ना! आपली भाषा आणि संस्कृती या साऱ्याला पचवील. ती राहील आणि सशक्त होऊन राहील. ती संगणकातही राहील. तिचे रूप बदलेल, तिच्यावर प्रभाव पडतील, पण ती साऱ्यांना जिरवून टिकेल. नवे काहीतरी होईल पण ते आपलेच असेल. हे मी अंधळ्या आशावादाने म्हणत नाही. माझ्या देशातील माणसांच्या अंगभूत सामर्थ्याविषयी वाटणाऱ्या विश्वासातून म्हणत आहे. साने




गुरुजींनी वलसागर भारताचे स्वप्न पाहिले होते. 'वलसागर भारत होवो. विश्वात शोभुनी राहो' ते म्हणाले होते. या स्वप्नामध्ये प्रतिशोध, पराक्रम या भावना नाहीत. शोभून राहणे आहे. बुद्ध आणि गांधीजींच्या देशातल्या लोकांना तेच शोभून दिसते असे म्हटले पाहिजे.





# आमचा समाज आणि आमचे कार्य

## विठ्ठल पटवर्धन

१९४६ च्या एप्रिल महिन्यात आमच्यावरील सर्व वॉरंटे व खटले ब्रिटिश सरकारने मागे घेतले. १९४२ च्या ऑगस्टपासून १९४६ च्या एप्रिलपर्यंत मी भूमिगतच होतो. नुसता भूमिगत नाही तर आजारी पडलो. पण अच्युतराव पटवर्धनांच्या मायेच्या आधारावर म्हैसूरला दवाखान्यात होतो – बरा होऊन परत आलो.

त्याचे असे झाले –

१९४३ मध्ये बंगालमध्ये भयानक दुष्काळ पडला होता. १९४२ पासून मी स्वातंत्र्यलढ्यात होतो. कॅपिटॉल बॉम्ब केसमध्ये माझे नाव असल्याने मी पुण्यातून मुंबईला येऊन साने या नावाने अच्युतराव पटवर्धन यांचा एक मदतनीस म्हणून काम करीत होतो. पण चळवळ झपाट्याने ओसरू लागली. आमचे अनेक सहकारी पकडले जाऊ लागले. शेवटी सकाळ-फंडातर्फे बंगालच्या दुष्काळात स्वयंसेवक म्हणून मी व नंदा नारळकर यांनी नावे नोंदवली व १९४४ मध्ये आम्ही बंगालमध्ये मिदनापुरला ४-६ महिने काम केले. तेथील अनुभव भयानकच.

पण या सर्व धावपळीमध्ये मला ताप येऊ लागला. वॉरंट डोक्यावर असल्याने उघडपणे कुठे उपचार घेणे शक्य नव्हते. मला क्षयरोग झाला होता. अच्युतरावांच्या कानावर हे गेले. त्यांनी अरुणाबाई असफअली यांच्या ओळखीने मला म्हैसूरच्या क्षयरोग्यांसाठीच्या प्रसिद्ध सॅनिटोरियममध्ये दाखल केले. तोही प्रसंग गमतीचाच. अच्युतरावांच्या व्यक्तिमत्त्वाची झलक दाखवणारा.

अरुणाबाईंची ओळख घेऊन ते म्हैसूरच्या डॉ. जयराम यांच्याकडे स्वतः गेले. त्यांना म्हणाले, "मी अच्युत पटवर्धन. मला पकडून देणाऱ्याला सध्या १ लाख रुपये इनाम आहे."

डॉ. जयराम पाहातच राहिले. ते म्हणाले, "मी काय करण्याची आपली अपेक्षा आहे?"

अच्युतराव म्हणाले, "एक तर तुम्ही पोलीसला फोन करून मला अटक करवू शकता व एक लाख रुपये मिळवू शकता. किंवा तुम्हाला माझ्या कामाबद्दल सहानुभूती असेल तर माझ्या वतीने माझा एक पेशंट ॲडमिट करू शकता."

डॉक्टर हसले व प्रेमाने अच्युतरावांचा हात पकडून म्हणाले, "मला दुसरा पर्याय मान्य आहे." आणि मी म्हैसूरला जवळजवळ दोन वर्षे राहिलो.

बरा होऊन परत यायला १९४६ साल उजाडले व अशा स्थितीतही कुसुम (गोळे) ने धारिष्ट्याने माझ्याशी लग्न ठरविले. १९४७ मध्ये आमचा संसार सुरू झाला.

मला समाजवादी पक्षाचे काम करायचे होते. मानधन होते रु. ५०/- ! तरी संसार सुरू झाला. महाराष्ट्र समाजवादी पक्षाचा सेक्रेटरी म्हणून मी कामाला सुरुवात केली.

पहिला धक्का आमच्यातील कम्युनिस्ट बनलेल्या काही मित्रांनी दिला. कम्युनिस्टांची वैचारिक बैठक पक्की. पण मार्ग मात्र कोणतेही वापरीत. समाजवादी पक्ष फोडून कार्यकर्ते कम्युनिस्ट पक्षात नेणे हे त्यांचे कार्य. कार्यकर्त्यांमध्ये गैरसमज पसरवणे, नवीन कार्यकर्त्यांशी जवळीक साधणे, सर्वांना पेचात धरणे, डावपेच खेळणे ही त्यांची सतत चाल. अशा काही कार्यकर्त्यांनी तेव्हा पक्षात फूट पाडली. त्यांच्या या 'निष्ठे'ची तशी प्रशंसाच करावी लागेल. कारण कम्युनिस्ट 'धर्मा'चाच हा एक भाग आहे.

त्यांची आणि माझी मैत्री कधी जमली नाही. आणि मी पुण्याचे काम सोडून नाशिकला आलो. पुण्यामध्ये असताना कुसुम अण्णासाहेब सहस्रबुद्धे या असामान्य मोठ्या अशा

अनुक्रमणिका







एका व्यक्तीबरोबर काम करू लागली होती. तिचा औद्योगिक सहकाराचा पोस्ट ग्रॅज्युएट डिप्लोमा झाला होता. सोसायट्यांतर्फे लोणारी कोळशाचा डेपो चालविण्याचे तिचे काम. कोळसा हाताळणे, त्याची वाहतूक करणे, दोन्ही अवघड, पण तिने अण्णांच्या मदतीने, श्री. अनगळांच्या सहकार्याने काम केले. त्या काळात अण्णांशी खूप घनिष्ट संबंध आला. अन् सामाजिक-रचनात्मक काम आणि हिशेब यांच्या निकट संबंधाचा ठसा कुसुमच्या व माझ्याही मनावर उमटला.

श्री. घुले पाटील म्हणून आमचे १९४२ मधील एक वृद्ध सहकारी मांजरीस राहात. चळवळीच्या दिवसांत नलू-कुसुम रात्रीसुद्धा मांजरीस हडपसरला जात. श्री. घुले पाटील स्वतःच्या मुलींसारखे त्यांच्यावर प्रेम करीत.

सरकारने उपळवट जमिनींचा निचरा करून उत्तम बागाईत जमीन २५०-३०० एकर तयार केली होती. ही जमीन बॅरिस्टर गाडगीळ लिलावात घेत अन् एकरी रक्कम घेऊन कसावयास देत. या जमिनीवर सहकारी शेतीसोसायटी करावी असे ठरले. अण्णा, मी, कुसुम, घुले पाटील या कामाला लागलो. आम्ही निखळ शेतमजुरांची सोसायटी केली. या कामासाठी मी किमान २०० वेळा सायकलवर मांजरी-हडपसरला गेलो असेन.

सोसायटीला जमीन हवी असेल तर सरकारी लिलाव थांबविण्यासाठी अर्ज करावयाचा; तो केला. पण सरकारने रु. २०००/- डिपॉझिट मागितले. येवढी रक्कम कोठून जमणार? जीव काढून हजार-बाराशे जमले !

आमच्या लग्नाचे हे पहिले वर्ष. पुण्याहून नाशिकला यायचे होते. यापेक्षा जास्त रक्कम जमणे अशक्य होते. जमलेली रक्कम साहेबांपुढे ठेवून येवढ्यावर लिलाव थांबवा, अशी विनंती करण्याचे ठरले. मी व कुसुम सेंट्रल बिल्डिंग ऑफिसात गेलो.

आमच्याने जमलेली रक्कम म्हणून १२०० रुपयांच्या नोटा साहेबांच्या पुढे ठेवल्या. त्यांना आमची पार्श्वभूमी – अण्णांचे नाव, घुले पाटलांचे वजन व निष्ठा सर्वच ठाऊक होते. साहेब नाही म्हणाले तर पुढील वर्षावर सर्व काम जाणार होते. पण केवढे आश्चर्य! ते आमच्याकडे पाहून म्हणाले, "ही रक्कम मी पुरेशी मानून लिलाव थांबवतो."

सुभाष सामुदाईक शेतीचा हा जन्म! घुले पाटलांनी कामाची शिफारस केली. कुसुम, अण्णा, मी – सर्वच खपत होतो. अण्णा खादीकामातले फार मोठे अधिकारी, पण आमच्यात घरच्यासारखे राहात. कार्यकर्ते तयार करण्यात त्यांचा हातखंडा. मी व कुसुम यांच्या रचनात्मक कामाचे श्रेय अण्णांचेच.

सुभाष सोसायटी स्थापन झाली. माझ्या मांजरी-हडपसरच्या फेऱ्या चालूच होत्या. त्याही सायकलवर. अप्पा मायदेव शेतकी पदवीधर झाले. ते आम्हाला येऊन मिळाले अन् त्यांनी सोसायटीची सूत्रे उचलली. यशस्वी केली. साऱ्या देशात सामुदायिक शेतीसोसायटी नावारूपास आली. आज त्या शेतमजुरांची स्वतःची घरे आहेत. त्यांची मुले आता पदवीधरपण झालीत. पंडित नेहरू दोनदा सोसायटीवर आले. "हमारे यहाँ यु.पी.में ये क्यों नहीं हो सकता?" अण्णा व ते बोलत लांब गेले. पुढे हा सारा पसारा समाजवादी मंडळींचा आहे हे कळल्यावर पंडितजींना सोसायटीचा विसर पडला!

पण ही सर्व कथा स्वतःची स्तुती करण्यासाठी सांगितलेली नाही. ऐका पुढे. श्री. मायदेवांनी सोसायटी चांगलीच भरभराटीला आणली. सभासदांना बराच बोनस मिळू लागला. स्थिती सुधारू लागली. शेतमजुरांच्या सोसायटीच्या शेतीवर अनेक शेतमजूर राबत होते. अण्णांच्या मनात असे आले की, या शेतीवर सभासद सोडून राबणाऱ्या इतर मजुरांनाही बोनसचा वाटा मिळाला पाहिजे. वर्षातील हजेरीच्या दिवसांपैकी ५० टक्केपेक्षा जास्त दिवस हजर असणाऱ्या मजुरांना बोनसचा काही भाग मिळावा असा प्रस्ताव सर्वसाधारण सभेपुढे आला. गरिबांचे दुःख गरीबच जाणतो ही किती मूर्ख कल्पना आहे याचा धडा मिळावयाचा होता.

ठराव मंजूर होऊ शकला नाही.

मजुरांनीच मजुरांना बोनस देण्याचे अमान्य केले! अण्णांनी सोसायटी सोडली. ती चांगली चालत राहिली. आजही चालते. मजूर मालक झाला अन् तो गरीब राहिला नाही, तर त्याचा वर्ग सर्वार्थांनी बदलतो. असाच अर्थ याचा करावयाचा ना?

अशा प्रकारच्या आदिवासींच्या सोसायट्या निफाड तालुक्यात कोठूरे, करंजगाव येथे आम्ही काढल्या. त्यांची स्थिती फारशी सुधारली नाही. गाळपेराच्या जमिनी पोती-दोन पोती धान्याच्या बोलीवर सधन शेतकऱ्यास देत असत. अजूनही देतात. आदिवासी हा आदिवासीच राहिला. या जमिनी इतक्या सुपीक आहेत की, मेहनत करणाराची सर्व चिंता मिटावी.

नाशिक येथे मी एक सहकारी मजूर सोसायटी स्थापन केली. आजतागायत (१९८४) ती चालू आहे. सरकारी कामे टेंडर भरून घ्यावयाची व सभासदमजुरांना काम पुरवायचे हा

अनुक्रमणिका






उद्देश. वरीच वर्षे ही सोसायटी चांगली चालली आहे. जिल्हा पातळीवर मी एक फेडरेशनही स्थापन केले.

सरकारी बांधकाम खाते हे एक गूढ आहे. ते समजायला-सुद्धा वराच काळ लागतो. सरकारने काढलेली टेंडरे संगनमताने पाडून घेणे, वरपासून खालपर्यंत सर्व नोकरशाहीचा तेथीलच एजंट गाठून कब्जा घेणे, पैशाचा भ्रष्टाचार सातत्याने नियोजित करणे, वाईट माल वापरणे, सिमेंट कमी वापरणे (धोका टळेल अशी खवरदारी घेऊन), सरकारी देखरेख करणारे - बिले बनविणारे-पास करणारे या सर्वांना लाच देऊन सर्व गोष्टी पास करून घेणे, हा कॉन्ट्रॅक्टरच्या हातचा मळ आहे. यातून अशी कंत्राटे मिळविणाऱ्या सोसायट्या कशा सुटतील? त्याही हे सर्व करतात, करवितात. बोलविता धनी अर्थात पैसा हाच असतो. हे सर्व काम इतके सुरळीत, इतके झकास चालते की, नवख्या माणसाला त्यातला 'ब्र' सुध्दा कळणार नाही, उमजणार नाही. त्याची मजल फार तर 'हल्ली भ्रष्टाचार फार वोकाळला आहे', अशी खंत व्यक्त करणे यापलीकडे जात नाही. त्याला कशातलेच काही ठाऊक नसते.

बांधकाम खात्याच्या भ्रष्टाचाराच्या मंत्रतंत्रावर एक पुस्तिका सहज लिहिता येईल. काम हजाराचे असो की लाखाचे, तंत्र साधारणपणे तेच असते.

आमच्या फेडरेशनने आता एक ३-४ लाखांची विल्डिंग बांधली आहे. तेथे संस्थापक म्हणून माझा फोटोही आहे. सर्व कॉन्ट्रॅक्टर्स व सोसायट्या भ्रष्टाचारात प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष भागीदार असतातच – नव्हे, त्याखेरीज त्यांचा धंदा चालूच शकत नाही. जातीबाहेर जाता येत नाही. कोणी खुशीने, कोणी नाखुशीने यात सामील होतात. मलिदा हाती लागू लागला की, 'अहो हे करावेच लागते, पाण्यात राहून माशाशी वैर करता येत नाही' वगैरे कॉन्ट्रॅक्टरांची मल्लीनाथी ढोंगीपणाची व खोटी असते. पण खरोखर भ्रष्टाचार न करता सरकारी बांधकामांच्या कंत्राटांचा धंदा करता येईल का? नाही, करता येणार नाही!

बांधकामखाते कदाचित भ्रष्टाचारात अग्रगण्य असेल; पण म्युनिसिपालट्या-सेल्स टॅक्स- इन्कमटॅक्स-लेबर ऑफिसेस-रेव्हेन्यू खाते यांची भ्रष्टाचाराची तपश्चर्या जुनीपुराणी आहे. उतारा, नकला, तारखा ढकलणे, पुरावा नष्ट करणे यांतले काहीही होऊ शकते. पोलीसखात्याबद्दल न बोलावे तेवढे बरे. नाशिकच्या पोलीस ट्रेनिंग कॉलेजमध्ये प्रवेश मिळविणे हे केवढे दिव्य आहे! कॅपिटेशन फी वगैरे 'सफेत' गैरव्यवहार वरील ॲडमिशनपुढे हास्यास्पद आहेत. हेही सांगावयास हवे की, या पी.टी.सी.च्या बाबत सर्व पक्षांची वर्तणूक सारख्या लायकीची ठरलेली आहे.

महानगरपालिकेत (म्युनिसिपालिटी) झाडूवाल्याचे काम करणाऱ्या मंडळींना रु. ७०० पेक्षा जास्त पगार मिळतो. रु. ७००/- पेक्षा जास्त पगार घेऊन २००-३०० यार्ड रस्ता दिवसातून एकदा झाडणे कसे शक्य आहे? ते सर्व काम मजूर लावूनच केले जाते. रस्ता दिवसातून एकदा झाडावयाचा असतो ना? हजेरी ७।। ते फारतर ९. यापेक्षा किफायतशीर नोकरी तुम्हाला ठाऊक आहे का? यांचे सुपरवायझर, देखरेख करणारे यांचे गुटमळ इतके जमलेले असते की, एखादा कोणी अतिशहाणा हे दूर करू पाहील तर त्याला तेथे अधिकाऱ्याच्या जागेवर राहणे अशक्य करण्यायेवढी ताकत तयार असते. निवडून आलेला अध्यक्ष या भानगडीत पडत नाही असे म्हणणे मूर्खपणाचे होईल. त्यालाही हे मान्य असते. याला मात्र अपवाद असू शकेल, पण "डोळे मिटून घेण्याचे पाप" तो करतोच.

चला, तालुका पंचायती, ग्रामपंचायती पाहू. पैशाचे माप अधिकारकक्षेबरोबर कसे लहान-मोठे होत जाते! एक गमतीची माझ्याशी संबंधित गोष्ट –

काही गावांत लहानमोठी तळी असतात. सरकारचे एक खाते माशांची पैदासवाढ करणे, तत्संबंधी प्रचार-प्रसार-माहिती देणे यासाठी आहे. मी नाशिक तालुक्याच्या पश्चिम भागात खादी कमिशनच्या वतीने बरेच काम केले. या खात्याशी संपर्क साधून मी ते मत्स्य-बियाणे अनेक तळ्यांत टाकले.

८-१० वर्षांनंतर परवा तेथील एक गृहस्थ भेटले. मी सहज माशांची चौकशी केली. "दादा, दर साल लई माशे निघत्यात."

आपण पेरलेले बी उगवले म्हणून मला केवढा आनंद झाला. त्यावर पाणी ओतण्यास माझा मित्र तयार होता.

"म्हंजी दादा, त्याच असं हाये, गरामपंचायत लिलाव करती, तो लिलाव ग्रामपंचायतीच्या सभासदांच्या नातेवाईकाला पाळीपाळीने संगनमताने मिळतो.

"तिगस्त साली लिलाव झाला रु. ५५० ला. मासे निघाले ३-४ हजारांचे. गुदस्त साली लिलाव ७५० ला गेला. मासे झाले ७-८ हजारांचे. औंदा १०५० ला लिलाव गेला. उत्पन्न १७-१८ हजाराच्या घरात असंल!"

लिलाव संगनमताने झाला अन् उत्पन्नाचे वाटप झाले तर कोणाची माय व्यायली आहे भानगड उपस्थित करण्याची!

आमच्या उत्कर्ष समितीच्या दगडाच्या लहान खाणीत आम्ही हे बीज टाकीत असू. तेथे काम करणाऱ्यांनी खूप मासे खावे ही इच्छा होती. तसे त्यांनी खाल्लेही. पण कोणीतरी पैसे मागील म्हणून 'हां, मिळतात कवा कवा' येवढीच कबुली!

यंदा माशाचे बियाणे बदलावे म्हणून त्या खाणीतले सर्व मासे जाळी लावून काढविले. सर्वांनी पोटभर खाऊन ७० किलो मासे निघाले. सध्या या माशांचा भाव १५ ते १८ रुपये किलो आहे.

नवीन बियाणे टाकलेही. कोणाच्या तरी पोटात अन्न जाते, या भावनेने.

हा झाला नमुना. – गवताची राने, बांधकामे, गैरहजर मास्तरला माफी; जेथे जेथे म्हणून ४ पैसे मिळतील ते सरकारी काम बिघडवायचे. त्याबद्दल कोणालाही खंत नाही.

नाशिकला आल्यावर मी सहकारी संस्थेचेही काम करीत होतो. अगदी प्रथम एक सुधारित शेती (बेटर फार्मिंग) सोसायटी स्थापन केली. तिचे नाव 'श्रीकार्तिका बेटर फार्मिंग सोसायटी'. या सोसायटीचे काम यथातथाच चाले. पण येथे उल्लेख करण्यासारखी गोष्ट म्हणजे कूळकायदा आल्यावर या सोसायटीच्या सभासदांना, सहकारी सोसायटीचे सभासद असल्यामुळे, त्या जमिनीचा काहीही भाग मालकीने मिळाला नाही. याबद्दल तंटेबखेडे खूप झाले. मी ही सोसायटी संघटित केल्यामुळे मलाही मालकांकडून शिव्याशाप मिळाले.

एक बरीच मोठी सेवा सहकारी सोसायटी त्रिंबक विद्यामंदिराच्या भोवतालच्या १५ गावांतील लोकांसाठी स्थापन केली. कर्ज-वाटपाचे काम छान चालले. ही सोसायटी आमच्या उत्कर्ष समितीच्या लोकांनीच मागे राहून चालविली. तालुक्यातील ही उत्तम अशी एक सोसायटी. श्री. दिंडोरकर या नावाच्या आमच्या कार्यकर्त्याने ही सोसायटी नावारूपाला आणली. पुढे याच्या २-३ सोसायट्या झाल्या. सर्व बऱ्या चालतात. आदिवासी भागातील शाखा आहे. आदिवासी मंडळींना याचा फायदा नाममात्र मिळतो. शेतकऱ्यांच्याबाबत तिन्ही सोसायट्या उत्तम काम करतात.

पुन्हा एकदा, येथे उल्लेख करण्याचा उद्देश असा की, या विविध कार्यकारी सेवा सहकारी सोसायटीत कारागिरांना कर्ज मिळण्याची सोय आहे. ती सर्व महाराष्ट्र राज्यात आहे. पण या सोसायट्यांमधून १० टक्के कारागिरांनासुद्धा कर्ज मिळाले नाही, याबद्दल माझी खात्री आहे. बुरूड, मांग, सुतार, चांभार यांना कर्ज द्यावे, त्यांच्या धंद्याला मदत करावी असा दृष्टिकोण होता. पण तसे करणारे सभासद, सेक्रेटरी तर नव्हतेच – नाहीतच. वरच्या मंडळींची गोष्टच नको, कारण ते सगळे 'साहेब.'

उत्कर्ष समितीतर्फे काही ग्रामोद्योग आम्ही चालविले. त्यांपैकी फक्त कातडी कमावण्याचा धंदा तेवढा बंद पडला. आमच्या वीटभट्ट्या दरसाल ५-६ लाख विटा करतात. गेली २० वर्षे घोंगडी-उत्पादन व विक्री १ लाखापेक्षा जास्त असते. खादीचे दुकान, एक वेल्डिंग वर्कशॉप, शेतीच्या लहान अवजारांचे उत्पादन इ. कामे आम्ही सातत्याने करीत आलो, करतो. या सर्व कामाचा प्राण शेतकऱ्यांची शेती सुधारणे, त्यांना जागृत करणे, हा होता. काही अंशी तो साध्य झालाही. पाचपन्नास शेतकरी जागे झाले. आमचे बरोबर कामही करतात. हे काम खादी कमिशनच्या 'सघन क्षेत्र योजने'खाली सुरू झाले.

खंत वाटणाऱ्या गोष्टी वेगळ्या आहेत. श्रमदानाची प्रथा महाराष्ट्रात ६०-६५ सालापर्यंत चालू होती. आम्ही ती कसून राबवली. खेड्यांच्या लोकांना जमवून आम्ही श्रमदानाने रस्ते केले. केलेल्या रस्त्यांची लांबी ४ मैल तरी एकूण भरेल. जपानी भातशेतीसाठी असेच जिवाचे रान आम्ही केले. उत्पन्न वाढवून दाखविले. आज त्याची नावनिशाणी नाही. मग जिल्हा पंचायतीचे राज्य आले. शाळा-बांधकामातील लोकांच्या योगदानाच्या हिश्शाचे – श्रमदानाचे अगर रकमेचे – कागदी खोटे गणित सरकारी मंडळींच्या साहाय्याने ताबडतोब सापडले. तेच रस्त्यांचेही झाले. श्रमदानाचा पुकारा करणारे राष्ट्र सेवा दल, 'लॅन्ड आर्मी' सांगणारे डॉ. लोहिया अन् या जातीची आम्ही मंडळी हात चोळीत बसलो. कारण आता जनतेच्या सहकार्याची, श्रमदानाची गरजच उरली नाही. वातावरण बिघडले. श्रमदान, ग्रामसहकार ही पुराणामधील वांगी झाली.

हेच, अगदी हेच ग्रामीण शिक्षणाचे झाले. या मागासलेल्या भागात शाळा नव्हत्या. ५-७ मैलांवर शाळा असे. आमचा एक कार्यकर्ता दौलत कडलग याने अशा दोन गावांत स्वतः शाळा चालविल्या. त्याचे नावच दौलत मास्तर झाले. ह्या तरुणाने चालविलेल्या गावी आता 'गराम पंचायती'च्या शाळा आहेत. शिक्षकांचा पत्ता नसतो. मुले शेतात जातात; मास्तर लहर लागेल तेव्हा येतो. दोन मास्तरांची शाळा असली तर



अनुक्रमणिका

एक हमखास गैरहजर असतो. ही बापाची पेंड खाण्याची आता आम्हाला सवयच झाली आहे. याचा पुरावा म्हणून मुद्दाम उल्लेख करतो की, आज १९८४ साली ४ थी पास होऊन ५ वीत आलेल्या आमच्या आदिवासी वोर्डिंगमधील मुलींना वेरीज-वजाबाकीही येत नाही.

या काळात श्री. न.ग. ओक यांच्या मदतीने, सहकार्याने प्रथम एक मुलींचे वोर्डिंग, नंतर रचना विद्यालय, नंतर रचना ट्रस्ट इत्यादी संस्थांचे काम चालू झाले. मी, कुसुम, रावसाहेब, शांता, माधव अशा मंडळींनी ही कामे सुरू केली. कुसुम, शांताने रचना विद्यालय सांभाळले. चांगले चालले. नावारूपास आले. ७-८ लाखांच्या इमारती उभ्या झाल्या. यंदा तर बोर्डात पहिल्या १० त शाळेचा विद्यार्थी आला.

श्री. ना.ग. गोरे यांनी स्थापन केलेल्या ट्रस्टतर्फे, 'सौ. सुमतिवाई गोरे विद्यार्थिनी वसतिगृह' चालू झाले. २५ पासून ४० पर्यंत मुलींची संख्या असते. प्रत्येक मुलीमागे रु. ६५/- असा अन्नखर्च मिळतो. रु. ६५/- मध्ये जेवण २ वेळा देण्याची किमया आम्ही करतो. म्हणजे दरसाल ५-७ हजारांचा तोटा आम्ही पत्करतो. कारण जेवण माणसाला शोभेल असे आम्ही देतो. आम्ही थोडीफार शेती करतो. त्यातली भाजी मुलींच्या तोंडाला लागते. रु. ६५ चे १०० झाले असे गेले वर्षभर ऐकत आहे. हे प्रमाण महागाईच्या प्रमाणाशी समांतर असल्याने परिस्थितीत सुधारणा होईल असे मानणे कठीण आहे व अजून मुलींच्या मागे रु. १००/- हातात लागावयाचे आहेत. ही ग्रॅन्ट मिळविण्यासाठी योग्य कागद-पत्र तयार करणे, पाठविणे, इन्स्पेक्शन इ. इ. कामे चालू असतात.

आमच्या बावतीत लाच, भ्रष्टाचार झाला नसला तरी, त्याचा एक अनुभव असा आला. नाव न घेता असे लिहितो की, इन्स्पेक्शनला आलेले तिघेजण हॉटेलात आमच्या खर्चाने जेवायला गेले. मी आमच्या माणसाजवळ सढळ हाताने रु. ६०/- दिले. जेवण दुपारचे. पण त्याचे विल रु. ११०/- झाले. आमचा कार्यकर्ता विचकून जेवलाच नाही. पण त्याचा फोन असा आला की, आणखी रु. ५०/- पाठवा. हॉटेल मित्राचे होते. सवडीने पैसे दिले. यावावत आम्ही अर्थातच नेहमीप्रमाणे मूग गिळले.

ते वर्ष गेले. इन्स्पेक्शनसाठी पुढच्या वर्षी जास्त तयारीचा माणूस आला. इन्स्पेक्शन वगैरे झाली. आमच्या हिशेवनिसाजवळ मागणी तर झालीच, पण ते गृहस्थ धाडसाने मला भेटायला आले. दोन दिवस अगोदर घरात टेप रेकॉर्डर-प्लेअर घेतला होता. मी पडद्याआड टेप लावूनच त्यांना आत घेतले. गृहस्थ अत्यंत तयारीचा. इकडचे तिकडचे बरेच बोलणे झाले. मुद्द्यावर येणे तर भाग होते. ह्यातून – पैसे देण्यातून – सुटका नाही, म्हणाले. रु. ५००/- फार कमी होतात; यंदा १००० तरी पाहिजेत. मी काहीच देणार नव्हतो. टेपवर वरचे संभाषण रेकॉर्ड झाले. याबाबत माझे धोरण व श्री. माधवराव व सौ. कुसुम यांच्या धोरणांत फरक होता. काहीही द्यायचे नाही हे माझे धोरण. त्यामुळे ग्रॅन्ट मिळविण्यास वेळ लागे. माझ्या व माधवरावांच्या ४-५ फेऱ्या झाल्या की ग्रॅन्ट मिळे.

या वेळी सर्वजण फार रागावले. माधवरावांची सर्व वरिष्ठ अधिकाऱ्यांशी घसट. त्यांनी तेथल्या सर्वांत वरिष्ठ अधिकाऱ्यांना फोन करून सर्व सांगितले. ते आमच्यापेक्षाही जास्त बिघडले. म्हणाले, "४ तासांत मी या माणसास ऑफिसच्या बाहेर काढतो". – काढलेही त्यांनी. पण तीन महिन्याने हे गृहस्थ, 'माझ्या मुलाला इन्फंटाईल पॅरॅलिसिस आहे, मला नाशिकच हवे', असा 'प्रयत्न' करून गृहस्थ नाशिकातच राहिले. जागा कदाचित जास्त फायद्याची असेल.

त्यानंतर आलेले अधिकारी मात्र आदर्श होते. कागदपत्र तर तपासलेच, शिवाय आमच्या चुका सुधाराव्या कशा तेही सांगितले. त्यांच्याशी बोलताना-वागताना समाधान वाटले. ही दोन टोके. एकाचे नाव लिहिले नाही, दुसऱ्याचे कसे लिहू?

आश्रमशाळा, ग्रामीण भागातील वोर्डिंग-शाळा ही सरकारची प्रेक्षणीय शाखा आहे. शिक्षणातला 'आनंद' वर लिहिलाच आहे की, ५वीत आलेल्या मुलीस बेरीज-वजाबाकी येत नाही. पण आश्रमशाळेतील मुले-मुली घरी गेल्यावर, बराच काळ गैरहजर राहिल्या तर फारच आनंदाची बाव; कारण खर्चाची रक्कम मिळतच असते. एकशिक्षकी शाळांवर देखरेख कोणाचीच नाही. दोनशिक्षकी शाळा असेल तर पाळीने गैरहजर राहण्याची सोय. असे आमचे ग्रामीण शिक्षण आहे.

यामध्ये 'पुढील पिढीची तयारी' असे वोलणे हे किती मूर्खपणाचे आहे? अशा संस्थांत कोठे चुकून साने गुरुजींचा फोटो पाहिला तर लाजेने मान खाली होते. त्यांचा यापेक्षा मोठा अपमान करणे शक्य आहे का? हे पाहिले की गुरुजींनी फार वेळेवर जीव दिला, असेच वाटते.

शिक्षण, वोर्डिंग, ग्रामपंचायती, सहकार, पंचायत समित्या, रेव्हेन्यू, पोलीस, एक्साईज, टाऊन प्लॅनिंग, कस्टम्स, सेल्स

अनुक्रमणिका








टॅक्स, इन्कमटॅक्स, वाहतूक (आरटीओ), म्युनिसिपालिट्या, कॉर्पोरेशन, एम.एस.ई.बी., स्टेट ट्रान्स्पोर्ट ह्यांमधील भ्रष्टाचार अनुभवीत सर्व व्यवहार चालतात. आपण सुखाने जगत असतो. त्यात समाजसेवकांचा दंभ, काहीतरी भरीव काम करीत असल्याचा भ्रम, लोक आपल्याला मानतात, आपली प्रतिष्ठा वाढते आहे असे वाटणे हे चालूच असते.

सध्या जे सरकार राज्यावर आहे ते लोकशाहीने बदलावे; नंतर सर्व ठीकठाक होईल, असे मानणारे आमचे कार्यकर्ते आहेत. त्यांच्यापैकी काहींना सत्तेच्या रक्ताची चटक खास लागली आहे. मते विकत घेता येतात हे ठाऊक असून, ते विसरून आम्ही लोकशाहीच्या गोष्टी करीतच असतो. पार्लमेन्टपासून ग्रामपंचायतीपर्यंतच्या निवडणुकीत आम्ही भाग घेतो, रमतो, हरतो अन् पुन्हा तोच डाव खेळू लागतो. ह्या सगळ्याला 'कार्य' असे म्हणतात.

मला सर्वांत जास्त खोटी वाटणारी बोलण्याची भाषा अशी : एक, 'लोकजागृती' केली पाहिजे असे तोंडाने म्हणत राहणे, ही. दोन, लोकशिक्षण हाच ह्या सर्वांवरचा इलाज आहे, ही. सभा संपल्यानंतर सातत्याने अर्धा तास या कामाला देणारे विरळा. लोकजागृती व लोकशिक्षण ह्या नुसत्या बोलण्याच्या गोष्टी बनल्या आहेत. बोलाचीच कढी बोलाचाच भात

आमच्या निवडीच्या राजकीय पक्षाला आमच्या रचनात्मक कामाची मदत खरोखर फार अल्प झाली, हा दुःखाचा भाग. थोडेफार काम झाले; थोडेफार यश मिळाले. पण सर्व मोठ्या पार्श्वभूमीवर ते कवडीमोल तरी आहे का? पक्षान्तर्गत कलह, राष्ट्र सेवा दलाची स्थिती हे सर्व अनुभवल्यावर वाटते, नुसता सेवाभावी राहिलो असतो तर बरे झाले असते. सध्या आमची स्थिती वटवाघळापेक्षा वाईट आहे. राजकीय मित्रांना वाटते, आम्ही नुसते रचनात्मक – रचनात्मक कामाचे गुऱ्हाळ मी इतका वेळ चालविलेच आहे.

ह्याला आता वयाच्या ६७ व्या वर्षी उत्तर मिळून तरी काय उपयोग? खऱ्या अर्थाने खूप मोठी माणसे भेटली, जवळ आली - साने गुरुजी, जयप्रकाशांपासून नानासाहेबएस.एम. पर्यंत. हा परम सुखाचा ठेवा मात्र खास आमचा आहे! (लेखनकाल : १९८४)





# पन्नास वर्षे, स्वातंत्र्याची की सत्तांतराची?

**चिं. मो. पंडित**

गेल्या पन्नास वर्षांत 'आपल्या व्यवसायक्षेत्रात स्वातंत्र्याचे काय होताना आपण पाहिले?' असा विषय आहे. म्हणजे, एका अर्थाने, आपला स्वतःचाच व्यावसायिक आढावा घेण्यासारखे आहे. पन्नास वर्षे म्हणजे व्यक्तीचे जवळजवळ संपूर्ण कार्यक्षम आयुष्य. पण समाजासाठी, देशासाठी पन्नास वर्षे म्हणजे एक क्षण. तेव्हा, या एका क्षणाच्या घडामोडीवरून निष्कर्ष काढण्याचा उतावीळपणा कोणी करू नये. फक्त काय घडत आहे व ते मी कसकसे माझ्या व्यवसायातून, काही समाजकार्यातून अनुभवत गेलो, जात आहे एवढेच नमूद करता येईल. बघूया प्रयत्न करून. स्वातंत्र्य नसणे म्हणजे नेमके काय हे माहीत नाही आणि त्यामुळे ते असणे म्हणजे तरी नेमके काय हेही माहीत नाही. कदाचित ज्या सामाजिक स्तरात मी जन्मलो, वाढलो आणि आजतागायत जगत आहे तिथे हे प्रश्नच उपरे असतील. इतके मात्र खरे की, या पन्नास वर्षांत व्यवहारात काही करून दाखविण्यावर फारशी बंधने, काच जाणवले नाहीत; वर वर सरकायला खूप झगडा करावा लागला नाही. काही मर्यादा पडल्याच असल्या तर त्या माझ्या मानसिकतेच्याच आहेत. बंधने जाणवली ती वाईट कृत्ये करण्यावर. तशी ती स्वातंत्र्यपूर्व काळातही होतीच, नाही का? किंबहुना नेहमीच असतात. अगदी अलीकडे १०-१५ वर्षांत मात्र काही मानसिक घुसमट, काही झोटिंगशाही, माफियागिरी, कायद्याचा व न्याय-व्यवस्थेचा ऱ्हास रोजच्या व्यवहारात डोकावू पाहात आहे असे वाटते. सचोटीच्या मेहनतीची किंमत कमी होत आहे असे वाटते.







अनुक्रमणिका

साल १९४७, १५ ऑगस्ट. आम्ही शाळकरी मुलं, आमची वडील मंडळी, सर्वजण कोणाच्यातरी घरी रेडिओभोवताली भावुकपणे, काहीसे झपाटलेले गोळा झालेलो. पंडित नेहरू आवेशाने आवाहन करत होते. – 'और जोरसे बोलो – जय हिंद' आणि आम्ही इतक्या दुरून, काही दिसत नसताना, कळत नसताना आरोळ्या ठोकत होतो : 'जऽऽय हिंद'. वडील मंडळी कौतुकाने हे पाहायची. मी अकरावी एस.एस.सी. पास झालो. गुण बरे होते. माझ्या गुरुजनांत मतभेद झाले. एक पक्ष मी कला शाखेकडे जावे असा आग्रह धरत होता तर दुसरा विज्ञान शाखेचा. आजोबांचं तर म्हणणं होतं – मी अभियंताच व्हावं, म्हणजे कोयना धरणावर काम करून देशाच्या बांधणीला हातभार लावता येईल. शेवटी व्यावहारिक तोडगा असा निघाला की, विज्ञान शाखेकडेच जावे; कला शाखेचा अभ्यास काय बाहेरूनही करता येईल, पण विज्ञान शाखेचा बाहेरून करता येणार नाही!

यथावकाश इंटरची परीक्षा पास होऊन बरे गुण मिळून वास्तुतज्ज्ञ अभियंताही झालो. सरकारी नोकरी करायची नाही, कारण तिथे काहीही करून दाखवता येत नाही; फक्त दुसरा करीत असेल त्यातील चुका काढत राहण्याचे नकारात्मक, फाइली उपसण्याचे कंटाळवाणे काम जन्मभर करावे लागेल, अशी समजूत. शिवाय भ्रष्टाचार करावा लागेल अशी भीती. आणि बाहेर खासगी उद्योगांत कष्ट केल्यास आर्थिक भरभराटीची खात्री. म्हणून एका बड्या कंत्राटदाराकडे नोकरी घेतली. अत्याधुनिक तंत्रज्ञानाचा उपयोग करून बांधत असलेल्या पुलाच्या कामावर नेमणूक झाली. आजोबा थोडे खट्टू झाले. त्यांच्या हिशोबी कोयना धरण म्हणजे देशाची पुनर्बांधणी, महाराष्ट्राची भरभराट. पुढे भिलाईला पोलाद कारखान्याच्या कामावर गेलो तेव्हा त्यांना जरा बरे वाटले. फार पुढे पूलबांधणीचे कामही वाहतुकीसारख्या मूलभूत सुविधांसाठी आवश्यक आहे हे मला कळले व आजोबांना समजावून सांगू शकलो.

पहिल्या पुलाच्या कामावर व नंतर भिलाईला (१९५६-५८ साली) असे दोन प्रसंग घडले की, ज्यांनी स्वदेशाभिमान डिवचला गेला व ईर्षा जागृत झाली. पुलाच्या कामावर एक फ्रेंच तंत्रज्ञ (टेक्निशियन पातळीवरचा) आम्हाला नवीन अवजारे वापरण्यासाठी, देखभाल करण्यासाठी मदत करत असे. माणूस चालू होता. एकदा काही तांत्रिक, डिझाईनच्या चर्चेसाठी बांधकाम खात्याच्या मुख्य अभियंत्याशी भेट होती. हा फ्रेंच तंत्रज्ञही वट मारण्यासाठी आम्ही बरोबर नेला होता. मुख्य अभियंतासाहेब काही केल्या आमचे ऐकेनात. आणि चर्चा निष्फळ होत होती. एकाएकी हे आमचे तज्ज्ञ (?) उठले आणि आम्हाला उद्देशून म्हणाले, "बघा बुवा, माझा सल्ला मी तुम्हाला दिला आहे. तुम्ही तो मानला नाहीत, पुलाच्या कामात त्रुटी राहिल्या तर मी जबाबदार नाही; ती तुमची जबाबदारी. मी आपला जातोच कसा." हे ऐकताच आमचे ज्ञानसंपन्न, अनुभवसंपन्न बांधकामखात्याचे मुख्य अभियंता सटपटलेच. "तसं नाही हो. हे अत्याधुनिक तंत्रज्ञान आहे. मी आपला शंका विचारत होतो. तुम्ही म्हणता तसेच करा." झाले, चहा पिऊन आम्ही बाहेर आलो. तर हा आमचा फ्रेंच टेक्निशियन हसायला लागला. मला म्हणाला, "बघ, तुझा मुख्य अभियंता. त्याला काही अक्कल नाही. तुला माहीतच आहे की, मी यंत्रसामग्री सांभाळणारा एक साधा कुशल टेक्निशियन. पण तरी हा मला घाबरला." हा प्रसंग मला फार लागला. आपण एक दिवस परदेशी जाऊन हे अत्याधुनिक तंत्रज्ञान आत्मसात करू, परकीयांची गुलामी नको असा मनोमन निश्चय केला. भिलाईलाही असाच एक प्रसंग घडला. एक काम रशियन तंत्रज्ञाच्या निर्णयावाचून उगाचच लांबत होते. भिलाई स्टील प्लँटचे प्रकल्पप्रमुख हे फार हुशार व काम रेटणारे होते. एके दिवशी त्या रशियन अभियंत्यासमोर त्यांनी मला खडसावले, "तुला डोकं, अक्कल आहे ना? की असल्या फालतू निर्णयासाठी तू मॉस्कोकडे डोळे लावून बसणार आहेस? मला हे काम तावडतोब पूर्ण करून हवे आहे. समजलं?" लेकी बोले, सुने लागे. रशियन अभियंता काय समजायचं ते समजला. मी दोन दिवसांत त्याच्याकडून निर्णय घेऊन काम संपवून टाकले. हाही प्रसंग स्वाभिमान जागृत करून गेला. व्यक्ती असो, राष्ट्र असो 'Self is the Man' हेच खरे. असा एक लाल बहादूर शास्त्रीच होऊन गेला, ज्याने आठवड्याला एक उपवास करा, पण अमेरिकेची भिक्षांदेही नको, असा स्वाभिमानाचा संदेश दिला.

१९६५ साली मी परदेशी अत्याधुनिक तंत्रज्ञान शिकून भारतात परत आलो. परदेशी कंपनीचा सहभाग असलेल्या एका देशी सल्लागार कंपनीत खातेप्रमुख म्हणून नोकरीला लागलो. सहा महिन्यांत माझ्या कामाची माहिती देऊन आधीचा जर्मन अभियंता मला पदभार देऊन परत जाणार होता. तसा तो गेलाही. आणि मी पदभार स्वीकारल्यानंतर पंधरा दिवसांतच एक प्रसंग घडला. आमचा एक जर्मन प्रकल्पप्रमुख (हाही

फोरमनच्या पातळीवरचाच होता) माझ्याकडे आला आणि मोठ्या आवाजात तणतणला, "तुझ्यामुळे कामाला उशीर होतोय. घोटाळे होताहेत..." मी शांतपणे त्याच्याकडे पाहिले आणि म्हणालो, "तू एक साधा फोरमन, हळू आवाजात बोल. तुझ्या देशात माझ्यासारख्या पीएच्.डी. झालेल्या अधिकाऱ्याशी बोलण्याची संधीदेखील तुला मिळाली नसती. नीट बोलता येत नसेल तर बाहेर जा. चारचौघांत शोभा होऊ नये म्हणून मी हे सर्व तुला तुझ्या जर्मन मातृभाषेत हळू आवाजात सांगतोय." तो नरमला, पण परत उसळून म्हणाला की, "डायरेक्टरकडेच तुझी तक्रार नेतो." मात्र अर्ध्या तासाने परत येऊन त्याने दिलगिरी व्यक्त गेली. आणि म्हणाला, "लक्षात ठेव, तुझ्या देशात तुझ्या ज्ञानापेक्षा माझी गोरी कातडीच श्रेष्ठ धरतात." दुर्दैवाने, आठवड्याच्या आतच याची प्रचिती आली. मुंबई महानगरपालिकेतून आम्हाला काही निर्णय हवे होते. खूप चर्चा झाली, संदर्भ दिले, पण अधिकारी ऐकेनात. जुने कालबाह्य, संदर्भहीन नियम दाखवू लागले. हा आमचा फोरमन म्हणाला, "हे अत्याधुनिक तंत्र आहे. आम्हीही जर्मनीत अलीकडेच वापरात आणलेय. तुमचे नियम जुनेपुराणे झालेत. पाहा, विचार करा." आणि गोरी कातडी जिंकली! १९५२-५४ मध्ये ज्या मुंबई महानगरपालिकेने स्वतःच्या हिमतीवर येथील तरुण अभियंत्यांकडून तानसा धरण बांधले तिला आज १९९७ मध्ये संडास बांधायलादेखील जागतिक बँक व परदेशी तंत्रज्ञ लागतात. बाहेरच्या सल्लागाराशिवाय कामच होत नाही. नराचा नारायण होतो आणि घोड्यांची गाढवंही करता येतात.

बाकी, सल्लागार म्हणून मला इथे स्वतंत्र काम करायला खूप वाव मिळाला. नवीन कल्पना राबविता आल्या. अनेक उत्तमोत्तम प्रकल्प करायला मिळाले. दीडएकशे पूल बांधून झाले, फॅक्टऱ्या झाल्या, जलशुद्धीकरण प्रकल्प झाले, मार्केट्स झाली, स्मारके झाली. दोन-तीन संरचना सर्व आशियात प्रथम क्रमांकाच्या ठरल्या. तीस-चाळीस हजार माणसांसाठी कायमची रोजगारनिर्मिती झाली. आणि हे सर्व येथील कामगारांनी केले. परदेशी मदतीशिवाय, मार्गदर्शनाशिवाय झाले.

खंत आहे ती दोन गोष्टींची. या कष्टाळू, कल्पक, विश्वासू कामगारांसाठी मी काही करू शकलो नाही. १९५६ साली ते जसे कामावर राहात, तसेच आज राहतात. त्याच फाटक्यातुटक्या बांबू चटया, तीच तशीच उकिरड्यावर खेळणारी पोरं. त्यांच्याच जिवावर आपले राष्ट्रीय प्रकल्प उभे राहिले. पण नेहरूसुद्धा म्हटल्याचे स्मरतेय, त्यांना जास्त देणे देशाला परवडत नाही. प्रकल्प फार महाग होतील. नियोजन मंडळाने हाच धागा पकडून सातत्याने आजदेखील शेतमजूर (यांचीही स्थिती मी गेली दहा वर्षे शेतीचे काम करून व थोडाफार अभ्यास करून प्रत्यक्ष पाहात आहे. महात्मा फुले यांचे *शेतकऱ्याचा असूड* आजही कालबाह्य वाटत नाही!) व बांधकामावरचे मजूर यांच्याविषयी ही संवेदनाशून्य विचारधारा बाळगलीय. एक मनाला लागून राहिलेला अनुभव देतो. एका पुलाच्या कामावर मुद्दामहून बांधकाम मजुरांसाठी घरे, पाळणाघर, दवाखाना असा घटक निविदेत घ्यायला लावला. याचा अर्थ असा की, हा खर्च प्रकल्पावर वर्ग होणार होता, कंत्राटदाराच्या खिशातून जाणार नव्हता. तरीही कंत्राटदाराने खुबीने त्यातून आपल्या अधिकारीवर्गासाठी घरे बांधली, कामगार आपले त्याच झोपड्यांत. माझ्या हरकतींकडे दुर्लक्ष करून अधिकाऱ्यांनी त्या कामाचे पैसे कंत्राटदाराला दिले! निमसरकारी महामंडळाच्या सदस्य कार्यकारी संचालकाने उचलून धरलेल्या या योजनेचे प्रत्यक्षात त्याच्या हाताखालच्या अधिकाऱ्यांनी कंत्राटदाराबरोबर संधान बांधून मातेरे केले. गेल्या ३० वर्षांत २-३वेळा कामगारांसाठी स्वस्त घर योजनांचे प्रकल्प आखणी करण्याचे प्रसंग आले. खूप मेहनत घेऊन, कामगारांना स्वाभिमान देणारे पर्याय सुचविले. पण प्रत्येक वेळी कामगारांच्या पुढाऱ्यांनीच ते हाणून पाडले. त्यांना ही घरे फुकट तरी हवी होती किंवा ती विकायचा अधिकार हवा होता. आत्मसन्मानाची ऐशी तैशी.

दुसरी खंत आहे ती प्रकल्पांच्या पूर्ततेत होणाऱ्या अक्षम्य दिरंगाईची आणि त्यामुळे पटीत वाढणाऱ्या प्रकल्पखर्चाची. निर्णयाअभावी, राजकीय दृष्टिकोणातून सतत होणाऱ्या अग्रक्रमांतील फेरवदलांमुळे प्रकल्प रखडतात, त्यांना आर्थिक साहाय्य वेळेवर मिळत नाही. एकच उदाहरण देतो. पुण्यात बंडगार्डनजवळ मुळेवर एक पूल बांधायचे गेली १५-२० वर्षे घाटत आहे. आत्तापर्यंत काही वर्षांच्या अंतराने तीनदा निविदा मागवून, त्या स्वीकृत करून, परत काम पुढे ढकलले गेले आहे. पहिल्या निविदेवर रु. ७२/- लाख, दुसरीवर रु. २.२५ कोटी, तिसरीवर रु. ३.५० कोटी अशी पक्की बोली कंत्राटदाराकडून आली होती. आज आता चौथ्या वेळी निविदा मागविण्याचे घाटत आहे. सुधारित अंदाजित खर्च रु. ६.५० कोटी असल्याचे ऐकतो. ठाणे खाडीवरील पुलाची बोली रु. ४०- ४५ कोटींची होती असे स्मरते. आज दुप्पट वेळ व

रु. २०० कोटींच्यावर हा पूल होणार आहे. सिंचनप्रकल्पांचेही तेच. सर्वच प्रकल्पांचे हे असे आहे. बांधकामातील ४-५ टक्के भ्रष्टाचारापेक्षाही हे भयानक आहे.

शेवटी हे माझे उपजीविकेचेही साधन होते. हे काही धर्मादाय काम नव्हते. तेव्हा त्याविषयीही दोन शब्द लिहिल्यास अप्रस्तुत होऊ नये. जसे जसे समाजकार्याकडे लक्ष जाऊ लागले, वाचन वाढले, खेडोपाडी प्रवास झाला तसे लक्षात येऊ लागले की, आपली बाजारातील किंमत ही एका आर्थिक-सामाजिक व्यवस्थेच्या चौकटीच्या संदर्भातच आहे. माणसाची खरीखुरी किंमत (intrinsic and absolute) कशी ठरते? त्यासाठी प्रत्येकाला रॉबिनसन क्रुसो होऊन निर्मनुष्य अशा अज्ञात बेटावरच राहायला हवे का? अशा तऱ्हेच्या विचारांमुळे पैशाच्या मोबदल्याच्या बाबतीत मी थोडाफार अव्यवहारी व उदासीनच राहिलो.

स्वतंत्र व्यवसाय सुरू केला तेव्हा एका ज्येष्ठ सल्लागाराला विचारले की, मोबदला काय घ्यावा. त्यांनी हसतहसत सांगितले की, देणाराला परवडेल तितका जास्तीत जास्त घ्यावा. म्हणजे मोबदल्याचा आणि आपण कामावर देत असलेल्या वेळेचा, बौद्धिक विचारांचा काही संबंध नाही तर! सल्लागार-अभियंत्यांची एक संस्था आहे. तिच्या शिफारशी अशा की, बांधकामाच्या प्रत्यक्ष किमतीच्या तीन टक्के मोबदला घ्यावा. एक टक्का हा तांत्रिक कामासाठी, एक टक्का कार्यालय, लेखनसामग्री, दूरध्वनी इ. साठी व एक टक्का नफा. सर्व सल्लागार हा मोबदला मिळविण्याचा प्रयत्न करतात. मात्र तांत्रिक काम व इतर खर्चासाठी शिफारस केलेला खर्च करायला टाळाटाळ करतात. तीन टक्क्यांपैकी दोन टक्के फायदा करण्याचा प्रयत्न करतात. शिवाय मालकही खमके असतात, सल्लागारांत झुंज लावून एक-दीड टक्क्यांपर्यंत खाली आणून कामे करून घेतात; मोबदल्याचा शेवटचा हप्ता बुडवतातही. सल्लागार थातुरमातुर काम करून प्रकल्प महागडे व सदोष करतात. सर्वच संबंधित दुसऱ्याला टोपी घातल्याच्या खुशीत.

आपल्यासारख्या गरीब, विकासाच्या वाटेवरील देशाला पाश्चात्त्यांच्या धर्तीवर मोबदला देणे परवडणार नाही. मी मनाशी असे ठरविले की, सरकारी प्रथम श्रेणीतील माझ्या बरोबरीच्या लोकांच्या उत्पन्नापेक्षा वीस टक्के जास्त माझी कमाई असावी. हे वीस टक्के मी स्वतंत्र व्यवसायाचा धोका पत्करतो म्हणून. शिवाय, शक्यतो, मालकाच्या पैशाने जरी प्रवास केला तरी रेल्वेतून सेकंड क्लास स्लीपरने करावयाचा. सहसा बांधकामाच्या जागीच राहायचे. महागडी हॉटेल्स टाळायची.

हे सर्व छान बसले. पैसे कधी कमी पडले नाहीत. पण माझ्या बाबतीत जो साध्या राहणीचा मार्ग मी स्वीकारला तो माझ्याकडे काम करणाऱ्या सेवकवर्गाला पटला असे वाटत नाही. माझ्याकडे उत्तम प्रशिक्षण मिळते म्हणून नेहमीच तरुण अभियंते काम करत. ड्राफ्ट्स्मनही खूप तयार झाले व येथील प्रशिक्षणाच्या जोरावर परदेशी उत्तम नोकऱ्या त्यांना मिळाल्या. तीन अभियंत्यांचे आज स्वतंत्र व्यवसाय आहेत. माझ्यापेक्षा तिप्पट मोठी कार्यालये आहेत. सर्वांशी आजही उत्तम घरगुती संबंध आहेत. अनेक अशीलही आज मित्र झालेत. दरम्यान सरकारी अधिकाऱ्यांचे पगार, इतर सुविधा, घरबांधणीसाठी स्वस्त जमिनी, दरवर्षी वाढणारे निवृत्तिवेतन इ.इ. पाहता 'वीस टक्के अधिक' हा निकष चुकला की काय, किंबहुना स्वतंत्र व्यवसाय न करता सरकारी अथवा खासगी कंपनीत नोकरी धरणे हेच जास्त व्यावहारिक शहाणपणाचे आहे का, अशी शंका मनाला चाटून जाते.

व्यवसायाचा अभिमान वाटावा, आनंदाने दाद द्यावी असेही क्षण आहेत. दिल्लीचे बहाई मंदिर, कलकत्ता मेट्रो, कोकण रेल्वे – असे कितीतरी. ही सर्व कामे आपण केली आहेत; आपल्या अशिक्षित रांगड्या कामगारांनी, आणि साधने कमी असतानाही त्यांवर मात करून आमच्या अभियंत्यांनी केलीत. 'मुंबई महानगरी' नावाचे अवाढव्य संयंत्र, तेथील पाणीपुरवठा, रहदारी ते सर्व काही तिप्पट-चौपट इतक्या जादा भाराखालीही चालू आहे.

थोडा तथाकथित समाजकार्याचा वीस-पंचवीस वर्षांचा अनुभव. खूप लिहिण्यासारखे आहे. निरलसपणे काम करणारे आजही अनेक आहेत. तरुण-तरुणी, उच्चशिक्षित आहेत; पण सर्वांचे सवते सुभे. संस्था-संघटनाशास्त्रात आम्ही फार मागे आहोत. त्यामुळे या सर्वांची बेरीज होत नाही. बहुतेक संस्था एकांड्या, एकखांबी तंबू असलेल्या. त्यांच्यात अंतर्गत लोकशाही अभावानेच दिसते. अभ्यासाची, तंत्रज्ञानाची 'गुंतवणूक', जोड त्यांच्या कामात फार कमी दिसते. नसते तात्त्विक वादच फार. लातूर भूकंपात स्वयंसेवी संस्था उघड्या पडल्या. अपवाद अर्थातच आहेत. १००० मुलांची शिक्षणासकट सर्व जबाबदारी घेणारे आहेतच की.

शिक्षणसंस्थाही फारशा उत्साहजनक नाहीत. मागे एका महाविद्यालयात 'अभियांत्रिकीचे सामाजिक पैलू' या विषयावर व्याख्यान दिले. मुले उल्हसित झाली. पण प्राध्यापकगण ढिम्म. आम्ही काय करणार, कसं सांगणार, आठवड्याचे तास... अशी रडगाणी. मी सुचवले की, दर तीन महिन्यांनी झालेल्या अभ्यासाचे सामाजिक संदर्भ सांगावेत. उदा., रस्ते व पूल हा विषय झाला की, 'पायाभूत सोयींची उभारणी व विकास' वर दोन तास घ्यावेत. पण कोण मेहनत घेणार? सर्व शिक्षण संदर्भहीन, पोटार्थी, आत्मकेंद्रित!

विषादाचे व्यावसायिक व सामाजिक क्षणही आले. ठाणे खाडीपूल, मांडवीपूल, चटईक्षेत्राच्या चोऱ्या, कईगा अणुविद्युत केंद्र... अयोध्या आणि नंतर ऑपरेशन ब्लूस्टार–इंदिरा गांधी हत्या आणि नंतरचे दिल्लीतील दंगे, मराठवाड्यातील दंगली, गांधीहत्येनंतरची वावटळ... असे कितीतरी. एका अन्यायाचे परिमार्जन दुसऱ्या अन्यायाने कसे होते? कुटुंबनियोजनासारखा अत्यंत निकडीचा कार्यक्रम 'राष्ट्रीय' का होत नाही? त्यात पक्षीय राजकारण का येते?

अशा वेळी वाटू लागते की, ही स्वातंत्र्याची ५० वर्षे नसून सत्तांतराची ५० वर्षे आहेत. गोरा साहेब गेला त्याच्याजागी काळा साहेब आला. व्यवस्था तीच राहिली. सामान्य माणसाला न्याय मिळणार तो इंग्रजीतून आणि मग वकीलसाहेब तो त्याला त्याच्या मातृभाषेत समजावून सांगणार – १०-२० वर्षांनी, दाद लागली तर!

❖❖



# समाजचळवळीतील सुखदुःखे

**फ्रान्सिस दिब्रिटो**

कॅथलिक धर्मगुरूंचे कार्यक्षेत्र कर्मकांड, पूजाअर्चा ह्यांच्या पलीकडे जात असते. जन्मापासून मृत्यूपर्यंत ख्रिस्ती (कॅथलिक) माणसाला सहा महत्त्वाचे संस्कार स्वीकारावे लागतात. त्यानिमित्ताने धर्मगुरूचा लोकांशी प्रत्यक्ष संबंध येतो. तसेच शिक्षण, आरोग्य, अनाथसेवा ही क्षेत्रे त्याच्या समाजकार्याचा मोठा भाग आहेत.

दीड-दोन हजार लोकवस्तीच्या गावात एखादे कॅथलिक चर्च असते. त्या चर्चमध्ये एक धर्मगुरू असतो. त्याला सर्वजण 'फादर' या नावाने संबोधतात. गावातील प्रत्येक कुटुंबाशी त्याचे पितृवत् संबंध असतात. त्यांच्या सुखदुःखांत तो सहभागी होण्याचा प्रयत्न करतो. त्यांच्या अडीअडचणींत तो त्यांचा मार्गदर्शक बनतो. त्यांच्या भावभावनांचा तो तटस्थ साक्षीदार असतो. थोडक्यात 'सर्वेऽपि सुखिनः सन्तु' ही भूमिका घेऊन तो कार्य करीत असतो.

सर्वजण सुखी असावेत ही सद्भावना चांगली आहे, परंतु प्रत्यक्षात सुख हे सापेक्ष असते. एकाचा आनंद हे दुसऱ्याचे दुःख होऊ शकते. धर्मगुरू झाल्यावर (वयाच्या २९ व्या वर्षी), मी एका चर्चमध्ये कार्य करीत होतो. गावातील तरुण-तरुणींचा माझ्यावर खूप विश्वास होता. श्रीमंत घराण्यातील एक मुलगा आपल्याच परिसरातील एका अनाथ, गरीब आणि सुलक्षणी मुलीच्या प्रेमात पडला होता. त्याच्या आईला आणि भावंडांना ही प्रीत मान्य नव्हती. त्यांनी त्याचा जंग जंग छळ आरंभला.

तिला घेऊन तो माझ्याकडे आला. दोघांचं एकमेकांवर अढळ प्रेम होतं. 'कितीही विरोध झाला तरी तिला वाऱ्यावर सोडणार नाही', असं वचन त्यानं मला दिलं. त्या दोघांच्या पाठीशी उभं राहायचं मी ठरविलं. त्यांना खूप आधार वाटला. मात्र, त्यांच्या प्रीतीला माझा पाठिंबा आहे हे समजताच, त्याच्या सर्व भावंडांनी मला छळायला सुरुवात केली. मला शिवीगाळही केली. एकदा मी त्यांच्या घरी सहज भेटीसाठी गेलो असता, मला अतिशय अपमानास्पद वागणूक मिळाली. मी आखलेल्या कार्यक्रमाला त्यांनी विरोध करायला सुरुवात केली.

तो तरुण त्या मुलीचा नाद सोडीत नाही असं दिसून आल्यावर सर्व भावंडांनी व त्यांच्या आईनं त्याला घरातून बाहेर काढलं. तरीही तो बधला नाही. त्या मुलीबरोबरच त्यानं लग्न केलं. त्यांच्या विवाहविधीला मी जातीनं हजर राहिलो.

अनुक्रमणिका





बंगल्यातून बाहेर काढल्यामुळं, तो तिच्यासह तिच्या माहेरच्या चंद्रमौळी झोपडीत राहू लागला. शेवटी, नशीब काढण्यासाठी तो परदेशी गेला. 'मी परदेशी जातोय, माझ्या पत्नीकडं म्हणजे तुमच्या बहिणीकडं लक्ष द्या', असं निघताना भरल्या डोळ्यांनी त्याने मला सांगितलं. त्यांचा माझ्यावरील विश्वास पाहून मी सद्‌गदित झालो.

चर्चमध्ये कार्य करीत असताना कधी कठीण निर्णय घ्यावे लागतात. दिसायला कुरूप आणि वृत्तीने भांडखोर अशा एका अविवाहित मुलीला माझ्या पूर्वसुरीने केवळ दयाबुद्धीने नाममात्र वेतनावर चर्चमध्ये कामावर ठेवले होते. त्या धर्मगुरूंच्या जागी माझी नेमणूक झाली. कामाचा आवाका वाढत होता आणि या मुलीला हिशेब लिहिणेही जमत नव्हते. तशात, दररोज कुणाशी ना कुणाशी तरी तिचे भांडण होई. लोकांकडूनही तक्रारी येऊ लागल्या. शेवटी, योग्य व्यक्तीचा सल्ला घेऊन तिला कामावरून कमी केले. बस्स. तिने गावभर, अगदी घरोघर जाऊन माझी नालस्ती करण्याचा प्रयत्न केला. काही 'समाजसेवक' तिची बाजू घेऊन भांडायला आले. तिच्या जागी ज्या दुसऱ्या व्यक्तीची नेमणूक केली तिच्या आणि माझ्या-संबंधी वावड्या उडविण्यास तिने कमी केले नाही. अजूनही ती कुठे भेटली तरी मान वर करून माझ्याकडे पाहात नाही. माझ्यासंबंधी लोकांना खोटंनाटं सांगत फिरते.

कधी कधी संस्थेच्या हिताचे, परंतु व्यक्तींना अप्रिय वाटणारे निर्णय घ्यावे लागतात. धर्मगुरू हा केवळ प्राचार्य, केंद्राधिकारी, शिक्षक नसतो, तर तो 'फादर' असतो. या दुहेरी भूमिकेमुळे त्याला अधिक भोगावे लागते.

### कुंपणाबाहेर

सन १९८६ ची गोष्ट. गिरीज या वसईतील गावात मी कार्य करीत होतो. संपूर्ण तालुकाभरचे रस्ते उखडले होते. सार्वजनिक दळणवळणाचा एकमेव आधार असलेली एस.टी.ची सेवा कोलमडून पडली होती. विजेचा सावळा गोंधळ कळसाला पोहोचला होता. स्थानिक आमदार प्रयत्नशील होते. परंतु त्यांचे प्रयत्न अपुरे पडत होते.

"एस.टी. बससाठी चाळीस ते पन्नास मिनिटे रखडत उभे राहावे लागते. लोकप्रतिनिधी म्हणून आपण काही करू शकता का?" असा प्रश्न आमदारांना विचारला असता त्यांनी उत्तर दिले, "मी कारमधून फिरतो म्हणून मला एस.टी. प्रवासाची माहिती नाही." चारचौघांना घेऊन एस.टी. अधिकाऱ्यांकडे गेलो. त्यांनी थातुरमातुर उत्तर दिले. तहसीलदाराची भेट मिळूच शकली नाही.

लोकांचे हाल कुत्रा खात नव्हता. सर्व अधिकारी रोमन सम्राट निरोचे वंशज निघाले होते. गिरीज चर्चमध्ये माझे मित्र फादर रेमंड होते. ते नवीन विचाराचे होते. "सामाजिक सुविधा नसल्यामुळे लोकांचे हाल होत असताना आपण फक्त प्रार्थनाच करणार का?" असा प्रश्न मी त्यांना केला.

"काय करता येईल?" त्यांनी विचारले.

"लोकशक्ती जागृत करणे आवश्यक आहे. अधिकाऱ्यांनी झोपेचे सोंग घेतले आहे. एकट्यादुकट्याला ते दाद देत नाहीत. आपल्या मागण्यांसाठी आपण रस्त्यावर का उतरू नये?" मी त्यांना सांगितले. त्यांना ते पटले.

गावागावांतून प्रचारसभा घेतल्या. एक समिती स्थापन केली आणि मोर्चाची हाक दिली.

मोर्चा निघणार ही बातमी वर्तमानपत्रांत झळकताच अधिकाऱ्यांकडून फोन येऊ लागले. "तुम्ही मोर्चा काढू नका; आपण बसून बोलूया." ते सांगू लागले. समितीचा त्यांच्या आश्वासनावर विश्वास नव्हता. ठरल्याप्रमाणे मोर्चा निघाला. चांगला प्रतिसाद मिळाला. अधिकारी खडबडून जागे झाले. परिस्थितीत सुधारणा झाली.

आपण संघटित झालो तर आपले प्रश्न आपण सोडवू शकतो, हा विचार लोकांना देता आला हा माझा मोठा आनंद होता. एकट्यादुकट्या व्यक्तीला कुठलाही सरकारी अधिकारी भीक घालीत नाही, मात्र समाज संघटित झाला तर पुष्कळशी कामे होऊ शकतात, हा माझा अनुभव आहे. "सामर्थ्य आहे चळवळीचे" ह्या समर्थांचा उपदेश मला पूर्णपणे पटलेला आहे.

### माफियाविरुद्ध लढा

सन १९८० ते ९० या दशकात वसईला अक्षरशः मोगलाई अवतरली होती. मुंबईतील वाढत्या लोकसंख्येचा लोंढा वसई-विरार विभागाकडे ढकलला जात होता. जमिनीचे भाव आकाशाला भिडत होते. राजकीय पक्षांचे अनेक पुढारी जमीन-खरेदी व्यवहारांत गुंतले होते. महाराष्ट्रातील एका बड्या नेत्याने मोठ्या खुबीने वसईतील हिरव्या पट्ट्यातील २५००० एकर जमीन घरबांधणीसाठी मोकळी केली होती. जमीन-खरेदीसाठी बड्या बिल्डरांची व राजकीय नेत्यांची झुंबड उडाली होती. याच वेळी ठाकूरबंधूंचा उदय झाला. आपल्या

प्रचंड दहशतीने त्यांनी लोकांत दरारा निर्माण केला होता. जमीनखरेदीची सर्व मक्तेदारी त्यांनी घेतली. राजकीय नेते व वडे बिल्डर्स त्यांचे मिंधे झाले. त्यांच्या ओंजळीने पाणी पिऊ लागले. पोलीसयंत्रणा माफियाने आपल्या खिशात कोंवली. दिवसाढवळ्या मुडदे पडत होते, सामान्य माणसांवर पाशवी हल्ले होत होते. गरिबांची जमीन लुवाडली जात होती. शेतकऱ्यांच्या विहिरीतून पाण्याचा उपसा करून क्रॉंक्रिटचे जंगल उभारले जात होते. त्यामुळे शेती ओस पडू लागली होती व अनेक ठिकाणी विहिरी कोरड्या पडून पिण्याच्या पाण्याचे दुर्भिक्ष्य निर्माण झाले होते.

सारेच दीप मंदावले होते. 'तुका म्हणे उगी राहावे, जे जे होईल ते ते पाहावे', अशी भूमिका ज्येष्ठ आणि श्रेष्ठ नेत्यांनी घेतली. माझा अंतरात्मा मला शांत वसू देत नव्हता. मरण आले तरी हरकत नाही; परंतु या पाशवी शक्तीला आव्हान दिलेच पाहिजे, असं माझं मन मला सांगू लागलं. आम्ही मूठभर समविचारी कार्यकर्ते एकत्र आलो आणि 'हरित वसई संरक्षण समिती'ची स्थापना केली.

लोकजागृती करण्यासाठी गावोगावी सभा घेण्याचा सपाटा चालू केला. दवलेल्या आवाजांना व्यासपीठ मिळू लागलं. लोक सभांना येऊ लागले. आमच्या विचारांना पाठिंवा देऊ लागले. १ ऑक्टोवर १९८९ रोजी आम्ही जाहीर मोर्चा काढण्याचे ठरविले.

माफियाविरुद्ध ब्र काढण्याची कुणाची टाप नव्हती. आता तर मोर्चा निघणार होता! माफियाच्या नाकाला मिरच्या झोंवल्या. त्याने सर्व पक्षांतील आपल्या ताटाखालच्या मांजरांना एकत्र केले आणि आमच्याविरुद्ध आघाडी उघडली. आम्हाला खुनाच्या धमक्या येऊ लागल्या. आमच्याविरुद्ध पत्रकांचा पाऊस पडू लागला. मी ख्रिस्ती धर्मगुरू असल्यामुळे, ख्रिस्ती वस्त्यांवर आणि संस्थांवर हल्ले केले जातील, असा प्रचार सुरू झाला. अपप्रचारासाठी एका स्थानिक वृत्तपत्राचा वापर करण्यात आला. माझ्याच समाजातील काही नेत्यांना माझ्याविरुद्ध राळ उठविण्यासाठी वापरण्यात आले. 'मोर्चामध्ये प्रचंड रक्तपात होणार आहे, लालवागच्या गुंडांना सुपारी देण्यात आली आहे', अशा वावड्या उडविण्यात आल्या. माझ्या उच्च अधिकाऱ्यांना अतिशयोक्तिपूर्ण रिपोर्ट पाठविण्याची जवावदारी माझ्याच एका सहकाऱ्याने घेतली.

दवावतंत्राचा आमच्यावर परिणाम झाला नाही. आम्ही ठरल्याप्रमाणे मोर्चा काढला. श्री. विजय तेंडुलकर प्रमुख वक्ते म्हणून हजर राहिले. मुंबईतील वर्तमानपत्रांनी चांगली साथ दिली. पुन्हा एकदा लोकशक्तीचा विजय झाला. माफियाला संदेश मिळाला. परंतु, तो शांत वसला नाही. आम्हीही चळवळ चालूच ठेवली.

तरुणांना आणि पुरुषांना मारहाण होते म्हणून आम्ही 'पाणी वचाव महिला आंदोलना'ची स्थापना केली. दहशतीने शेतकऱ्यांच्या विहिरीतून पाणी काढून नेणारे पाण्याचे टँकर्स अडविण्याचे आंदोलन सुरू झाले. नेतृत्व महिलांकडे दिले. माफिया अधिकच चवताळला. आंदोलन करणाऱ्या ३२ महिलांवर माफियाच्या गुंडांनी सशस्त्र हल्ला केला. मला धडा शिकविण्यासाठी ख्रिस्ती लोकांवर संघटित हल्ले करण्याचे सत्र आरंभले. ठाणे जिल्ह्याचे एस.पी. ठाकुरांच्या वंगल्यावर पार्ट्या झोडीत वसले. सुदैवाने, त्यावेळचे जिल्हाधिकारी श्री. शांताराम सगणे आमच्या वाजूने उभे राहिले.

लोकांवर व विशेषतः स्त्रियांवर भ्याड हल्ले झाल्यामुळे तरुण पेटून उठले. त्यांनी प्रतिहल्ल्याची तयारी केली. मात्र ते समजताच मी धावत निर्मळ येथे गेलो. हजारभर संतप्त युवकांचा तो जमाव होता. "तुम्ही प्रथम घरी जा. सर्व परिस्थिती मी हाताळतो", अशी त्यांना हात जोडून विनंती केली. त्यांनी माझे ऐकले व त्यामुळे एक मोठा अनर्थ टळला. हा माझा मोठा आनंद होता.

पर्यावरणसंरक्षण, किनारा वचाव, आदिवासींचे हक्करक्षण, स्त्री-अत्याचारविरोध अशा अनेक प्रश्नांवर हरित वसई समिती सातत्याने आंदोलने छेडीत आहे. कार्यकर्त्यांना विश्वासात घेऊन कार्यक्रम आखले जातात. त्यामुळे अनेकांचा संघटनेवर विश्वास आहे.

राजकारण हा समाजजीवनाचा महत्त्वाचा भाग आहे. परंतु अनेकदा पक्षीय राजकारणामुळे स्वयंसेवी संघटनेपुढे काही अडचणी निर्माण होतात. राजकारण करून निवडणुकीच्या माध्यमातून आपले उद्दिष्ट साकार करावे, अशी मांडणी काही विचारवंत करतात. त्या मानसिकतेपर्यंत सर्व कार्यकर्ते पोहोचले नसल्याने निवडणुकांच्या राजकारणापासून आमची संघटना अलिप्त राहते. तर, सर्व स्वयंसेवी संघटना ह्या डाव्या पक्षाच्या वटीक आहेत, अशी समजूत त्यांच्या काही नेत्यांनी करून घेतली आहे. त्यांना निवडणुकांच्या वेळी संघटना घाऊक पाठिंवा देत नसल्यामुळे, त्यांचा रोप आम्हाला पत्करावा लागला आहे. कधीकधी उजव्यांपेक्षा डाव्या नेत्यांकडून संघटनेला अधिक उपद्रव पोहोचतो ही दुःखाची गोष्ट आहे.









कधीकधी थोड्याशा आर्थिक लाभासाठी कार्यकर्ते शत्रूला जाऊन मिळतात, वारांगनेप्रमाणे निष्ठा बदलतात. त्यामुळे खूप वेदना होतात. कधी मित्रांच्या मत्सराला तोंड द्यावे लागते. अनेक पत्रकारांनी संघटनेला सहकार्य केलं आहे. परंतु, एका मोठ्या वर्तमानपत्रात काम करणारा एक पत्रकार, संघटनेच्या जन्मापासून तिच्या मागे हात धुऊन लागला आहे. 'हरित वसई समितीत फूट' अशी चक्क खोटी बातमी त्याने एकदा छापून आणली. संघटनेसंबंधीच्या बातम्यांना आपल्या वर्तमानपत्रात प्रसिद्धी मिळणार नाही ह्याकडे त्याचे लक्ष असते. संघटनेचा द्वेष करणाऱ्या चार-पाच जणांचे टोळके एकदा मुंबईतील सर्व वर्तमानपत्रांच्या कार्यालयामध्ये जाऊन आले. हरित वसई समितीची बदनामी करणे हा एकच कार्यक्रम त्यांच्यासमोर आहे!

समाजातील तथाकथित विचारवंत उपदेशाचे डोस पाजतात, परंतु प्रत्यक्ष लढ्यात उतरत नाहीत. त्या मानाने सामान्य कार्यकर्त्यांची निष्ठा वाखाणण्यासारखी आहे. सकाळ-संध्याकाळ माफियांच्या दारासमोरून जावे लागते, तरीदेखील हरित वसई संघटनेचे निशाण उघडपणे खांद्यावर घेतलेले कार्यकर्ते संघटनेत आहेत. असे हे मर्द मावळे हीच खरी संघटनेची ताकद आहे. अशा कार्यकर्त्यांबरोबर कार्य करण्याची संधी मिळाली हा मला जीवनातला फार मोठा भाग्ययोग वाटतो.

### आंदोलन – एक लढाई

आंदोलन ही एक लढाई असते. रणांगणात उतरल्यावर वार स्वीकारण्याची तयारी ठेवावी लागते. दहशतवाद्यांविरुद्ध दंड थोपटताना ही तयारी आम्ही ठेवली होती. वास्तविक आम्ही जिवावर उदार झालो होतो.

पोलिसांनी संरक्षण देण्याची तयारी दाखविली तेव्हा मी त्यांना सांगितले, "मला एकट्याला संरक्षण नकोय. प्रथम लोकांना संरक्षण द्या." संरक्षणाविना आम्ही तालुकाभर हिंडत होतो. माधवराव गडकरी मला प्रेमाने सांगायचे, "एकटादुकटा फिरू नकोस. काळजी घे."

आमच्या पाठीशी मुंबईचे ज्येष्ठ पत्रकार व लेखक उभे होते ह्याची जाणीव माफियाला होती. त्याने कुणाला तरी सांगितलं, "या फादरला गोळ्या घालणं आपल्याला अडचणीचं आहे. त्याच्या पाठीची लेखक, पत्रकार आहेत."

शस्त्राचा वापर करता येत नव्हता म्हणून त्याने बदनामीची मोहीम आखली. एका पीत-पत्रकाराला हाताशी धरलं. त्या पत्रकाराने माझ्या निकटच्या चार-सहाजणांशी संधान बांधलं. माझी बदनामी करणारा, माझ्यावर चिखलफेक करणारा, एक विशेषांक त्यांनी प्रसिद्ध केला. त्यातील काही लेख माझ्या परिचयातील लोकांनीच लिहिले होते. माझी छायाचित्रे त्यांनीच पुरविली होती. त्या अंकाचे तालुकाभर मुक्त वाटप करण्यात आलं. माझा मत्सर करणाऱ्या ज्या माझ्या मित्रानं त्यात निनावी लेख लिहिला होता, तो त्या दिवशी संपूर्ण तालुकाभर फिरून लोकमताचा अदमास घेत होता. रात्री १०.३० वाजता तो माझ्या भेटीलाही आला! बिचाऱ्याचं मन त्याला खात असावं. मी काहीच बोललो नाही.

लोकांना त्याचा संशय आला तेव्हा, बायबलावर हात ठेवून, 'तो मी नव्हेच' असं तो सांगत सुटला.

टीका, निंदेची मला सवय झाली होती. परंतु, मला बदनाम करण्यासाठी एका निष्पाप मुलीचा माझ्याशी संबंध जोडण्याचा प्रयत्न एका लेखात करून, बिचारीला जीवनातून उठविण्याचा प्रयत्न परीटघडीचे कपडे वापरणाऱ्या एका माणसानं केला ह्याचं अधिक वाईट वाटलं.

सिडकोच्या विध्वंसकारी आराखड्याविरुद्ध आम्ही चळवळ उभी केली. खेडेन् खेडे पिंजून काढले. वातावरण तापू लागले. लोकांचा चळवळीला भरपूर पाठिंबा मिळू लागला.

काही राजकीय पक्षांचे धाबे दणाणले. शेवटच्या टप्प्यात सर्व चळवळ हाती घेऊन, निवडणुकीनिमित्त त्यांना श्रेय लाटायचे होते. एका समाजवादी नेत्याने भाजपच्या एका नेत्याला बोलावून सांगितले, "एक धर्मगुरू चळवळीचं नेतृत्व करीत आहे. तुम्ही काय करता?" (हे त्या भाजप कार्यकर्त्याने स्वतः मला येऊन सांगितले. खासदार राम नाईक ह्यांच्याशी माझे मैत्रीचे संबंध असल्याचे त्या भाजप कार्यकर्त्याला माहीत आहे.)

चळवळीची सूत्रे आमच्या हातून काढून घेऊन, तापलेल्या वातावरणाच्या तव्यावर पक्षीय स्वार्थाची पोळी भाजण्याचा प्रयत्न राजकीय पक्षांच्या काही कार्यकर्त्यांनी केला. माझा मत्सर करणाऱ्या मित्राने त्यात पुढाकार घेतला.

"तुमच्या मागण्या लेखी लिहून द्या, आमच्या आणि तुमच्या मागण्या जुळत असतील, तर आमची सहकार्याची तयारी आहे", असा प्रस्ताव आम्ही मांडला. त्यांनी तो प्रस्ताव अमान्य केला. त्यांना श्रेय हवे होते. त्यांनी निराळ्या मोर्चाची भाषा सुरू केली. आम्ही त्याला पाठिंबा दर्शविला. त्यांचा

निपाणीला महाबुबसुबहानीचा दर्गा आहे. गल्लीतील कोणी निपाणीस दर्ग्याला गेला की गोरीच्या घरी जाऊन येत.

'आम्ही गोरीला भेटायला गेलो तर तिच्या सासूने आम्हाला घरात घेतले नाही. गोरी बिड्या बांधते. घरात सोळा लोक आहेत, त्या सर्वांचे जेवण बनविण्याचे काम एकट्या गोरीला करावे लागते.' अशा नाना बातम्या येत.

एकदा एक बातमी आली, नवऱ्याने गोरीला मारले. तलाकचा कागद लिहून देऊन तिला मध्यरात्री घराबाहेर काढले.

आम्ही घरातील सर्वजण अस्वस्थ होत असू. तिला यातून सोडविण्यासाठी काय करावे? हा प्रश्न मला पडलेला असायचा.

एकदा मी वर्गातील मित्रांना घेऊन निपाणीस जाऊन गोरीच्या नवऱ्याला ताकीद देऊन आलो. आम्ही हा प्रवास सायकलने केला होता.

त्या माझ्या कृतीने गोरीला फार आधार वाटला होता.

पुढे चालून मोहल्ल्यातल्या अनेक तरुणींना असेच जीवन जगावे लागते, हे कळू लागले.

तलाक घेऊन परत आलेल्या मुली आमच्या मोहल्ल्यात आहेत हे दिसू लागले, आणि त्या स्त्रियांसाठी काहीतरी करावे असे वाटू लागले. त्या जाणिवेतून पुढे हमीद दलवाईंशी संपर्क आला व मी मुस्लिम सत्यशोधक मंडळाचा कार्यकर्ता झालो. १९७१ ते ८० अशी तब्बल दहा वर्षे मी मंडळाचा पूर्णवेळ कार्यकर्ता होतो.

हे काम करीत असताना आमच्या समाजाची स्त्रीबद्दलची अनुदार वृत्ती पाहून मी अनेक वेळा मनात खजील झालो आहे.

२२ मार्च १९७० रोजी पुण्यात 'मुस्लिम सत्यशोधक मंडळा'ची स्थापना मरहूम हमीद दलवाई यांच्या पुढाकाराने झाली.

धर्मचिकित्सा व धर्मसुधारणा हा उद्देश या संघटनेचा असला तरी नंतरच्या काळात मुस्लिम महिलांच्या प्रश्नावर या चळवळीने आपले लक्ष केंद्रित केले.

मुसलमानांना चिकित्सावादी बनविणे, शिवाय धर्मनिरपेक्ष प्रवाहात त्यांना आणणे, मुस्लिम स्त्रीची दयनीय अवस्था आणि दर्जा सुधारण्यासाठी योग्य त्या कायद्याची मागणी करणे, त्यासाठी परिषदा घेणे, मोर्चे काढणे, शिबिरे घेऊन जागृती करणे अशी या चळवळीची वाटचाल झाली.

१९८५ साली शाहबानो पोटगी खटल्याचा निकाल लागला. सुप्रीम कोर्टाने घटस्फोटित मुस्लिम स्त्रीस तिच्या पतीने तिच्या हयातीपर्यंत पोटगी दिली पाहिजे असा ऐतिहासिक निकाल दिला. या निकालाने आमच्या धर्मात हस्तक्षेप झाला अशी ओरड मूलतत्त्ववादी मुस्लिम संघटनांनी सुरू केली व ठिकठिकाणी या निकालाविरुद्ध मोर्चे संघटित केले. तेव्हा, मुस्लिम स्त्रियांना वरदान ठरणारा हा निकाल कायम राहिला पाहिजे; तसेच तोंडी तलाक कायद्याने बंद करा, द्विभार्याप्रतिबंधक कायदा मुस्लिमांना लागू करा या मागण्या घेऊन 'तलाक मुक्ती मोर्चा' कोल्हापूर ते नागपूर असा १२ जिल्ह्यांत सलग १५ दिवस फिरला (३ नोव्हें. १९८५ ते १८ नोव्हें. १९८५). पुढे १९८६ मध्ये दिल्लीस जाऊन पंतप्रधान राजीव गांधी व राष्ट्रपती झैलसिंग यांना निवेदन देण्यात आले. परंतु त्याचा उपयोग झाला नाही व शाहबानो केसप्रकरणी झालेला निकाल रद्द करणारे 'मुस्लिम महिला विधेयक' १९८६ साली राजीव गांधीं शासनाने संसदेत मंजूर केले. या विधेयकाने घटस्फोटित मुस्लिम स्त्रीचा पोटगीचा अधिकार रद्द झाला व मुस्लिम सत्यशोधक मंडळाची चळवळही पन्नास वर्षे मागे गेली.

१९८७ साली ही चळवळ राष्ट्रीय पातळीवर नेण्यासाठी ऑल इंडिया प्रोग्रेसिव्ह मुस्लिम कॉन्फरन्सची स्थापना कोल्हापुरात परिषद घेऊन केली. त्यानंतर गुजरात, आंध्रप्रदेश, तामिळनाडू, कर्नाटक, दिल्ली इत्यादी ठिकाणी परिषदा होत राहिल्या.

अगदी अलीकडे १० एप्रिल १९९७ रोजी मुंबई येथे विधान भवनावर पाचशे मुस्लिम महिलांचा मोर्चा काढून मुख्यमंत्र्यांना निवेदन देण्यात आले की, तोंडी तलाक कायद्याने बंद करा व भारतीय दंड संहिता कलम १२५ मुस्लिमांना पुन्हा लागू करा. हा लढा चालूच ठेवावा लागणार आहे.

स्वातंत्र्यानंतर 'मुस्लिम सत्यशोधक मंडळ' असे नाव घेऊन ही चळवळ सुरू करावी लागली. याचे कारण सांगताना, मुस्लिम समाजातील प्रबोधनाची दरी भरून निघेपर्यंत हे मंडळ मुस्लिम या नावाखाली काम करेल व पुढील काळात या भिंती गळून पडतील व व्यापक चळवळीत ते समाविष्ट होईल, अशी आशा मंडळाच्या जाहीरनाम्यात व्यक्त केली आहे.

आज पंचवीस वर्षांनंतर मात्र जातीय व धार्मिक भिंती गळून पडण्याऐवजी अधिक दृढ होताना दिसतात; इतकेच नव्हे, त्यात अधिक कप्पे निर्माण होताना दिसत आहेत.

फाळणीची घटना ताजी होती व स्वातंत्र्यापूर्वी आणि नंतर झालेल्या जातीय दंगलीच्या जखमा पुरत्या बुजलेल्या नव्हत्या, त्या काळात आमच्या स्वधर्मीयांविषयी अनुकूल मत






होईल अशा प्रकारे त्यांचे चित्रण करण्याची आपल्यावर जबाबदारी आहे, या भावनेच्या दडपणाखाली भारतातील विचारवंत होते, असे चित्र दिसते.

आपल्या स्वतःच्या समाजाचा इतिहास आणि संस्कृती यांचा चिकित्सक अभ्यास करण्यासाठी लागणारे वस्तुनिष्ठ आणि नैतिक धैर्य फारच थोड्या मुसलमानांनी दाखवले आहे.

मुस्लिम विचारवंत असे वागत असतानाच सत्ताधारी काँग्रेस पक्षानेही पाकिस्तानात न गेलेले मुसलमान व त्यांचे पुढारी हे आपले मित्र आहेत, त्यांना फाळणीमुळे दुखावलेल्या हिंदूंपासून संरक्षण दिले पाहिजे असे गृहीत धरले. 'आम्ही तुमची भाषा, धर्म यांचे संरक्षण करू', या आश्वासनाने काँग्रेस पक्षाने मुस्लिमांचा पाठिंबा मिळवला. मुसलमान हे धार्मिक व सांस्कृतिक अल्पसंख्य असून आम्ही लोकशाहीवादी त्यांचे रक्षणकर्ते आहोत अशी भूमिका काँग्रेसने घेतली.

मुसलमानांना या देशात दुय्यम नागरिक म्हणून वागवितात, त्यांना सरकारी नोकऱ्यांत घेत नाहीत, ७ ते ८ राज्यांत उर्दूला राज्यभाषेचा दर्जा दिला पाहिजे, असे मुस्लिम जातीयवाद्यांचे म्हणणे आहे, व त्यांच्या म्हणण्याला कम्युनिस्टांनी सतत पाठिंबा दिला आहे.

परंतु शाहबानो केसप्रकरणी कोर्टाचा निकाल रद्द करणाऱ्या मुस्लिम महिला विधेयकाला त्यांनी कसून विरोध केला आहे.

समाजवादी पक्ष व मंडळींनी मुस्लिम समाजाला आधुनिक व सेक्युलर बनविण्याच्या चळवळीला पाठिंबा दिला. सुरुवातीस त्यांनी समान नागरी कायद्याचा प्रश्न उचलून धरला. तरी सय्यद शहाबुद्दीन हे जातीयवादी भूमिका घेणारे खासदार त्या पक्षात आहेत.

भारतीय जनता पार्टीने मुस्लिमद्वेष हाच आपला मुख्य मुद्दा ठेवला. समाजाला खोल गर्तेत नेणारा प्रश्न म्हणजे अंधश्रद्धा. या अंधश्रद्धेला खतपाणी घालून राममंदिराचा प्रश्न राजकारणासाठी वापरला व संसदेत आपली ताकद वाढवली.

राजीव गांधींनी मुसलमानांना खुश करण्यासाठी शाहबानो पोटगी केस निकाल रद्द करणारे मुस्लिम महिला विधेयक मंजूर करून मुस्लिम व्होट बँक निर्माण करण्याचा प्रयत्न केला. यामुळे हिंदू नाराज झाले. म्हणून राममंदिराचे दरवाजे उघडले. परंतु याचा फायदा काँग्रेसला न होता भाजपा व हिंदुत्ववादी संघटनांना झाला. त्यांनी हिंदू जातीयवादाचा कळस गाठला व बाबरी मशीद उद्ध्वस्त केली. ही त्यांची कृती म्हणजे उच्च न्यायालयाचा विश्वासघात होता. शिवाय घटनेवरही हल्ला होता.

यातूनच पुढे मुंबईत बॉम्बस्फोट झाले व हेच उत्तर बरोबर आहे असे मुसलमानांना वाटू लागले. ही काळजीची बाब आहे.

मुसलमानांना हा जबरदस्त धक्का बसला आहे. परंतु त्यांनी इतिहासात डोकावून पाहिल्यास त्यांना दुःख होणार नाही. स्वातंत्र्यानंतर सत्ताधारी पक्ष व समाजवादी, सर्वोदयवादी राष्ट्रीय एकात्मतेचा धोशा लावत होते व मुसलमान त्यापासून लांब असत. आता राष्ट्रीय एकात्मतेची मागणी मुसलमान करू लागतील. आक्रमक हिंदुत्ववादाने ही अवस्था निर्माण केली आहे.

मी १९६५ च्या दरम्यान कारखान्यात नोकरी करत असताना कर्नाटकात जाऊन ऑइल इंजिनास लागणारे स्पेअर पार्ट जोडधंदा म्हणून विकत असे. नंतर जरा जम बसतो असे वाटत असताना व्हिजिटिंग कार्ड्स छापून घेतली होती. तेव्हा 'हिंदवी स्पेअर्स' असे नाव जाणीवपूर्वक ठेवले होते. त्या वेळी आपण मुसलमान आहोत हे समोर येऊ नये किंवा मुसलमान आहोत म्हणून असे नाव ठेवणे गरजेचे आहे असे मनाला वाटले होते. हा कोणता दबाव मनावर होता? आजही अशा दबावाचा रेटा वाढतो आहे व आपली कोंडी होते आहे, असे मुसलमानांना वाटत आहे, ही वस्तुस्थिती आहे.

राजकारणासाठी, राजकीय सत्ता मिळविण्यासाठी जातीय दंगली घडवल्या जातात तेव्हा स्वातंत्र्यावरचा विश्वास उडू लागतो. आणि यातून मार्ग न सापडल्याने स्वतःचे रक्षण करण्यासाठी घरात काठ्या, कुऱ्हाडी जमा करून ठेवाव्या लागतात अशी परिस्थिती सांगणाऱ्या सोलापूरकडील मुसलमानांची मानसिकता कशी बनली आहे हे समजते.

महाराष्ट्रातच काय पण उत्तरप्रदेशात आम्ही दंगलीची पाहणी करायला १९७८ साली अलिगढ येथे गेलो होतो. तेथे धर्मातीत नेतृत्व तेव्हाच संपुष्टात आले होते. दंगली थांबाव्यात म्हणून काय उपाय योजावेत असे मुस्लिमांना विचारल्यावर, 'तशा दंगली थांबणार नाहीत, तुम्ही फक्त आमच्या गल्लीच्या सुरुवातीस लोखंडी फाटक बसवून द्या', अशी मागणी त्यांनी केली होती.

बाबरी मशीद हिंदुत्ववाद्यांनी उद्ध्वस्त केल्यावर आता महाराष्ट्रातही मुसलमान आपल्या वेगळ्या वस्त्या वसवू लागलेत.

आणि हिंदू? मी एका गृहनिर्माण संस्थेत प्लॉट घ्यायला गेलो तेव्हा मी मुसलमान आहे, तेव्हा प्लॉट द्यावा की नाही अशी मीटिंगमध्ये चर्चा झाली. नंतर मी मुस्लिम सत्यशोधक आहे अशी माझी ओळख माझ्या मित्रांनी करून दिल्यावर मला प्लॉट देण्यात आला.

या व्यवस्थेला उत्तर सापडत नाही म्हणून स्वतःला तबलीगसारख्या मूलतत्त्ववादी संघटनेच्या कामाशी मुस्लिम तरुण स्वतःला जोडून घेतो व स्वर्ग मिळविण्यासाठी पाच वेळची नमाज पढणे हेच त्याचं जीवन बनून जातं, तेव्हा या समाजाचा वाली कोणी असूच शकत नाही असे विचार मनात येतात. परंतु नवीन पिढीबद्दल आशा आहे. या परिस्थितीच्या माऱ्यापुढे ती नवीन उत्तरे शोधते आहे.

नाहीतरी असेच होत असते. जेव्हा सर्व मार्ग खुंटलेले असतात तेव्हाच नवीन मार्ग शोधले जातात.





# गेल्या पन्नास वर्षांत

**प्रभा श्रीनिवास**

महायुद्ध, अमानुष अनावर संहार. नाझी – हिटलर – छळछावण्या – योजनाबद्ध क्रौर्य. जगभर स्वातंत्र्य, समता, बंधुता, साऱ्यांचा निर्घृण चक्काचूर. मग येते पर्ल हार्बर आणि त्या गुन्ह्याला बेसुमार शिक्षा — अणुबॉम्ब. विज्ञानाचे विश्वसंहारक रूप. संहारानंतरचा सन्नाटा आणि त्यात स्वातंत्र्याच्या वाटाघाटी. सर्वांच्याच मनाचे दोर ताणलेले. आदर्शवाद-व्यवहारवाद यांचा सुवर्णमध्य – फाळणी. या पार्श्वभूमीवर होतो भारतीय स्वातंत्र्याचा जन्म. १४-८-४७ मध्यरात्र.

१४-८-४७ च्या मध्यरात्री नवी कोरी पाटी सुरू झाली आणि १५-८-९७ ला ती भरली असे काही म्हणता यायचे नाही. तसं काही म्हणायचं तर जयप्रकाशांच्या 'नवनिर्माण'शी पहिला टप्पा आणि मनमोहनसिंगांच्या नवीन आर्थिक धोरणाशी दुसरा टप्पा संपला, असे म्हणता येईल. पण अशा खुंट्या ठोकता येतात का? कमीअधिक गतीने पण सतत बदलत असलेले आणि विविध धारांच्या विषम गतींमुळे गुंतागुंतीचे बनलेले समाजजीवन वर्तमानक्षणी पकडणे फारच धाष्टर्याचे होईल. तेव्हा आयुष्याचे बहुतांश दिवस मागे पडल्यावर काहीतरी सांगावेसेही वाटते, तेवढ्यापुरताच हा प्रपंच.

पन्नास वर्षांपूर्वी वातावरणात जल्लोष होता, कृतकृत्यतेचा विश्वास होता, अस्वस्थताही होती. पण ती प्रेरक अस्वस्थता होती. काम करणाऱ्यांना आपल्याला काय करायचे त्याचा साधारण अंदाज होता. पुढे पवित्रे चुकले असतील, दिशाभूल झाली असेल. ढेपाळले असतील. पण त्या क्षणी ते उत्सुक होते. आजवर काठावर उभे असलेले अतिडावे आणि अति-उजवे, तेही सक्रिय झाले. दोघांचीही हुकुमशाहीवर श्रद्धा होती. एकाला श्रमिकांची तर दुसऱ्याला हिंदुधर्मिकांची. दोघांचीही हिंसेवर भिस्त होती. एकाने तेलंगणासारखे उठाव, दुसऱ्याने गांधीजींचा खून. या संघटित हिंसाचाराच्या जोडीला निर्वासितांचा, संकटात लोटलेल्यांचा उत्स्फूर्त हिंसाचार होताच. स्वातंत्र्याच्या या रक्तरंजित प्रभातकाली तरीही नव्या जीवनाच्या आशेमुळे माणुसकीचा मुडदा पडला नाही. जागोजागी लोकांचे अश्रू पुसायला, लोकांना आवरायला कार्यकर्ते उभे राहिले. सुसंस्कृतपणे राजकारण पुढे सरकत राहिले.

स्वातंत्र्यानंतर राजसत्ता स्वतःला कल्याणकारी म्हणवू लागली, लोकशाही म्हणवू लागली. सरकारने विकासाचे व्यवस्थापन करावयाचे आहे, न्यायाचे रक्षण करावयाचे आहे, पीडितांचे दुःखनिवारण करावयाचे आहे; एकंदरीत सुखसमृद्धी-सुबत्ता आणायची आहे आणि लोकांकडे सुपूर्द करायची आहे, अशी एक ढोबळ कल्पना होती. समाजवाद, अंत्योदय अशा समाज उलटापालटा करू पाहणाऱ्या कल्पनाही होत्या. पण ही सर्व क्रांतीही सरकारनेच करावयाची होती. लोकांनी फक्त पंगतीत बसायचे होते.

या कल्पना फारच कमी प्रमाणात प्रत्यक्षात आल्या. नागरिक व शासन असे साक्षात नाते बनण्याची प्रक्रिया सुरू









झाली नाही. माणूस प्रथम कुटुंबाचा नंतर जातिजमातीचा, धर्मगटाचा, वर्गाचा आणि अखेर देशाचा. नागरिक-सामाजिक गठबंधनाचे हे स्वरूप फारच थोडे व थोड्यांकरिता बदलले. राजसत्तेवर दंडशक्तीचा प्रभाव होताच. पोलिसकोठडी, कारागृहे, फाशीसारख्या शिक्षा यांसारख्या हिंसाधिष्ठित परंपरा जराही खंडित झाल्या नाहीत. गुन्हेगारीसंबंधी मौलिक नवा विचार सरकारलाच काय, लोकांनाही स्फुरला नाही. सज्जन माणसे कंठरवाने मुर्दाबादचे नारे लावीत रस्त्याने हिंडत. भागलपुरला कैद्यांना सळ्या खुपसून अंधळे करण्यात आले. गावोगावी लोक हातात कायदा घेऊन गाजलेल्या गुन्हेगाराला अशाच अघोरी शिक्षा करतात. गुन्हेगारी प्रवृत्ती, गुन्हेगारांत स्थिरावणारे क्रौर्य, सर्वांच्याच पोटांत साठणारी हिंसा, नंतर हिंसक प्रवृत्तीचे उदात्तीकरण करून रॉबिनहूडचा मुखवटा वा गांधीटोपी चढवून राजकारणी बनणे ही प्रक्रिया एका बाजूला दिसते; तर, राजकीय तत्त्वज्ञानातून हेतुपूर्वक कटकारस्थानात्मक चळवळी उभ्या होणे, 'बंदुकीच्या जोरावर क्रांती' तत्त्वज्ञानाच्या जुन्या संदर्भांना उजाळे देत लोकमानसात हिंसक राजकारणाबद्दल दहशत, दरारा आणि आपुलकी निर्माण करणे ही प्रक्रिया दुसऱ्या बाजूला दिसते. अगदी व्यक्तिगत हिंसेचे राजकारणही स्वातंत्र्योत्तर काळात निर्माण वा प्रस्थापित झालेले नाही; रँडचा खून करणाऱ्या चाफेकरांसारख्या 'क्रांतिकारका'पासूनच ते या भूमीत होते. राजसत्ता जेव्हा लोकांच्या ऐवजी गटांच्या, विशिष्ट राजकीय पक्षांच्या मालकीची बनली तेव्हा सर्व नागरिकांच्या व्यवहारांचे समभावाने व्यवस्थापन करण्याऐवजी काहींचे व्यक्तिशः-गटशः दमन, काहींचे शमन होऊ लागले. लोकांचा असंतोष वाढू लागला, 'सर्वांचे कल्याण', 'सर्वोदय' या कल्पना खोट्या वाटू लागल्या.

लोकांमध्ये सरकारबद्दल परकेपणाची, रागाची, विरोधाची आणि कधी विद्वेषाची भावना निर्माण का झाली? एक म्हणजे प्रत्यक्षात देशाच्या व्यापक हिताचे राजकारण सरकारने केलेच नाही. लोकशाहीऐवजी गटशाहीच निर्माण झाली. दुसरे म्हणजे सरकारची भूमिका प्रस्थापितांच्या व्यवस्थापनाची असते हे न मानता, सरकार नवीन व्यवस्थानिर्माणाची क्रांती राबवणार आहे असा भल्याभल्यांचा ठाम विश्वास होता. शासनाने सर्वंकष नियोजन केल्याशिवाय त्याची सर्वकल्याणकारी भूमिकाही ते परिणामकारक रीत्या बजावू शकत नाही. शासनाला आपल्या जीवनाच्या सर्व जबाबदाऱ्या सुपूर्द करताना आपल्याला आपल्या जीवनावरचे सर्व अधिकारही सुपूर्द करावे लागतील याची तयारी लोकांची नव्हती, व्यक्तींची नव्हती, संघटित गटांची नव्हती. सुदैवाने वा दुर्दैवाने या सर्व जबाबदाऱ्या स्वीकारण्याची शासनाचीही तयारी नव्हती. पण ही जबाबदारी त्यांनी स्वीकारलीय अशी लोकांची मात्र ठाम समजूत होती. आपली जबाबदारी नुसती संताप व्यक्त करण्याची, तळतळाट देण्याची, झुंडीत असू तेव्हा प्रत्यक्ष हिंसा करण्याची. आपले भविष्य बनविण्यात आपल्याला काही विधायक भूमिका बजावण्यासारखी आहे असे सुट्या, सामान्य माणसाला वाटतच नव्हते. जे संघटित गट होते, त्यांच्याही 'मागण्या'च होत्या. पण त्यांची शक्ती संघटित होती. तरीही त्यांच्या पदरात काही पडत नव्हते. निराशा, असंतोष, भ्रमनिरास, त्यातून राग-द्वेष-संताप असे एक हानिकारक रसायन पहिल्या वीस-पंचवीस वर्षांत तयार झाले. अन्य अंगभूत प्रतिकूल परिस्थितीबरोबर, आपले काम व परिस्थिती यांची समज आणि उद्दिष्टप्राप्तीच्या निष्ठा यांतही राज्यकर्ते कमी पडले. आणि त्यातून उत्पन्न झाली पोकळ भरमसाट आश्वासने. विरोधक बेजबाबदार आणि प्रदर्शक कृतींच्या बाबतीत मुक्त. त्यांच्यामुळे सर्वसामान्य जनताही मानू लागली की, आपल्या सर्व दैन्यःदुःखाचे कारण आहे सरकार. राज्य पोलिसी हडेलहप्पी बनले म्हणून राजकारणी गुन्हेगार बनले, की गुन्हेगार राजकारणी बनले म्हणून राज्य 'पोलीस स्टेट' बनले हा संशोधनायोग्य विषय दिसतो. परिणाम मात्र असा झाला आहे की, अहिंसेचा उदोउदो करणाऱ्या भारतात आज हिंसाचारी हा हिरो बनला आहे, हिंसाचार शिष्टाचार बनला आहे. राज्यसरकारपासून झोपडी वा फ्लॅटमधील दारूभऱ्या दादल्यापर्यंत सर्वजण या शिष्टाचाराचे यथाशक्ती पालन करीत आहेत.

परिवर्तनाचे यजमानपण सांभाळायचा सरकारचा प्रयोग फसत चालला होता म्हणून परिवर्तन काही थांबले नव्हते. सुरुवातीला समाज बव्हंशी सनातनी आणि रूढिबद्ध होता. जात, जमात, धर्म यांनी वळ दिलेल्या रूढी-परंपरांचे धीमेपणाने विनतक्रार पालन करीत होता. चैनविलास वा स्वस्थ जीवन जगणारी माणसे मूठभरच होती. बहुसंख्य माणसे लौकिक दृष्ट्या कसेबसे जगत होती. तरीपण नेमकेपणा, नियमितपणा आणि निश्चितता यांतून मिळणारे भावबल माणसाकडे भरपूर होते. कुटुंब, जात, गोत यांची जिव्हाळामय नाती होती. पण माणसे एकमेकांवर इतकी अधिक अवलंबून होती, सामाजिक

स्वीकृतीची गरज इतकी तीव्र होती की, एक असहाय निस्तेजता सामाजिक व्यवहारात होती.

उद्योगीकरण, दिपवणारे तंत्रज्ञान यांच्या संपर्कात अधिकाधिक माणसे येऊ लागली. त्यासाठी नगरात नव्याने वसू लागली. जगण्याच्या परिस्थितीत एकाएकी आणि अतितीव्र बदल होऊ लागला. अनुषंगाने माणसाची जीवनशैलीही झपाट्याने बदलली. विचारात, विशेषतः विश्वासंबंधीच्या समजुतीत, श्रद्धांमध्ये, नीतिअनीतीच्या कल्पनांमध्ये मात्र धिम्या गतीने आणि मूकपणे बदल होत होता. आचारविचारांतील हा आत्यंतिक बदल, तोही झपाट्याने, पचविणे माणसाला कठीण जात होते. वेगवेगळ्या प्रादेशिक आणि प्राकृतिक विभागांत हे बदल वेगवेगळ्या वेळी, वेगवेगळ्या गतीने आणि वेगवेगळे स्वरूप घेऊन सुरू झाले. असंतुलित अशी सामाजिक-सांस्कृतिक-आर्थिक प्रगती झाली. एकसंधतेला, एकसूत्रतेला, म्हणूनच व्यावहारिक ऐक्यालाही पोषक परिस्थिती उरली नाही. विघटनाची प्रक्रिया सुरू झाली. विघटन आणि छोट्या घट्ट बांधणीचे गट निर्माण होणे अस्वाभाविक नाही आणि अनुपयुक्तही नाही. आणि, या गटांत एकमेकांबद्दलच्या तीव्र शत्रुत्वाच्या भावना निर्माण झाल्या नाहीत तर, त्यात विघातक असेही काही नाही. पण विघटनाबद्दल राष्ट्रीय विचारात इतका प्रतिकूल ग्रह आहे की, अशा प्रकारच्या गटनिर्मितीचा आपण तीव्र निषेध करतो. एक अंतर्गत कलहाचा माहौल उभा राहतो. नागरी-ग्रामीण, मालक-मजूर, स्त्री-पुरुष, हिंदु-मुसलमान, दलित-सवर्ण अशा अनेक फळ्या आज पडलेल्या आहेत, आणि समाज कलहग्रस्त, अस्वस्थ बनला आहे.

स्वातंत्र्य, समता आणि बंधुता अशी आदर्श त्रयी आधुनिक भारतीय सामाजिक विचारावर छत्र धरून राहिली आहे. प्रत्यक्ष पगडा असणाऱ्या पौर्वात्य विचारसरणीशी महत्त्वाचे मतभेद असणाऱ्या या विचारसरणींनी आपल्या, अगदी आधुनिकांच्याही, प्रत्यक्ष आचरणावर एकसंध परिणाम केलेला दिसत नाही. एकमेकांशी घट्ट नाती जुळवायची, ती जोपासायची आणि एकमेकांबरोबर नांदायचा अट्टहास करायचा ही लोकांची प्रवृत्ती असते. ती बंधुतेच्या कल्पनेशी जुळते. स्वातंत्र्याच्या कल्पनेतून जी व्यक्तिस्वातंत्र्याची कल्पना पुढे आली, तिच्यामध्ये माणसाच्या खासगीपणाला महत्त्व दिले गेले. माणसाच्या नव्हे, व्यक्तीच्या भोवती, दुसऱ्या कोणाही व्यक्तीने ओलांडायची नाही अशी एक लक्ष्मणरेषा आखली गेली. शरीर-मन-आत्मा अशा सम्यक् मिलनाची कल्पना व्यक्तिस्वातंत्र्याला हानिकारक वाटू लागली. वास्तवाशी विपरित असा हा पवित्रा, मूलतः पराधीन माणसाने स्वतःला स्वायत्त, स्वतंत्र मानण्याचा हा भ्रम अभिजनांत अधिक रुजला. अधिक एकाकी, स्वतंत्र आणि म्हणून स्वतःपुरते जगण्याची महती वाढू लागली.

याच्याशी मिळताजुळता एक परिवर्तनाच्या प्रक्रियेबद्दलचाही विचार कार्यरत आहे. व्यक्ती म्हणून माणूस बदलला म्हणजे सामाजिक परिवर्तन होईल हे गृहीतक कित्येकांच्या मनात असलेले दिसते. 'तू खुदको बदल, दुनिया अपनेसे बदलेगी' याउलट 'जग बदल घालुनी घाव' तत्त्वज्ञान आहे. गोळाबेरीज तथ्य हे असावे की, माणसाच्या सामाजिक जाणिवा बदलणे ही परिवर्तनाची मुख्य गरज असते. व्यक्ती एकान्तात बदलत नाही; बदलून भागत नाही. सामाजिक संपर्कातून ती बदलते आणि तिच्या सामाजिक गटाच्या जाणिवा बदलतात. विशिष्ट सामाजिक संदर्भात मानवी विकास असे स्वरूप परिवर्तनाला असते. त्यामुळे माणसाचे मूळ रूप, त्याच्या वैयक्तिक सामाजिक गरजा, या गरजांतून निर्माण होणाऱ्या त्याच्या प्रवृत्ती या एकीकडे लक्षात ठेवायच्या आणि विकासाची उद्दिष्टे (जी पुन्हा माणूससापेक्षच असावीत) दुसऱ्या बाजूला लक्षात ठेवायची ही तारेवरची कसरत परिवर्तनाच्या कार्याला करावी लागते. जनआंदोलनाच्या कार्यकर्त्यांना यासाठी सतत जनसंपर्कातून सामाजिक वास्तवाचे मर्म ग्रहण करावे लागते आणि आपली सामाजिक तत्त्वज्ञान-विकासाची संकल्पना पुनःपुन्हा तपासून पाहावी लागते. कार्यकर्त्यांपुढे असणारे आव्हान असे अनेकमुखी असते की, ते पेलू पाहणाऱ्या जागोजागीच्या असंख्य तरुण-तरुणींना बहाद्दूर म्हणावे लागेल. पण तेवढ्याने परिवर्तनाच्या अटी पूर्ण होत नाहीत. कार्यकर्ते जागोजागी परास्त होतात ते त्यांच्या दुबळेपणाने नसून आव्हानाच्या प्रचंडपणामुळे. असे असले तरी 'जग पाहिजे त्या गतीने' बदलत नाही हे अस्वस्थकारी वास्तव उरतेच.

सामाजिक विकासाच्या व्यवस्थापकाला, शासनयंत्रणेला, अगदी क्रांती करता येणार नसली तरी, कल्याणकारी कार्यक्रम, रोजगारनिर्मिती, शिक्षण असे कार्यक्रम राबवायला काय हरकत आहे, असे कित्येकांना वाटते. दिलेल्या आराखड्याप्रमाणे काम पार पाडावयाचे आहे असे स्वयंसेवी संस्थां (एन्.जी.ओ.) ना सुद्धा वाटते. पण आराखड्याला जर सामाजिक वास्तवाची जाण व विकासाच्या सुस्पष्ट कल्पना यांचा आधार नसला तर

अनुक्रमणिका






कायदेकानू, नियम, 'प्रोसीजर' यांचा वडिवार निर्माण होतो. विकास ही व्यवस्था नसून गतिशील प्रक्रिया आहे. त्यासाठी आवश्यक असणारे गतिशील नेतृत्व ही मंडळी देऊ शकत नाहीत; तशी त्यांना मुभाच नाही. सामाजिक वास्तव सतत वदलत असते, माणसांच्या व्यक्तिशः आणि गटशः प्रतिक्रिया सतत वदलत राहतात याची दखल घेण्याची संधी व कुवत या दोन्ही प्रकारच्या व्यवस्थापकांना नसते. परिवर्तनाच्या या घिसाड प्रक्रियेतून निर्माण होणाऱ्या अव्यवस्थेला मग पोलीस कायदा व सुरक्षितता, कित्येकदा स्वतःची सुरक्षितता या नजरेतून सामोरे जातात. कल्याणकारी राज्य क्रमाक्रमाने पोलीसराज्यात परिवर्तित होते हेही गेल्या पन्नास वर्षांत आम्ही अस्वस्थ मनाने अनुभवले आहे.

परिवर्तनाचे कार्यक्रम हिंसक की अहिंसक याचाही विचार स्वातंत्र्योत्तर चळवळीत महत्त्वाचा मानला गेला नाही. कम्युनिस्टांना व मूलतत्त्ववाद्यांना हिंसेचे वावडे तर नव्हतेच; प्रसंगी हिंसेचा गौरव करण्याची त्यांची वृत्ती होती. एखादा शोपित वर्ग जेव्हा शस्त्र हातात घेतो तेव्हासुद्धा त्या समाजाचा कायाकल्प होतो, उदा., अल्जीरियातील सशस्त्र क्रांतीने त्या लोकांच्या जाणिवा प्रगल्भ झाल्या, स्वातंत्र्य आणि समानतेच्या कल्पना तपशिलाने जीवनाच्या अंगोपांगात रिघू लागल्या वगैरे तात्त्विक प्रतिपादनेही होऊ लागली. 'हल्ला चाहे जैसा भी हो, हाथ हमारा नहीं उठेगा' म्हणून मोर्चा काढणाऱ्यांच्याही विराट मेळाव्याला घावरून पोलीस भरमसाट वळाचा वापर करू लागले. मोर्चा, धरणे, घेराव सगळ्यांत त्यामुळे हिंसक भाव स्पष्टपणे उमटू लागले. आतापर्यंत माणसे निमूटपणे कष्ट, वंचना सोशीत होती. वदलत्या परिस्थितीत लोक आपापल्या हक्कांवद्दल अधिक जागरूक झाले; रेशनवर रॉकेल मिळाले नाही, गाडी उशिरा आली, सरकारी हॉस्पिटलमधील डॉक्टर वेळेवर हजर नव्हता – तावडतोव याविरुद्ध हंगामा होऊ लागला. सरकार हे सर्व हल्ल्याचे लक्ष्य वनले; कारण स्वातंत्र्य म्हणजे सरकारने लोकांना सर्वकाही देण्याची हमी घेणे अशी कल्पना वनली. सरकार व लोक यांच्यातील वैरभावना वाढतच चालली.

परिवर्तनासाठी हिंसा अटळ आहे हा विचार मूकपणे पसरला त्याचे आणखी एक कारण म्हणजे जनचळवळींनी अभावितपणे मान्य केलेले तत्त्वज्ञान. सर्वोदयाच्या तत्त्वज्ञानातून कल्याणकारी राज्याची कल्पना आली होती. फारसे कल्याणकारी काही होऊ शकले नाही, पण जे थोडेफार झाले त्याने लोकांचा तात्पुरता फायदा झाला. पण पाहिजे त्या व्यवस्थापरिवर्तनाला चालना दिली का? की प्रस्थापित अयोग्य रचनेला वळ दिले? तिच्याशी समझोता केला? या कामातून योग्य परिवर्तनाचा आवेग मंदावतो असा विचार पुढे आला. सर्वोदय कधीच होणार नाही. द्वंद्वे ही अंतिम सत्ये आहेत असे मानले गेले.

– २ –

परिवर्तन कमी-अधिक संथपणे होतच असते. सत्तांतर तसे धीमेपणाने, शांतपणानेच पार पडले. जातीय दंगली, निर्वासितांचे लोंढे. पण शासनाचे दोर घट्टपणे राज्यकर्त्यांच्या हातांत. बरेच चर्वितचर्वण करून घटना बनली. त्याचे अर्थ लावीत, अर्थावद्दल वाद घालीत अंमलबजावणी सुरू झाली. शेटजी-भटजींची पकड राज्ययंत्रणेवर जसजशी घट्ट होऊ लागली तसतशी जन-आंदोलने अपरिहार्य झाली. कालांतराने झुंजार अतिरेकी, उद्धट नेतृत्व अधिकाधिक परिणामकारक ठरू लागले. लोकांचा परिवर्तनासंबंधीचा आवेग वाढला. संघर्ष, रणनीती, लढा या शब्दांनी तीव्र विरोध असा अर्थ होतो. स्वातंत्र्याच्या दुसऱ्या पचंविशीत जनआंदोलने ज्वलंत स्वरूप धारण करू लागली. समाधानी जीवन जगण्याच्या साधारण माणसाच्या ऊर्मीला या विरोधाच्या, वैराच्या, द्वेषाच्या, कल्पनांनी छेद गेला. विकास म्हणजे विरोध-विकास; तेव्हा संघर्ष होणारच, हा मार्क्सपासून स्थापित झालेला विचार भारताच्या प्रस्थापित विचारधारेत वसत नाही. प्रस्थापितांना तर तो आवडत नाहीच; पण सहारा नसलेल्या कोणत्याच समाजाला पसंत पडत नाही. तोवर आपण सुधारणा, प्रगती, उत्क्रांती, क्रांतीवद्दल वोलत होतो. पण त्यातील कशातही, अगदी क्रांतीतही कलहाची अपरिहार्यता नव्हती. परिवर्तनाची प्रक्रिया एक आंतरिक विकास, मत-परिवर्तन, हृदयपरिवर्तन, त्याशी परिस्थितीची प्रतिक्रिया अशी काहीशी होती. आजची लहानमोठी आंदोलने, त्यांचे वंद, धरणे, मोर्चे असतात सनदशीर; पण एक दहशतीचे वातावरण निर्माण करून जातात.

सर्वोदय आणि मार्क्सवाद यांत मूलगामी मतभेद द्वंद्वासंवंधी आहे. हितविरोध असणारच. ज्यात एकाचे हित त्यात दुसऱ्याचे अनहित असणारच. विविध गटांच्या हितांचा ल.सा.वि. निघू शकणार नाही, म.सा.वि. फार तर निघेल अशी आज धारणा झालेली आहे. आणि सरकार-जनता यावरोवरच, दलित-सवर्ण,



अनुक्रमणिका

स्त्री-पुरुष इ. सर्वांत हितविरोध आहे ही भावना बंधुतेच्या विकासाला मारक आहे. निव्वळ प्रेम असणार नाही, भांडणे असणारच; पूर्ण स्वातंत्र्य असणार नाही, बंधने असणारच; सर्व माणसे सारखी असणार नाहीत, फक्त पत सारखी असेल; ही वस्तुस्थिती उमजूनच आपण आपली माणुसकी जतन करू शकू. अहिंसेचा यापेक्षा सम्यक् विचार आपल्याला पेलणार नाही.

कुठल्याही परिवर्तनाचा एक महत्त्वाचा भाग संदर्भपरिवर्तन असतो. आणि आर्थिक विकास हे एक कळीचे संदर्भपरिवर्तन असते. हे मार्क्स न मानणारेही मान्य करतील. आर्थिक विकासाचे आदर्श प्रारूप काय असावे, भारताच्या आजच्या परिस्थितीत त्याचे काय व्हावे या दोहोंचा कमी-अधिक विचार झाला. पण या साऱ्या विचाराला बगल देऊन, प्रत्यक्षात, झगमगणारी औद्योगिक क्रांती भारताचे स्वप्न बनली. जेमतेम दहा टक्क्यांना परिसस्पर्श करणारा हा विकास, विकासाचा मेनस्ट्रीम बनला. आणि नव्वद टक्के आडप्रवाहांना या प्रवाहात सामील होण्याचे आमंत्रण मिळाले.

या हाकेला सर्वांत जास्त प्रतिकार आदिवासी समाजाने केला. ग्रामीण विभागातील चातुर्वर्णी समाज आणि आदिवासी समाज यांतील एक महत्त्वाचा भेद नेहमी दृष्टिआड होतो. अन्य ग्रामीणांप्रमाणे आदिवासींवर मध्ययुगीन संस्कृतीचा प्रभाव नाही. त्यांच्यावर आदिम संस्कृतीचा, प्रकृतीचा पगडा आहे.

आधुनिक भारत स्वतःला आदर्श समजून त्या दिशेने आदिवासींनी प्रगती करावी असे म्हणत होता. आपल्यासारखा आर्थिक विकास, आणि त्या विकासानुरूप दृष्टिकोण, कल्पना, मूल्ये यांचा आदिम समाज स्वाभाविकपणे स्वीकार करील असे वाटले होते. पण तसे झाले नाही. एकतर आधुनिक भारताने प्रामाणिकपणे हा प्रयत्न केला नाही. मुळात सुरू झाली आदिवासींची लूट. दुसरे म्हणजे हा विकासकार्यक्रम आदिम समाजाच्या जीवनविषयक तत्त्वज्ञानाला एवढा धक्का देणारा होता की, तो सतत विकृत वा असफलच होत राहिला. मोठे अपयश शिक्षणाला मिळाले. शिक्षणावर आमची भलतीच भिस्त होती. गाजावाजा न करता एक क्रांती शिक्षण घडवून आणील अशी उमेद होती. अगोदरच, शिक्षण त्यांच्यात रुजले नाही. दुसरे म्हणजे, शिक्षणाने त्यांची जीवनदृष्टी औद्योगिक संस्कृतीला अनुकूल बनली नाही. कारण त्यांच्या जगण्याच्या परिस्थितीत फरक करण्याची कोणतीच प्रक्रिया शिक्षण निर्माण करू शकले नाही. आधुनिक तंत्रज्ञानही त्यांना उपयुक्त ठरले नाही. या तंत्रज्ञानाचा उपयोग धनिकांना होतो. तंत्र राववणारे लोक गरीबच राहतात. तंत्र त्यांना पेलत नाही असे नाही, तर परवडत नाही. सरकारी कर्ज, एकतर ते धनिकांकडेच गेले; आणि जेव्हा गरीबाकडे गेले तेव्हा तो कर्जबाजारी बनला. ग्रामीणाकडे, आदिवासीकडे हिशेबी वृत्ती नाही म्हणून तो बुडतो असे म्हटले जाते. खरे तर औद्योगिक संस्कृतीच त्यांना परकी वाटते. उत्पादन अधिक गतीने व्हावे, अधिक चांगल्या प्रकारचे व्हावे अशी उद्योगाची उद्दिष्टे असतात. उत्पादन करणाऱ्या माणसाच्या सुखासमाधानाचा, सोयीचा, शारीरिक-मानसिक आरोग्याचाही विचार त्या उद्दिष्टाच्या प्रकाशात होतो. पण मनुष्य हा केंद्रस्थानी मानून आपण विचार करीत असू तर उत्पादनप्रक्रियेच्याही केंद्रस्थानी आपल्याला माणूस कल्पावा लागतो. समुचित तंत्रज्ञान, अल्पप्रमाण यंत्रे आदी विचारात ही व्यवस्था होती. पण या विचाराचा प्रसारच अल्पप्रमाण ठरला.

अशीच एक शेतकऱ्यांची चळवळ. ग्रामीण भारताची मूलभूत समस्या म्हणून विचार आणि ती सोडवताना अहिंसक परिवर्तनाचा एक मौलिक प्रयोग म्हणून शेतीसमस्येचा वापर भूदान आंदोलनाने केला. शेतकरी-कामगाराचे, श्रमिकांचे राज्य आणण्याचे कंकण बांधलेल्या तरुण कार्यकर्त्यांना या आंदोलनाचे आकर्षण वाटले नाही. खासगी मालकीच्या मनीमानसी रुजलेल्या कल्पनांना 'भूदान यज्ञा'त एक आहुती म्हणून विसर्जित केले जाईल, ही एक कविकल्पनाच ठरली. सरकारने मालकीच्या प्रश्नाकडे जुजबी लक्ष पुरविले. पण शेतीचे उत्पन्न वाढवायचा प्रश्न मात्र गांभीर्याने उचलला. एकंदर औद्योगिक विकासाचे प्रारूप शेतीसंबंधीही वापरले गेले. शेतीचे उद्योगाच्या धर्तीवर संवर्धन केले गेले. लहानमोठा शेतकरी एक वर्ग म्हणून आकारास आला. मोठ्या शेतकऱ्याला पैसा, प्रतिष्ठा, स्वास्थ्य आणि शिक्षण यांचा लाभ झाल्याने राजकीय आकांक्षा निर्माण झाली. शेतकरी हे नाव पांघरल्याने वड्या शेतकऱ्यांशी ज्यांचे हित बांधलेले नाही असे बारीकसारीक सर्व ग्रामीण त्यांच्याबरोबर राहिले. भरभक्कम ग्रामीण नेतृत्त्व पुढे आले. शहरी आणि ग्रामीण नेतृत्वाची टक्कर होणार असे वाटत असतानाच वड्या शेतकऱ्यांचे नागरीकरण सुरू झाले. उद्योगपती आणि वडे शेतकरी यांच्यात नेतृत्वाचे समझोते कठीण बनले नाहीत. दोघांनाही भांडवलाची सत्ता मान्य होती. सत्ताहीन आणि



अनुक्रमणिका

उपेक्षित राहिला तो शहरी आणि ग्रामीण साधनहीन, संपत्तिहीन माणूस.

पुन्हा, या माणसांना आपल्या परिस्थितीचा योग्य अर्थ लागला नाही. चांगले जीवनमान हे संपत्तीच्या संपर्कात आलेल्या प्रत्येक संपन्न, विपन्न माणसाचे उद्दिष्ट ठरले आणि अधिकाधिक सुखांगी उपभोगपूर्ण जीवन म्हणजे सुधारलेले जीवनमान अशी त्याची व्याख्याही ठरली. अधिक कार्यक्षम, अंतर्बाह्य अधिक साजिऱ्या, माणसाच्या वैशिष्ट्यपूर्ण सांस्कृतिक प्रवृत्तीचा परिपोष करणाऱ्या जीवनाची ओढ नवश्रीमंतांना लागत नव्हती.

थोडेफार आदर्शवादी टिकले होते. त्यांना 'दारिद्र्याची चटक' लागल्याची टवाळी होऊ लागली. ज्या व्यापक समाजाच्या सुखदु:खाशी तद्रूप होण्याची तळमळ या आदर्शवाद्यांमध्ये होती तिचे प्रत्यक्ष धडपडीत रूपांतर अनेकदा झाले नाही. एक वांझ तळमळ, प्रवाहाच्या उलट्या दिशेने जाण्याच्या धडपडीतून येणारे करूण एकाकीपण आणि अंती शुष्कपण अशी शोकांतिका अनेक उत्तुंग व्यक्तींची झालेली दिसते. या माणसांचे काय चुकले?

विचाराचा आणि आचाराचा जर मेळ नसला तर एक दांभिकपणा अपरिहार्यपणे जीवनात रिघतो. आतून पोखरून, दांभिकपणा एक खुजे व्यक्तिमत्त्व निर्माण करतो. स्वानंदासाठीही स्वत:शी प्रामाणिक राहण्याची जरुरी असते. प्रतिकूल वातावरणात स्वत:पुरते स्वत:च्या विचारांशी, प्रेरणांशी प्रामाणिक राहता येते काय? माझ्या मते जीवन ही मूलत: एक वैयक्तिक साधना आहे. आपल्या गर्भातील माणुसकी जीवनात सर्व कलांनी मोहरावी, फुलावी, फळावी हे तिचे उद्दिष्ट. पण समाजाशी, व्यक्तींशी हार्दिक नाते जुळावे हे तर आतूनच वाटत असते. त्यामुळे समाजाच्या पदरात काहीतरी टाकावे यासाठी नित्य सावधान राहून धडपड केल्याशिवाय ही साधना पुरी होत नाही. गाजराची पुंगी वाजली तर वाजली या वृत्तीने ही साधना सार्थ बनू शकत नाही; अस्सल बनू शकत नाही. पण प्रत्यक्षात आपण समाजाच्या पदरात काही टाकू शकलो नाही तर आपल्या मर्यादांचे भान त्यातून व्हावे, वैफल्य येऊ नये. वैयक्तिक जीवनातील निष्ठांना जपणे हा साधनेचा एक भाग; समाजासाठी कार्यरत राहणे हा दुसरा भाग. पहिल्या भागातून समाजाचे भले न होईल, पण भले करण्याच्या आपल्या धडपडीला बळ तरी येईल. चिकित्सा न करता जीवनातील सुखे जसजशी उपलब्ध होतील तसतसा त्यांचा स्वीकार करीत गेलो तर हळूहळू आपल्या प्रेरणांना, वृत्तिप्रवृत्तींना जडपणा येऊ लागतो. आपण प्रस्थापिताचा भाग बनतो, प्रस्थापित अन्यायाचे, प्रस्थापित शोषणाचे आपण वाटेकरी होतो. आपल्यातील माणुसकीचे जतन करायला विसरतो. सामान्य माणसाशी – स्थापितापलीकडच्याशी – आपले नाते जुळेनासे होते. वृक्षाच्या तुटलेल्या फांदीप्रमाणे आपले जीवन एकाकी शुष्क बनत जाते. म्हणून फक्त वैयक्तिक जीवनातील निष्ठा जपून भागत नाही, समाजाशी तुटून चालत नाही. पण ज्या समाजाशी नाते जुळवायला जाऊ तो आपल्या निष्ठांशी पूर्णतया विसंगत असूनही चालत नाही.

पाश्चात्त्य संस्कृतीच्या प्रभावाबरोबर औद्योगिक क्रांतीची उत्सुकता, उच्च तंत्रज्ञानाचे आकर्षण, विज्ञानाबद्दल प्रचंड आदर असे एक विचारप्रवर्तन सुरू झाले. मिश्र अर्थव्यवस्था, फक्त मूलभूत सोयींसाठी मोठे उद्योग वगैरे धोरणांना न जुमानता सर्व प्रकारच्या अजस्रीकरणाकडे उत्पादनव्यवस्थेची घोडदौड सुरू झाली. आपल्याला 'मुख्य प्रवाह' मानणाऱ्या नागरी पांढरपेशा, बुद्धिजीवी, भांडवलजीवी समाजाला या बदलत्या वास्तवाने घेरले आणि विज्ञाननिष्ठा ही नवयुगाची अग्रनिष्ठा ठरली. लगेचच तिचा अतिरेकही सुरू झाला. विज्ञान आपल्या कक्षा ओलांडून सर्वत्र मक्तेदारी मिरवू लागले. विज्ञान आणि अध्यात्म यांचा जोडीने प्रभाव पडला पाहिजे हा विनोबाजी-सारख्यांचा विचार अतिक्षीण झाला. विज्ञाननिष्ठेचा प्रचार स्वत:च अवैज्ञानिक आणि असहिष्णू बनला.

तर्क आणि बुद्धी यांच्या आधाराने ज्ञान मिळविण्याचा, नव्हे सत्य सापडविण्याचा यशस्वी प्रयत्न करता येतो असे ही मंडळी मानतात. बुद्धी, भावना, प्रेरणा, एकमेकांत गुंतून घेतलेला सम्यक् अनुभवच सत्याचा मर्मभेद करतो, असे अन्य काही मानतात. अनुभवाचा वालुकण सृजनशील मनाच्या शिंपल्यात सुखेनैव पडून राहतो आणि मग त्याचा अस्सल मोती बनतो असे कोणीतरी काव्यमय वर्णन केले आहे. विज्ञाननिष्ठेत खरे तर वैचारिक स्वातंत्र्याची कल्पना अंतर्भूत आहे. पण तर्कशुद्ध विचार हाच प्रमाण म्हणणारे यापेक्षा वेगळा विचार मांडूच देत नाहीत. सर्वसामान्य माणसाला विचाराच्या सिद्धासिद्धतेचे सोयरसुतक नसते. त्यांना व्यवहारोपयोगी विचार हवा असतो. सर्वसामान्य माणसाचा हा वैचारिक प्रवास अत्यंत वैज्ञानिक पद्धतीने चालतो असेच काही अर्थाने म्हणावे लागेल. एक विचार (गृहीतक), त्याचा उपयोग करून अनुभव (प्रयोग)





अनुभवाचे व्यावहारिक यशापयशाच्या दृष्टीने मूल्यमापन आणि निष्कर्ष. सामान्य माणूस करीत असतो. आपल्या कृत्याच्या परिणामात त्याचे मन इतके गुंतलेले असते की, 'हे का घडले', याचा विचार तो करीत नाही. यासाठी त्याला झिडकारण्याऐवजी ज्यांना वैचारिक शुद्धतेचे महत्त्व आहे त्यांनी सामान्य माणसाचा हा अनुभव जमवला पाहिजे, जुळवून पाहिला पाहिजे आणि सत्याचे सम्यक् दर्शन उभे करण्याच्या मानवाच्या युगानुयुगाच्या प्रयत्नाला हातभार लावला पाहिजे. वैज्ञानिकाचे हे काम आहे. सामान्य माणसाला धिक्कारणे, त्याला गतानुगतिक अंधविश्वासी मानून ज्ञानविज्ञानाच्या क्षेत्रातून बाद करणे यांतून विज्ञान-निर्मितीच्या प्रक्रियेची फारच मोठी हानी होते. लोक-विज्ञानाच्या चळवळी लोकांच्या नावाने कुंकू लावतात खरे, पण त्यांचा अधिक प्रयत्न प्रयोगशाळेतील विज्ञान लोकांकडे नेण्याचा असतो. सर्वसामान्यांचे शहाणपण ही एक मौलिक ज्ञानसामग्री आहे याची त्यांना कमी जाण आहे. कारण तेही बुद्धीला सर्वोपरी मानतात. बुद्धीच्या वापराशिवाय थेट जाणण्याची माणसाची जी कुवत, समग्र आकलनक्षमता यांकडे तर त्यांचे दुर्लक्ष होतेच, पण भावनेने जाणण्याच्या क्षमतेसारखा एक ढोबळपणे लक्षात यावा असा ज्ञानाचा पैलूही त्यांना दिसत नाही.

धर्मविचार गांधीविचाराचा मूलाधार होता असे म्हणता येते. अर्थविचाराला प्राधान्य देणारे औद्योगिक युग विज्ञानाचा बडिवार मानू लागले आणि पुरोगामी विचारातून धर्मविचाराला तिलांजली मिळत गेली. प्रस्थापित धर्मविचार अत्यंत दूषित स्वरूपाचा होता. उतरंडव्यवस्था समतामूल्यांना, लोकशाहीला छेद देत होती. प्रेमाचा, बंधुभावाचा संदेश देणाऱ्या धर्मप्रेषितांनीही या संदेशात स्वातंत्र्याचा अंतर्भाव कधी केला नव्हता. काही धर्मांत सर्वच 'ताडन के अधिकारी' होते, तर काहींत फक्त स्त्रिया आणि शूद्र एवढाच फरक. प्रेम आणि बंधुभाव याचा अर्थ सर्वव्यापक, सर्वसमावेशकही कोणी होऊ दिला नाही. आपले तेवढेच प्रेमाचे अधिकारी, दुसरे पाखंडी; त्यांच्या विरोधात जिहाद, अस्पृश्यता, उच्चनीच भाव, स्त्रीदास्याची कल्पना सारेच धर्म रुजवीत होते. पुरोगाम्यांनी धर्माचा धिक्कार केला ही शुभघटनाच होती.

पण त्यांनी धर्मभावनेचा धिक्कार का केला? पुरोगाम्यांच्या बुद्धीला हे लांच्छनास्पद आहेच; पण त्यातून सबंध पुरोगामी तत्त्वज्ञान दूषित झाले आहे. देवावरील विश्वास, योग्य तेच करावे अशा प्रेरणा यांचा धर्माशी संबंध त्यांना अटळ का वाटला? माझा धर्मावर विश्वास नाही; कारण एक स्त्री म्हणून कोणत्याही धर्माचा माझ्यावर विश्वास नाही. पण माझ्यातील धर्मभावना प्रबळ व्हावी असे मात्र मला जरूर वाटते. प्रगत धर्मांनी देवाचे जे मूलरूप मानले, ते कल्याणकारी शक्ती या स्वरूपाचे आहे. आस्तिकता म्हणजे देव मानणे; धर्म मानण्याची गरज आस्तिकाला नाही. देवाच्या प्रेम, करुणा, कल्याणमय स्वरूपाची ओळख करून घेता घेता आस्तिक माणसाला या जगातील आपला मार्ग कळू लागतो. ही श्रद्धा आहे आणि श्रद्धेची जगाला गरज आहे. परिवर्तन करू इच्छिणाऱ्यांना तर ती महत्त्वाची आहेच. कारण आज जे अस्तित्वात नाही ते उमटेल यावर त्यांना विश्वास ठेवायचा असतो. जगात भल्याच्या दिशेने बदल घडतील, हा अन्याय मिटेल, हे अत्याचार थांबतील, हे कलह शमतील, आजच्या पददलितांचा अखेर विजय होईल यावर पूर्ण श्रद्धा असली तरच कार्यकर्ता या सर्वांविरुद्ध उभा राहू शकतो. या अन्यायपीडितांना ही कल्याणकारी श्रद्धा असली तरच ते आजचे दुःख पचवू शकतात. 'रात्रीच्या गर्भात उद्याचा असे उषःकाल' हे काय आहे? ही श्रद्धा आहे. तेव्हा सर्वच श्रद्धा त्याज्य नाहीत. सश्रद्धता हा जोपासावा असा सामाजिक सद्‌गुण आहे. चांगल्या चळवळीतून कित्येकदा विघातक उपपदार्थ (by-product) निघतात. उदा., भ्रष्टाचारविरोधी चळवळ. जगात कोणीही भला नाही; तू नाहीस, मी नाही. परिघावर असलेल्या, द्विधा मनस्थितीतील माणसांचे अवसान यातून गळते. आशाच संपते.

आशावादी हा मूलतः आस्तिक असतो. ज्या हृदयात आस्तिक्यभावना रुजलेली आहे त्यात या साऱ्या आशावादी श्रद्धा पालवू शकतात. परिवर्तनवादी हा प्रयत्नवादी असतोच. पण आपल्या प्रयत्नांना यश येणारच, असा आत्मविश्वास त्याला त्याची आस्तिकता प्रदान करते. मला स्वतःला प्रत्येकाजवळ थोडासा दैववाद असावासे वाटते. 'दैवं चैवात्र पंचमम्' हे सत्यही वाटते. दैववादामुळे स्थितप्रज्ञ न होता, कर्मण्येवाधिकारस्ते वगैरे न म्हणता, सर्व भावभावनांत यथेच्छ रंगून अपयशातून येणारे वैफल्य टाळता येते. कित्येकदा यश-अपयश हे माणसाच्या पराक्रमाचे गमक, प्रयत्नाचे फळ नसून एक परिस्थितिसंघाताचा परिणाम असतो. अपयशाचे कर्तेपण दैवाला देणे हा एक मानसोपचार आहे असेही मी मानते.

मार्क्सने अर्थ, फ्राईडने काम, तर गांधींनी धर्मप्रेरणा ही मानवी जीवनावर सर्वंकष सत्ता गाजविणारी प्रेरणा आहे, व






असावी असे मानले. धर्मप्रेरणा बहुसंख्य भारतीयांची नस होती आणि आजही आहे. गांधींनंतर देशातील अभिजनांपुढे एक निरोगी विचार म्हणून हे ठेवणारा कोणी राहिला नाही. आणि पुरोगाम्यांनी तर त्या विचाराचा पद्धतशीर अधिक्षेप केला. पुढे मूलतत्त्ववाद्यांनी धर्मप्रेरणा भ्रष्ट स्वरूपात वापरल्या आणि हे भ्रष्ट रूप गांधीविचारी मंडळींवरही प्रभाव पाडू लागले. त्यांच्यात भगव्या कफन्यांची संख्या वाढली. गांधीवादी आणि हिंदुत्ववादी यांच्यात गल्लत झाली. परिणामतः राजघाटावर दलितांनी गांधींची विटंबना करण्याचा प्रयत्न केला. पुरोगाम्यांनी धर्मप्रेरणेचे सामाजिक वास्तव नाकारले. निधर्मी आणि सर्वधर्मसमभावांत फरक करण्याची ताकद दाखविली नाही. दलित-पीडित पुरोगाम्यांकडे वळले नाहीत. हिंदुधर्म सोडून आंबेडकरांनी दुसरा धर्मच स्वीकारला. धर्मांतरानंतर कदाचित त्यांनी धर्मविचारावर आधारलेली विकासप्रक्रिया कार्यान्वित केलीही असती पण त्यांना त्यासाठी फार दिवस मिळाले नाहीत. माणूस मेला तरी त्याने सुरू केलेले विचार, विकास, प्रवर्तन चालूच राहते असे म्हणतात. आंबेडकर, गांधी, जयप्रकाश कोणाच्या बाबतीत ते खरे ठरले नाही.

चांगुलपणावर, सश्रद्धतेवर आणि धर्मविचारावर अश्रद्धा, काही प्रमाणात अंधश्रद्धानिर्मूलनातूनही निर्माण झाली. या चळवळीने विधायक श्रद्धांनाही प्रश्नचिन्ह लावले. त्यांना अपराध-भावना चिकटवली. दांभिकपणात वाढ झाली. धर्मविचाराचा निषेध धर्माच्या राजकीय दुरुपयोगामुळे आपण करतो, करायला हवा. पण धर्मविचाराचा अधिक्षेप करताना 'सत्यं शिवं सुंदरम्' या आदर्श त्रयीचाही अधिक्षेप झाला. विशेषतः पावित्र्याची कल्पना ही गैरलागू समजल्याने जीवनातील सत्य आणि सौंदर्यच काय, सारा रसच निघून जातो हे धर्मविचारावर निर्घृणपणे प्रहार करणाऱ्या पुरोगाम्यांना जाणवले नाही.

प्रत्येक चळवळीचा काही दुष्परिणाम असतोच की काय? इहवादाचा आणि चंगळवादी तत्त्वज्ञानाचा मला असाच संबंध जाणवतो. इहवाद्यांनी 'ब्रह्म सत्यम्, जगन्मिथ्या' चे तत्त्वज्ञान खोडून, अलौकिकाला हद्दपार केले. प्रयत्नवादाला प्रोत्साहन दिले. या जगातल्या व्यवहाराला मध्यवर्ती बनवले. पण याबरोबर अध्याहृतपणे ऋण काढून तूप पिण्याचाही सल्ला दिला. भोगवाद हा इहवादाचा तार्किक निष्कर्ष आहे काय, याबद्दल वाद होऊ शकेल. पण विवेकाला वळसा घालून 'मुक्त' जगताना 'मजा-यात्री' स्वतःला आनंदयात्री म्हणून मिरवू लागले, ते त्याग-संयमाचे अडसर मुक्त मनाने ओलांडता येऊ लागले म्हणूनच. फ्राईडच्या भाषेत सांगायचे तर, इहवादाने आमचा ध्येयात्माच (Superego) बदलून टाकलाय. बुद्धिवाद्यांनी तर्ककर्कश कठोरतेला अधिष्ठान, प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. पण त्यातून विवेक, त्याग, संयम यांसारख्या आदर्शांना बळ मिळाले नाही. कारण ते आधीच आदर्शाच्या फलकावरून काढून टाकले होते. त्यांचे योगदान होते ते भावनांना कमीपणा देण्यात. त्यातून कवी हास्यास्पद ठरले, विशेषतः भावकवी. सानेगुरुजी रडुबाई ठरले, खांडेकर स्वप्नजीवी ठरले. अनुभव घेण्याचे आणि अनुभव जाणण्याचे एक अप्रतिम साधन, भाव-साक्षरता, तिला अनुल्लेखाने मारण्यात आले. संगणक मानवी बुद्धीचा आदर्श ठरला, तर यंत्रमानव हा मानवी जीवनाचा. उपयुक्तता, अधिकाधिक परिणामकारकता, मोजता येण्याजोगे परिणाम-स्थिती-गती ही परमसत्ये ठरली. ही सांस्कृतिक प्रक्रियेची आजची पांढरपेशाला भिडलेली अवस्था माणसाला एकाकी, परके आणि अमानुष वाटण्यास कारणीभूत आहे.

दुःख, वेदना या काहीही करून टाळायच्या आहेत ही धारणा. आपल्या आयुष्यातून त्यांना हद्दपार करायला धडपडायचेच; पण इतरांच्या दुःख-वेदनेकडे काणाडोळा करायचा. वेदनेला आणि सहवेदनेला माणुसकीच्या आशयात जे स्थान आहे ते आज फार थोड्यांना जाणवते.

पन्नास वर्षांत खूप काही घडले, खूप जाणवले. आज आठवताना मनात तरळलेल्या विचारांचे हे कोलाज. काही चित्रे अजून मनःकोषात राहिलीत. स्त्रीजीवनासंबंधीची, माणसा-माणसांतील नात्यांची, विकासकल्पनेच्या पुनर्लेखनाची, जातीयतेची, धर्मांधतेची. ती तशीच ठेवली आहेत. कारण त्याचे रंग अजून ओले आहेत.

❖❖

अनुक्रमणिका



# मी आणि माझा देश

मिलिंद बोकील

माझा देश म्हणून मला भारताचे भान आले ते १९७१ साली. भारत-पाकिस्तान युद्ध झाले तेव्हा. त्या वेळेस मी अकरा वर्षांचा होतो. बऱ्यापैकी समजायला लागले होते. वर्तमानपत्रांतून युद्धाची वार्तापत्रे रकाने भरभरून येत असत. मुंबईच्या उपनगरात राहात असल्याने खिडक्यांच्या तावदानांना आम्ही खाकी कागद चिकटवले होते. आमच्या गावाने घराघरांतून वर्गणी काढून एक नॅट विमान खरेदी करण्याइतके पैसे गोळा केले होते. इतर कुणाही शाळकरी मुलासारखेच, युद्धामधील आपल्या सैन्याचा पराक्रम वाचून आनंदाचे भरते येई.

पुढच्याच वर्षी भारत देशाचे आणखी एक वेगळे भान आले. अर्थात ती जाणीव महाराष्ट्र राज्याशी संबंधित होती. कारण महाराष्ट्रभर दुष्काळ होता. त्या वेळी शहराच्या फुटपाथवर गावाकडून आलेले लोक दिसायला लागले. शेरभर धान्यासाठी लोकांनी बैल विकल्याच्या बातम्याही वृत्तपत्रांत वाचायला मिळाल्या. दुष्काळग्रस्तांसाठी आमच्या शाळेत धान्य जमा करणे चालू होते. त्यात रोज एक मूठभर गहू आम्ही बरेच दिवस जमा करत होतो.

त्यानंतरची जाणीव आणीबाणीतली आहे. त्या वेळी मी दहावी-अकरावीत होतो. आमची शाळा काँग्रेसधार्जिणी होती, पण गाव विरोधकांचे होते. राजकारण फारसे समजत नव्हते. पण आणीबाणी ही काहीतरी वाईट गोष्ट आहे हे कळत होते. शाळेमध्ये येता-जाता देशभक्तिपर गाणी म्हणवून घेत, त्याची आम्ही टिंगल करत असू. त्या वेळी वर्गामधला एक मुलगा रस्त्यावरून हुकुमशाहीविरुद्ध घोषणा देणाऱ्या तरुणांबरोबर गेला होता. त्याला चार-पाच दिवस गावाबाहेरच्या तुरुंगातही ठेवले होते. तेव्हा त्याचा कौतुकमिश्रित्त हेवा वाटला होता.

त्यानंतरची ठळक आठवण १९७७ सालच्या जनता पार्टीच्या विजयाची आहे. रात्रभर सर्वजण जागे होते. हुकुमशहांच्या पराभवाच्या बातम्या रेडिओवरून येत होत्या आणि सर्वत्र जल्लोष उसळत होता. त्या आधीचा महिना-दीड महिना प्रचाराच्या रणधुमाळीने आणि मोठमोठ्या नेत्यांच्या भाषणांनी दुमदुमून गेला होता. त्या काळात सर्वसामान्य लोकांचा जो प्रचंड राजकीय उत्साह पाहिला तसा नंतर कधीच दृष्टीस पडला नाही. १९४७ सालची स्वातंत्र्यप्राप्तीची रात्र आम्ही पाहिली नव्हती. आमच्या दृष्टीने १९७७ साल हेच खरे स्वातंत्र्याचे साल. त्या साली केवळ स्वतंत्र झालो असे नाही, तर एकदम वयातही आलो.

नंतर मग ७८-७९ सालापासून जयप्रकाश नारायण यांनी स्थापन केलेल्या छात्र युवा संघर्ष वाहिनीत मी सामीलच झालो आणि मनापुढची एकेक कवाडे झपाट्याने उघडत गेली. त्या माध्यमातून समाजपरिवर्तनाच्या विचारधारेशी संबंध आला आणि निरनिराळ्या सामाजिक समस्यांचे भान आले. नंतर मी स्वतःच त्या विचारधारेत सापडून आदिवासी भागात कार्य करायला गेलो. ग्रामीण भाग पुष्कळ जवळून पाहिला. समाजशास्त्राचे औपचारिक शिक्षण घेतले. निरनिराळ्या सामाजिक संस्थांशी संबंध आला. लेखन करीत होतोच. सामाजिक संशोधनातही मन रमायला लागले. उत्तर आणि पूर्वेकडचा भाग सोडला तर देश बराचसा पाहून झाला. व्यावसायिक कारणांमुळे परदेश-प्रवासही झाले. मानवशास्त्र व पुरातत्त्वशास्त्र वाचत गेलो तेव्हा आपली भूतकाळातली पाळेमुळेही समजत गेली.

आता अगदी पूर्णांशाने नाही तरी आपला देश बऱ्यापैकी परिचित झाला आहे. तो महान जसा आहे तसा नगण्यसुद्धा. सामर्थ्यशाली जसा आहे तसा दुबळाही. काही बाबतीत श्रीमंत आहे, काही बाबतीत अगदी गरीब. सुधारक जसा आहे तसाच प्रतिगामीसुद्धा. कधी समजल्यासारखा वाटतो, कधी थांग लागत नाही.

ह्या देशाला स्वातंत्र्य मिळून पन्नास वर्षे झाली. माझ्या मनात भारत म्हटले की कोणकोणत्या जाणिवा येतात? पहिल्यांदा जाणवते ते हे की, ह्या देशावर इतिहासाचे प्रचंड ओझे आहे. इतिहास प्रत्येक समाजाला असतो, पण भारतासारखा प्रदीर्घ आणि गुंतागुंतीचा इतिहास फारच थोड्या देशांना असेल. इथला इतिहास हा एकाच वेळी पर्यावरणातील घडामोडींचा,

अनुक्रमणिका







मानवी समूहांच्या स्थित्यंतरांचा, संस्कृतींच्या उदयाचा आणि विनाशाचा, खेड्यांचा आणि नगरांचा, राजकीय उलथा-पालथींचा आणि स्वातंत्र्य व गुलामगिरीचा इतिहास आहे. आजमितीस ह्या ओझ्याखाली देश वाकलेला आहे. आज भेडसावणाऱ्या बहुतेक सर्व प्रश्नांची पाळेमुळे प्राचीन नाहीतर अर्वाचीन इतिहासात सापडतात. भारतीयांची मानसिकता अशी आहे की, ते हे ओझे मानेवरून उतरवू शकत नाहीत.

ह्या देशावद्दल दुसरे जाणवते ते म्हणजे याचा अवाढव्यपणा. भौगोलिक आकाराच्या दृष्टीने भारतापेक्षा अमेरिका, रशिया, चीन, ब्राझील, ऑस्ट्रेलिया इत्यादी देश पुष्कळच मोठे आहेत, आणि लोकसंख्येच्या घनतेच्या दृष्टीने पाहिले तर इंग्लंड, जपान, हॉलंड ह्या देशांत दाटीवाटी जास्त आहे. पण तरीही भारत अजस्र वाटतो. ह्याचे कारण इतर देशांचा मोठेपणा एकपदरी आहे. भारत मात्र आकार, संख्या आणि सामाजिक व्यामिश्रता ह्या सगळ्या बाबतींत अवाढव्य आहे. मानवी इतिहासाच्या ज्या टप्प्यावर आपण उभे आहोत त्या ठिकाणी हा अवाढव्यपणा एक ताकद आहे आणि मर्यादासुद्धा. आपण आपला आकार कशा रीतीने उपयोगात आणतो त्यावर ते अवलंबून आहे. पण ह्या अवाढव्यपणामुळे आपल्या समोरचा प्रत्येक प्रश्न भेसूर रूप धारण करतो हे मात्र खरे. मग तो जातीय दंगलींचा असो, एड्‌सच्या प्रसाराचा असो, वा हवेच्या प्रदूषणाचा.

ह्याशिवाय जाणवते ती इथली अफाट विषमता. ती हर प्रकारची आहे. काही प्रमाणात हा इथल्या प्रकृतीचाच गुणधर्म आहे की काय कळत नाही. कारण निसर्गाचे एक सूत्र असे आहे की उष्ण कटिबंधात वृद्धी कमी होते पण विविधता असते तर शीत प्रदेशात वृद्धी खूप असते पण विविधता कमी. युरोप-अमेरिकेत सजीवांची वाढ पुष्कळ होते पण ते सगळे एकसारखे असतात. भारतासारख्या प्रदेशात त्याच्या उलट आहे. त्यामुळे इथली विषमता ही बऱ्याचदा विविधतेचे रूप घेऊन येते. प्राकृतिक विविधता आनंददायक असते. पण सामाजिक विषमतेचे इथले स्वरूप हे भेसूर, अन्यायकारक आणि करुणास्पद असे आहे. प्रगतीच्या ज्या प्रवाहासोबत आपण चाललो आहोत त्यामुळे ही विषमता कमी होण्याऐवजी वाढतेच आहे.

पन्नासाव्या स्वातंत्र्यदिनी भारताचा विचार करताना इथले प्रश्न, समस्या आणि आव्हानेच आपल्यासमोर येतात हे साहजिकच आहे. कारण आपल्याला आपल्या देशाची काळजी वाटते. ह्या प्रश्नांची वा समस्यांची यादी करायची म्हटली तर ती फार मोठी होईल. ह्या समस्या सुटतील किंवा सुटणार नाहीत. ह्यासंबंधी केवळ भाकिते करून काही साध्य होणार नाही. मला स्वतःला भूक, उपासमार किंवा दारिद्र्य ही समस्या फार काळ टिकणार नाही असे वाटते. ज्याला निखळ दारिद्र्य म्हणतात ते गेल्या तीस-चाळीस वर्षांत पुष्कळच कमी झाले आहे. पण गरिबी जाईल का, ह्या प्रश्नाचे उत्तर देणे कठीण आहे. कारण ती एक तुलनात्मक संज्ञा आहे आणि ती आर्थिक विषमतेच्या पोटी निर्माण होते.

भारतातल्या प्रत्येक नागरिकासाठी स्वाभाविक आकांक्षा काय असू शकते? तर प्रत्येकाला अन्न, वस्त्र, निवारा, स्वास्थ्य, समृद्धी आणि समाधान यांची प्राप्ती. राष्ट्राची उभारणी ही या दृष्टिकोणातून व्हायला पाहिजे. ह्या प्रक्रियेला छेद देणाऱ्या अशा कोणत्या गोष्टी आहेत की ज्यांची चिंता करायला हवी?

ह्या बाबतीत प्रथम जाणवते ते हे की, इथल्या साधन-संपत्तीचा अयोग्य व अनुचित वापर. कुठल्याही प्रदेशातील नैसर्गिक, भौतिक व मानवी साधनसंपत्ती त्या प्रदेशाच्या उन्नतीला पुरेशी आहे की नाही हे त्या संपत्तीच्या उपयोग व उपभोगाच्या प्रक्रियेवर अवलंबून असते. 'योग' करायचा की 'भोग' असा तो प्रश्न आहे. भारतात एका बाजूला साधनांचे प्रचंड दुर्भिक्ष्य तर दुसऱ्या बाजूला आत्यंतिक वैपुल्य असे चित्र दिसते. आपली साधनसंपत्ती ही दूरदर्शित्वाने, विवेकाने आणि संवर्धनशील रीत्या वापरली पाहिजे हा विचारच इथल्या सामाजिक व्यवहारातून जणू हरवला आहे. मग ते पाणी असो, पैसा असो, वीज असो वा वनसंपदा. ह्या बाबतीत श्रीमंत आणि गरीब, सुशिक्षित आणि अशिक्षित, शहरी आणि ग्रामीण किंवा सत्ताधारी आणि सत्ताहीन सर्वच लोक दोषी आहेत. अन्नाची नासाडी, पाण्याची उधळमाधळ, श्रमाची लुबाडणूक, पैशाचा गैरवापर, पर्यावरणाचा विनाश ह्या गोष्टी गरीब व विकसनशील देशाला परवडण्यासारख्या नाहीत.

दुसरी चिंताजनक गोष्ट म्हणजे इथल्या शिक्षणव्यवहाराची दुरवस्था. 'सर्वांना शिक्षण' ही अत्यंत साधी, सोपी गोष्ट पन्नास वर्षांनंतरही साध्य झालेली नाही. महाराष्ट्रासारख्या तथाकथित प्रगत राज्यातही सुमारे पन्नास टक्के मुले सातवीच्या पुढे जात नाहीत. जी जातात त्यांची पुढे जी वाताहत होते ती वेगळीच. सर्वसामान्य समाजाची ही स्थिती तर मग दलित,

भटके, आदिवासी व स्त्रिया यांच्या शिक्षणाकडे तर पाहायलाच नको. विद्यालयीन आणि महाविद्यालयीन शिक्षणाचा दर्जा अत्यंत टाकाऊ आहे. शाळा-कॉलेजांत शिकणाऱ्या लक्षावधी विद्यार्थ्यांना कुणीही वाली राहिलेला नाही. त्यांना औपचारिक शिक्षणच पुरेसे मिळत नाही तिथे नागरी संस्कार, सामाजिक जबाबदारी किंवा राष्ट्रीय उत्तरदायित्व यांचे महत्त्व काय सांगणार? बेकारी, असंतोष, गुंडगिरी, असंस्कृतपणा हे आर्थिक-सामाजिक प्रश्न आहेत असे आपण मानतो; पण ते मूलतः शिक्षणव्यवस्थेच्या दिवाळखोरीतून निर्माण झाले आहेत. हा देश खरं म्हणजे, बुद्धी-कौशल्यांचा न आटणारा समुद्र आहे; पण त्या बुद्धी-कौशल्यांची वाढ होऊच द्यायची नाही असे जर आपण ठरवले तर मग आपल्यासारखे करंटे आपणच.

ह्यासोबतच काळजी करण्याची बाब म्हणजे हा देश उन्नत करण्याची जबाबदारी ज्या सुशिक्षित, बुद्धिवादी लोकांवर आहे त्यांनी पाश्चिमात्य संस्कृती आणि जीवनव्यवहारासमोर पत्करलेली सपशेल शरणागती आणि त्यासोबतच त्यांच्यामध्ये वाढलेली स्वार्थी, आपमतलबी प्रवृत्ती. भारताला परकीय समाजांबरोबरचे संबंध नवे नाहीत. सिंधु-पूर्व काळात, सिंधु-संस्कृतीच्या परिणत अवस्थेत, कुषाण आणि गुप्तांच्या काळात, मध्ययुगात आणि इंग्रजी राजवटीच्या पारतंत्र्यातही पौर्वात्य आणि पाश्चात्त्य देशांशी भारताचे व्यापारी व सांस्कृतिक संबंध आले. भौतिक संस्कृतीच्या प्रगतीमध्ये आपण बहुतांशी परिघावर राहिलेलो असलो तरी भारताची म्हणून एक स्वतंत्र प्रतिमा ह्या सर्व काळात तयार झालेली होती. आज मात्र भारताकडे केवळ एक लुसलुशीत बाजारपेठ म्हणून बुभुक्षित नजरेने पाहिले जाते. ह्याचे कारण इथला बुद्धिवादी उच्चभ्रू समाज आहे. पाश्चिमात्य जीवनाचा झगमगाट, त्यांची विज्ञान-तंत्रज्ञानातील प्रगती, परदेशी कंपन्यांचे मायाजाल आणि सुखविलासी जीवनाचे अनुकरण ह्या गोष्टींची मोहिनी इथल्या उच्चभ्रू समाजावर इतकी पडलेली आहे की, स्थानिक, देशीय, इथल्या मातीतले म्हणून जे जे काही आहे ते ते तुच्छ, कमअस्सल आणि टाकाऊ मानले जाते आहे. बदलत्या परिस्थितीला एक खास भारतीय, अभिजात असा प्रतिसाद देण्याऐवजी हा देश विकून टाकून चैन करावी असे इथल्या समाजधुरिणांना वाटते आहे. स्वार्थ आणि परमार्थ ह्या विषयावर भारतात जेवढे चिंतन झाले आहे तेवढे क्वचितच कुठे झाले असेल. परमार्थाचा पुरस्कार करीत असताना इथे 'स्व-अर्थाला' कधीच गौण स्थान देण्यात आले नव्हते. विनोबा तर म्हणत की, शुद्ध स्वार्थ म्हणजेच परमार्थ. पण आज स्वार्थाला लुटारूपणाचे स्थान प्राप्त झाले आहे.

पाश्चिमात्य संस्कृतीपुढे लोटांगण घेण्याचेच दुसरे एक रूप म्हणजे भारतीय भाषांना मिळणारे गौण स्थान. पारतंत्र्यात असताना भारतीय भाषांचे जे तेज होते ते आता झाकोळत चालले आहे. इंग्रजीचा अंधळा सोस आपल्या अस्तित्वाच्या मुळावर येतो आहे हे इथे लक्षातच घेतले जात नाही. राजकीय गुलामगिरी संपली असली तरी सांस्कृतिक न्यूनगंड शिल्लक आहे. उलट वाढतो आहे.

ह्या बाबतीत देशाचा विचार करताना मला महाराष्ट्राची आणि मराठी भाषेची अपरिहार्य जाणीव होते. ती संकुचित आहे असे मला वाटत नाही. कारण माझा देशीपणा हा मुख्यतः मराठीपणा आहे आणि भारतीय प्रवाहाचाच तो अविभाज्य भाग आहे. माझी मातृभाषा आणि संस्कृती ही संपन्न, समृद्ध आणि सामर्थ्यवान होणे हे भारताच्या दृष्टीने फलदायक आहे अशी माझी मनःपूर्वक धारणा आहे. म्हणून मराठी भाषेत उत्तम दर्जाचे लेखन करणे हे समाजशास्त्राचा अभ्यासक व लेखक म्हणून मला माझे निसर्गदत्त कर्तव्य वाटते.

हा देश कुठे जाणार आहे असा प्रश्न इतरांसारखाच मलाही पडतो. पण तो प्रश्न एवढाच मर्यादित आहे का? माझ्या घराच्या गच्चीवरून किंवा परदेशातील अज्ञात भूमीवरून चांदण्यांनी अपरंपार भरलेल्या आकाशाकडे मी जेव्हा पाहतो तेव्हा हे सगळे विश्वच कुठे जाणार आहे असा प्रश्न मनात येतो. मी एक व्यक्ती म्हणून कुठे जाणार आहे हा प्रश्न तर कायम असतोच. ह्या दोन प्रश्नांची उत्तरे मिळाली तर देश कुठे जाणार आहे हे सांगता येईल कदाचित.



अनुक्रमणिका









# देशाचे स्वातंत्र्य आणि मी

**दत्ता सावळे**

**देश स्वतंत्र होण्यापूर्वी :** देशाला स्वातंत्र्य मिळाले तेव्हा मी पंधरा-सोळा वर्षांचा होतो. पारतंत्र्यातील देश मी पाहिलाय. कुर्डुवाडीसारख्या लहानशा गावात आम्ही तेव्हा राहात होतो. आम्ही राहात असलेल्या गल्लीत काँग्रेसला मानणारे बरेच होते. हिंदुसभेचे एकटे अण्णा दीक्षित होते. सावरकरांचे भक्त होते. भिक्षुकी करीत; पण अस्पृश्यता पाळत नसत. भागापुरच्या सत्याग्रहात त्यांनी भाग घेतला होता. घरी दारिद्र्य. सत्याग्रहात त्यांच्या नित्य पूजा सुटल्या. श्रीमंत यजमानांना त्यांच्या श्रीमंती चोचल्याविरुद्ध ते फटकारत. त्यांचा मुलगा मुकुंदा संघाची शाखा चालवी. अप्पांना संघ सावरकरवादी वाटत नसे, तरीही मुकुंदाला ते चालवू देत. त्या सत्याग्रहाच्या वेळी घरात साऱ्यांचे खाण्याचे हाल झाले; पण आमच्या गल्लीने त्यांची फारशी दखल घेतली नाही. आम्ही बहुसंख्य मुले सेवादलात जायचो. आम्हाला संघ आवडत नसे. मुकुंदाला सेवादल आवडत नसे. दलात मुसलमान मुले येतात, खाटिक मुले येतात, म्हणून त्याचा राग. मुकुंदा आमचा दोस्त होता.

१९४२ पासून मी सेवादलात जात असे. खेळ, गाणी, स्वातंत्र्यासाठी लढत असलेल्या नेत्यांची, क्रांतिकारकांची चरित्रे तेथे सांगत. मनात अशीच सणक यायची की, आपणही पुढे भगतसिंग, चंद्रशेखर आझाद बनावे. आम्ही आपल्याला काँग्रेसवाले म्हणवून घेत होतो. गांधीजी आवडायचे तसे स्वातंत्र्यवीर सावरकरही आवडत. सेवादलातील दोघे तरुण आम्हाला त्या वेळी हिरो वाटायचे. त्यांपैकी श्री. चंद्रकांत शहा, देखणे. छान खादीचे कपडे घालीत. श्रीमंत होते. दुसरे श्री. दास, काळे-सावळे. अंगाने किरकोळ. घरचे गरीब. घरी अंधळे वडील व विधवा बहीण. वार लावून इंग्रजी शाळेत शिकत होते. छान गायचे. माझ्या घरीही त्यांचा एक वार होता. मला ते गणित, भाषा इत्यादि विषय शिकवायचे. गणपतीच्या दिवसांत गणपती करायचे. चित्रे उत्तम काढत. त्यांनी एकदा *एकच प्याला* नाटकात सुधाकरचे काम केले होते. सेवादलात सर्वांनाच ते आवडत. आमच्या शहरातल्या शाखांचे प्रमुख शहाच होते. मोठी मंडळी त्यांच्याकडेच उतरत. दास स्वतःच्या घरात रात्री झोपत नसत. फार लहान घर होते. रोजची शाखा संपल्यावर, देशात सध्या काय चालू आहे, काँग्रेसची भूमिका काय आहे, मोठे नेते काय म्हणतात यांविषयी मुलांना माहिती सांगत. गफूर म्हणून एक मित्र होता. रोज सेवादलात यायचा. देश स्वतंत्र झाला म्हणजे मला तुमच्या देवळात येता येईल, तुला आमच्या मशिदीत; असे नेहमी म्हणायचा!

त्याच सुमारास १९४२ चे आंदोलन सुरू झाले. नऊ ऑगस्टला आम्ही मुलांनी शाळा बंद पाडली. शाळेच्या प्रवेशद्वारातून मुलांना परत पाठवत होतो. गांधीजी, नेहरू यांच्या जयजयकाराच्या घोषणा देत होतो. 'त्यांना अटक झाली आहे. आज शाळेत जाऊ नका', असे आम्ही सर्वांना सांगत होतो. देशाच्या स्वातंत्र्यासाठी 'करा किंवा मरा' असे नेत्यांनी सांगितले आहे, असेही सर्वांना सांगत होतो. शाळा जवळजवळ ओस पडली. दुसऱ्या दिवशी आम्ही नेहमीसारखे शाळेत गेलो. आम्हाला हेडमास्तरांनी त्यांच्या ऑफिसमध्ये बोलावून घेतले. आम्हाला वाटले. आता आपल्याला छड्या मिळणार. हौतात्म्याचा भाव चेहऱ्यावर आणून ऑफिसमध्ये गेलो. त्यांनी आम्हाला विचारले, "काल शाळेत का आला नव्हता?"

"आमचा हरताळ होता."

"कशासाठी हरताळ होता?"

"आमच्या नेत्यांना सरकारने अटक केलीय, म्हणून."

"आज तुमच्या नेत्यांना सरकारने सोडलेय काय?"

"नाही."

"मग आज तुम्ही शाळेत का आलात? आज हरताळ का नाही?"

आमच्याकडे त्या वेळी उत्तर नव्हते. वर्गात जाऊन बसलो.



अनुक्रमणिका

बेचाळीसचे आंदोलन पुढे तापत गेले. सुरुवातीला सत्याग्रह होत होते. आमच्याही गावात काही दिवस सत्याग्रह झाले. पाच, दहा, पंचवीस अशा संख्येने सत्याग्रह होत. त्यांना अटक होई. आम्ही घोषणा देऊन त्यांना निरोप द्यायचो. पुढे सत्याग्रह रोडावत गेले. अनेक कार्यकर्ते भूमिगत झाले. सशस्त्र क्रांतिकारी लढ्याला बळ मिळू लागले. अनेक क्रांतिकारकांच्या कहाण्या ऐकताना शरीरावर रोमांच उभे राहत होते. अच्युत-अरुणाचे फोटो जवळ होते. नाना पाटील, रत्नाप्पा कुंभार, वसंतदादा पाटील, एस.एम., शिरुभाऊ यांच्या नावांचे नित्य उच्चारण होत राही.

श्री. दास यांना अटक झाली. दीड-दोन वर्षांनंतर त्यांना सोडून देण्यात आले, तेव्हा गावाने त्यांचे भव्य स्वागत केले. वावत्र बैलजोड्यांनी सजवलेल्या बैलगाडीतून त्यांची गावभर मिरवणूक काढली. अनेक जागी त्यांना ओवाळण्यात आले. गावातील बरीच श्रीमंत, व्यापारी मंडळी मिरवणुकीत होती. आम्ही सेवादलाची मुले तर होतोच. आमच्या गल्लीत मिरवणूक येताच दास गाडीतून उतरले, अण्णांच्या घरी गेले नि त्यांच्या पायावर डोके टेकून त्यांना नमस्कार केला. अण्णांनी त्यांना उराशी कवटाळले. दास गाडीत येऊन उभे राहिले, तेव्हा त्यांचे डोळे आसवांनी डबडबले होते. मिरवणूक केव्हातरी संपली. अण्णांसारख्या हिंदुसभावाल्याच्या पायावर दासांनी डोके टेकावे, हे बऱ्याच जणांना खटकले होते. कुणीतरी हे बोलून दाखवले. दास त्यावर म्हणाले, "आपण कोठेतरी बसून बोलू." देवळाच्या पायरीवर आम्ही बसलो. "ज्या अण्णांनी काँग्रेसला, गांधीजींना शिव्या वाहिल्या त्यांना तुम्ही दंडवत घालता हे काही आम्हाला आवडले नाही," एकजण म्हणाला. दास त्यावर गंभीरपणे म्हणाले, "गड्यांनो, आज स्वतःला, काँग्रेसवाले म्हणवून घेणारे, आजवर इंग्रज सरकारचे ठेकेदार दलाल म्हणून काम करीत होते. अण्णा खरे देशभक्त आहेत. गेली दोन वर्षे, माझ्या घरी माझ्या अंधळ्या बापाला व विधवा बहिणीला न चुकता या बामणाने दोन वेळ भाकरतुकडा पोहोचवला. कुठलाही गाजावाजा न करिता! हे मला वडिलांनी सांगितले म्हणून कळले. या 'देशभक्तां'नी या दोन वर्षांत चुकूनदेखील माझ्या घरच्यांची चौकशी केली नाही. अण्णा देशभक्त नाहीत?" आम्ही चूप.



माझे दोन मामा स्वातंत्र्य आंदोलनात सामील झाले होते. माझ्या आजोळी अठरा विश्वे दारिद्र्य होते. शिकल्यासवरलेल्या, नोकरीवर असणाऱ्या मोठ्या मुलाने नोकरी सोडून १९३०च्या आंदोलनात उडी घेतली, तरीही माझ्या आजोबांनी कधी तक्रार केली नाही. धाकट्या मुलाने १९४२ च्या भूमिगत लढ्यात उडी घेतली, तेव्हा माझी आजी म्हणाली, "बाबा, हे आमच्या रक्तातच आहे."

आजोबा टिळकभक्त. मोठे मामा रॉयवादी. धाकटा मामा १९४२च्या आंदोलनात सामील झालेला. घरी खायची भ्रांत. ताक-कण्या आजी मुलींना द्यायची. धाकटा मामा माझा हिरो होता. सातारा-कोल्हापूर भागातील प्रतिसरकारच्या आंदोलनात तो सामील होता. उंचा-पुरा. दाढी वाढवलेला. कधीतरी अवचित उगवायचा. रात्री-बेरात्री यायचा. झोपून राहायचा. आला तसा अवचित निघून जायचा. एका पहाटे तो आला. त्याच्या मागोमाग साध्या पोषाखातील पोलिसाने दरवाजा ठोठावला. "कुणी मुंबईहून आले आहे काय, त्यांचे पैसे द्यायचे राहिलेत." त्याने सांगितले. आईने कसे काय ताडले कुणास ठाऊक; पण, कोणी आले नाही, असे सांगून दार लावून घेतले. मामाच्या बॅगेत चकचकीत पिस्तुले होती. आई आजोबांच्या हाल-अपेष्टांविषयी बोलू लागली. तेव्हा मामा म्हणाला, "आक्का, येवढा लढा संपू दे. देश स्वतंत्र झाला की हे सारे सोडीन. नोकरी करीन. काकांचे हाल दूर करीन. परवा धुळ्याचा खजिना लुटला तेव्हा रत्नाप्पाण्णा म्हणाले होते, 'धनंजय, तुझ्या घरचे हाल आहेत. थोडे पैसे घरी देऊन ये.' मी त्यांना म्हणालो, 'अण्णा, घरच्या अडचणी सोडवण्यासाठी मी लढ्यात आलो नाही. घरी दैन्य आहे, म्हणून का या पैशाने ते दूर करू?' देश स्वतंत्र होऊ दे. नोकरी करीन. मजुरी करीन. घरचे दैन्य दूर करीन..." मामा सांगत होता. मी अंथरुणात पडून ऐकत होतो. देश स्वतंत्र झाला. त्याला नोकरी मिळाली नाही. प्राथमिक शाळेत मास्तर होण्यासाठी धडपडला; सोलापुरला कापडाच्या गिरणीत नोकरी शोधली... पुढे खूप वर्षांनी स्वातंत्र्य सैनिकांना पेन्शने सुरू झाली. तेव्हा तो नव्हता. त्याचा शोकान्त हे स्वातंत्र्यलढ्याचे अपयशच होते.



माझ्या मावशीचे गाव सातारा जिल्ह्यातले. तिकडल्या खेड्यातली ही गोष्ट. एका गावाने सत्याग्रहासाठी पाचजण देण्याचे मान्य

केले होते. आयत्या वेळी एकजण गळाठला. बाहेरगावची मंडळी, "कसले तुमचे गाव. दिलेला शब्द पाळत नाही" अशा हेटाळणीच्या भाषेत बोलत होती. तेथे एक गृहिणी भांडी विसळत हा संवाद ऐकत होती. तिने भांडी तशीच सोडली. मुलीला हाक मारली. "ही भांडी विसळून घे अन् तुझ्या बाला सांग मी सत्याग्रहात गेली म्हणून... आपल्या गावानं कबूल केलंय, पाच सत्याग्रही द्यायचं. एक आला नाही म्हनं. मी चालली त्याच्या जागी." सत्याग्रहात तिने भाग घेतला. सत्याग्रहींना बैलगाडीतून पोलीस तालुक्याच्या गावी नेत होते. त्या माऊलीचा नवरा मागून धावत येत होता. तेव्हा गाडी थांबवली. तिचा नवरा धापा टाकत गाडीसमोर उभा राहिला नि म्हणाला, "मला समदं कळलय. तू विनघोर जा. मी बघतो पोराकडं. माफी-बिफी मागू नगंस." तेवढं म्हणून तो परत फिरला.

दुसरे महायुद्ध सुरू झाल्यावर काही दिवसांनी आमच्या शाळेतील एका चांगल्या शिक्षकाने सैन्य-भरतीच्या प्रचारासाठी एक प्रहसन लिहिले होते. त्यात मला एक छोटीशी भूमिका होती. गाणी होती. अवती-भोवतीच्या गावांतून ती नाटुकली व्हायची. एकदा गांधी टोपी सोडून पोलिसांच्या पिंढऱ्यांना बांधणाऱ्या पट्ट्यांची टोपी घालून मी शाळेत गेलो. तो, प्रभू दयाळ म्हणून माझा मित्र व सेवादल सैनिक मला म्हणाला, 'ही कसली सरकारी टोपी घातलीयस? सरकारच्या नाटकात काम करतोस तेव्हा त्यांनी दिली वाटते!' त्यानंतर ती टोपी मी घातली नाही, की त्या नाटकात कामही केले नाही.



आम्ही कुर्डुवाडी सोडली नि पंढरपुरी राहायला आलो. मध्ये मराठी सातवी पास झालो. पंढरपुरच्या एका खाजगी हायस्कूलमध्ये एका वर्षांत तीन इयत्ताच्या क्लासमध्ये जाऊ लागलो. तेवढ्यात प्लेगची साथ सुरू झाली. त्या काळात आजोळी बिलूरमध्ये भरपूर राहता आले. दुसरे महायुद्ध संपले होते. आंदोलनही संपुष्टात आले होते. क्रांतिकारकांच्या गटागटांतील देणी-घेणी पुरी करण्यास सुरुवात झाली होती. त्या सुमारास बिलूरच्या एका प्रख्यात कापड व्यापाऱ्याच्या घरावर-दुकानावर क्रांतिकारकांनी दरोडा घातला होता. क्रांतिकारकांनी त्याच्याकडे ठेवलेली रक्कम देण्याचे त्याने नाकारले होते. म्हणून हा दरोडा होता. गावाची सहानुभूती चळवळवाल्यांकडे होती. पुढे त्यातील प्रमुख कार्यकर्त्यांवर खटले भरले गेले. सारे निर्दोष सुटले. माझ्या मामाचा त्यात पुढाकार होता, असे सारे गाव म्हणत होते.



त्याच सुमारास संस्थान हद्दीत प्रजा परिषदेचे आंदोलन जोरात होते. जत हे एक संस्थान होते. बिलूरसारख्या गावात प्रभातफेऱ्या, मिरवणुका, शिबिरे होत राहात. आम्ही सेवादलातील पोरे, काही तरुण, गावातल्या शिंदी-दारूच्या गुत्त्यावर पिकेटिंग करीत होतो. बाहेरून येणारी शिंदीची मडकी फोडत होतो. एकदा गांजा जाळला. गांजाची दुकाने बंद करायला लावली. पुढे स्वातंत्र्य मिळाल्यानंतर ती सारे दुकाने राजरोसपणे सुरू झाली. जतचे राजे लोकप्रतिनिधी म्हणून विधान परिषदेत अनेकवार निवडून आले. सुरुवातीला काँग्रेस-विरोधक म्हणून. पुढे काँग्रेसच्या वतीने. पुढे ते खासदारही झाले.



**स्वातंत्र्यानंतर :** १५ ऑगस्ट १९४७ ला स्वातंत्र्य मिळाले. सर्वत्र उत्सवाचे वातावरण होते. आमच्यासारख्या अराजकीय शाळेतदेखील उत्साहाला भरते आले. त्या दिवशी शाळेतील सर्व विद्यार्थ्यांना खाऊ वाटला गेला. प्रत्येक मुलाला पेढ्याचा एक पुडा देण्यात आला. आमच्या मित्रांपैकी अनेकांना पेढ्याऐवजी पुड्यात गुळाचे खडे मिळाले!

मध्येच घरच्या परिस्थितीने मला शाळा सोडावी लागली. पंढरपुरभोवतीच्या गावांत बाजाराच्या दिवशी तयार कपडे, होजिअरी विकत होतो. सेवादल मागे पडले. बाहेरून नववी-दहावी केली नि मॅट्रिकला पुन्हा शाळेत आलो. निकाल लागण्यापूर्वीच, एका मित्रासोबत समाजवादी पक्षाने सुरू केलेल्या सत्याग्रहात, घरी न सांगता सामील झालो. एका महिन्याची शिक्षा झाली. येरवड्यात राहायला मिळाले. पंढरपुरी सेवादलाच्या, प्र.सो.पा.च्या कार्यकर्त्यांनी आमचे स्वागत केले. परिवारात सामील करून घेण्याची उत्सुकता दाखवली. घरातून नोकरी करण्याविषयीचा आग्रह होता. राजकीय पक्षात काम करावे, असे एका बाजूला वाटत होते. पुढे शिकावे, असेही वाटत होते. कोणत्या पक्षात काम करावे हे ठरत नव्हते. गावात फार पर्याय उपलब्ध होते असे नाही; पण समाजवादी पक्ष का शेतकरी कामगार पक्ष असा विकल्प होता.

त्याला कारण त्यावेळचे एक कार्यकर्ते – भाई राऊळ त्यांचे नाव. सुरुवातीला ते कम्युनिस्ट पार्टीत होते. पुढे रॉयवादी झाले. मुंबईत-सोलापुरी कामगार चळवळीत त्यांनी काम केले होते. रॉयनी आपल्या पक्षाचे विसर्जन केल्यानंतर त्यांनी शे.का. पक्षात काम करायला सुरुवात केली होती. चाळीशीच्या आतले वय. काळे-सावळे, मध्यम उंचीचे. तरतरीत. देखणे वाटावेत असे. कपडे व्यवस्थित. आधुनिक. राजकीय दृष्ट्या अत्यंत सक्रिय. अजोड वक्तृत्व. विचार करण्याची, मांडण्याची विलक्षण हातोटी. माझ्या थोरल्या मामांचे सहकारी. घरचे दारिद्र्य. मोठे कुटुंब. विचार करण्याची, विश्लेषणाची मूलगामी पद्धती! वैचारिक संघर्षात घणाघाती हल्ला करण्याची आक्रमक शैली. या साऱ्यामुळे मी त्यांच्याकडे आकृष्ट झालो होतो. त्यांचे एक अभ्यास मंडळ होते. त्यांच्याबरोबर, त्यांचे एक सहकारी मित्र भाई ढोलेही अभ्यास मंडळात होते. वेगवेगळ्या विचारधारांचा परिचय तेथे झाला. वास्तवाची चिकित्सा करण्याची त्यांची पद्धत मनावर परिणाम करून गेली. वेगवेगळ्या विचारधारांच्या राजकीय पक्षांकडूनच देशाचे भवितव्य घडू शकेल, अधिक रास्त विचारांच्या पक्षाला ही संधी अधिक, असे वाटू लागले.

भाई राऊळ एक वेगळ्याच कुवतीचे लोक-संघटक होते. लोकशक्तीला संघटित करण्यात त्यांना जेवढे यश मिळाले तेवढे यश मी अन्य संघटकांत क्वचितच पाहिले आहे. भाई राऊळ व साथी जोशी पंढरपुरात कामगार संघटनांत एकत्र काम करीत होते. नगरपालिका कामगारांचीही त्यात एक संघटना होती. सफाईकामगार भाईंना फार मानत. भंगी, दलित कामगार भाईंवर जीव टाकीत.

त्यांच्या अभ्यास-मंडळामुळे देशातील एक वेगळेच वास्तव समोर आले. मध्यम वर्गीयांपलीकडे फार मोठा समाज देशात आहे; त्यांच्या वास्तवाचे भान फारसे आपल्याला नाही, हे प्रथमच तीव्रपणे जाणवले. देश स्वतंत्र झाला; म्हणजे इंग्रज येथून गेलाय येवढंच घडलंय. ज्यांनी इंग्रजी राज्यात भागिदारी केली होती, त्या धन व प्रतिष्ठेने बड्या असलेल्यांच्या हाती स्वराज्यात सारी सत्ता एकवटली. त्या दृष्टीने पुढे आलेला एक अनुभव येथे मुद्दाम सांगावासा वाटतो. १९७७ नंतर देशभरातील आदिवासी भागात कार्यकर्त्यांच्या प्रशिक्षणासाठी, शिबिरांसाठी अनेक ठिकाणी जाता आले. असाच मध्यप्रदेशातील झाबुआ भागात एका प्रशिक्षणासाठी गेलो असताना, मामा बाळेश्वर दयाळ यांच्याबरोबर काम केलेल्या जुन्या समाजवादी कार्यकर्त्यांबरोबर चर्चा करायला मिळाली. त्यांना मी एक प्रश्न विचारला होता, "तुम्ही इंग्रज येथून जावेत म्हणून काँग्रेसमध्ये राहून लढलात. त्याच काँग्रेसचे सरकार स्थापन झाल्यावर, स्वराज्यात तुम्ही त्यांच्या विरुद्ध आंदोलन केलेत, शस्त्रदेखील हाती घेतलेत. ते का?" त्या कार्यकर्त्यांनी – ते त्याच आदिवासींपैकी होते – दिलेले उत्तर मोठे बोलके होते. ते म्हणाले, "आम्हाला वाटत होते गांधीबाबाचे राज्य (म्हणजे स्वराज्य) येईल तेव्हा येथे जमीनदार असणार नाहीत. सावकार असणार नाहीत. फॉरेस्ट खाते असणार नाही. स्वराज्य आले पण ही मंडळी गेली तर नाहीतच; उलट तीच सरकारात गेली. तेच काँग्रेसचे मालक बनले! आम्हाला वाटले, हे आमचे सरकार नाही. इंग्रजांचे राज्य संपले नाहीच! म्हणून आम्ही लढलो." समाजपरिवर्तन झाले नव्हते. सत्ता, प्रतिष्ठा, धन यातले सामान्यांना काही मिळाले नव्हते. बहुसंख्य शेतकरी, राबणारे, वंचित लोक कालच्याप्रमाणे आजही सत्ताहीन, साधनहीन असेच राहिले.

भाईंनी पंढरपूर वेगळ्या तऱ्हेने समजावून दिले. तसे ते पूर्वी समजले नव्हते. नगरपालिकेच्या निवडणुकांसाठी गावाचे नऊ की चवदा वॉर्ड पाडलेले होते. या साऱ्या वॉर्डांतून काही प्रतिष्ठित, संपन्न घराणी होती. आजही आहेत. त्यांना सामान्य लोक श्रीमंत, धनी, मालक असे संबोधीत. त्या मालक घराण्यांत मतभेद असत. त्यांचे पक्ष असायचे. त्या मालकांपैकी कोणाला तरी निवडून देणे हे मतदारांचे कर्तव्य! स्वातंत्र्य मिळाल्यावर यांतील काहीजण काँग्रेसमध्ये आले. काँग्रेसचे पुढारी नवे मालक झाले. राखीव वॉर्ड असत, त्यातून अस्पृश्य उमेदवारच निवडले जात; पण ते कुणातरी मालकाचे बांधील असत. त्यांच्या पोटात त्यांचे अस्तित्व असे. मालकांची बांधील माणसे असत. ते मत देत; पण ते मतदार कधी झाले नव्हते. गावात राहणाऱ्या असंख्य गरीब, दुबळ्या, प्रतिष्ठाहीन जाती असून नसल्यासारख्या. त्यांना मते होती. ती आपल्या इच्छेप्रमाणे देण्याचे स्वातंत्र्य नव्हते! स्वातंत्र्यापूर्वी अशाच निवडणुका होत. स्वातंत्र्यानंतरही तशाच. विधानसभा, लोकसभेच्या निवडणुकीतही हे असेच. १९५७ च्या निवडणुकीपर्यंत आमच्या भागातील दलित उमेदवाराला, सवर्ण उमेदवाराच्या सतरंजीवर बसू दिले जात नव्हते.

या बिनचेहऱ्याच्या, असंख्य दुबळ्या, कमजोर घटकांना भाई राऊळांनी अशा तऱ्हेने संघटित केले की, त्यांची राजकीय/






सामाजिक जाण वाढून ते आपला मनुष्यपणाचा हक्क वजावण्यास तयार झाले. त्यांनी परंपरागत मालकांच्या आधाराशिवाय स्वतःकडे पाहायला सुरुवात केली. आपल्या अस्तित्वाचे भान वाढत गेले, तसे ते जुन्या मानसिकतेतून बाहेर येऊ लागले. दलित, पारधी असे काही समूह मालकांच्या कचाट्यातून बाहेर आले. त्याचे पडसाद नगरपालिकेच्या निवडणुकीत उमटले. १९५७ मध्ये विधानसभेवर तालुक्यातील मतदारांनी भाईंना निवडून दिले. संयुक्त महाराष्ट्र समितीला सोलापूर जिल्ह्यातील निवडणुकीत मोठे अपयश मिळाले असताना भाईंना लोकांनी निवडून दिले होते. पुढे दीड वर्षांतच भाई वारले. पण त्यांच्या संघटनाकौशल्याचे वैशिष्ट्य मनात राहून गेले. कमजोरांमधून लोकशक्तीचे सृजन होऊ शकते हे जाणवून गेले.



महाविद्यालयीन शिक्षणासाठी मी सांगलीला गेलो. सकाळी कॉलेज, दुपारी दुकान; पण लवकरच दुकान बंद करावे लागले. त्या दुकानाभोवती चांभारांची दुकाने बरीच होती. त्यांतील काहीजणांशी मैत्रीचे संबंध जुळून आले. पुढे पाच-सहा वर्षे त्यांच्यावरोबर काम केले. समाजवादी पक्षाचे कामही करीत होतो. चांभारांच्या संघटनेमुळे कामाला गती आली. सांगली-मिरजेच्या भोवती बरीच चांभारांची वस्ती आहे. कसबी कामगार; पण सारेच्या सारे कर्जबाजारी. आठ महिन्यांत कमवायचे, चार महिन्यांत गमवायचे. पावसाळ्यात बहुतेकांना कर्ज काढावे लागे. पावसाळ्यात कारागिरांना आपला माल तोट्यात विकावा लागत असे. समजा, ८० रुपयांना २० जोड्या चपला, अशी उत्पादनाची किंमत असेल, तर ६० रुपये, ४० रुपये खंडी त्यांना विकावी लागत असे. जी गत कारागिरांची, तीच पॉलिशवाल्यांची, नाळ-खिळेवाल्यांची. सारे कर्जबाजारी. बांधील गड्यांसारखे दलालांशी वा मालकांशी बांधलेले. काम करूनही त्यांना जगण्याचे स्वातंत्र्य लाभलेले नव्हते.

त्यांची एक सोसायटी बनवली. कारागिराने काम करून जोडी तयार केली की, त्याची मजुरी शेअर भांडवल म्हणून जमा होई. इतर पॉलीशवाले, सेल्समन तेजीच्या काळात रोख पैसे शेअरपोटी देत. त्यातून फाडीत (कच्चा माल) आणीत असू. भांडवल वाढत गेले. धंदाही वाढला. दोन वर्षांत, पावसाळ्यात बिगर-सभासदांकडून रु. ८०/- ला खंडी अशी खरेदीही सुरू केली. आणि पुढील तीन-चार वर्षांत ती सोसायटी मोडीत काढायला निघाली! ही सोसायटी मोडीत निघण्यात, बाहेरच्या मंडळींचा जसा हात होता, तसेच अन्तर्गत कारणानेही ती तुटली. प्रमुख दोन कार्यकर्त्यांना बाहेरच्या व्यापाऱ्यांनी चांगल्या पगाराच्या नोकऱ्या देऊन या सोसायटीच्या कामापासून अलग केले. अन्य क्षमता असलेल्या दोन-तीन कार्यकर्त्यांना हे काम नुसते अनाकर्षक वाटले असे नाही, तर अवमानकारक वाटत होते. भूपालसारखा एक कार्यकर्ता नेहमी म्हणायचा, "आयुष्यभर काय वेण्या घालत बसू? की जोड्या मोजत बसू? – हे काम जन्माचेच मागे लागलेय. यातून सुटण्यासाठी या मंडळात आलो... आणि यात अधिकच गुंतत चाललोय." असे असमाधान घेऊन काम मनापासून होईना. शोषणाविरुद्धची लढाई म्हणून सुरू झालेले काम, एक व्यवसायच वाटू लागला. वरील उद्गार काढणारा भूपाल हा दारूच्या आधीन गेलेला आमचा पहिला कार्यकर्ता! नंतर आठ-दहा मस्त कार्यकर्ते दारूने संपले. एक पिढी संपुष्टात आली.

सांगलीत कामगार संघटनांचे काम सुरू केले. बापू मगदूमसारख्या मित्राने सर्वस्व ओतून त्यांना आकार दिला. जि.प. कामगार, हमाल यांच्या संघटना नावारूपाला आल्या. त्यांच्या पतसंस्था सुरू केल्या. त्या कामगारांतील काहींना हाताशी धरून, पक्षातील सहकाऱ्यांनीच बापूला मारझोड करवली – ज्याने अर्धपोटी राहून, सात-आठ वर्षे वणवण केली त्या बापूला मार खावा लागला!

माझे लग्न झाले. पदवीधर झालो. दोघांचे युनियनवर पोट भागणे तेव्हा शक्य नव्हते. म्हणून उत्तुरला शाळेत नोकरी पत्करली. सेवादलाचे दोघे मित्र तेथे एक हायस्कूल चालवीत होते; त्यांना जाऊन मिळालो. प्रथमच मी एका खेड्यात राहात होतो. छोट्या शेतकऱ्यांची संख्या त्या भागात जास्त. त्यांचीच मुले शाळेत जास्त. त्या मुलांत काम करताना मजा आली. परिवर्तनावर त्यांचा विश्वास वाढत गेला. अनेक प्रसंगांनी मुलांच्या गावी, घरी जायचो. चोवीस तास मुले भोवती असत. पोहण्यापासून ते अभ्यासापर्यंत, सहलीपासून ते कीर्तनापर्यंत साऱ्या गोष्टींत मुले भाग घेत. मुले अनेक गोष्टी शिकली. अभ्यासातही उत्तम प्रगती असे. नोकरीच करायची तर शिक्षकाची हे मनात पक्के झाले.



दोन वर्षांनी पंढरपुरी परतलो. गौतम विद्यालयात नोकरी मिळाली. हे माध्यमिक विद्यालय प्रामुख्याने दलितांचे होते. ग्रामीण भागातील दलितांची, शहरातील सफाईकामगारांची

मुले या शाळेत बहुसंख्येने होती. सुरुवातीला शिक्षक म्हणून, १९६५ पासून मुख्याध्यापक म्हणून तेथे बारा-तेरा वर्षे काम केले. त्याच काळात संयुक्त समाजवादी पक्षाचेही काम सक्रियपणे करीत होतो. इतर संघटनांतही सक्रीय होतो. येथील कामगार संघटना, शेतकरी उत्कर्ष पंचायत, दलित संघटना अशांसारख्या संघटनांतून काम करीत होतो. १९६४ ते ६८ या काळात पक्षाचे काम म्हणजे अनेक चळवळीतला सहभाग होता. अनेक वंचित/शोषित समाजघटकांना भविष्य नसल्यासारखेच होते. ज्यांना भविष्य नाकारलेले असते, त्यांना स्वातंत्र्यही नाकारलेले असते. अशांच्या संघटना बांधण्यावर, चळवळी संघटित करण्यावर कामात भर होता. त्यामुळे पक्षाच्या कामात मन रमायचे. तुरुंग, फावडे, मतपेटी ही समाजवादी चळवळीची प्रतीके, काही काळापुरती सजीव, अर्थपूर्ण झाल्यासारखी वाटली. मुस्लिम सत्यशोधक चळवळ, 'एक गाव : एक पाणवठा' यांना संसोपाने आकार दिला. जमिनीच्या फेरवाटपाचा प्रश्न पुन्हा लोकांसमोर आणला. शोषणात्मक वर्ग/वर्णपद्धतीविषयीची जाण व्यक्त झाली. तरीही पुढाकार मध्यमवर्गीयांचाच राहिला.

१९६७ नंतरच्या अनेक राज्यांमधील विरोधी पक्षांच्या आघाड्यांच्या संविद सरकारांच्या प्रयोगाने संसोपाचे जन-आंदोलनात्मक रूप पालटले. सत्ताकांक्षा बलवत्तर झाली. समाजातील संख्येने मोठ्या, वंचित जातींमध्ये ती बळावत गेली. १९७१ च्या संसोपाच्या पुणे सम्मेलनात हे तीव्रपणे जाणवले. राजनारायण आणि कंपनीच्या दादागिरीपुढे सर्वांना शरण जावे लागले. एस.एम. सारख्यांना अवमानित करण्यात आले. तेव्हा तीव्रपणे जाणवले की, असे राजकीय पक्ष सत्ता काबीज करण्याची हत्यारे आहेत; समाजपरिवर्तनाची नाहीत.

संघर्षाएवढेच राष्ट्रबांधणीला, समाजबांधणीला स्वातंत्र्य-प्राप्तीनंतर महत्त्व द्यावयास हवे होते. गांधीजी सोडून, अन्य राजकीय नेत्यांनी त्याला महत्त्व दिले नाही. संघर्षामुळे समाजरचनेत बदल व वंचित/शोषितांच्या पुढाकाराखाली नव्या समाजाची/राष्ट्राची बांधणी व्हावयास हवी. राजकीय पक्षांनी, प्रस्थापितांनी हे होऊ दिले नाही. जमिनीच्या फेर-वाटणीचाच प्रश्न घ्या. पारतंत्र्यात जमीनदारी, मालगुजारी, खोती यांसारख्या अन्यायी व्यवस्था रूढ होत्या. त्याचा इंग्रजांना लाभ झाला. त्यांच्या जमिनी कसणाऱ्यांना, शेतकऱ्यांना मिळायला हव्या होत्या. जमीनदारी उन्मूलनाचे कायदे झाले; जमिनी जमीनदारांच्या घरातच राहिल्या. अगदी भूदानात मिळालेल्या जमिनींचेही वाटप धड झाले नाही. त्या ज्यांना मिळाल्या, त्या कमजोरांचे संघटन उभे राहिले नाही. त्यांची ताकद वाढली नाही. बिहारसारख्या राज्यातून त्या जमिनी बलशाली लोकांनीच बळकावल्या. केरळ-बंगालसारख्या राज्यांत, जेथे किसान सभेच्या चळवळी झाल्या, तेथे कमजोरांना जमिनी मिळाल्या. अनुत्पादक लहान-लहान तुकडे त्यांच्या हाती आले. अशांचे संघटन झाले नाही. त्यांच्या बाबतीत संघटन-रचना यांना प्राधान्य देणारे जन-आंदोलन झालेच नाही. शेतीवर राबणाऱ्या शेतकऱ्यांना, कुळांना, वेठ करणाऱ्या मजुरांना स्वातंत्र्य मिळालेच नाही. जमिनींच्याबाबत तेलंगणा, नक्षलबाडीसारखे सशस्त्र उठाव झाले. भूदान-ग्रामदानसारख्या अहिंसक चळवळी झाल्या. जमीनदारी उन्मूलनाचे, कूळकायद्यांसारखे कायदे झाले. ही तिन्ही आंदोलने सफल झाली नाहीत.

या संदर्भात, १९७४-७५ सालातील बिहार आंदोलन, क्रांतिकारी समाजपरिवर्तनाच्या संकल्पनेच्या दृष्टीने, संघटन व पद्धतीविषयक नव्या वाटा शोधण्याच्या दृष्टीने फार मोलाचे वाटले. एका उद्रेकात्मक, पॉप्युलिस्ट आंदोलनातून व्यापक समाजपरिवर्तनाचे आंदोलन बनवण्याच्या प्रक्रियेत जयप्रकाशजींनी फार मोलाची भर घातली. अहिंसक मार्गाने लोकशक्ती संघटित करण्यात, त्यातून अन्यायी, अत्याचारी, हिंसेवर आधारित व्यवस्थेला बदलण्यास लोकांना तयार करण्यात त्या पंधरा महिन्यांत जे यश मिळत गेले ते पाहून माझ्यासारख्या कार्यकर्त्याला काही वेगळेच घडत आहे असे वाटून गेले. संघटन, लोकलढ्यांतून लोकशक्ती बांधण्याच्या पद्धतीची जाण विस्तारत गेली. गावपातळीवर आझाद सरकारचे जे थोडे प्रयास झाले त्यात संघटित लोकशक्ती कशी असेल, लोकशाहीकरणाची प्रक्रिया तळातून कशी आकारेल याचा अंदाज येऊ लागला. राजकीय प्रातिनिधिक लोकशाहीला खरेखुरे आधार गावांतून, लोकांतून कसे उभे राहतील याचा अंदाज येत गेला. जमिनीच्या फेरवाटपाचे एक सशक्त हत्यार येथे तयार होत होते. पण इलाहाबादची, इंदिरा गांधींची निवडणूक रद्द ठरवल्यानंतर हे बुनियादी क्रांतिकारी आंदोलन एका पॉप्युलिस्ट आंदोलनात परिवर्तित झाले आणि ही आशा संपुष्टात आली! विरोधी पक्षांना आपल्या संविद पद्धतीच्या कार्यक्रमासारखे रूप त्या आंदोलनास देण्यात यश मिळाले. पुढे आणीबाणी... असंख्य कार्यकर्त्यांचा तुरुंगवास, लोकांची मुस्कटदाबी हे सारे देशाला सहन करावे लागले.









आपली फॉर्मल लोकशाही केवढ्या तकलादू आधारावर उभी आहे याचा प्रत्यय येऊन गेला!



गौतम विद्यालयातली बारा-तेरा वर्षे अस्वस्थता वाढवणारीच ठरली. ती नुसती शाळा नव्हती; दलित-वंचितांचे ते एक सामाजिक केंद्र बनले होते. दलितांवरील अन्याय-अत्याचारा-विरुद्ध लढणारा एक गट तयार झाला होता. समाजवादी, दलित पँथरची मंडळी एकत्र काम करीत होती. हे दलित-सवर्ण ऐक्य फार काळ टिकले नाही. निळ्या टोपीचा दरारा होता. एक मूल्यनिष्ठ चळवळ म्हणून तिला लोकमान्यता होती. शब्दांची सच्ची, पैशाला न बळी पडणारी, बाबासाहेबांची माणसं अशी त्यांची प्रतिमा होती. १९७१ नंतर ती नष्ट होत गेली. रिपब्लिकन पक्षाचे तुकडे झाले. लहानसहान सत्तास्थाने नेत्यांना, कार्यकर्त्यांना भ्रष्ट करून गेली. नेत्यांना लोक शिव्या देत राहिले, नि त्यांच्याच मागे गटागटाने राहिले. या नेत्यांविरुद्ध बंड म्हणून पुढे आलेल्या पँथरचेही दलित पक्षांसारखेच झाले. दलित संस्थांतून, वसतिगृहांतून, शाळांतून चळवळीचा मागमूस राहिला नाही. नेत्यांची ती खासगी कुरणे झाली. भ्रष्टाचाराने सर्वांनाच ग्रासले. वसतिगृहात मुलांना ताठ मान करून शिकायला मदत करण्याऐवजी, त्यांना लाचार बनवण्याची, पैसे कमावण्याची ती केंद्रे बनली. नेते सत्तेभोवती घिरट्या घालत राहिले. कार्यकर्ते शासकीय कार्यालयांमध्ये चकरा मारून दलाल बनले. दलित सामान्य माणूसही सुचेल तसे हे नवे धडे निवडणुकांत गिरवू लागला. दलितांच्या चळवळीचे रूप पार पालटून गेले. नेते-कार्यकर्ते-लोक साऱ्यांनीच स्वतःला विद्रूप करायचा सपाटा लावला. सडवणुकीची प्रक्रिया पार तळापर्यंत पोहोचवली गेली.



१९७५ मध्ये गौतम विद्यालय सोडले. बाबासाहेबांच्या पीपल्स एज्युकेशन सोसायटीच्या हवाली करून, ते विद्यालय सोडले. ठाणे जिल्ह्यात आबा करमरकरांबरोबर काम करण्यासाठी दामखिंडला (जि. ठाणे) आलो. आदिवासी मुला-मुलींसाठी शाळा सुरू करायचे ठरले होते. गौतम विद्यालयाने मला समाधान-असमाधान दोन्ही दिले होते. गुलामीच्या अंताचे शिक्षण कसे असेल, त्यासाठी काय हवे, हे काहीसे उमगले; पण तसे घडताना फारसे जाणवले नाही. दलित, वंचित हुशार मुले डॉक्टर झाली, इंजिनियर झाली. पण सामूहिक गुलामी नष्ट झाली असे दिसले नाही. माझ्या शाळेतून एक भंगी मुलगा एस.एस.सी. झाला. त्या वस्तीतील हा पहिला मुलगा – ज्याने एस.एस.सी. पर्यंत मजल मारली. भंग्याची नोकरी करायची नाही एवढीच त्याची व इतरांची अपेक्षा होती. दोन वर्षे बेकार राहून स्टेशनवर सफाईची नोकरी मिळाली. संडाससफाईचे काम त्याची पत्नी करतेय. पारध्याचा मुलगा – चोरी करायची नाही, दारू गाळायची नाही हे ठरविले. उद्दिष्ट साध्य करू शकला नाही. वेश्यांच्या मुलींना वेश्यापण सोडायसाठी शिकायचे होते. मास्तरणी झाल्यावरही त्यांचे वेश्यापण संपले नाहीच!

दामखिंडला अशा सुट्या मुलांना गुलामीतून वर काढायचे नाही असे म्हणत तेथे गेलो. तेथे गेल्यावर दिसले की, केवढा मोठा भूभाग, केवढा मोठा मानवसमूह अद्याप पारतंत्र्यात आहे! शाळा सुरू करण्यापूर्वी त्यांच्याबरोबर वावरलो. ते जे करतात ते करून पाहिले. समूहाच्या अनुभवातून, त्यांच्या तीव्र सुख-दुःखाच्या शब्दांतून मुलांना लिहायला, वाचायला शिकता येते, हे अनुभवाने कळले. शाळांबरोबर आदिवासींच्या जाणिवांच्या राजकीयीकरणाचे काम, भूमिसेना या संघटनेमध्ये करू लागलो. भूमिसेनेने अशा शिबिरांची मालिकाच आयोजित केली. दर आठवड्याच्या सभांतून, चर्चेतून भोवतीच्या वास्तवाची चिकित्सा सुरू झाली. त्या जाणतेपणाचा उपयोग संघर्षाचे, संघटनेचे स्वरूप ठरवण्यास होऊ लागला. सावकारांच्या हातून जमिनी सोडवूनही त्या कसता आल्या नव्हत्या. बँकेने कर्ज देऊनही खावटीच्या व सावकारांच्या तडाख्यातून सुटका झाली नव्हती. हा ताजा अनुभव होता. मजुरी एक रुपया दिवसाला होती. खावटी, सावकार, बांधील गडी बनणे हे सतत सुरू होते. येथे स्वातंत्र्य उगवलेच नव्हते.

संघर्ष, संघटना, जाणिवांचा विस्तार या मार्गाने आदिवासींनी स्वतःच स्वतंत्र व्हायचे ठरविले. किमान वेतनासाठी संघर्ष सुरू झाले. शेतीमोसमाशिवाय रोजगार हमीतून उत्पादक काम मिळावे म्हणून संघर्ष सुरू झाले. दोन वर्षांत किमान वेतन मिळवले. प्रत्येकी १००-१२० दिवस काम रोजगार हमीतून मिळविले. खावटी संपली. सामूहिक लग्ने, धान्य कोष, बियाणे कोष, सामूहिक जमिनीची लागण – असे आंदोलन विस्तारत गेले. पुढे मजुरीचे आंदोलन धीमे पडू लागले. वाळूच्या ट्रकवर, खडी क्रशरवर, विटांच्या भट्ट्यांतून दिवसाला ४० रुपये मजुरी मिळू लागली. कालचा सावकार कमजोर झाला. नवी मंडळी त्या भागात आली. गुन्हेगार मंडळी राजकीय दृष्ट्या






कामाला लागली. आदिवासींना आपल्या जागांतून हुसकावू लागली. भूमिसेनेने त्यांच्याशी संघर्ष केले. त्यात म्हणावेसे यश आले नाही. संघटनेला त्या आघाताला थोपवता आले नाही. राजकीय पक्षाचे राजकीयपण संपुष्टात आले. पैशासाठी सत्ता, सत्तेसाठी पैसा; निवडणुकांसाठी दोन्ही, भरीला गुन्हेगारी! हळूहळू राजकीय पक्ष, कामगार संघटना यांमध्ये गुन्हेगारांचे प्राबल्य झाले.

त्याच सुमारास देशातील आदिवासी, दलित आंदोलनांतून, संघटनांतून जाणिवांच्या राजकीयीकरणासाठी शिबिरे, प्रशिक्षणे यांत गुंतत गेलो. स्वयंसेवी संस्थांबरोबरीने काम करून पाहिले. जनआंदोलने, पर्यायी विकासाचे काम करणारे गट यांच्यासाठी प्रशिक्षणाचे काम करीत राहिलो. स्त्रियांच्या संघटनांबरोबर काम केले. बऱ्याच मोठ्या प्रमाणात स्वयंसेवी संस्थांतही वेगळे काही घडतेय असे दिसले नाही. इस्टेटी वाढवणे, सुखसोईंचा भोग घेणे, कार्यकर्त्यांना कर्मचारी बनवणे याच गोष्टी अनेक 'एन.जी.ओ.' करीत आहेत. राजकीय पक्ष, कामगार संघटना, बऱ्याच स्वयंसेवी संस्था, शिक्षणसंस्था – नव्हे संस्थागत जीवनात सर्वत्र सडवणुकीची प्रक्रिया गतिशील आहे.

स्वातंत्र्याच्या विटंबनेच्या अशा काळात काही जनआंदोलने, लोकसंघटना सडवणुकीविरुद्ध ठामपणे उभ्या आहेत. स्त्री-चळवळीतून, पर्यावरणाच्या आंदोलनातून, आपल्या अस्मितेच्या रक्षणाच्या आंदोलनातून, आदिवासी-दलित-पीडित, सुशिक्षित आज लढत आहेत. पर्याय उभे करण्यासाठी धडपडत आहेत. मध्य प्रदेशातील छत्तीसगढ मुक्तिमोर्चासारखे खाण-कामगारांचे संघटन असो की गडचिरोलीतील मेंढा गावच्या आदिवासी गावकऱ्यांचे आंदोलन असो, स्वातंत्र्याच्या संकोचाविरुद्ध, विकृतीविरुद्ध ते आज लढत आहेत! स्वातंत्र्याच्या कक्षा रुंदावण्याचा ते प्रयत्न करीत आहेत. सामूहिकरीत्या स्वातंत्र्य कुंठित झाले की व्यक्तीचे स्वातंत्र्यही कुंठित होते हे खरे! हा धडा मला मिळालेला आहे!

❖❖



# स्वातंत्र्यानुभव

**वेणू पळशीकर**

स्वातंत्र्यसंग्रामात सहभागी न झालेल्या घरात मी जन्मले. घरी आई-वडील आणि आम्ही दहा भावंडे अशी डझनभर माणसे होतो. मधूनमधून चुलत, आत्ये, मावस भावंडेही शिक्षणासाठी म्हणून येऊन राहात. 'व्यक्ती तितक्या प्रकृती' या न्यायाने वडील काँग्रेसवादी, आई हिंदुमहासभा-सावरकरवादी, मोठी भावंडे गांधीवादी व वरोवरीची भावंडे रा.स्व. संघवादी अशी विविधता आमच्या घरी होती. मला या कुठल्याच वादात रस नव्हता. घरी 'केसरी' हे फक्त मंगळवारी व शुक्रवारी प्रसिद्ध होणारे द्विसाप्ताहिक वर्तमानपत्र येत असे. माझी आईपण ते सविस्तर आवडीने वाचे. राजकारणाचे आणि माझे वावडे, त्यामुळे 'केसरी' मी कधी उघडूनही पाहत नसे. वेचाळीसच्या आंदोलनाच्या वेळी मी दहा वर्षांची होते. 'भारत छोडो' म्हणण्याएवढा गोऱ्या माणसांविषयीचा द्वेष मला वाटत नव्हता. आमच्या शाळा-तपासनीस वाई इंग्लिश होत्या. त्या मला आवडत. दुसऱ्या महायुद्धाच्या काळात पोलिश, जर्मन कुटुंबे कैदी म्हणून आलेली असत. ती दुकानातून वगैरे भेटत. त्यांच्या मुलांशी मोडक्यातोडक्या इंग्रजीत बोलायला मला आवडे. कुसुमाग्रजांच्या 'गर्जा जयजयकार', 'जालियनवाला वाग' या कविता जिव्हाग्री होत्या. पण जालियनवाला वाग प्रकरण, सायमन कमिशन, मोर्ले-मिंटो सुधारणा, खिलाफत चळवळ, वंगभंग चळवळ या वारंवार कानावर पडणाऱ्या शब्दांमागील तपशील समजून घेण्यात मुळीच रस नव्हता. त्यामुळे ४७ च्या ऑगस्टला स्वातंत्र्य मिळाले तेव्हा विशेष काही घडले असे वाटले नाही. उलट, फाळणीमुळे निर्वासित बनलेल्या कुटुंबांच्या हाल-अपेष्टांचे वृत्त वाचून, आनंदापेक्षा दुःखच अधिक झाले होते. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर चार महिन्यांनी महात्माजींचा वध झाला. गांधीवधाची वातमी ऐकून मोठ्या भावंडांच्या डोळ्यांतील दुःखाश्रूंचा पूर ओसरत नव्हता; तर वरोवरीच्या भावंडांच्या

डोळ्यांतील आनंदाश्रूंमध्ये तृप्तीचा भाव दिसत होता. भरदिवसा डोळ्यासमोर जाळपोळ व लूटमार पाहायला मिळाली. पण 'आहे रे' लोकांना 'नाही रे' लोकांनी लुटले तर काय बिघडले, अशा असमंजसपणे त्याकडे मी पाहिले. सेवादलातील चांगले संस्कार ग्रहण करण्याऐवजी 'सावकारशाही ठेवायची नाही, ठेचायची आता हाय हो' गाणेच तेव्हा मला फार आवडत होते. पण सावकारशाही म्हणजे 'सावकारी वृत्ती' (जी आपणही कधीकधी दाखवतो) 'सावकार ही व्यक्ती' नव्हे याची जाण तेव्हा झाली नव्हती.

स्वातंत्र्याच्या पहिल्या वर्धापन-दिनापासून म्हणजे ऑगस्ट ४८ पासून मी सातारचे घर सोडून उच्च शिक्षणासाठी पुण्याला वसतिगृहावर राहू लागले होते. घरी असताना साने गुरुजींची *श्यामची आई*, विनोबांची *गीता-प्रवचने*, गांधीजींचे *सत्याचे प्रयोग* ही पुस्तकं मी मोठ्या आवडीने वाचली होती. वसतिगृहातील वातावरण अशा प्रकारच्या वाचनाला विशेष अनुकूल नव्हते. वसतिगृहातील एक मुलगी आफ्रिकेतून (मोंबासाहून) आली होती. गांधीजींबद्दल तिला पराकोटीचा आदर होता. तिचे अनुकरण करून तीस जानेवारीला संपूर्ण निराहार व संपूर्ण मौन मी पाळत असे. फर्ग्युसनमध्ये संस्कृतसाठी आर.डी. वाडेकर म्हणून एक खादीधारी ब्रह्मचारी प्राध्यापक होते. त्यांच्या आवडत्या विद्यार्थिनींना (त्यामध्ये सुदैवाने माझा समावेश झाला होता) ते 'कन्ये' म्हणून संबोधत असत व आम्हीही त्यांना 'बाबा' म्हणत असू. खऱ्या बाबांपेक्षा या बाबांकडूनच मला भरपूर खाऊ व छंद म्हणून वापरायला एक कॅमेराही मिळाल्याचे आठवते. त्यांच्यामुळेच डॉ. दातारांची ओळख झाली. पेटीच्या चरख्यावर सूत कातण्याची कला त्यांनी शिकवली आणि त्यांच्या हातमाग-केंद्रावर मी कातलेल्या सुतापासून दोन पाचवारी साड्याही मला विणून मिळाल्या. 'भूदान पत्रिका'ही तेथे मला वाचायला मिळत असे. त्या सुमारास महाराष्ट्र पातळीवर एक निबंधस्पर्धा आयोजित करण्यात आली होती. विषय होता – 'भूदानयज्ञमूलक ग्रामोद्योगप्रधान अहिंसात्मक समाजरचना.' या स्पर्धेत मला पहिल्या क्रमांकाचे पारितोषिक (विभागून) मिळाले. निबंधपरीक्षकांपैकी आचार्य भागवत हे एक होते असे नंतर त्यांच्याकडूनच कळले. पुण्याला त्या वेळेला आचार्य भागवत वंगाली वाङ्मयाच्या प्रत्यक्ष परिचयाचे वर्ग घेत. त्या वर्गात बंकीमचंद्रांची *आनंदमठ* (कादंबरी) आणि रवींद्रनाथांचा *संचयिता* हा काव्यसंग्रह या दोन साहित्यकृतींशी जवळून परिचय झाला. पुढे सांगलीला एक वर्षभर अर्थशास्त्राची प्राध्यापकी करताना मी व प्रा. मुगळी मिळून आंतरभारतीचे वर्ग चालवत होतो. ते कानडी शिकवत असत व मी बंगाली शिकवत असे.

१९४८ ते ५२ या स्वातंत्र्योत्तर काळात फर्ग्युसन व सर परशुरामभाऊ महाविद्यालयामधून पदवीपरीक्षेचे अध्ययन मी पुरे केले. स्वकीयांच्या, अगदी खास राष्ट्रवाद्यांच्या म्हणून या शिक्षणसंस्था ओळखल्या जात. 'लोहदंड तव पायामधले खळा खळा तुटणार' या माझ्या आवडत्या क्रांतिगीताची प्रत्यक्ष प्रचीती घेत ४८ मध्ये मी फर्ग्युसनमध्ये प्रवेश घेतला. पहिल्या वर्षाअखेरच्या महाविद्यालयीन परीक्षेत संस्कृतमध्ये पहिल्या येणाऱ्या विद्यार्थ्यासाठी तेथे एक खास पारितोषिक ठेवले होते. उपरोक्त परीक्षेत मी पहिली आले. पण कोकणस्थ/देशस्थ/कऱ्हाडे ब्राह्मण विद्यार्थ्यांसाठीच हे पारितोषिक राखीव असल्यामुळे माझ्यापेक्षा कमी मार्क असणाऱ्या 'ब्राह्मण' विद्यार्थ्याला ते देण्यात आले. राजकीय स्वातंत्र्य मिळाले तरीसुद्धा शिक्षणाच्या पवित्र क्षेत्रातही जातीभेदाची शृंखला आपल्याला जखडून ठेवत आहे, असा कटू अनुभव मिळाला. १९५० साली मी स.प. महाविद्यालयाची विद्यार्थिनी असताना तिथे लोकमान्यांच्या *गीतारहस्या*वर एक निबंधस्पर्धा आयोजित करण्यात आली होती. *गीतारहस्य* माझा अत्यंत आवडीचा ग्रंथ होता. त्यामुळे मी उत्साहाने व प्रयासपूर्वक निबंध लिहिला; पण बोनाफाइड ब्राह्मण विद्यार्थीच या स्पर्धेत भाग घ्यायला पात्र आहेत या सबबीवर प्राचार्य सोनोपंत दांडेकरांनी माझ्या निबंधाचा स्पर्धेसाठी स्वीकारही केला नाही. तथाकथित उच्चवर्णीयांना खुल्या स्पर्धेची धास्ती वाटावी याचे वैषम्य वाटले.

१९५७ ते १९९२ अशी पस्तीस वर्षे महाविद्यालयीन अध्यापनक्षेत्रात व्यतीत केली. या क्षेत्रात भ्रष्टाचाराला ऊत आलेला दिसला. विद्यार्थ्यांची खोटी उपस्थिती, खोटे गुणपत्रक, खोटे वेळापत्रक, विद्यापीठ परीक्षांचे पर्यवेक्षक व परीक्षक म्हणून काम करताना येणारे संस्थेचे दडपण या सर्व गोष्टी विद्यार्थिधार्जिण्या व प्राध्यापकधार्जिण्या असल्यामुळे विद्यार्थी संघटना व प्राध्यापक संघटना त्याविरुद्ध तक्रार करताना दिसत नाहीत. अशा प्रचंड भ्रष्टाचारी परिस्थितीतही मनापासून अध्ययन करण्यास उत्सुक असलेले थोडेबहुत विद्यार्थी भेटतात. त्यांच्यामुळेच फक्त अध्यापनाचा खरा आनंद मिळतो.

स्वातंत्र्यानुभवाचे कथन करताना माहेरी मुलगी म्हणून

किंवा सासरी सून म्हणून वाट्याला येणारी दुय्यमतेची वागणूक मला कधीच अनुभवावी लागली नाही हे नमूद करणे आवश्यक आहे. माझे लग्न बरेच उशिरा म्हणजे बत्तिसाव्या वर्षी झाले. कुंकू न लावणाऱ्या – बांगड्या न घालणाऱ्या, पतंग उडवण्याचा छंद असलेल्या मला खरंच लग्न करण्याची इच्छा असल्यास मी चारचौघांसारखे वागायला शिकले पाहिजे, असा सल्ला माझ्या काही सनातनी भावांनी मला दिला होता. मला तो मुळीच पटला नव्हता. योगायोगाने, या सर्व विक्षिप्तपणासकट माझे स्वागत करणारे सर्वार्थाने चांगले सासर मला मिळाले. सासरचे कुटुंब सामाजिक कार्याबद्दल आस्था बाळगणारे होते. माझे सासरे साधनाताई आमटेंना आपल्या मुलीप्रमाणे मानीत. एकदा साधनाताईंना दीर्घकाळासाठी परगावी जायचे होते तेव्हा माझ्या सासूबाईंनी आनंदवनात राहून बाबा आमटेंची सर्व देखभाल जातीने केली. अण्णासाहेब सहस्रबुद्धेंचे आगमन तर आम्हा सर्वांना निकटवर्ती आप्तांप्रमाणे आनंददायी वाटत असे. विनोबा व सानेगुरुजींपासून वसंताला (मुलाला) एक प्रकारचे आदर्श पितृत्व व मातृत्वच लाभले असे सासरी गौरवाने बोलले जाई. भौतिक-रसायन व जीवशास्त्र या गटात विद्यापीठात इंटर सायन्सला प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण झाल्यावर समाजकार्याच्या आवडीमुळे महाविद्यालयीन शिक्षणाला रामराम ठोकणाऱ्या वसंताशी विवाह करायला मला मनापासून आवडले होते. कारण ज्ञानप्राप्तीसाठीची पदव्यांची व्यर्थता स्वानुभवाने मला पटली होती. नवराबायको दोघांनीही नोकरी करण्यापेक्षा एकाने तरी समाजकार्य करणे चांगले असेही माझे मत होते. माझी मोठी नणंद डॉक्टर असून गोविंदपूर (उ.प्र.) येथे बनवासी सेवा आश्रमात ग्रामीण आरोग्य केंद्राच्या जोडीला इतर अनेक पुनरुत्थानाच्या कार्यात जातीने लक्ष घालते. मीही नोकरीच्या जोडीला काही सामाजिक कार्यामध्ये सक्रिय असावे असे तिचे मत होते. पण मला ते कधीच जमले नाही. अध्यापनकार्य व घरकाम या दोहोंचा समन्वय साधणेसुद्धा मला कठीण जात असे.

घरी आम्ही दोघेही पहिल्यापासून खादी वापरत होतो. अशा परिस्थितीत आमच्या मोठ्या मुलीने, अनूने, बारा-तेरा-वर्षांची झाल्यावर खादी आवडत नाही म्हणून खादी सोडण्याचा निर्णय घेतला. प्रत्येकाला स्वतःच्या मताप्रमाणे वागण्याचे स्वातंत्र्य द्यावे अशी माझी धारणा होती. माझ्या सासऱ्यांना मात्र ती चुकीची वाटली.

आज स्वातंत्र्याचा सुवर्णमहोत्सव साजरा होत असतानासुद्धा निरक्षरता, दारिद्र्य, बेरोजगारी आणि जातीभेदावर वा लिंगभेदावर आधारित दुय्यमता यांच्या शृंखलांमुळे भारतातील बहुजन समाज बद्धच आहे. मुक्त नाही. खऱ्या स्वातंत्र्यासाठी वरील सर्व अरिष्टांपासून मुक्ती मिळवणे आवश्यक असले तरी तेवढेच पुरेसे नाही. 'सर्वात्मका, शिवसुंदरा' अशा 'स्व'च्या तंत्राने वागण्यात खरी स्वतंत्रता आहे. 'अहंतात्मका अशिवा असुंदरा' अशा 'स्व'च्या तंत्राने वागणे म्हणजे ती असुरी स्वतंत्रता झाली. खऱ्या स्वतंत्रतेसाठी अंतर्मुख बनून शांततामय आंतरिक क्रांती घडवून आणणे गरजेचे आहे. आत्मौपम्याची वृत्ती निर्माण झाल्याशिवाय केवळ भौतिक समृद्धीने खऱ्या स्वातंत्र्याचा अनुभव येणार नाही.





## अर्धशतकातील स्मरणे

**म.द. हातकणंगलेकर**

मन किती मागे धावते. धुक्यात हरवलेल्या आठवणींचा परिसर. मन हळवे, भावुक बनते का? बनते. त्यात कमीपणा, ओशाळ-वाणेपणा वाटण्याचे काही कारण दिसत नाही. १९३५-३६ चा काळ. मी त्या वेळी आठ, नऊ वर्षांचा असेन. हातकणंगले हे माझे जन्मगाव. खेडेगाव असले तरी पेट्याचे गाव होते. कोर्टकचेरी, जेल, मामलेदार अशा सुविधा होत्या. अलीकडे जयसिंगपूर, इचलकरंजी ही गावे. पंधरा मैलांवर कोल्हापूर शहर. शाहू महाराज, राजाराम महाराज, महाराष्ट्र सिनेटोन, राजाराम कॉलेज, पॅलेस थिएटर, खासबाग मैदान, रंकाळा तलाव, पन्हाळा, अंबाबाईचे मंदिर इत्यादी मनाला मोह पाडणारी






नावे. हातकणंगले तेव्हा दोन-तीन हजार वस्तीचे गाव असेल, नसेल. अर्थात खानेसुमारीत गोडी वाटण्याचे माझे वय नव्हते. नुकताच मी शाळेत जाऊ लागलो होतो. शाळेचे नाव ए.व्ही. स्कूल असे होते. या नावाचा उलगडा बऱ्याच दिवसांनंतर झाला. अँग्लो-व्हर्न्याक्युलर स्कूल, म्हणजे इंग्रजी-मराठी शाळा. इंग्रजी शिकविण्याची सोय होती कारण पोस्टमास्तरना इंग्रजी येत असे. पोस्टाचे काम करता करता पोस्टाच्या खोलीतच ते आम्हाला 'मेरी हॅड अ लिटल लॅम्ब' ही कविता शिकवीत. आमची ही शाळा ग्रामपंचायतीच्या नियंत्रणाखाली असे.

आमच्या घराच्या नजिकच बाजारपेठ होती. फार मोठी नव्हती. आठ-दहा किराणा मालाची दुकाने, कापडाची दुकाने, एक हलवायाचे दुकान, एक पीराचा दर्गा, त्यासमोर मोठे पटांगण, त्याच्यासमोर चावडी, नरसोबाचे देऊळ. दर्ग्यातच खाई आणि कुस्त्याचे मैदान भरत असे. त्या वेळी किराणा मालाची जी दोन मोठी दुकाने होती, त्यांचे मालक निगवे नावाचे गृहस्थ होते. मोठे निगवे हे शरीरप्रकृतीने अगडबंब शरीराचे, केसाळ, काळे गृहस्थ होते. (त्यांचे कदाचित नातेवाईक असणारे) दुसरे निगवे होते ते अधिक सुशिक्षित, सुधारलेले वाटत. त्यांच्या दुकानात बऱ्याच लोकांची बैठक सकाळ-दुपार पडत असे. माझ्या मोठ्या बंधूंचे ते मित्र होते. गांधींच्या चळवळीने खेड्यापाड्यांतून जे लोक प्रभावित झाले होते आणि ज्यांनी खादीचे व्रत अंगीकारले होते त्यांपैकी निगवे बंधू होते. त्यांची दुकानदारी मर्यादित स्वरूपाची असल्यामुळे व्यवहारात गैरप्रकार करण्याचा प्रश्न नसे. त्यांपैकी तरुण निगवे यांचे दुकान पेठेत मोक्याच्या ठिकाणी होते. त्यांची बैठक ऐसपैस, स्वच्छ तीन-चार तक्के मांडलेली असे. वरच्या बाजूला जे फोटो लावलेले होते त्यांत एकही देवादिकाचा असल्याचे आठवत नाही. सारे फोटो राष्ट्रीय नेत्यांचे होते. फोटो पाहूनच ते सर्व थोर नेते आहेत याची जाणीव मला झाली. त्यात गांधी, नेहरू यांचे फोटो तर होतेच पण त्याबरोबर सरदार पटेल, विठ्ठलभाई पटेल, कमलादेवी चट्टोपाध्याय, सरोजिनी नायडू यांचेही फोटो होते. खणाची चोळी घातलेल्या फोटोतल्या कमलादेवी फार आकर्षक दिसत. त्या फोटोंनी लहान वयातही आम्ही फार प्रभावित होत असू. काही काम नसताना अगर अगदी किरकोळ काम असताना मी या दुकानात केवळ हे फोटो डोळा भरून पाहण्यासाठी जात असे. आमच्या घरी जसे देवादिकांचे, संत-महात्म्यांचे फोटो होते, तसेच क्रांतिकारकांचे, भगतसिंग, राजगुरू यांचेही फोटो होते. भगतसिंग देखण्या नटाप्रमाणे दिसत असे. याबरोबर आमच्या घरी असलेल्या पुस्तकांत जसे *गीतारहस्य* होते, तसेच बंगाली क्रांतिकारकांसंबंधीचे एक छोटे पुस्तकही होते. त्यात खुदीराम बोस, कल्पना दत्त यांची छायाचित्रे होती. भर कोर्टात झालेल्या एका हत्येचे अंगावर शहारे आणणारे वर्णन होते. ही पुस्तके माझ्या मोठ्या भावाने आणलेली होती. नंतर मला कळाले की, त्याच्या मित्रांचा एक गट होता आणि त्यांना बंगाली क्रांतिकारकांप्रमाणे काही अघोरी कृत्ये या भागात करावयाची होती. त्यासाठी गावठी बाँब तयार करण्याच्या उद्योगात हे तरुण लोक होते. गावाच्या जवळ दोन मैलांवर एक टेकडी होती. तेथे रसायने, काचा, खिळे यांच्या साहाय्याने बाँब तयार करण्याचा उद्योग या तरुण मंडळींनी करून पाहिला होता. त्यातून काही निष्पन्न झाले नाही हा भाग वेगळा!

नंतर परदेशी वस्तूंवर, वस्त्रांवर बहिष्कार टाकण्याची चळवळ सुरू झाली. ती आमच्या खेड्यापर्यंत येऊन पोहोचली. परदेशी कापडाची होळी बाजारपेठेत करण्यात आली. गावातले प्रतिष्ठित गृहस्थ म्हणून माझ्या वडिलांना बोलावण्यात आले होते. त्या वेळी त्यांचा पोषाख उत्तम असे – जरीकाठी पांढरा रुमाल, पांढऱ्या सॅटिन कापडाचा लांब कोट, जाकीट, तलम बारीक काठाचे धोतर. पन्नासभर लोक जमले होते. मीदेखील उपस्थित होतो. माझ्या वडिलांनी आपले सारे परदेशी कपडे या होळीत टाकले. त्यानंतर जरी त्यांनी खादी वापरली नाही तरी त्यांनी साधा पोषाख वापरण्यास सुरुवात केली. माझ्या बंधूंनी त्यांचे अनुकरण केले नाही. मी त्याचा विचार करावा असे माझे वय नव्हते.

आमच्या घरी असणारी बंगाली क्रांतिकारकांसंबंधीची पुस्तके मी श्वास रोखून वाचलेली होती, कोर्टात गद्दारीबद्दल झालेला हल्ला मला थरारक वाटला होता. कल्पना दत्तच्या तेजस्वी चेहऱ्याने मी प्रभावित झालो होतो. रामकृष्ण, विवेकानंद, राजा राममोहन रॉय, अरविंद, सुभाषचंद्र हे अध्यात्म-राजकारणातले थोर पुरुष, देविकाराणीपासून उत्तमकुमारपर्यंतचे अभिनेते, गायक-संगीतकार या सर्वांमुळे बंगालबद्दलचा आदरभाव वाढला होता. त्यात रवींद्रांचा मोठेपणा *काबुलीवाला*, *गीतांजली*, *क्रेसंट मून*, *गार्डनर* यांमुळे पटला होता. यांची नंतर मी पारायणे केली. त्यामुळे बंगाल हा अद्भुत प्रदेश अजूनही वाटतो. इतकी बंगालची दाट छाया खेड्यापर्यंत पसरली होती.

अनुक्रमणिका

त्यानंतर कोल्हापुरात प्रजापरिषदेची चळवळ सुरू झाली. तिचे वृत्त दररोज वृत्तपत्रांतून येत होते. माणसे त्यासंबंधी हिरिरीने चर्चा करीत होती. त्यात त्याकाळचे नेते माधवराव बागल आणि रत्नाप्पाण्णा कुंभार यांचा सहभाग होता. त्यांची आणि विशेषतः माधवराव बागलांची चौकटीच्या कापडातील चड्ड्या-कुडत्याची चित्रे वृत्तपत्रांतून येत होती. त्यासंबंधी अतिशय कुतूहल वाटत असे. त्या वेळीदेखील आम्ही गावातल्या शाळेतच शिकत होतो. एके दिवशी गावात दवंडी पिटली गेली की, रात्री आठ वाजता चावडीसमोर रत्नाप्पाण्णा कुंभार यांचे प्रजापरिषदेच्या चळवळीची माहिती देणारे व्याख्यान होणार आहे. पोरासोरांना ती पर्वणी होती. श्रोत्यांनी धुळीतच बैठक मारायची होती. व्याख्यात्यासाठी टेबल, खुर्ची आणि समोर काठीला टांगलेली गॅसबत्ती. आम्ही सातपासूनच बैठक मारून व्याख्यात्यांची वाट बघत होतो. वातावरणात भीती आणि उत्सुकता दाट भरलेली होती. अखेरीस रत्नाप्पा कुंभार आले. माझ्या भावाचे मित्र व प्रा. ना.सी. फडके यांचे लेखनिक, किर्लोस्करचे लेखक श्री. शि.आ. स्वामी यांनी प्रास्ताविक, परिचय करून दिला. रत्नाप्पाण्णांचे व्याख्यान झाले. त्यातले आम्हाला काही कळाले नाही. संस्थानी कारभारातील जुलूम आपण सहन करता कामा नये, त्याचा खंबीरपणे प्रतिकार केला पाहिजे असे काहीसे ते म्हणाले. ही चळवळ जोरात सुरू आहे असे कानावर येई.

त्यानंतरच्या टप्प्यावर १९४२ ची चळवळच आठवते. तोपर्यंत माझे पहिले शिक्षण संपले होते. वडिलांचा १९३९ साली मृत्यू घडला होता. आम्ही हातकणंगले सोडून सांगलीस मामांच्या आश्रयाला गेलो होतो. मामांची तेलाची गिरणी शहराच्या पूर्वेला कुपवाडच्या वाटेला होती. मी त्या वेळी मॅट्रिकच्या वर्गात शिकत होतो. रात्री उशिरापर्यंत अभ्यास करीत बसत असे. घरातले सारेजण झोपलेले असत. बाहेर पहारेवाला असे. कुपवाडचे बरेच लोक सांगलीत अडत्यांच्या दुकानांत अगर इतरत्र नोकरीला जात. बरीच तरुण मुले दुधाचा धंदा करीत. सायकलीला दुधाच्या पितळी घागरी अडकवून ते शहरात दूध घालायला जात. आमच्याकडे थांबत. तोपर्यंत पत्रीसरकारचा दंगा उसळला होता. त्यांच्या लूटमारीच्या, दरोड्याच्या धाडशी हकिकती शाळेतली मुले सांगत. त्यांनी असेही सांगितले की, कुपवाडकडून दूध घालायला जाणारी मुले दुधाच्या घागरीतून पिस्तुले नेतात आणि ती वसंतदादा आणि त्यांच्या सहकाऱ्यांना पुरवतात. त्यामुळे हे लोक मला साहसी आणि आदरणीय वाटू लागले. त्यांपैकी सर्वांनाच स्वातंत्र्यसैनिकांचे पेन्शन मिळाले. एक-दोन जण हलाखीत मृत्यू पावले आणि काहींना कथित पुराव्यावर पेन्शन सुरू झाले. त्यांचे दरवर्षी मेळावे सुरू असतात. या त्यागाच्या जोरावरच काहींनी राजकारणात अमर्याद सत्ता भोगली आणि आपल्या नातलगांची, इष्टमित्रांची समृद्धी साधली. तेथूनच, राजाजी म्हणाले त्याप्रमाणे, लायसन्स-परमिट राज्याची भरभराट सुरू झाली. वसंतदादा तुरुंगातून पळून गेले ती सांगली भागात एक रोमहर्षक घटना झाली. त्यांच्या गुप्त हालचालींच्या कथा ऐकताना आम्ही भयचकित होत असू. एकदा आम्ही चित्रपटगृहात चित्रपट पाहत ड्रेस सर्कलच्या खाली बसलो होतो. तर कुणीतरी म्हणाले की, आपल्या पाठीमागे वसंतदादा उभे आहेत. खरेच ते उभे होते. चित्रपटातल्या नायकापेक्षा आम्हाला तेच मोठे नायक वाटले. तसे ते झालेही. त्यांनी सांगली शहराचा, जिल्ह्याचा कायापालट घडवून आणला. अनेक संस्था, उद्योगधंदे, साखरकारखाना सुरू केला. अत्युच्च पदी गेल्यानंतर सुभाषितवचनाप्रमाणे जे घडायचे ते घडले.

त्याअगोदरची हकिकत. एका बाजूला काँग्रेसची ही लाट वर चढत होती तर आमच्या भागात राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे काम जोरात वाढत होते. शिबिरे, संचलने, संघस्थानावरील कवायती, जाहीर व्याख्याने, दसऱ्याचे समारंभ, अभ्यासवर्ग, नेत्यांच्या भेटी सतत वाढतच होत्या. महाविद्यालयात त्याची साक्ष मिळत होती. एकदा सरसंघचालकांचा समारंभ आमच्या महाविद्यालयातील भोजनगृहात झाला. गांधीद्वेषाची अखेर महात्माजींच्या हत्येत झाली. त्याची सूत्रे सांगलीपर्यंत पोहोचली. फार मोठा जनक्षोभ उसळला. ब्राह्मणांविरोधी विध्वंसक चळवळ सुरू झाली. जमाव रॉकेलचे डबे घेऊन रस्तोरस्ती फिरू लागला. घरे पेटवून देण्यात आली. लोक वेलणकरांच्या गजानन मिलवर चालून गेले. इस्लामपूर, कोल्हापूर पेटले. भाल.जी. पेंढारकर – ते संघाचे आधारस्तंभ. त्यांचा स्टुडिओ पेटवून दिला, त्यांचे हातपाय तोडले, अशी बातमी आली. कर्फ्यू पुकारण्यात आला. रस्ते ओस पडले. विश्रामबागेत एक 'नेता' नावाचे वृत्तपत्र सुरू करण्यात आले. ते गुप्त वाटांनी शहरभर पसरले. त्यातून भडक बातम्या वाचायला मिळू लागल्या. जातीय विद्वेषाचे वारे फैलावले. हे वातावरण शांत व्हायला बराच काळ जावा लागला. यावरची प्रतिक्रिया म्हणून समाजवादी पक्षाचे काम






जोम धरू लागले. सेवादलातल्या स्वयंसेवकांची संख्या वाढली, सानेगुरुजींची पुस्तके प्रेमाने वाचली जाऊ लागली. एकदा सांगलीत, विशाल मैदानावर त्यांचे हृदयाला पीळ पाडणारे व्याख्यान झाले. अरुणा असफअल्ली, जयप्रकाश, अच्युतराव ही या मुलामुलींची दैवते बनली. या मंडळींचा सातारला एक मोठा मेळावा भरला होता. त्याला मी हजर होतो. असे वाटले की, सत्याग्रही समाजवादाचा एक परिणामकारक मार्ग देशाला गवसला. पण तसे घडायचे नव्हते. ही शक्ती कालांतराने विघटित झाली. पुढे अशी भाषा लोक बोलू लागले की, जनतेचा एवढा पाठिंबा आणि प्रेम समाजवादी पक्षाला मिळून आणि त्यांच्याकडे इतके सत्त्वशील नेते असून त्यांना राष्ट्र उभे करता आले नाही. सरकार चालवता आले नाही.

नंतरचा इतिहास परिचित आहे. त्यावर वेळ खर्च करण्यात फार स्वारस्य नाही. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर देशाची फाळणी, जातीय दंगली, जमातींचे स्थलांतर, निर्वासितांचे लोंढे, त्या वेळी घडलेला रक्तपात, अत्याचार या साऱ्या लज्जास्पद घटना. त्यानंतर महाराष्ट्रात संयुक्त महाराष्ट्राची चळवळ, गोवामुक्तीचा संग्राम इ. घटना. या सर्वांना आम्ही दुरून साक्षीदार होतोच. नंतर झालेल्या निवडणुकांचे स्वरूप कसे बदलत गेले, त्यांत अपप्रवृत्ती, अपप्रकार कसे वाढत गेले, लोकशाहीच्या तत्त्वाचा स्वार्थासाठी कसा वापर करण्यात आला, एकूणच सुसंस्कृत नागरिक कसा सैरभर होऊन जावा असे वातावरण तयार झाले, याचीही चर्चा वृत्तपत्रांतून, सभासंमेलनांतून अनेक वेळा झालेली आहे. जमेची बाजूही दाखविण्यात आलेली आहे. ती आहे यात शंका नाही. आपल्या लोकशाहीचे वर्णन अनेकपरीने करण्यात येत असते. जगातली ती सर्वांत मोठी लोकशाही आहे, ती बालवयातील (रांगत्या मुलाच्या वयातील) लोकशाही आहे, लोकशाही ही एक प्रक्रिया आहे, ती कधीच परिपूर्ण नसते इ. पण बालवयातच आपल्या लोकशाहीचे अनेक पोरखेळ सुरू आहेत. बिहारमधल्या घटना त्याच्या द्योतक आहेत. तरी आपण म्हणतो की, लोकशाही हीच न्याय्य राज्यव्यवस्था आहे. ती सुधारण्याची मात्र गरज आहे. दृश्य मात्र असे आहे की, कोणत्याही मार्गाने सुधारण्याऐवजी ती अधिकाधिक बिघडतच आहे.

१९४२ च्या लढ्याच्या वेळी आम्ही हायस्कूलमध्येच शिकत होतो. १९४४ साली कॉलेजमध्ये गेल्यानंतर ४२ ला घडलेल्या काही हकिकती आम्हाला समजल्या. १९४२ च्या चळवळीत भाग घेणारे काही विद्यार्थी विलिंग्डनच्या वसतिगृहात राहतात अशी माहिती मिळाल्याने पोलीस तपासासाठी कॉलेजवर आले. त्यांना प्राचार्य व्ही. के. गोकाक यांनी मनाई केली. कॉलेज माझ्या ताब्यात आहे, तेथे तुम्हाला प्रवेश करता येणार नाही; बळजबरीने येण्याचा प्रयत्न कराल तर माझ्यावर प्रथम गोळी चालवावी लागेल. पोलीस परत गेले. प्राचार्यांच्या धाडसाचे कौतुक झाले. कॉलेजच्या रस्त्यावर काही अंतरावर 'रेनबो' नावाची इमारत होती. तेथे भूमिगत कार्यकर्ते भेटतात अशीही बातमी होती. या इमारतीत ध्वनिमुद्रिका तयार करणारी 'रेनबो' नावाची कंपनी होती. त्या वेळी कॉलेज अगदी शिस्तबद्ध पद्धतीने चालत असे. २० जूनला बरोबर सुरू होत असे. प्राध्यापकांबद्दल आदरभाव असे. विद्यार्थी त्यांचा एकेरी नावाने उल्लेख करीत नसत. त्यांच्या ज्ञानाबद्दल शंका घेत नसत. स्नेह-संमेलनाचे कार्यक्रमही व्यवस्थित पार पडत. त्यांत काही प्राध्यापक आवडीने सहभागी होत याचे आम्हाला नवल आणि कौतुक वाटे. त्या वेळी विलिंग्डनकडे कर्नाटकातल्या मुलांचा ओघ होता. अगदी कारवार, शिरशीपासून मुले, मुली येत. त्याची दोन कारणे होती. उत्तम इंग्रजी व कानडी शिक्षणाची सोय येथे होती. प्राचार्य गोकाक, डॉ. मुगळी असे या विषयाचे अग्रगण्य प्राध्यापक येथे होते. राष्ट्रीय विचाराचे, खादीधारी प्राध्यापक होते. तसेच अध्यात्मामध्ये रस घेणारेही होते. कानडी मंडळींचे अरविंदू सर्कल होते. निंबाळचे रानडे होते. संस्थानिक थिऑसफीचे अभ्यासक होते. कानडी विद्यार्थ्यांच्या भोजनाचा नॅशनल क्लब होता तर मराठी मुलांचा समर्थ क्लब होता. कॉलेजच्या आवारात एक उपाहारगृह होते. पण तेथे फार मुले जात नसत. वसतिगृहातली कानडी मुले प्रामुख्याने जात. ती सधन घरांतून आलेली असत. त्यांच्या घरी शेतीचे, व्यापाराचे उत्पन्न असे. कॉलेजात विद्यार्थिसंख्या जेमतेम चार, साडेचारशे असे. मुली चाळीसभर असतील. त्यांना फार फॅशन नव्हती. केस कापलेले नसत. मुले विजार, शर्ट, टोपी, कोट या पोषाखात असत. ड्रेसेस किंवा पँट, बुशशर्ट रूढ झालेले नव्हते. मूळ पुस्तके वाचण्याची प्रथा होती. फारकरून गाईड्स वापरली जात नसत. ग्रंथालयातील अभ्यासिकेचा उपयोग करण्यात येई. मान्यवरांच्या व्याख्यानांना विद्यार्थी उत्सुकतेने उपस्थित राहत. परीक्षा वेळेवर होत. कॉपीचे प्रमाण तुरळक असे. मार्क्स वाढवून घेण्यासाठी परीक्षकांना भेटावे असे मनात येत नसे; तसा धीरही होत नसे. परीक्षा-पद्धतीवर दृढ विश्वास

होता. पालकांना महाविद्यालयाबद्दल आदरभाव होता. पन्नास वर्षांनंतर हे चित्र उलटे झाले आहे. त्या वेळी मुख्य भर साहित्यशाखेवर होता. सोसायटीचे आजीव सेवक भाषाविषयाचे, अधिक संस्कृतचे होते. क्रमाक्रमाने विज्ञानशाखा वाढू लागली. या विषयाचेही नामवंत आजीव सेवक झाले. सरकारी अनुदान कमी असे. पगार माफकच असत. प्राध्यापकाची नेमणूक १५० रुपयांवर असे. शिपायांना ३० पर्यंत पगार असे. फी कमीच असे. वर्षाची दीडशेपर्यंत असेल. परीक्षेत १ला वर्ग साहित्यविभागाकडे दुर्मिळ असे. विज्ञानशाखेतही मेडिकल, इंजिनिअरिंगकडे जाण्यासाठी दुसरा वर्ग पुरेसा होई. आज ९५-९७ टक्के मार्क्स घेऊनही हा प्रवेश मिळेल अशी खात्री नाही. पहिल्या वर्गात येणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या केवळ उत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यांपेक्षा सापेक्षतः वाढली आहे. प्राध्यापकांची जागा मिळविण्यासाठी वरच्या दर्जाची शैक्षणिक गुणवत्ता लागत असे. महाविद्यालयांची संख्या मोजकी होती. मुंबई विद्यापीठाशी सिंधपासून कर्नाटकापर्यंतच्या प्रदेशातली महाविद्यालये संलग्न होती. विद्यापीठाच्या व्यवहाराशी कमी लोक संबंधित होते. आज महाविद्यालयांची संख्या कल्पनेबाहेर वाढली आहे. प्रादेशिक विद्यापीठे झाली आहेत. शिक्षणाचे झपाट्याने बाजारीकरण आणि सरकारीकरण झाले आहे. स्वातंत्र्यानंतर समाजातील सर्व प्रकारची विषमता नष्ट करण्यासाठी जी धोरणे आखली गेली त्यातून शिक्षणाचा सर्व स्तरावर विस्तार झाला. त्याची गरज होतीच. शिक्षणाची आर्थिक जबाबदारी सरकारने उचलल्यामुळे शैक्षणिक धोरण, अभ्यासक्रम यांचेही अप्रत्यक्षपणे सरकारीकरण झाले. जो भारतीय स्वरूप देण्याचा प्रयत्न केला तोही पूर्ण विचारांती झाला नाही. त्याला शास्त्रीय पाया फारसा दिसला नाही. अभ्यासक्रमात वारंवार बदल करण्यात आले. निरनिराळ्या विषयांचे अभ्यासक्रम सारख्या वजनाचे होतात की नाही, याचा नीट विचार झाला नाही. त्यामुळे अभ्यासक्रमाची गुणवत्ता अजमावणे कठीण झाले आहे. माध्यमाचा प्रश्नही नीट हाताळलेला नाही. मराठी माध्यम बेभरवशाचे व अस्थिर झाले आहे. इंग्रजीसंबंधीचे धोरण एकमुखी नाही. इंग्रजी सुटत नाही आणि नीट चालवताही येत नाही. प्राध्यापकांचे वेतन वाढले आहे. ते सुखवस्तू झाले आहेत. पण आणखी ऐषआराम त्यांना हवा असल्याने जोडधंदे करीत आहेत. शिकवण्याचे क्लासेस चालवीत आहेत. श्रीमंत होत आहेत. गाड्या बाळगीत आहेत. नेहमीचे शिकवणे पाट्या टाकल्यासारखे करीत आहेत. शिकविणे नियमित, वेळेवर, जबाबदारीने होत नाही. प्राध्यापक संघटनेचे, राखीव जागांचे संरक्षण आहे. कितीही कडक नियम झाले तरी त्यांतून मार्ग काढण्याची कला अवगत झाली आहे. काही स्वायत्त, गुणवान संस्था निर्माण करण्याची योजना फलदायी होत नाही. प्राध्यापकांची गुणवत्ता वाढविण्याच्या योजनांना विरोध होतो. त्यासंबंधीचे कार्यक्रम यांत्रिकपणे उरकले जातात. अधिक पैसा खर्च होतो. प्रगती मात्र होत नाही. शिक्षणाच्या क्षेत्रातील गुणवत्ता वरच्या पातळीपर्यंत चढवण्याऐवजी सामाजिक समतेच्या आग्रहापोटी ती सामान्य पातळीवर खाली ओढण्याचेच प्रयत्न होत आहेत. वाढती टक्केवारी आणि गुणवत्ताप्राप्त विद्यार्थांची पानभर येणारी चित्रे आणि त्यांच्या मुलाखती हे माध्यमांना आवश्यक उपक्रम आहेत यात शंका नाही. आपल्याकडील तरुण परदेशी जाऊन नाव काढत आहेत हेदेखील विसरता येत नाही. पण एकूण शिक्षणक्षेत्राचे चित्र पन्नास वर्षांनंतर चिंताजनकच आहे. विद्यार्थिजगताचे स्वरूपही पालटले आहे. ज्ञानार्जनाचा हेतू ओसरला आहे. कॉलेज हे मजामौज करण्याचे ठिकाण. दंगे-धोपे, बेपर्वाई, धमक्या, व्यसनाधीनता, गुन्हेगारी, चैनबाजी मोठ्या प्रमाणावर फैलावली आहे. त्यामुळे निषेधमोर्चे, बंद कोणत्याही निमित्ताने पुकारले जातात. 'कॉमन ऑफ' केव्हा, का जाहीर होईल हे सांगता येत नाही. शांतता राखण्यासाठी पोलिसांची मदत बोलवावी लागते. मी प्राचार्य असताना आठवडाभर पोलीस महाविद्यालयाच्या आवारात होते. वेंकटाचलम नावाचे जिल्हा पोलीस अधीक्षक होते. ते नेहमी मला भेटायचे. एकदा मी त्यांना म्हणालो, आता वेळ अशी आली आहे की महाविद्यालयाची देखरेख करण्याचे काम पोलिसांनी हाती घ्यावे. आम्ही शिक्षण देण्याचे काम करू.

स्वातंत्र्याच्या पन्नास वर्षांच्या काळात शिक्षणक्षेत्रात स्वातंत्र्याची विपर्यस्त कल्पना फोफावली आहे आणि प्रत्यक्ष शिक्षणाला ओहोटी लागली आहे. याची दुसरी बाजूही मांडता येते याची मला जाणीव आहे.

निवृत्त होण्यापूर्वीच साहित्य संस्कृती मंडळावर आणि विश्वकोश निर्मिती मंडळावर माझी नियुक्ती झाली. ज्ञानपीठाच्या मराठी समितीचा सभासद, साहित्य अकादमी, महाराष्ट्रातील विविध साहित्य पारितोषिक समित्यांवर सभासद म्हणून मी काम केले. त्या सर्वांबद्दल तपशिलाने लिहिण्याचे प्रयोजन नाही. एकूण शासनाच्या संस्थांचा आणि सार्वजनिक संस्थांचा

अनुक्रमणिका

कारभार फारसा समाधानकारक चालत नाही असाच अनुभव आला. या संस्थांचे जे वार्षिक बजेट असते त्यापैकी साठ टक्के पैसे नोकरांचा पगार, भत्ते आणि कार्यालयीन समारंभ यांवर खर्च होतात असे आढळले. कामासंबंधी उदासीनता आणि कमालीची दिरंगाई आणि बेपर्वाई आढळली. संस्कृती मंडळाची योजना काही सामाजिक हितासाठी आणि जनतेचे योग्य ते प्रबोधन होऊन एका नव्या लोकशाहीचे जबाबदार, सुजाण नागरिक त्यांनी बनावे यासाठी विचारपूर्वक तयार करण्यात आली होती. त्यानुसार पाश्चिमात्य जगातील उत्तम ग्रंथ मराठीत अनुवादित करावेत आणि नवे वैचारिक आणि विज्ञानविषयक ग्रंथ लिहिले जावेत असेही ठरविण्यात आले होते. त्याप्रमाणे काही कार्यवाही झाली. त्यानंतर हे ग्रंथ प्रसारित करण्याचा काहीच प्रयत्न झाला नाही. निर्मितीच्या यंत्रणेचा, वितरणाशी संबंध जोडण्यात न आल्याने ग्रंथ सरकारी गोदामात पडून राहिले. काही मंडळींना अनुदाने, गौरववृत्त्या देण्याच्या नव्या योजना नव्या अध्यक्षांच्या सूचनांनुसार तयार झाल्या. त्याची कार्यवाही मनमानी पद्धतीने होऊ लागली. त्यासाठी काही सभासदांनी अध्यक्षांशी मेतकूट जमवले. या दुष्ट वर्तुळातून आणि कार्यपद्धतीतून स्वयंघोषित रामशास्त्री बाण्याचे पदाधिकारीही सुटले नाहीत. या मंडळांच्या बैठकी नियमानुसार काही तास झाल्याचे नोंदवावे लागते. प्रत्यक्षात इतके कामकाज नसते. सभासदही इतके लागत नाहीत. आपण या व्यवहारात सामील आहोत याची मनाला टोचणी लागते. काही सभासद उघडपणे म्हणतात देखील की, सरकारी पैशाने प्रदेश पाहता येतो, ऐषआरामात राहता येते, इष्टमित्रांना भेटता येते यात बिघडले कोठे? राजकीय आश्रय देण्याचे कायदेशीर मार्ग म्हणून राज्यकर्ते या संस्थांकडे पाहतात. अगदीच काम होत नाही असे नाही, थोडे होते. पैसे मात्र सढळपणे खर्च होतात. आठवण होते डॉ. सॅम्युअल जॉनसन् यांच्या उद्‌गाराची. त्याने जेव्हा इंग्रजी भाषेच्या डिक्शनरीचा उद्योग एकाहाती सुरू केला तेव्हा काही मंडळींनी त्याला सांगितले की, फ्रान्समध्ये या कामासाठी ४० विद्वानांचा गट नेमण्यात आला आहे. त्यावर तो उद्‌गारला की, बरोबरच आहे. एक ब्रिटिश विद्वान ४० फ्रेंच विद्वानांना पुरून उरतो. ज्ञानपीठाच्या अखेरच्या बैठकीत सर्व भाषेच्या प्रतिनिधींसमोर मला बोलावण्यात आले. मी मराठीसाठी जी.ए. कुलकर्णी यांचा आग्रह धरला होता. मराठी समिती सतत ४-५ वर्षे त्यांच्या नावाची शिफारस करीत होती, तरीही या नावाचा विचार होत नव्हता. तेथे जी.एं.च्या साहित्याचे मोल सांगताना मला असे आढळले की, बहुतेकांना हे नाव माहीत नव्हते; कारण त्यांच्या कथांचे हिंदी अगर इंग्रजी अनुवाद उपलब्ध नव्हते. आम्ही पाठविलेले पत्रही सर्व प्रतिनिधींपर्यंत पोहोचले नव्हते. मग मी अध्यक्ष नरसिंहराव यांनाही भेटलो. त्यांना मराठीतले हरि नारायण आपटेच माहीत होते. त्यांच्या एका कादंबरीचा अनुवाद त्यांनी आपल्या भाषेत केला होता. आमच्या धडपडीचा काही उपयोग झाला नाही. ऑफिसमधल्या एका अनुभवी पदाधिकाऱ्याने आम्हाला सांगितले की, या कामासाठी तुमच्या भाषेसाठी प्रयत्न करेल असा एक राजकीय माणूस दिल्लीत पाहिजे, त्याचे येथे वजन पाहिजे, तुमच्या भाषेची एक लॉबी पाहिजे, तरच ही कामे पुढे सरकतात. जी.ए. जाऊद्यात, त्यांच्या कथांचे एक पुस्तक आम्ही, जी.ए. मित्रमंडळाने हिंदीत आणले आहे. श्री.दा. पानवलकरांच्या कथांचेही पुस्तक पॉप्युलर प्रकाशन काढणार आहे. त्यामुळे काय साधणार हे कळत नाही. एक कळते की, साहित्याची पारितोषिके केवळ साहित्यगुणावर दिली जात नाहीत. त्याहून या गुणावर एकमत होणे कठीण. दिल्लीतल्या त्या पदाधिकाऱ्याने आणखी एक गोष्ट सांगितली ती उद्‌बोधक आहे. तो म्हणाला की, मराठी समितीच्या शिफारशी कधीच एकमुखी असत नाहीत. पहिल्या क्रमांकासाठी दोन नावे जोडून पाठविली जातात. अन्य समित्यांवर काम करताना असे आढळले की, बऱ्याच वेळा तडजोडीचाच प्रकार होतो. अगदी नवी वाट काढता येत नाही. एकदा कराड पारितोषिकासाठी आम्ही अन्य लोकप्रिय नावे बाजूला ठेवून दिलीप चित्रे यांची निवड केली. त्यावर स्थानिक पत्रकार चित्र्यांची कविता आम्हाला समजावून सांगा म्हणून आमच्याकडे आले. सहज समजणारा आणि रिझवणारा कवीच त्यांना पारितोषिकासाठी पाहिजे होता. ५० वर्षांच्या स्वातंत्र्याने पारितोषिकांची संख्या, रक्कम वाढविली पण अभिरुची संभ्रमित केली. सांस्कृतिक क्षेत्रातही लोकमताचे दडपण वाढविले.

सांगलीत १९८६ साली आम्ही मतिमंद मुलांसाठी एक संस्था व शाळा सुरू केली. यासाठी शासनाची मदत मिळते हे आम्हाला उशिरा कळाले. त्यासाठी कागदपत्रांचे बरेच सव्यापसव्य करावे लागते, समाजकल्याण विभागाकडे खेटे घालावे लागतात याची आम्हाला आणि शाळा चालवणाऱ्या माझ्या मुलीला, रेवती हातकणंगलेकर हिला काहीच कल्पना नव्हती. या धडपडीत

२-३ वर्षे तिने स्वतःच्या बळावरच शाळा चालविली. तोपर्यंत समाजकल्याणचे कटु अनुभव तिला आले. अनेक वेळा गैरसल्ला, दिरंगाई, अडवणूक असे प्रकार झाले. शाळेसंबंधी अपप्रचारही झाला. या गोष्टी आम्ही श्री. माधव गडकरी – एकदा ते शाळेच्या भेटीसाठी आले असता – यांच्या कानावर घातल्या. त्यांनी लोकसत्तेतून, भाषणांतून आमच्यासाठी प्रयत्न केले पण त्याचा उपयोग झाला नाही. हितचिंतकांनी सल्ला दिला की, तुम्ही समाजजल्याणला काय हवे-नको ते पाहिले पाहिजे. त्यांच्या अधिकाऱ्यांची मर्जी राखली पाहिजे. माझ्या मुलीला हे मंजूर नसल्याने आम्ही या मार्गाने गेलो नाही. आमची शासनाकडची कामे यथावकाश पार पडली पण आमच्यावरचा रोष तसाच राहिला. एका अधिकाऱ्याने आम्हाला जे ऐकवले ते स्वातंत्र्याच्या ५० वर्षांनी आम्हाला काय दिले आणि शिकवले या संदर्भात महत्त्वाचे आहे. ते म्हणाले, "ही कामे करणे, त्यासाठी संस्था काढणे ही तुमच्या वर्गाची कामे नव्हेत. करणार असाल तर शासनाची मदत का घेता? या गोष्टी वंचित वर्गासाठीच आहेत. त्यांच्या प्रगतीच्या, समृद्धीच्या आड तुम्ही का येता?" स्वातंत्र्याच्या फळाची वर्गवारी, सत्ता शाबूत ठेवण्यासाठी या प्रकारे चालू आहे. जमेची बाजू दाखविता येईल; पण ती पक्षपाती अगर आदर्शवादी असण्याची शक्यता अधिक.





# परिवर्तनाच्या चळवळीतली मूल्यच्युती

**अविनाश बि.जे.**

'... स्वातंत्र्याचे काय होताना अनुभवले... त्या अनुभवांविषयी भविष्याकडे पाहात चिंतनात्मक स्वतःचे मनोगत व्यक्त करावे...' अशी अपेक्षा सत्तरी-पंचाहत्तरीतल्या व्यक्तींपासून ते पस्तिशी-चाळीशीतल्या काही व्यक्तींकडून *नवभारत*ने व्यक्त केलेली आहे.

अपेक्षित विषयाचा मुख्य रोख पाहता याविषयी मी माझ्या वयाचा संदर्भ जोडून पाहू लागलो... 'आमची पिढी' असं मला ज्या वयोगटाला म्हणता येईल त्या पिढीचा जन्म स्वातंत्र्यप्राप्तीनंतर दहा ते पंधरा वर्षांनंतरचा. ब्रिटिशांच्या राजवटीच्या संदर्भात, त्या काळातील भारतीय समाजाचं आर्थिक, सामाजिक, राजकीय, सांस्कृतिकं दृष्ट्या विविध टप्प्यांवरचं, विविध कोनांतून दिसणारं चित्र, त्याचे गावपातळीवरच्या समाजापासून ते वसाहतवादाच्या आंतरराष्ट्रीय पातळीपर्यंतचे संदर्भ... पुढे स्वातंत्र्याच्या प्रेरणेने भारलेल्या सुमारे दोन पिढ्यांचा अस्वस्थ काळ, प्रत्यक्ष स्वातंत्र्याचा संग्राम, १५ ऑगस्ट १९४७ हा ऐतिहासिक दिवस,... देशाचे राजकीय स्वातंत्र्य दृष्टिपथात आल्यापासून ते मिळेपर्यंतच्या व पुढे ते मिळाल्यानंतरच्याही काही काळातील जाणत्या पिढीने पाहिलेली विविधरंगी स्वप्ने... त्या स्वप्नांचेही स्थानिकपासून ते आंतरराष्ट्रीय वातावरणाशी असलेले संदर्भ हे सारं 'आमच्या पिढी' पर्यंत एक इतिहास म्हणून पोहोचलं. स्वतंत्र भारताची धुरा पुढे घेऊन जाणारी पिढी म्हणून साहजिकपणेच हा इतिहास आमच्यापर्यंत प्रेरणादायी स्वरूपात पोहोचला. किंबहुना तो होताही रोमहर्षकच. शालेय शिक्षण घेणारांना क्रमिक पुस्तकांतून, पुढे कथा-कादंबऱ्यांतून, वेळोवेळी विविध नियतकालिकांत झालेल्या लिखाणांतून, काही चित्रपटांतून, गीतांतून, नेत्यांच्या वेळोवेळी ऐकलेल्या भाषणांतून आणि खूप मोठ्या प्रमाणावर, मुख्यतः ग्रामीण भागात, इतिहासात कुठेही नोंद नसलेल्या पण स्वातंत्र्यसंग्रामात सामील झालेल्या नात्यागोत्यातल्या, शेजार-पाजारच्या वुजुर्गांच्या भारावलेल्या गप्पांतून तो सारा इतिहास व त्यांनी पाहिलेली स्वप्नं 'आमच्या पिढी'पर्यंत पोहोचली.

पण सुमारे वीसेक वर्षांपूर्वी, १९८० च्या मागे-पुढे, ही 'आमची पिढी' जेव्हा भोवतालचं वास्तव समजून घेण्याच्या वयात पोहोचली तेव्हापर्यंत स्वातंत्र्य मिळून तीन दशकं उलटून गेलेली होती. ब्रिटिश राजवटीतल्या अन्याय-अत्याचारांच्या वर्णनांबरोबर, स्वातंत्र्यचळवळीच्या रोमहर्षक वर्णनांबरोवर, केवळ इतिहासातच न रमणाऱ्या लोकांचा एक तिसरा सूरही या सुरात केव्हाच येऊन मिसळला होता.... स्वातंत्र्यप्राप्ती-पासूनच्या तीन दशकांतील अपेक्षाभंगाचा, स्वप्ने धुळीला





मिळाल्याचा तो सूर. म्हणजे 'आमची पिढी' जेव्हा भोवतालचं वास्तव समजून घेण्याच्या वयाच्या टप्प्यावर आली तेव्हा 'उषःकाल होता होता, काळरात्र आली...' हा सूरही पुन्हा-पुन्हा आमच्या कानी येत होता.

आज सत्तरी-पंचाहत्तरीत असलेले लोक आपलं चिंतनात्मक मनोगत मांडताना, आजच्या वास्तवाकडे, ४५-५० वर्षांपूर्वी स्वतःच्या पिढीने पाहिलेल्या स्वप्नांच्या तुलनेत पाहू शकतील; पण आमच्या पिढीचे डोळेच मुळी उषःकाल होता होता आलेल्या काळरात्रीत उघडले असल्यामुळं आमच्या भोवतालचं वास्तव म्हणजे काळरात्रच होती... ती उषःकाल होता होता आली होती हे आम्हाला इतिहास सांगणारांकडूनच समजू शकत होतं. थोडक्यात म्हणजे, आम्ही या वास्तवाकडं कुठल्याही स्वतःच्या, एके काळी पाहिलेल्या स्वतंत्र भारताच्या स्वप्नांच्या तुलनेत पाहू शकत नव्हतो... आम्ही भोवताली पाहू लागलो तेव्हा राजकीय स्वातंत्र्य अस्तित्वात होतंच. म्हणून आमच्या दृष्टीनं भोवतालच्या वास्तवाचं चिंतनात्मक मनोगत हे, 'स्वातंत्र्याचं काय होताना अनुभवलं' अशा संदर्भात फारसं नसून, 'भोवतालच्या समाजाचं वास्तवरूप पाहात, समजावून घेत, ते बदलण्याची स्वप्नं पाहात आणि ती साकारण्यासाठी धडपडत असताना काय अनुभवलं', असं अधिक आहे.

या भूमिकेतून हे टिपण/चिंतनात्मक मनोगत मांडत असताना *नवभारत*ने व्यक्त केलेल्या आणखी दोन अपेक्षांचं भान इथं ठेवलं पाहिजे. एक म्हणजे लेखन करणाऱ्या व्यक्तीने आपण ज्या क्षेत्रात क्रियाशील आहोत/होतो त्या क्षेत्रात आपण जे अनुभवले त्याचविषयी लिहिण्याची एक रास्त अपेक्षा आहे आणि विशिष्ट व सामान्य (Particular आणि General) असा संयोगही अपेक्षित आहे. म्हणजे अर्थातच मी परिवर्तनाच्या चळवळीतला कार्यकर्ता या भूमिकेतून लिहिणे अपेक्षित आहे आणि, 'विशिष्ट व सामान्य यांचा संयोग' याचा अर्थ, माझ्या व्यक्तिगत अनुभवांच्या विश्लेषणाची एकूण चळवळीच्या संदर्भाशी जोड असावी, असा मी घेत आहे.

१९८५ साली 'आंतरभारती' आणि बाबा आमटे यांनी आयोजित केलेल्या राष्ट्रीय एकात्मतेच्या प्रचारासाठीच्या 'भारत जोडो' सायकल यात्रेत मी, घरच्यांशी नाइलाजानं जवळजवळ नातं संपवूनच, सामील होण्याचा घेतलेला निर्णय हा, त्यामागच्या सुमारे दोन-तीन वर्षांमध्ये वाचनात आलेल्या डॉ. अल्बर्ट श्वाईट्झर, कार्व्हर, डॉ. आयडा स्कडर, रझिया पटेल यांसारख्यांची निमित्त ठरलेली चरित्रे, त्यांचे लेखन वाचून आणि भोवतालच्या वास्तवात दिसणाऱ्या, भेटणाऱ्या लोकांच्या दुःखाशी त्याचा संबंध जोडून पाहताना येणाऱ्या अस्वस्थतेतून व यातूनच हळूहळू स्वतःच्या मध्यमवर्गीय, सुखवस्तू जीवनाविषयी वाटणाऱ्या अपराधीपणातून घेतलेला निर्णय होता. जरी 'भारत जोडो'च्या निमित्तानं काहीशा व्यापक, मूलभूत प्रश्नांचा संपर्क येण्याची अधिक संधी मला मिळाली असली तरी तेवढ्यातून त्यांचे गुंतागुंतीचे संदर्भ मनात स्पष्ट झाले नव्हते. तिथून पुढची १९८८ पर्यंतची तीनेक वर्षे ही तुलनेनं निरुपद्रवी अशा, अंध विद्यार्थ्यांच्या शिक्षणाचे काम करण्यात गेली (अर्थात, या कामाचे स्वतंत्र पातळीवरचे महत्त्व मान्यच असल्याने ते काम आजही सुरू आहेच). तिथून पुढे मात्र काही वाचनातून, जाणीवपूर्वक केलेल्या अभ्यासातून, वाढत गेलेल्या संपर्कातून चळवळीचं चित्र पुढं उलगडत गेलं... मग चळवळीचा इतिहास समजावून घेणं, भोवतालच्या वास्तवाकडं, चळवळीकडंही समाजशास्त्रीय दृष्टिकोणातून पाहणं हे प्रयत्नपूर्वक सुरू झालं... या साऱ्या वाटचालीच्या खोलात जाण्याची इथं गरज नाही. फक्त एक मुद्दा यातून स्पष्ट करायचा आहे की, जेव्हा मी या क्षेत्रात पूर्णवेळ पडण्याचा निर्णय घेतला तेव्हा चळवळीविषयीची सर्वांगीण जाण, वैचारिक स्पष्टता वगैरे तर दूरच पण काही छोटंसं काम सुरू करण्यासाठी लागणारी व्यावसायिक माहितीही पुरेशी नव्हती. आणि तरीही समोर येत गेलेल्या अडचणींतून मार्ग काढत, सहकारी जोडत (काही जुने सहकारी गळत), चाचपडत, शिकत आम्ही वाटचाल करत राहिलो. तिथून सुरुवात करून आज माणसा-माणसांमधल्या आणि मानवेतर निसर्ग आणि मानवामधल्या नात्यांचा शोध घेत-घेत टिकाऊ, न्याय्य, वैविध्यपूर्ण, भयमुक्त समाजाचं स्वप्न पाहात, अत्यंत गुंतागुंतीच्या वाटचालीतून पुढं जाण्याचा प्रयत्न करत असतानाच्या या सर्व वाटचालीत, आपला प्रेरणास्रोत काय आहे?, हा प्रश्न जेव्हा जेव्हा समोर येतो तेव्हा उत्तर एकच मिळतं – मनाची संवेदनशीलता, त्या संवेदनशीलतेमुळे भोवतालचे वास्तव पाहून निर्माण होणारी अस्वस्थता, त्या अस्वस्थतेतून प्रश्नांची उत्तरं शोधण्याचा आशावाद, हाच आपला प्रेरणास्रोत आहे....

.... इथं मला थोडं गेल्या दहा-बारा वर्षांतल्या चळवळीतल्या निरीक्षणांत जाणवलेलं, एक अस्वस्थ करणारं वास्तव स्पष्ट करायचं आहे. 'कार्यकर्ताही माणूसच आहे, त्यालाही इतरां-








सारख्याच गरजा आहेत; रिकाम्या पोटी तो इतरांना कसा मदत करेल?...' हे तर्कशास्त्र मांडत मांडत आज 'व्यावसायिक समाजकार्य' हा 'ट्रेन्ड' चळवळीत खूप मोठ्या प्रमाणात घुसलेला आहे. वास्तविक वर सांगितलेल्या तर्कांचा अगदी 'सरळसाधा' अर्थ घेतला तर त्यात कोणालाच काही आक्षेपार्ह वाटणार नाही; पण त्याचा अर्थ तितका 'इनोसन्ट' राहात नाही. या व्यावसायिक समाजकार्यात दोन अपेक्षा गृहीत धरल्या जातात. एक तर समाजकार्यात पडण्यापूर्वीच, सुरुवातीपासून, कार्य-कर्त्याचा समाजकार्याचा समाजशास्त्रीय अभ्यास असला पाहिजे, त्यासाठी त्याने/तिने समाजकार्याचे व्यावसायिक प्रशिक्षण घेतले पाहिजे आणि मग पुढे समाजकार्य हाच 'व्यवसाय' म्हणून निवडल्यावर (किंवा काही लोक त्याला व्यवसाय न म्हणता 'करिअर' म्हणतात) त्यातून त्याला आर्थिक संरक्षण मिळालं पाहिजे... या दोनही अपेक्षांच्या समर्थनार्थ मग अनेक मुद्दे, तर्क सांगितले जातात. या 'व्यावसायिक समाजकार्या'च्या महापुरात मनाची संवेदनशीलता, अस्वस्थता, झोकून देण्याची वृत्ती अत्यंत अभावाने, क्वचितच आढळते. कार्यकर्त्यांची आर्थिक सुरक्षितता आणि पुस्तकी समाजशास्त्रीय सिद्धान्तांचा अतिरेकी अट्टहास या गोष्टींमध्ये संवेदनशीलता, अस्वस्थता, झोकून देण्याची वृत्ती हे खरे प्रेरणास्रोत लुप्तच होत चालले आहेत की काय असं वाटतं. आजपर्यंतच्या मानवी समाजाच्या वाटचालीच्या अभ्यासातून निर्माण झालेल्या समाजशास्त्रातल्या सिद्धान्तांच्या केलेल्या अभ्यासाचाही चळवळीत काही उपयोग होतो हे मान्यच असलं तरी, चळवळीत प्रत्यक्ष काम करताना त्या त्या काळातल्या संदर्भात पुढं येणाऱ्या प्रश्नांचा, आपल्या मूलभूत मूल्यांच्या, तत्त्वांच्या निकषावर सतत गांभीर्यानं अभ्यास, चिंतन, चर्चा, मंथन होणं अत्यंत गरजेचं आहे. तसे व्यावसायिक समाजकार्याच्या या पर्वातही चर्चासत्रं, सेमिनार, शिबिरं भरपूर होतच असतात... पण त्यांत या प्रकारचं मूलभूत तात्त्विक चिंतन फारच क्वचित होतं असं दिसतं आहे. परिवर्तनाच्या चळवळीत काम करत असताना आपण स्वीकारलेल्या व रुजवू पाहत असलेल्या मूलभूत मूल्यांच्या, तत्त्वांच्या निकषांवर आपलं काम तपासून पाहाणं ही एक सतत प्रवाही प्रक्रियाच असली पाहिजे... इथं केवळ आजपर्यंतच्या समाजशास्त्रांच्या पुस्तकांतलेच सिद्धान्त अपुरे पडतात. ही प्रक्रिया या चळवळीत सर्व पातळ्यांवर होत राहण्याची गरज आहे. आज ती होत असल्याचं दिसत नाही. समाजकार्याच्या अभ्यासात मानवी समाजाच्या आजपर्यंतच्या वाटचालीचं समाजशास्त्रीय विश्लेषण करणं, त्यातून काही निष्कर्ष काढणं, त्यातून काही समाजशास्त्रीय सिद्धान्त समजावून घेणं हे शक्य आहे, उपयुक्तही आहे... पण आपल्या कल्पनेतील 'योग्य' समाजव्यवस्थेसाठी आवश्यक मानवी मूल्यं, तत्त्वं शोधून ती स्वतःच्यात व समाजात रुजवण्यासाठीच्या प्रेरणा, वृत्ती, ऊर्जा या गोष्टी केवळ शास्त्रीय पुस्तकांच्या अभ्यासातून कशा मिळणार?

खरं तर स्पर्धेसारख्या ज्या मूल्यांवर, केंद्रीकरण, बाजार-व्यवस्था यांसारख्या ज्या रचनांवर आधारित समाजव्यवस्थेच्या विरोधात चळवळ करायची आहे त्याच समाजव्यवस्थेतील तीच मूल्यं, त्याच व्यवस्था 'व्यावसायिक समाजकार्या'च्या नावाने चळवळीत आज शिरलेल्या आहेत, आणि खूप मोठ्या प्रमाणावर शिरत आहेत असं दिसतं. फंडिंग एजन्सींना पटतील अशा प्रकारचे प्रकल्प-प्रस्ताव बनवणं, त्यासाठी गरज पडल्यास इतर कुठलीही बांधिलकी न मानता केवळ आपली फी घेऊन/कमिशन घेऊन प्रकल्प-प्रस्ताव बनवून देण्याचा व्यवसाय करणाऱ्या 'एक्स्पर्ट्स'कडून, 'फायनान्सिअल कन्सल्टंट' कडून ते बनवून घेणं, प्रत्यक्ष आपल्या कामाच्या खऱ्या गरजांचा विचार न करता भरपूर फंडिंग मिळवणं... हे सारं करणाऱ्या नोंदणीकृत संस्थांची संख्या खूप वाढलेली आहे, वाढत आहे. त्या संस्थांत असे 'व्यावसायिक समाजकार्य' करणारे 'सोशल वर्कर्स', बहुधा सुट्टीचे दिवस सोडून, ११ ते ५ या वेळात 'समाजकार्याची नोकरी' करतात. तिथं त्यांना भरपूर पगार मिळतात (अर्थात त्याला ते 'मानधन' म्हणतात). या भरपूर पगाराच्या आकर्षणामुळं, अजून फार स्पर्धा नसलेलं व्यवसायाचं एक क्षेत्र म्हणून एम.एस.डब्ल्यू. ला प्रवेश घेणाऱ्यांची संख्याही आज भरपूर आहे, वाढते आहे. आता पब्लिक ट्रस्ट, ट्रेड युनियन, संघटना या माध्यमांबरोबरच 'कंपनी' म्हणून नोंदणी करून समाजकार्य करणाऱ्यांचाही एक नवा 'ट्रेन्ड' आला आहे... या ट्रेन्डबरोबर चळवळीत आणखी कुठली मूल्यं शिरताहेत हेही बारकाईनं पाहावं लागेल...

... या साऱ्या व्यवसायीकरणाच्या, व्यवहाराच्या रेट्यात भोवतालच्या समाजातलं वास्तव पाहून होणारी अस्वस्थता, त्यामागची संवेदनशील मनं, ध्येयासाठी झोकून देणं... हे सारं कुठं हरवूनच चाललेलं दिसतं...

अधिकाधिक गुंतागुंतीच्या वनत चाललेल्या समाज-व्यवस्थेतील मूलभूत समस्यांची, त्यांच्या मूळ स्रोतांची आणि







त्यांच्या आजच्या संदर्भांची पुरेशी जाणीव/स्पष्टता नसणं (का, ती करून घेण्याविषयी पुरेसं गांभीर्य नसणं?), आणि त्यामुळं आपण काय करू पाहतो आहोत हेही पुरेसं स्पष्ट नसणं ही यामागची कारणं असू शकतील काय? ज्या मूल्यांच्या विरोधात चळवळ करायची आहे तीच मूल्यं चळवळ करणाऱ्यांच्यातच जोमानं रुजत आहेत, आपला शत्रूच आपल्या पोटात शिरला आहे, हे आपल्या, म्हणजे चळवळीतले म्हणवून घेणाऱ्यांच्या, वेळेवर लक्षात आलं पाहिजे, त्याच्या संभाव्य परिणामांचं गांभीर्य आपल्या लक्षात आलं पाहिजे. चळवळीची भावी दिशा ठरवताना आपण या मूलभूत समस्येवर गांभीर्यानं, कठोरतेनं विचार केलाच पाहिजे.






# लक्ष्यबदल

नरेन्द्र डेंगळे

भारतातील वास्तुकलेचे महाविद्यालयीन शिक्षण बौहौस या १९१९-१९३३ दरम्यान जर्मनीतील शिक्षणसंस्थेच्या कार्याच्या व कलामूल्यांच्या जागतिक पडसादांवर बेतलेले आहे. स्वातंत्र्यपूर्वकालात सर जे.जे. स्कूल ऑफ आर्किटेक्चरमध्ये जे शिक्षण दिले जात होते त्यात इमारतींचे चेहरे-मोहरे कसे घोटावेत यावर भर होता. जुन्या 'सुंदर' वास्तुनमुन्यांना समोर ठेवून त्यांचे कित्ते गिरविणे व त्यांतील वास्तुघटकांची रचना काटेकोरपणे करणे असे त्याचे स्वरूप होते. औद्योगिक तार्किकता, उपयुक्ततावाद, नवे बांधकामसाहित्य व वास्तु-रूपबंधावर होणारा या सर्वांचा परिणाम यांचा विचार त्या वेळेस नव्हताच. यामधील जे विद्यार्थी शिक्षणासाठी परदेशी गेले, विशेषतः लंडन, पॅरिस किंवा हार्वर्ड येथे, त्यांना एक वेगळीच दिशा मिळाली. त्यांना युरोपमधील बुजुर्ग वास्तुशिल्पी – जे आता अमेरिकेत स्थायिक झाले होते त्यांना – व अमेरिकेतील घडामोडी जवळून पाहण्याची संधी मिळाली. या बुजुर्गांची कार्यपद्धती, कलाजाणीव, सौंदर्यदृष्टी, जीवनशैली, आधुनिकतेची स्वप्ने यांचा भारतीय तरुण वास्तुशिल्पींवर ठसा उमटणे स्वाभाविकच होते. पण असे वास्तुशिल्पी हाताच्या बोटांवर मोजण्याइतपतच होते. परंतु १९६० च्या पुढे मात्र युरोपमधील औद्योगिक क्रांती व तिचा वास्तुकलेवरील परिणाम आणि युरोपीय-अमेरिकन बुजुर्गांची वास्तुकला यांचा पडसाद भारतातील वास्तुकला महाविद्यालयांवर नक्कीच पडला होता. बडोदा, दिल्ली व मुंबई ही वास्तुकलेची महत्त्वाची केंद्रे बनली होती आणि अहमदाबाद व खरगपूर बनू पाहत होती.

१९६४ साली एस.एस.सी. ची परीक्षा दिल्यावर मी माझ्या दोन-तीन मित्रांबरोबर पाठीवर हॅवरसॅक लावून उत्तरेकडे भटकायला गेलो होतो. दिल्ली-आग्रा, देहरादून, भाक्रा-नांगल, चंडीगढ, शिमला-सोलन व आसपासचे भाग फिरून महिनाभराने आम्ही परतलो. परतलो, आणि थोड्याच दिवसांत 'आधुनिक भारताचे एक शिल्पकार' पंतप्रधान पंडित नेहरू यांच्या निधनाचा हादरा देशाला बसला. चंडीगढची रचना करायला पंडितजींनीच ल-कॉर्बुझिए या जगप्रसिद्ध स्विस-फ्रेंच वास्तु-शिल्पीला पाचारण केले होते. ल-कॉर्बुझिएचा चंडीगढ निर्मितीमागील अत्याधुनिक दृष्टिकोण आणि पंडितजींचा त्याला मिळालेला पाठिंबा – त्यांच्याच शब्दांत सांगायचे तर, "आपल्याला आवडेल का नाही हे बिलकूल महत्त्वाचे नाही; हा (चंडीगढ-प्रकल्प) भारतातील अशा प्रकारचा सर्वांत विराट प्रकल्प आहे... कारण तो आपल्या डोक्यावर एक प्रहारच करतो, कारण तो आपल्याला विचार करायला भाग पाडतो... आणि भारताला कशाची गरज आहे तर अनेक क्षेत्रांमध्ये डोक्यावर प्रहार होण्याची."

१९६४ मध्ये चंडीगढमधील विधान-सभागृह, उच्च-न्यायालय व सरकारी शासनाच्या इमारती पूर्ण झाल्या होत्या. शहराची रचना आकार घेऊ लागली होती. घरबांधणी चालू होती. चंडीगढच्या स्थापनेसाठी जुनी नगरे न धुंडाळता सर्वस्वी नवीन – न डागाळलेल्या – भूमीची निवड करण्यात आली होती... तेथेच कोठेतरी वास्तुकलेचे शिक्षण घ्यावे हे बीज माझ्या मनात पेरले गेले असावे. भारतातील नगररचना परदेशी वास्तुशिल्पींच्या हाती सोपविण्याची ही पहिली घटना नव्हती.

त्यालाही एक परंपरा होतीच! सर एडविन् लुटीयन्सने नव्या दिल्लीची रचना १९२० मध्ये पूर्ण केली होतीच. पण त्याची नेमणूक ब्रिटिश राज्यकर्त्यांनी केली होती.

भारतीय वास्तुकला अर्थातच इतिहासजमा झाली होती. हिंदू-बौद्ध-जैन-मुस्लिम यांच्या भव्य, विराट व कलाकुसरपूर्ण अशा वास्तुकलेची जाणीव फक्त इतिहासाच्या अभ्यासाद्वारेच काय ती विद्यार्थ्यांपर्यंत पोहोचत असे. (आजही त्यात फार बदल झालेला नाही.) आपण जी नवी आधुनिक-उपयुक्ततावादी-औद्योगिक जाणीव वास्तुकलेद्वारे शिकत आहोत, तिचा आमची संस्कृती-इतिहास-परंपरा-सामाजिक संदर्भ व भविष्यकालाशी काय संबंध लागतो याचे भान कोणालाच नव्हते! सर्वसामान्यतः फ्रँक लॉइड राइट (अमेरिकन), मीस व्हॅन डर-रो (जर्मन), ल-कॉर्बुझिए (फ्रेंच-स्विस), अल्वार आल्टो (फिनीश), आंतोनी गावदी (स्पॅनिश), केंझो तांगे (जपानी) या प्रतिभावान मंडळींची वास्तुकला आमच्यापर्यंत पुस्तकाद्वारे पोहोचत होती. त्याने आम्ही प्रभावित होत होतो. त्यातूनच पुढे अहमदाबादला भेट दिल्यावर तेथील ल-कॉर्बुझिएरचित इमारती पाहिल्या, लुई कानचे आय.आय.एम.ही पाहिले व पुस्तकी दृश्य-कल्पनांना अवकाशाचे परिणाम लाभल्यासारखे झाले. हे सर्व घडत असताना, चुकूनही, जुने पुणे पाहावे, जुन्या वास्तूंकडे नव्या नजरेने पाहून त्यातील अर्थ शोधावा, परंपरेचा नव-वास्तुकलेत कसा नव-अवतार घडवून आणावा इत्यादी विचार ना कोणी आमच्यापुढे मांडले ना आम्हाला त्यात कधी रस वाटला! आम्हीही नव-वास्तुकलेतील दृष्टीने दिपलो होतो. भारतीय वास्तुशिल्पींपैकी श्री. अच्युत कान्विंदे, चार्ल्स कोरिया व बाळकृष्ण दोशी यांचे काम मोठ्या आवाक्याचे व प्रतिभावान म्हणायला हवे. कान्विंद्यांचे आय.आय.टी. कानपूर, कोरियांचा साबरमती येथील गांधी आश्रम व दोशींची इंडॉलजीची अहमदाबादमधील वास्तू ह्या त्यांच्या त्या वेळच्या प्रातिनिधिक वास्तू होत.

या वास्तूंकडे पाहताना व त्यांचा अनुभव घेताना, काही नवे प्रश्न, अर्थ आणि संदर्भ मनात तयार होत होते. त्यांतील सर्वांत महत्त्वाचा दृष्टान्त म्हणजे भारतातील वैविध्यता. आदिवासी भागातील गरजा व त्यांनी योजलेले उपाय, खेड्यातील अर्ध-शहरीवृत्ती, महानगरातील उद्योगप्रधान-नागरी वातावरण या तिन्ही क्षेत्रांना स्वतःचे खास पारंपरिक, सामाजिक आणि सांस्कृतिक संदर्भ होते. परंतु सरकारी पी.डब्ल्यू.डी. ने बांधलेल्या ठोकळ्यांमध्ये त्यांचा सर्वस्वी अभाव दिसत होता. अशा पद्धतीने बांधलेल्या इमारतींना एका चमत्कारिक काटकसरीच्या व्याख्येने ग्रासले होते. उपयुक्ततेच्या नावाखाली मध्ये बोळ व दुतर्फा खोल्या अशा स्वरूपाच्या या चेतनाहीन वास्तूंमध्ये मुतारीचा दर्प भरलेला असे. भारतात कोठेही वास्तू रचताना सर्वांत महत्त्वाची बाब ध्यानात घ्यावी लागते ती म्हणजे खेळती हवा. तसेच सूर्यप्रकाशाचा यथार्थ वापर... हे विद्यार्थिदशेतच लक्षात यायला लागले होते.

महाविद्यालयात, म्हणजे ६४ ते ७० या काळात, इतरही अनेक घटनांचा परिणाम होत होता. पुण्यातील पूर व त्यात स्वयंसेवक म्हणून केलेले काम, बिहारचा दुष्काळ व जयप्रकाशांचे तरुणांना आवाहन, चंद्रपूर येथे बाबा आमट्यांनी घेतलेले पहिले कार्य-शिबिर यामधील मानसिक गुंतवणूक व सहभाग तर दुसरीकडे कलाक्षेत्रातील जाणिवांचे उमलणे. सत्यजित राय यांच्या चित्रपटांतील भारतीय वास्तवता व संवेदना यांचा कलापूर्ण आविष्कार, विजय तेंडुलकर-बादल सरकार यांच्या नाटकांतील नागरी जाणीव, कर्नाडांच्या नाटकांतून व्यक्त होणारे सांस्कृतिक संदर्भ, बडे गुलाम अलीखाँ यांचे रंगतदार, रसाळ आणि भावपूर्ण गायन आणि भारतीय चित्रकलेतील आधुनिकता समजावून घेण्याचे ते दिवस होते.

हिंदुस्थानातील गुरु-शिष्य परंपरा वास्तुकलेतही अनेक वर्षं जोपासली गेली होती. परंतु जशी संगीतात, नृत्यात व कलाकुसरीत ती अजूनही पाळली जात होती तशी वास्तुकलेत मात्र मंदिर-रचनाकार्यात मग्न असलेले स्थपतीच फक्त ती मर्यादित स्वरूपात पाळत होते. आम्ही त्या परंपरेच्या केव्हाच बाहेर पडलो होतो, हेही ध्यानात यावयास लागले होते. परंतु या परंपरेच्या प्रवाहाशी केव्हा व कोठे पुनः गाठभेट होईल हे ठाऊक नव्हते. महाविद्यालयातून बाहेर पडल्यावर वास्तुकला-प्रक्रियेत उडी घ्यायला मन उत्सुक होते, बोटे शिवशिवत होती, शरीर वाटेल ते कष्ट करायला तयार होते. तीन वर्षं विविध स्टुडिओंमध्ये काम केले. त्यात कान्विंद्यांकडेही. तेथून बाहेर पडताना वास्तुकलेचा सदुपयोग आपण जर खेड्यापाड्यांत केला तर आपल्या शिक्षणाचे व तालमीचे चीज होईल असे वाटत होते. त्यामुळेच की काय, पण १९७४ मध्ये दिल्लीला स्वतःची प्रॅक्टिस सुरू केल्यावर, सुरुवातीचे अनेक प्रकल्प बिहारमधील गावे, संथाल परगणा येथे आदिवासी मुलांच्या शाळा-वसतिगृहे, आदिवासी क्षेत्रात इस्पितळे वगैरे करण्यात




गुंतलो होतो. १९७५ मध्ये आणीबाणी जाहीर झाली तेव्हा मी दिल्ली विद्यापीठातील वास्तुकला महाविद्यालयात अध्यापन करीत होतो. प्रॅक्टिस चालू असली तरी अध्यापन ही एक सरकारी नोकरीच होती. तिचा त्याग करून प्रॅक्टिसमध्ये अधिक लक्ष घालावे व आणीबाणी-विरोधात सहभागी व्हावे अशी जबर इच्छा जागृत झाली. तेव्हा कै. नानासाहेब गोरे दिल्लीला असत. त्यांना भेटून माझी व्यथा सांगितली. लहानपणापासून परिचय असल्यामुळे त्यांना माझ्या धडपडीची ओळख होतीच. त्यांनी, 'वास्तुकलेला सोडू नकोस व अध्यापनात रस घेतो आहेस तर त्याग करायची गरज नाही,' असा सल्ला दिला. त्यामुळे पुढे १९८१ पर्यंत अध्यापन चालूच राहिले (जरी आणीबाणीत आमचे जंगपुऱ्यातील लहानसे घर अनेक अनोळखी भूमिगत कार्यकर्त्यांचा बैठकीचा अड्डा आणि काही स्नेह्यांसाठी मुक्कामाचे ठिकाण बनले होते). आणीबाणीत आणखी एक घटना घडली. ती म्हणजे दिल्लीमधील आम्हा सात-आठ वास्तुशिल्पींची इंदिरा गांधींशी भेट! हे सर्वच वास्तुशिल्पी स्वतःचा व्यवसाय आणि अध्यापन दोन्ही क्षेत्रांत मनापासून कार्यमग्न होते. सर्वांनीच राष्ट्रीय पातळीवरील वास्तुरचना-स्पर्धांमध्ये पारितोषिके मिळवलेली होती. सर्वांनाच सामान्यांच्या गृहरचनेच्या प्रश्नासंबंधी पोटतिडीक होती. चर्चा अर्धा-पाऊण तास चालली. गृहरचनेसाठी, नगर-विस्तारासाठी खेडी-विकासासाठी योजना आखायला अशा व्यावसायिकांच्या गुणवत्तेचा, प्रतिभेचा व बोधनेचा सहभाग करून घेता येणे शक्य असतानाही त्याबद्दल सरकार निरुत्साही का आहे, हा प्रश्न आम्ही पंतप्रधानांना केला. प्रत्यक्ष आणीबाणीचा आमच्या भेटीचा काही संबंध होता असे वाटत नाही. केवळ हे गाऱ्हाणे सर्वोच्च पातळीवर मांडल्यास काहीतरी चमत्कार घडेल व आम्ही आमची सर्जक शक्ती अधिक कारणी लावू शकू अशी भोळसट समजूत त्यामागे असावी. त्यानंतर आठवडाभर पंतप्रधानांच्या कार्यालयातून बरेच फोन, भेटी वगैरे झाल्यावर ही घटना आजकालच्या असंख्य 'घोटाळ्यां'सारखी हवेत, स्मृतीत विरूनही गेली.

१९७४ ते ८२ या काळात मी बिहारमधील बोकारो, हजारीबाग, कुजू, सीतापहाड, सीतागढ, बंगालमधील राजीवपूर, दार्जिलिंग, सिक्कीम, ओरिसात जगन्नाथपुरी इकडे अनेक प्रकारचे वास्तु-प्रकल्प केले. त्या निमित्ताने खूपच फिरलो. आदिवासी कला-राहणी पद्धती, तिबेटी-नेपाळी लोकांची घरे, नागांची हातमागावरील कला, बांधकाम साहित्याचा पारंपरिक विचार, हस्तकलांचे जीवनातील स्थान, निसर्गचक्राशी असलेला हस्तकला, नृत्य, संगीत यांचा घनिष्ट संबंध तसेच या सर्वांवर 'आधुनिकते'चे उठणारे ओरखडे... सर्वच जाणवत होते. हे नक्कीच कोठेतरी हृदयात पक्के ठासले गेले असणार; कारण त्यांचे संश्लेषण माझ्या वास्तुरचनेत उतरत होते असे मागे वळून पाहताना ध्यानात येते. अंगण, ओसरी, पडवी, माजघर, ओटा, आंतरांगण, खळे, कुंड इत्यादी. अवकाश-घाटदर्शक संज्ञांना प्रत्येक प्रांतिक भाषेत स्थान होते. भिंतींचा गिलावा किती वर्षांनी करावा, त्यात काय मिसळावे, बांबूचे छत केव्हा शाकारावे, त्यावरील सुके गवत केव्हा बदलावे... पुरुषाने काय करावे, स्त्रीने काय करावे, शेजाऱ्यांचा गृहरचनेत काय सहभाग असावा – कितपत, बांधकामसाहित्य सर्वस्वी विकत घेतले जाते की जमिनीत पैदा केले जाते, वास्तूचे आयुर्मान किती वर्षांचे असावे, पाऊस-पूर-वादळे-विजा-भूमिकंप यांना अशी घरे कितपत टक्कर देऊ शकतात... इत्यादी अनेक गोष्टींची नोंद होत होती.

पिढ्यान् पिढ्या चालत आलेले परिसराविषयीचे ज्ञान पूर्णपणे इतिहासजमा झालेले नसून, भारतासारख्या 'मागास' देशात या ज्ञानाचा वापर सतत चालू असलेला आढळतो – विशेषतः खेड्यात आणि आदिवासी भागात. कारागीर, बांधकाम-साहित्य आणि शिस्त व व्यवस्थापन यांमधील परस्परसंबंधांतून वास्तुकला कोठल्या दिशेने वाटचाल करीत आहे हे व्यक्त होते. कारागिरीमध्ये गुरू-शिष्य परंपरा जपण्याचा प्रयत्न होतो. बांधकाम-साहित्यामुळे सुतार व कुंभार एकत्र येऊन विशिष्ट पद्धतीने काम करताना कोकणात आढळतात. बांधकामाचे व्यवस्थापन व शिस्त बदलू लागली की, त्याचा परिणाम कामाच्या गुणवत्तेवर होऊ लागतो. व्यवस्थापन जितके मागणीप्रमाणे पुरवठा करू लागते तेवढे ते कारागिरी, बांधकाम-शिस्त यांवर नियंत्रण ठेवू पाहते. पारंपरिक पद्धतीने होणारी गृहरचना मात्र कल्पकतेअभावी विशिष्ट साच्यामध्ये अडकून बसली आहे. बदलती राहणी-पद्धती, आधुनिकता यांना सामोरे जाताना सर्जक जाणिवेअभावी पारंपरिक वास्तुघाटाची कक्षा आकुंचित झाली आहे. एकीकडे वास्तुमहाविद्यालयातून शिकून बाहेर पडलेले वास्तुकार – ज्यांच्या दृष्टीपुढे विकसित देश, पुस्तकी तसेच लौकिक वास्तुघाट यांचे आदर्श असतात – त्यांनी, नकळतच का होईना, पारंपरिक ज्ञान, कारागिरी व

अनुक्रमणिका








कलातत्त्वे यांकडे पाठ फिरविलेली असते. दुसरीकडे, पारंपरिक कलेतून कला बाजूलाच राहून रूढी अंगवळणी पडल्यामुळे फक्त पारंपरिकता आणि कारागिरी यांना जपणारा समाज आढळतो. असे विभाजन बहुतेक सर्वच कलांना आत्मघातकी ठरले आहे. कदाचित संगीत व काही प्रमाणात नृत्य यांना हे अंतर्गत विभाजन कमी भेडसावत असेल. परंतु आकृती हा ज्या कलांचा प्राण आहे त्या 'आकार्य' कलांचे यामुळे चांगलेच नुकसान झाले आहे. याच्या जोडीला पारंपरिक कलेला जपणारा परंतु कलेच्या अंतर्गत व्यवहाराबद्दल पूर्णपणे अज्ञानी असा मोठा समाज आपल्याकडे आहे. या समाजाला धार्मिकतेविषयी मूलाग्रही प्रेम असल्याने ठरावीक पद्धतीच्या वास्तुप्रतिमांची पुनर्उजळणी करण्यापलीकडे वास्तुकलेत रस नाही. बेंगलोरची विधानसौधा, दिल्लीचे अशोक हॉटेल, शिवसेनेची बुरूजरूपी कचेरी किंवा पुण्यातील ज्ञानप्रबोधिनीची इमारत इ. नमुने कलाकुसर, बांधकाम-साहित्य आणि वास्तुरूपबंध यांमधील परस्परसर्जक नाते प्रकट करण्याला असमर्थ ठरतात; किंबहुना, नाकारतात. त्यांच्या चक्षूंपुढे असतात त्या साचेबंद ऐतिहासिक वास्तु-प्रतिमा. काँक्रीट, ग्रॅनाइट, रंग लावलेले पुठ्ठे, थर्मोकोल अशा भिन्न प्रवृत्तींच्या साहित्याद्वारे या पार्थिव वास्तुप्रतिमा राबवायला या मंडळींना कुठलीच अडचण वाटत नाही! गंमत म्हणजे एखाद्या जुन्या व वैशिष्ट्यपूर्ण वास्तूचा जीर्णोद्धार करताना मात्र हीच मंडळी पारंपरिक पद्धतीचा अवलंब न करता – म्हणजेच दगड घडवून, कारागिरीला प्राधान्य देऊन न करता – काटकसरीच्या नावाखाली झटपट काँक्रीटमध्ये हवा तो दृश्याकार बांधून त्याला भगवा किंवा हवा तो रंग देऊन मोकळे होतात! त्यामुळे एकीकडे 'परंपरा जपणारे' व दुसरीकडे त्यांचे 'निर्मूलन करणारे' गट तयार झाले आहेत. परंतु वास्तुकला त्यापलीकडची कला आहे. अवकाशाकडे सदैव नव्या नजरेने बघणारी कला म्हणून मी वास्तुकलेकडे पाहू लागलो आहे. दैनंदिन मानवी व्यवहारासाठी उपयोगाच्या पूर्तीकरता केवळ नव्हे तर त्यापलीकडील अवकाशाचा कला अनुभव ज्याद्वारे प्रस्तुत केला जातो अशी ही कला आहे. परंपरेविषयीचा आग्रह वा तिरस्कार, संशय किंवा अविश्वास तसेच आधुनिकतेबद्दल विनाकारण श्रद्धा या परस्परविरोधी भूमिकांचा प्रश्न या 'नव्या नजरेत' येत नाही. 'Spirit Nouveau' प्रमाणे ती नव्या काळाची नाडी पकडू पाहते. काल आणि अवकाश या दोन्ही पलीकडील गोष्टी आहेत. पण वास्तुकला ही व्यवहारातील, जीवनोपयोगी या अर्थाने 'पार्थिव कला' असूनही, तिचा संबंध या दोहोंशी विविध पातळ्यांवर येतो. स्थानिक हवामान, पर्यावरण आणि संस्कृती यांनाही काल आणि अवकाशाची वस्तुनिष्ठ परिमाणे वास्तुकले-द्वारे लागत असतात.

परंपरा व वारसा यांचा विचार वास्तुसंकल्पनेचा अंगभूत पैलूच आहे, हे वाटचाल करीत असताना ध्यानात आले. पूर्वी जुन्या पुण्याची फारशी ओळख नसलेला मी, ज्या गावांना, शहरांना भेटी देण्याचा योग आला तेथे नकळत जुन्या वास्तुवैशिष्ट्यांचे टिपण करू लागलो होतो. यातूनच साचेबंद प्रतिमांचा त्याग झाला. मग त्या प्रतिमा भारतीय-ऐतिहासिक असोत किंवा पाश्चात्त्य आधुनिक असोत. परंपरा व वारसा यांचा विचार स्वतंत्रपणे येऊन टपकत नाही. संस्कृती व वारसा यांची जाणीव दोन स्तरांवर जाणवते. आंतरिक आणि व्यक्त. आंतरिक जाणिवेला शास्त्राची चौकट मर्यादितपणेच लावता येते पण तिला डोळसपणे पाहणे शक्य असते. शास्त्रोक्त उत्तर शोधण्यासाठी नव्हे तर स्वतःपर्यंत येऊन पोहोचणाऱ्या संवेदनांचे संदर्भ व अर्थ कलेद्वारे मांडण्यासाठी. कार्यकारणभावाने या जाणिवेला ओळखणे शक्य नाही. परंतु विधी, सोहळे यांपासून अलिप्त करून आंतरिक जाणिवेला निव्वळ स्वरूपात पाहणे शक्य असते असे वाटते. आंतरिक जाणिवेला पाहण्यासाठी आपल्याकडे ध्यान, भक्ती इत्यादी परंपरा आहेतच. या परंपरेचा मोठाच पगडा जनमानसावर आहे. सर्वसामान्य नागरिक, शास्त्रज्ञ, राज्यकर्ता, विद्वान, कलाकार... कोणीही असो, सर्वसामान्य चर्चेतही ध्यानपरंपरेची, अतिभौतिकतेची, अध्यात्माची जाणीव सहज उतरताना दिसते. कलाकार आपल्या कलेच्या संदर्भातही आवर्जून या जाणिवेचे समर्थन करताना आढळतात. व्यक्त स्वरूपात संस्कृती व वारसा यांचे दर्शन आपल्याला होते ते वास्तुकला व इतर आकार्य कला, राहणी-पद्धती, विधी-सोहळे, कलाकुसरीची परंपरा यांमध्ये.

दोन वर्षांपूर्वीच माझ्यावर एका हिंदू देवळाच्या रचनेचे काम सोपविण्यात आले. आजच्या काळात हिंदू देवतेसाठी मंदिर रचायचे म्हणजे वास्तुकाराने नेमके काय करायचे हा एक प्रश्नच आहे. बहुधा असे प्रकल्प पारंपरिक संस्थेतील स्थपतींकडे सोपविले जातात. त्याची निष्पत्ती आपण अलीकडील विविध जैन मंदिरे, हिंदू देवालये यांमध्ये पाहतोच. ही देवालये संगमरवर, स्थानिक किंवा आयात केलेल्या पाषाणातून जुन्याच

शैलीत बांधलेली असतात. त्यांचा आकार, घाट, घटक तथाकथित 'शास्त्रात सांगितल्याप्रमाणे' असतात. बौहौस पद्धतीच्या धर्तीवर वास्तु-प्रशिक्षण घेतलेल्या माझ्यासारख्या असंख्य वास्तुकारांनी मग काय करायचे? वरवर दोन पर्याय दिसतात. एक म्हणजे एखाद्या स्थपतीशी संधान बांधायचे आणि मग स्वतःचा कार्यभाग जुजबी कामापुरता मर्यादित करायचा. दुसरा पर्याय म्हणजे पारंपरिक शैलींच्या व शास्त्राच्या ज्ञानाअभावी, देवळांची ढोबळ प्रतिमा पुढे ठेवून मंदिर 'ठोकून' द्यायचे – ज्याचे परंपरेशी व संस्कृतीशी, आंतरिक वा व्यक्त कोठलेच नाते नसेल. देऊळ म्हणजे एक देवाची खोली, त्यावर एक टोपीयुक्त छप्पर एवढेच त्याचे मर्यादित स्वरूप असेल. मला वाटते की, दोनही पर्याय काल व अवकाश यांच्याशी प्रतारणा करणारे आहेत. अवकाशाचे पारंपरिक व सांस्कृतिक संदर्भ आज नव्याने 'पाहून', वास्तूच्या व्यक्त रूपाचे महत्त्वाचे पैलू नव्याने घडविणे शक्य व्हावे असे मला वाटले. त्यातूनच वास्तुकाराची आंतरिक जाणीव आणि तिचे संस्कृतीशी असलेले नाते आधुनिक कालात नव्या रूपाने अवतरू शकते. हा तिसरा अवघड पर्यायही ओळखायला हवा.

वास्तुकलेत अवकाश हे असे माध्यम आहे की, ज्याद्वारे वैयक्तिक अनुभव व जाणीव सर्वसामान्यांपर्यंत पोहचून पलीकडील संक्रमण साधू शकते, काही स्थित्यंतर घडवू शकते. हिंदुस्थानात पूर्वी वास्तुकलेला 'ज्योतिषशास्त्र राबवणारी कला' असेही म्हटले गेले होते. धर्माच्या दबावाखालील मर्यादित स्वरूपाची पार्थिव कला या पार्श्वभूमीवरून आता वास्तुकलेचे क्षेत्र अधिक व्यापक बनले आहे. एका स्तरावर ती सामाजिक-आर्थिक-सांस्कृतिक प्रश्नांना उत्तरे शोधते, दुसऱ्या स्तरावर ती अजूनही धर्म, श्रद्धा यांच्या दबावाखाली ऐतिहासिक जडप्रतिमावादी ठरते, तिसऱ्या स्तरावर वास्तुकला हा इमारती बांधून विकायचा (शॅम्पू, सावणवडी इ. प्रमाणे) धंदा बनला आहे, तर चौथ्या स्तरावर अवकाशाचे संदर्भ-परिमाण धुंडाळताना वास्तुकलेतील कलाबीजे नवे अंकुर धारण करू शकतात. असे चार काहीसे परस्परभिन्न पर्याय आज वास्तुकलेद्वारा मांडले जात आहेत. बौहौस पद्धतीच्या शिक्षणानंतर स्वतःच्या वास्तुजाणिवेत अनेक सामाजिक, स्थानिक व सांस्कृतिक संदर्भांचे पदार्पण झाले आहे. भारतातील अनेक वास्तुशिल्पींच्या जाणिवेत त्यामुळे लक्ष्यबदल घडून येतो आहे.





# फुटलेले (भ्रमाचे) भोपळे!

**कुसुम पटवर्धन**

गेल्या पन्नास वर्षांची आठवण झाली की, माझे मलाच खूप आश्चर्य वाटते. मी आज आहे अशी का आहे? माझे विचार, काही थोडेफार कार्य, मनोधारणा, मित्र-मैत्रिणी, मुख्यतः मी ज्यांच्याशी लग्न केले ते साथीदार (विठ्ठल पटवर्धन) याच गोष्टींना माझ्या जीवनात स्थान का मिळाले? माझ्या मते जी थोर अशी अनेक माणसे मला भेटली ती का भेटली? थोडक्यात काय, मी माझाच शोध घेतला तर सर्वांत महत्त्वाचे आयुष्याचे वळण कोणते?

अर्थातच १९४२ चे क्रांतिपर्व! आणि त्यातून पाहिलेले पूर्ण क्रांतीचे दर्शन. तेव्हाचे अनेक 'ठाम सिद्धान्त', गृहीते, 'इझम' इ. काळाने पूर्ण खोटे ठरविले आहेत. तेव्हाच्या आमच्या मनातील कल्पना तरी काय होत्या?

तेव्हा अर्थातच स्वातंत्र्य मिळवायचे होते. ब्रिटिश राज्यापासून मुक्ती हवी होती. मग राज्य कसे हवे होते?

तो काळ कम्युनिस्ट-मार्क्सिस्ट विचारसरणीच्या पगड्याचा होता. आम्ही मार्क्सवादामध्ये घोटले जात होतो. श्रीमंत हे श्रीमंत का होतात? तर, मजुरीमुळे जे उत्पादन होते त्याची किंमत वास्तविक जादा असते, पण सर्व नफा हा मालक व भांडवल घालणारा खाऊन जातो व मजुरांची पिळवणूक होते, म्हणून इ. इ. त्यामुळे जमीनमालक, घरमालक, गिरणीमालक अशी सर्व मालकमंडळी ऐदी, बसून खाणारी, न कमावता आयत्या बिळावर नागोबा होऊन बसणारी, निरुद्योगी म्हणून आम्ही त्याज्य मानली! व्यापारीही त्यांचेच पित्ते. केवळ लुटणारे!

अनुक्रमणिका





मात्र स्वातंत्र्यानंतर अण्णासाहेब सहस्रबुद्धे यांच्याबरोबर अनेक प्रयोगांत व उत्पादक सोसायट्यांत प्रत्येक 'उद्योग' आम्ही प्रचंड नुकसानीत घालून दाखवला! आणि तो उद्योग 'लहान' आहे, माणसे नवीन आहेत, मजूर अडाणी आहेत अशी अनेक समर्थने देत बसलो! व्यापारातही लाखाचे बारा हजार!

पण धंदा करायला पैशाबरोबर प्रचंड श्रम व अक्कलही लागते हा धडा शिकायला आम्ही तयार नाही! आज तर अशी स्थिती आहे की, मजूर हा मजुरीपेक्षा जास्त किमतीचे उत्पादन करतो हे प्रमेयच शंकास्पद वाटावे. दिवसाचे दोन तास जेमतेम काम करूनही आमची 'पिळवणूक' होत असते, अशी आमची आज तक्रार असते!

सरकारी कर्मचारी, कारखाने, शाळा, शेती – सर्वत्र 'काम कमी करा व दाम जास्त द्या' याचेच नारे लागतात व यालाच अजून 'क्रांतिकारक' विचार मानायची पद्धत आहे! समाजवादापासून इतकाच अर्थ आम्ही काढलेला दिसतो.

आर्थर कोसलरच्या *डार्कनेस ॲट नून* या कादंबरीमधील ग्लेटकिन या क्रांतिकारकाशी रुबेशॉव या प्रतिक्रांतिकारक ठरलेल्याचा झालेला एक संवाद आहे. रुबेशॉव विचारतो, "झारच्या अत्याचारांच्या विरोधात आपण क्रांती केली, पण कम्युनिस्ट सरकारने जास्त मोठ्या प्रमाणात अत्याचार केले नाहीत का?"

ग्लेटकिन सांगतो, "आपण दहशत घालून लोकांकडून काम करून घेतले नसते तर आपल्याकडे रेल्वे रुळावर गवत उगवले असते! आपले अत्याचार देशाच्या प्रगतीसाठी होते."

आपल्या देशात रुळांवर गवत उगवलेच आहे! समाजवादाच्या नावावर आपण केवळ आळस आणि आराम ही संस्कृती शिकवली!

क्रांतिकारक साध्यासाठी कोणत्याही साधनाचा वापर समर्थनीय आहे (End justifies the means) असे एक कम्युनिस्ट तत्त्वही आम्हाला सातत्याने ऐकावे लागले. हे सर्व अत्याचार, संहार, लढाया ह्या योग्यच आहेत; कारण त्यांचे ध्येय उच्च होते. या तत्त्वाविरुद्ध फक्त म. गांधीच निश्चित भूमिका घेत. हिंसेने हिंसाच वाढेल, द्वेषाने द्वेषच वाढेल असे ते नेहमी म्हणत. आम्ही मात्र त्यांची टर उडवीत होतो. पण एका वेगळ्याच अर्थाने आम्हाला त्याची प्रचिती येऊ लागली. विद्यार्थिदशेत प्रथम आम्ही एकत्र जमत होतो व बौद्धिके ऐकत होतो. त्यात अनेक कम्युनिस्ट पुढारी व कार्यकर्ते होते. अचानक, १९४२च्या सुमारास, दुसरे महायुद्ध हे पीपल्स वॉर – लोकयुद्ध – ठरले ! कालपर्यंत ब्रिटिशांविरुद्ध रणशिंग फुंकण्याची वाट पाहत असलेले आमचे कॉम्रेड्स ब्रिटिशांना मदत करण्याची भाषा करू लागले. तासचे तास वाद घालू लागले. इकडे काँग्रेसची पावले अंतिम लढ्याच्या बाजूने पडत होती. आमच्या मनातही आग पेटू लागली होती. अचानक ही बौद्धिक मंडळे फुटली. कालचे मित्र आजचे शत्रू बनले. आमच्या काही मैत्रिणी आंदोलनाच्या विरुद्ध झाल्या. इतक्यावरच थांबले नाही, तर काही मित्र-मैत्रिणी वा कार्यकर्ते फोडण्यासाठी खोट्या बातम्या, खोट्या चिठ्ठ्या, इतकेच काय खोटी प्रेमपत्रेही पाठवली गेली. एका कार्यकर्तीची मजल तर पार्टीला पैसे हवेत म्हणून स्वतःच्या घरात चोरी करण्याइतकी गेली! पार्टीसाठी वा ध्येयासाठी सर्व नीतिमूल्ये टाकून देणे हे मला मात्र पटेना. मला त्यांची पीपल्स वॉरची मांडणीही पटेना. म्हणून मी त्यातून बाहेर पडले व सरळ आंदोलनातच भाग घेतला. अशा 'राजकारणा'बद्दल माझ्या मनात जी अढी बसली त्यामुळेच, मला वाटते, मी आयुष्यात कधी कोणत्या पार्टीत गेले नाही. सारा मार्क्सवाद आमच्या डोक्यात कोंबून घातला होता; त्या वेळी अनेक पुस्तके त्या निमित्ताने वाचली, हा मात्र मोठाच फायदा.

मार्क्सवादाचा आणखी एक सिद्धान्त आम्हाला सांगितला गेला की, जगाच्या इतिहासात सर्व युद्धे ही मूलतः पैशासाठी, जमिनीसाठी, मूल्यवान वस्तूंसाठी म्हणजे आर्थिक कारणांसाठी झाली आहेत. म्हणजेच ती एक प्रकारे वर्गयुद्धेच होती. आधुनिक काळातील युद्धांची मीमांसा या तऱ्हेने करणे योग्य असेलही. उदाहरणार्थ, ब्रिटिश वा फ्रेंच येथे का आले? तर साम्राज्यासाठी. साम्राज्य का हवे? तर आर्थिक सुबत्तेसाठी. युद्धाची बाकीची कारणे ही वरवरची आहेत.

पण परवा एक पुस्तक वाचले. *गॉड इन पॉलिटिक्स* हे त्याचे नाव. त्या लेखकाचे प्रमेय असे की, १९३० सालापासून, मुख्यतः मार्क्सच्या विचारसरणीचा प्रभाव सर्व विचारवंतांवर पडला असल्याने, सर्व इतिहास व घटनांची चिकित्सा ही आर्थिक कोनामधून करण्याची आपल्याला सवय पडली आहे; पण युद्धाचा व घटनांचा खरा विचार केला तर काय दिसते? 'वॉर ऑफ रोझेस' या नावाने ओळखल्या जाणाऱ्या युद्धापासून युरोपच्या इतिहासाचे दाखले लेखकाने दिले आहेत. ते मुस्लिम

व ख्रिश्चन यांच्यामध्ये दीर्घकाळ झालेले महायुद्ध. त्या युद्धापासून अजूनही चालू असलेल्या ज्यू व अरब किंवा अरब व अमेरिका या युद्धांत काय दिसते? भारत वा आशिया खंडातही चाललेल्या युद्धांत धर्म हाच मुख्य विचार, निदान प्रेरणा, नाही काय? माणसांना उद्दीपित करणारी मुख्य भावना पैसा वा फायदा नव्हे तर धर्म. धर्मावर आधारित आघात करण्याची प्रेरणा हीच जास्त प्रभावी ठरते. पराक्रमाची इच्छा वा जग जिंकायची इच्छा ही केवळ पैसे मिळवण्याची प्रेरणा असते का? सिकंदरला जग जिंकायचे होते की पैसा मिळवायची इच्छा होती? मोगल प्रथम भारतात आले ते लूट करण्यासाठी की इस्लामच्या प्रचारासाठी? शिवाजीमहाराज लढले ते स्वतंत्र राज्याच्या प्रेरणेने की हिंदू राज्य स्थापण्यासाठी की मराठी राज्यासाठी की प्रदेश जिंकून संपत्ती लुटण्यासाठी? अरब व ज्यू कायम लढाईच्या पवित्र्यात उभे आहेत, ते वंश वा धर्म वेगळा म्हणून, की संपत्तीसाठी? वाळवंटातच पुन्हा आपली मातृभूमी वसवावी - जेथे ऐतिहासिक काळी ज्यू राष्ट्राचा निवास होता – ही प्रेरणा कितपत आर्थिक मानावी?

आजही भारतातील हिंदु-मुसलमान दंगली वा स्पृश्यास्पृश्य दंगली यातील मुख्य प्रेरणा कोणती? धार्मिक, वांशिक, प्रादेशिक, भाषिक दंगलींची कारणमीमांसा काय? केवळ दारिद्र्य? उच्चनीचतेची भावना? धर्म वा जातीचा अभिमान-दुरभिमान? जातीय विचारांची तीव्रता इतकी जास्त का असते?

मला वाटते याचे विश्लेषण नीट होत नाही. पण केवळ आर्थिक विचारांवर हे अवलंबून आहे असे मानणे यात चाकोरीबद्ध विचारांची झापडे नाही वाटत?

धार्मिक भावना व श्रद्धा यांचा मार्क्सने सतत उपहास केला आहे. धर्म ही अफूची गोळी आहे वगैरे. ईश्वर, पाप, पुण्य, स्वर्ग, नरक इ. सर्वच कल्पना आपण टाकून दिल्या पाहिजेत याला आपण 'बुद्धिवादी' व आधुनिक समजत आहोत. बुद्धिवाद वा इहवाद हा आपण योग्य मानला. अगदी घरातील अनेक सण, उत्सव, विधी हेही बुद्धीवर घासून त्याज्य ठरवले. मुंज करायची नाही, देवळात जायचे नाही, सत्यनारायणाचा प्रसादही खायचा नाही, अशी आमचीही 'व्रते' होती! आमच्या एका मित्राबरोबर मी जात असता एके ठिकाणी ते सत्य-नारायणाच्या प्रसादासाठी थांबले. मी अर्थातच चप्पलही न काढता बाजूला उभी राहिले. ते घर माझ्या माहितीतले असल्याने आतील मंडळी मलाही आत बोलावू लागली. माझा नाइलाज झाला. मी आत गेल्यावर आमच्या मित्राने माझी ओळख करून दिली व म्हणाले, "मी प्रसादाला आलोय; पण यांना प्रसाद देऊ नका बरं का! यांना शिरा द्या शिरा!"

मलाही हसू आवरेना.

आमच्या या सर्व नास्तिकतेचा उपयोग इतकाच झाला आहे की, आम्ही थोडीशी मंडळी समाजापासून पूर्ण तुटून बाजूला पडलो आहोत. कारण आम्हाला यात्रा, वारी, सण, उत्सव, पूजा, डामडौलाची लग्नं, मुंजी, मंदिरे सर्वच वर्ज्य. आणि आता तर कधी नव्हते इतके उधाण या धार्मिक समारंभांना आले आहे. आणि आम्ही करीत आहोत केवळ चर्चा, सभा, शिबिरे. तेच कार्य! आणि उपस्थिती? नगण्य.

शिक्षण व संस्कार यांबद्दलच्या आमच्या सर्व कल्पनाही काळाने खोट्या ठरवल्या आहेत. मूलोद्योगी शिक्षण हा शिक्षणाचा पाया व मातृभाषा ही शिक्षणाची भाषा ही आमची पक्की समजूत आहे. मात्र आज गाडी नेमकी उलट्या दिशेने भरधाव चालली आहे. मूलोद्योग म्हणजे काय, हा प्रश्न आज सगळेच विचारतील. मूलोद्योग म्हणजे शेती व ग्रामोद्योग. शी! याचा शिक्षणाची संबंध काय, अशीच प्रतिक्रिया येईल. शिक्षण हे एक क्षेत्र असे असावे जे सर्वांना समान असावे असे आम्ही मानले. तरच समान संधी मिळेल ना? पण आज शिक्षण-क्षेत्राइतकी मूलभूत असमानता कुठेही नाही असे मला वाटते. खेड्यांतील व शहरांतील झेड.पी.च्या वा म्युनिसिपालिटीच्या 'मोफत' शाळा कुणीकडे आणि मूल जन्मल्याबरोबर देणग्या घेऊन चालवलेल्या 'हाय फाय' शाळा कुणीकडे! आणि यातूनही आम्ही समानता आणणार आहोत आणि समान संधी उपलब्ध करून देणार आहोत अशी आमची स्वप्ने कायम आहेत. या खास शाळांचे माध्यम अर्थातच इंग्रजी आणि त्यांचे ध्येय अमेरिकेत कायम वास्तव्य करण्याचे!

आणि या पिढीवर आपण संस्कार करणार आहोत. कशाचे? समानता आणि त्यावर आधारित लोकशाहीचे!

आमचे हे प्रचंड भोपळे फुटलेत हे आम्ही स्वत:ला कधी सांगणार मात्र नाही. गेल्या पन्नास वर्षांत आमची अनेक गृहीतके चुकली असेही वाटते. संपूर्ण क्रांती, समानता, मानवी स्वातंत्र्य अशा कल्पना घेऊन धावत सुटलेली आमची पिढी आज अशा वळणापाशी येऊन उभी आहे की, संभ्रम पडावा, आता जावे तरी कुठे? जुन्या सवयींमुळे आम्ही अजून मार्गदर्शन करण्याचा आव आणतो व गांधीमार्ग, समाजवाद, लोकशाही

अनुक्रमणिका

इ. मंत्र म्हणत आहोत. पण खरे म्हणजे आज चालू असलेल्या कोणत्याही धडपडी आता आमच्या पिढीच्या आवाक्याबाहेर आहेत.

"राम होऊन गेला. कृष्णानेही अवतार घेतला. पण माणसाचे प्रश्न कधी कायम सुटलेले नाहीत." असे विनोबा म्हणाले होते.

त्यांच्या भूदान यात्रेनंतर त्यांना कुणीतरी विचारले, "विनोबा, भूदान अयशस्वी झाले तर तुम्ही काय कराल?" ते शांतपणे म्हणाले, "नाही प्रभूची इच्छा म्हणून हरी हरी करीत घरी बसेन!" पण तो हरीही आम्ही गमावून बसलो आहोत. वेचाळीसच्या क्रांतिकारक वळणापासून आलो तरी कुठे आपण?

❖❖



# शिक्षण : पन्नास वर्षांचा ताळेबंद

**दिगंबर पाध्ये**

१५ ऑगस्ट १९४७ रोजी स्वातंत्र्य मिळाले तेव्हा मी तिसरीच्या वर्गात शिकत होतो. चिपळूणसारख्या तालुक्याच्या ठिकाणी स्वातंत्र्यदिनानिमित्त निघालेली प्रभातफेरी उत्सुकतेने आणि उत्साहाने पाहिल्याची आठवण आजही ताजी आहे. त्या दिवसाला आता पन्नास वर्षे होऊन गेली.

पन्नास वर्षांपूर्वीचा तो दिवस आठवला की त्याबरोबरच तेव्हाचे सगळे चित्र डोळ्यांसमोर उभे राहते. हातात शाईची दौत आणि शाळेत बसण्यासाठी लागणाऱ्या सतरंजीच्या तुकड्यासकट भरलेले दप्तर गळ्यात अडकवून शाळेत जाण्याचे ते दिवस होते. डोक्यावर टोपी हवीच असा दण्डक होता. शाळेत शेणाने सारवलेल्या जमिनीवर आम्ही सगळे बसत असू. त्या काळातील स्वतःचे आणि मित्रांचे रूप डोळ्यांसमोर आणले तर आज गंमत वाटते.

त्या दिवसांच्या तुलनेत आज शाळेत जाणाऱ्या मुलांकडे पाहिले तर पन्नास वर्षांत आपण कुठून कुठे आलो हे लक्षात येऊन काहीसा अभिमानच वाटतो. सरकार शिक्षणाकडे दुर्लक्ष करते, पुरेसा खर्च करीत नाही. आजही या क्षेत्रात अनेक अडचणी आहेत, अनेकजण शिक्षणापासून वंचित आहेत. हे सर्व खरे असले तरी, जिथून सुरुवात झाली तिकडे दृष्टी वळवली तर मधल्या काळात वरेच काही घडले असेच म्हणावे लागते. आज शिक्षणाची सोय खेड्यापाड्यांपर्यंत पोहोचली. उच्च शिक्षणाचीही अधिक सोय झाली. शाळांना इमारती मिळाल्या, शैक्षणिक साधनसामग्रीत वरीच वाढ झाली. शिकणे ही गरजआहे असे वाटणारांची संख्या वाढली. शिक्षण समाजाच्या सर्व स्तरांत पसरले. पैशाअभावी शिक्षण घेता येत नाही अशी परिस्थिती सामाजिक पातळीवर तरी फारशी राहिली नाही. ही स्वातंत्र्याची कमाई आहे असेच म्हणायला हवे. हे कळते पण तरीही निर्मळ समाधान वाटत नाही. ही कमाई करता करता काहीतरी बिघडले आहे असे वाटत राहते; असमाधान, अस्वस्थता वाटते.

भोवताली जे घडले, घडते आहे त्याची समाजशास्त्रीय मीमांसा करण्याचा माझा अधिकार नाही. पण अशी मीमांसा करून तरी हाती काय लागणार? फार तर जे काही घडले, घडते आहे ते का घडले आणि तेच कसे अपरिहार्य होते हे सांगण्यासाठी काही आणि आवश्यक ते युक्तिवाद, हेच ना? अशा युक्तिवादांनी घडले आहे ते योग्य आहे हे तर सिद्ध होणार नाही. म्हणून अशा फंदात न पडणेच बरे. शिवाय माझे असमाधान काही व्यापक सामाजिक अनुभवावर आधारलेले आहे असेही नाही. सुरुवातीला विद्यार्थी म्हणून आणि नंतर शिकविण्याचा व्यवसाय आणि शैक्षणिक/साहित्यिक क्षेत्रातच काही धडपड करीत राहिल्यामुळे जे अनुभवाला आले, येत राहिले तेवढाच या असमाधानाचा आधार.

शाळेतल्या दिवसांसंबंधीची एक आठवण मला वारंवार होते. तिसरीचा अपवाद करता, सातवीपर्यंतचे माझे शिक्षण मुंबई महानगरपालिकेच्या शाळेत झाले. ती शाळा मला अजूनही आठवते. भूगोलाची पुस्तके लिहिणारे पां.दा. प्रभु, गणिताची क्रमिक पुस्तके लिहिणारे काळे असे शिक्षक आम्हाला शिकवायला होते. शाळेच्या परिसरातील प्रतिष्ठितांची मुले आमच्या वर्गात होती. खरे म्हणजे अनेक नावे आठवतात, पण ते जाणीवपूर्वक

टाळतो. नाजूक, गोरा, गळ्यात सोन्याची साखळी आणि स्वच्छ इस्त्रीचे कपडे अशा थाटात येणारा एक मुलगा आजही आठवतो. अशी इतरही व्यावसायिकांची मुले होती. पण या मुलांबरोबरच शाळेच्या समोरच्या फूटपाथवर भाजी विकणाऱ्या बाईंचा एक मुलगाही आठवतो. त्या मुलासारखी मुलेही आमच्या वर्गात होती. म्हणजे शाळेच्या परिसरातील सर्व स्तरांतील मुले तेव्हा काही काळ तरी एकाच शाळेत येत. 'म्युनिसिपालिटीची शाळा' हा तेव्हा साधा वर्णनात्मक शब्द होता. त्याने शाळेचे मूल्यमापन होत नव्हते. ही माझी आठवण १९५०-५२ मधली.

स्वातंत्र्यानंतरच्या काळात मुंबईसारख्या शहरात काय झाले? आज आर्थिक स्तरानुसार वेगवेगळ्या शाळा झाल्या. आपण ज्या समाजात जगतो तो समाज समजून घेतला पाहिजे असे एका बाजूने म्हणत असताना, दुसऱ्या बाजूने, शक्य तो समाजाचा संपर्कच नको अशी वृत्ती आली. आज महापालिकेची शाळा हा केवळ वर्णनपर शब्द राहिला नाही. त्याने शाळेचे मूल्यमापनही होऊ लागले आणि शक्यतो ही शाळा टाळण्याची प्रवृत्ती झाली. माझ्या घराजवळ एक म्युनिसिपालिटीची टुमदार शाळा होती. त्या शाळेला चांगले मैदान होते. पाहता पाहता गेल्या काही वर्षांत तेथे एक अजस्र, अक्राळविक्राळ इमारत होऊन वेगवेगळ्या माध्यमांची हजारो मुले त्या शाळेत येऊ लागली. अशा शाळांना वातावरण कसले असणार? आणि त्यांच्याविषयी आस्था तरी कशी वाटणार? खरं म्हणजे मुंबई महापालिकेच्या शाळांमधील दरडोई खर्च खासगी शाळांच्या तुलनेने कितीतरी अधिक आहे. तरीही असे का व्हावे?

असे काही पाहिले की, आपल्या पन्नास वर्षांच्या वाटचालीत एका बाजूने काही कमावीत असताना आपण नकळत काहीतरी गमावतो आहोत, असे वाटत राहते.

मनाला सतावणारा असाच एक विषय शिक्षणाचे माध्यम कोणते असावे हा आहे.

आजपासून जेवढे भूतकाळात जावे तेवढे लोकांचे इंग्रजी चांगले होते असे दिसते. इंग्रजीविषयी नव्या धोरणाचा स्वीकार झाल्यानंतरच्या काळातच मी शिकलो. त्यामुळे माझ्या इंग्रजीचे जे काय बरे-वाईट व्हायचे ते झालेच. शिकत असताना शिक्षणाचे माध्यम मातृभाषा, फार तर हिंदीसारखी एतद्देशीय भाषा असावी ही चर्चा जोरात कानावर येत होती. विद्यापीठस्तरावर शिक्षणाचे माध्यम काय असावे यावर पंचवीस-तीस वर्षांपूर्वी तावातावाने चर्चा केल्याचे अजून आठवते. पण आज जे दिसते ते चमत्कारिकच आहे. आता माध्यमिक, विद्यापीठीय स्तर सोडाच पण पूर्वप्राथमिकपासूनच इंग्रजी माध्यमाकडे लोकांचा ओढा आहे. शैक्षणिक वातावरणाचा स्पर्शही नसणाऱ्या इंग्रजी माध्यमाच्या शाळांकडे आज मुंबईसारख्या शहरातील सुस्थितीतले पालक धावताहेत. आणि मातृभाषा माध्यम असावे असा शैक्षणिक दृष्ट्या योग्य आग्रह धरणारे अपराधी भावनेने पाहताहेत. हे चित्र शहरात आणि वरच्या स्तरातील लोकांचे आहे असे म्हणून दुर्लक्ष करण्यासारखी ही बाब नाही. ही भविष्य-काळाची दिशा आहे. उद्या हेच लोण अधिक पसरणार आहे.

स्वातंत्र्यपूर्वकाळातही माध्यम इंग्रजीच होते हे खरे. पण त्या काळातील सुशिक्षितांना मातृभाषा उत्तम अवगत होती. तसे नसेल तर ते चूक आहे हे जाणवून देणारे सामाजिक वातावरण होते. पारतंत्र्याच्या संदर्भामुळे स्वभाषेविषयी अभिमान होता. आज सगळे उलटच झाले आहे. 'मी मराठी वाचीत नाही' (खरे म्हणजे इंग्रजीही वाचीत नाही) असे सांगणे अभिमानाची बाब झाली आहे. अशा परिस्थितीत ज्ञान मराठी भाषेत आणले तरी त्याचा उपयोग कोणाला आणि किती, असे विचार मनात येऊ लागतात. स्वतःच्या भाषेचा अभिमान सहजस्वाभाविक असला तर असतो. त्याविषयीच्या युक्तिवादाने खरे म्हणजे काहीच साध्य होत नाही. हे माहीत असल्यामुळे मन अधिकच अस्वस्थ होते. आपण ज्या दिशेने वाटचाल सुरू केली ती हरवून आपण फुटेल त्या वाटेने धावणारे दिशाहीन तर झालो नाही ना, असे काहीसे वाटू लागते.

आपल्या राज्याचे हितसंबंध डोळ्यांसमोर ठेवून इंग्रजांनी ही शिक्षणपद्धती येथे आणली हे ऐकता ऐकता माझी विद्यार्थिदशा संपून मी अध्यापनाच्या व्यवसायात आलो. इंग्रजांनी रूढ केलेले शिक्षण कारकून बनविणारे होते असे अजूनही कानावर येत असते. (ही मते सर्वस्वी खरी नाहीत हे आता कळते.) तेव्हा हे बदलले पाहिजे ही मनाची धारणा होतीच.

आज एका दृष्टीने पाहता शिक्षण विविधांगी झाले आहे. विज्ञान-तंत्रज्ञानाला आता शिक्षणात महत्त्व मिळते आहे. या बाजूने गेल्या पन्नास वर्षांत आपण बरेच काही साधले आहे. आपल्या समाजाची शिक्षणाची गरज पूर्ण करणे हे मोठेच आव्हान होते व अजूनही आहे. या आव्हानाला तोंड देण्यासाठी एवढी प्रचंड व्यवस्था उभारणे आणि पुष्कळशी सुरळीतपणे राबविणे हे काम निश्चितच अवघड होते. हे काम करण्याची आपली धडपड अभिमानास्पद वाटावी अशीच आहे.

अनुक्रमणिका

पण त्याचबरोबर एक प्रश्नही मनात येतो. इंग्रजांनी सुरू केलेल्या शिक्षणाला कारकून बनविणारे शिक्षण असे म्हणताना ते केवळ नोकऱ्यांसाठी शिक्षण होते असाही अर्थ मनात होता ना? आपल्या लोकांना शिक्षणाची ओढ नाही; जेवायला मिळाले तर झाडाला बांधून घातले तरी हे लोक पुस्तक वाचणार नाहीत, अशा अर्थाचे निरीक्षण लोकहितवादींनी नोंदविले होते. त्याचा अर्थही हाच होता. केवळ जगण्यासाठी एखादे कौशल्य आत्मसात करणे एवढेच शिक्षणाचे उद्दिष्ट असू नये; शिक्षणाने माणसाची विचार करण्याची शक्ती वाढावी, त्याच्या अंगी असणाऱ्या सर्व क्षमतांचा विकास व्हावा असल्या कल्पनांनी माझ्या मनात घर केले होते.

या दिशेने आपली वाटचाल कुठे आहे? हा प्रश्न आज मनाला कुरतडीत राहतो.

मी महाविद्यालयात दाखल झालो तेव्हा दोनच विद्याशाखा प्रमुख होत्या : कला आणि विज्ञान (वाणिज्य शाखेची मुंबईत तीन-चार महाविद्यालये होती). बहुसंख्य विद्यार्थी कलाशाखेकडे असत. त्या तुलनेत कमी विद्यार्थी विज्ञानाकडे वळत. परंतु प्रत्येक हुशार मुलाने विज्ञानाकडेच गेले पाहिजे अशी वृत्ती नव्हती. स्वातंत्र्योत्तर काळातील औद्योगिक विकासाचा परिणाम म्हणून ही परिस्थिती बदलत गेली आणि विज्ञानशाखेतील विद्यार्थ्यांची संख्या वाढू लागली. साहजिकच तेथे स्पर्धा आली. स्पर्धेत जिंकणे हे प्रतिष्ठेचे लक्षण असल्यामुळे हुशार विद्यार्थी विज्ञानशाखेकडे वळू लागले. आता गेल्या काही वर्षांत वाणिज्य शाखेची भरभराट सुरू होऊन विज्ञानशाखेलाही धक्के बसू लागले. पूर्वी हुशार मुलांचे स्वप्न डॉक्टर-इंजिनिअर होणे हे होते. आता त्यात सी.ए. ची भर पडली. असे काहीतरी होणे म्हणजे वैयक्तिक प्रगतीच्या पायऱ्या चढणे हे समीकरण आज पक्के आहे. व्यक्तिगत पातळीवर यात काही चूकही नाही. परंतु कोणत्याही हुशार विद्यार्थ्याला आपण शिक्षक, प्राध्यापक, संशोधक व्हावे असे का वाटू नये? हे न वाटणे नाही म्हटले तरी चमत्कारिकच दिसते. आपल्या समाजाची, शिक्षणव्यवस्थेची वाढ निरोगी नसल्याचे तर हे दर्शक नाही? (अर्थात समाजाच्या आरोग्याची आपली कल्पना काय त्यावर हे उत्तर अवलंबून राहणार.)

गेल्या काही वर्षांतील या प्रक्रियेत मुंबईसारख्या शहरातून कलाशाखा पूर्णपणे दुर्लक्षित होत आहे. भाषा, इतिहास, तत्त्वज्ञान यांसारख्या विषयांचे महत्त्व दिवसानुदिवस कमी कमी होत आहे. हे विषय तसे व्यवसायाभिमुख नाहीत हा त्यांचा दोष. परंतु व्यवसायाभिमुख होण्याच्या गडबडीतही आपण प्राथमिक-माध्यमिक सर्वसाधारण शिक्षण तर सुरू ठेवणार ना? तेथे भाषा, इतिहास, भूगोल यांसारख्या विषयांच्या शिक्षकांची गरज लागणार ना? मग बुद्धिमान विद्यार्थ्यांमधील काहींना तरी अशा विषयांचे आकर्षण वाटणे ही एक सामाजिक गरजच ठरत नाही का? या गोष्टीकडे आज दुर्लक्ष केले तर त्याचा परिणाम काही वर्षांतच दिसू लागेल. नव्हे, तो दिसू लागला आहे. मराठी/इंग्रजी या भाषांचे उत्तम शिक्षक आज दुर्मिळ होत चालले आहेत.

चांगली नोकरी किंवा व्यवसाय हेच शिक्षणाचे एकमेव उद्दिष्ट असे आजचे स्वरूप आहे. समाजाच्या वरच्या स्तरात हे दृश्य आहे असे म्हटले तरी त्याचेच हळूहळू अनुकरण होत असते ही वस्तुस्थिती आहे. या शिक्षणाची प्रचंड व्यवस्था आहे. अशी व्यवस्था आली की कागदावर सर्व आहे आणि प्रत्यक्षात काही नाही असे घडू शकते. आज विद्यार्थी शिक्षण घेतात, परीक्षांना बसतात, त्यांना गुण मिळतात – सर्व काही होते. परंतु पहिल्या वर्गात उत्तीर्ण होऊन शिक्षक-प्राध्यापक होण्यासाठी मुलाखतींना आलेल्या उमेदवारांना अगदी साध्या प्रश्नांचीही उत्तरे देता येत नाहीत हे पाहिले की काय म्हणावे तेच सुचत नाही.

अगदी अलीकडचे दोन अनुभव आहेत. एक आहे मराठीच्या प्राध्यापकपदासाठी मुलाखतीला आलेल्या उमेदवाराचा. उमेदवाराची कागदावरची गुणवत्ता उत्तम. (विशेष योग्यतेसह पहिला वर्ग.) त्याला प्रश्न विचारला, 'मराठी संतांच्या परंपरेत आपण पाच कवी महत्त्वाचे मानतो ते कोणते?' हा प्रश्न विचारताना उमेदवाराला हा प्रश्न अपमानास्पद वाटेल म्हणून काहीशी क्षमायाचना करीत विचारला होता. आश्चर्य असे की, कालक्रम न पाळता उमेदवाराने चार नावे सांगितली, पाचव्या नावाची आठवण मलाच करून द्यावी लागली. दुसरा अनुभव अगदी अलीकडचा. शाळेतल्या मुलाखतींचा. उमेदवार इतिहास, राज्यशास्त्र या विषयांचे पदवीधर (अर्थात पहिला किंवा दुसरा वर्ग). दूरदर्शनवर नुकतेच लोकसभेच्या कामकाजाचे कंटाळा येईपर्यंत थेट प्रक्षेपण झालेले. प्रश्न साधा होता – 'लोकसभेतील चर्चेत सेक्युलॅरिझम हा शब्द तुम्ही वारंवार ऐकलात. हा सेक्युलॅरिझम म्हणजे काय?' – उत्तरे थक्क करणारी होती. सेक्युलॅरिझम म्हणजे जातीजातींत वैमनस्य नसणे इथपासून ते सेक्युलॅरिझम म्हणजे सर्व पक्षांचे सरकार







अनुक्रमणिका

इथपर्यंत. एका उमेदवाराने सर्वधर्मसमभाव असे सांगितले. पण म्हणजे काय विचारल्यावर त्याला सांगता आले नाही.

हे अनुभव अपवादात्मक आहेत असे म्हणता येईल. परंतु पहिला वर्ग मिळवून उत्तीर्ण होणाऱ्या पदवीधरांकडून, अपवादात्मक का होईना, असा अनुभव येणे हे आपल्या शिक्षण-व्यवस्थेवरचे एक भाष्यच नाही का?

मी शाळेत होतो तेव्हा एखाद्या विद्यार्थ्याला शिकवणी असणे हे काहीसे लज्जास्पद मानले जात असे. कोचिंग क्लासेस तेव्हाही होतेच. पण त्यांचे स्वरूप खूपच मर्यादित होते. माझ्या वर्गातील एक मुलगा बोर्डाच्या गुणवत्ता यादीतही आला होता. पण तो कुठे क्लासला जात असल्याचे आठवत नाही. आता स्पर्धा वाढली आणि परिणामी शाळांपेक्षा कोचिंग क्लास, शिकवण्या यांना महत्त्व आले. मुंबईसारख्या शहरात पाचवीपासून शिकवण्यांना जाणारी मुले पाहावयास मिळतात. हे लोण आता तालुक्यापर्यंत पोहोचल्याचे मी पाहिले आहे. या वर्गांना मुले नियमित जातात. कनिष्ठ महाविद्यालयांतून तर त्यामुळे उपस्थितीचाच प्रश्न निर्माण होतो. चांगल्या महाविद्यालयात प्रवेश मिळावा म्हणून मुले व पालक जो जिवाचा आटापिटा करतात तो पुष्कळसा त्या महाविद्यालयात अनुपस्थित राहण्याचा अधिकार मिळविण्यासाठीच, असे एका मित्राचे मत मी ऐकले आहे. एका प्रकारे शाळा, महाविद्यालये या रीतसर शिक्षणसंस्था निरर्थक होऊन समांतर व्यवस्थेचे एक जाळेच शिक्षणक्षेत्रात निर्माण झाले आहे. त्यातच आता परीक्षांचा सराव करून घेणाऱ्या, प्रश्नपत्रिका सोडवून घेण्याचे काम करणाऱ्या संस्थांचीही भर पडली आहे. ही समांतर व्यवस्था आपल्या शिक्षणव्यवस्थेला पूरक नव्हे तर आता अपरिहार्यच झाली आहे. शिक्षणासाठी उभारलेल्या प्रचंड व्यवस्थेचा हा एक परिणाम आहे. त्याची कारणे अनेक आहेत हे सगळे कळते. पण हे सगळे योग्य आहे का? या प्रश्नाने, कितीही नाही म्हटले तरी, अस्वस्थता येतेच.





# जाणत्यांना जागे कसे करायचे?

**पन्नालाल सुराणा**

स्वातंत्र्य मिळाले त्या दिवशी मी बार्शीत होतो. सोळा वर्षांचा. त्या वेळच्या अकरावीतला विद्यार्थी. शाळेत दुपारी बारा वाजता झेंडावंदन व्हायचे होते. मध्यमवस्तीत एका माडीवर आमची ती शाळा भरत होती. झेंडावंदनासाठी ध्वजस्तंभ गच्चीच्या कठड्याला बांधला होता. 'वंदे मातरम्' हे राष्ट्रगीत म्हणायला मी व आणखी एकाला मुख्याध्यापकांनी सांगितले होते. आम्ही दोघे सेवादलातले होतो. झेंडावंदन शिस्तीत कसे घ्यायचे ते शिकलो होतो. राष्ट्रगीतही आम्हा दोघातिघांनाच पाठ म्हणता येत होते. एवढ्या सगळ्यांच्या समोर आपल्याला इतका मान मिळाला म्हणून कॉलर ताठ झाली होती.

स्वातंत्र्यचळवळीत भाग घ्यायची चिमुकली संधी मिळाली होती. १९४२ साली काही काँग्रेस कार्यकर्ते गावातून प्रभातफेरी काढत. मी त्यात जात असे. "गरीबानु या, झेंडा हाती घ्या, काँग्रेसची हाक तुम्हा हाय हो" यासारखी साने गुरुजींची गाणी म्हणायची. घोषणा द्यायच्या. झेंडा न लावता सेवादलाची शाखा भरवायची. लपत छपत गांधी जयंती साजरी करायची. अशा कार्यक्रमांत सहभागी होत होतो. सेवादल शिबिरातली बौद्धिके बऱ्यापैकी समजायची. आचार्य जावडेकर, एस.एम. जोशी यांच्या व्याख्यानांतून, स्वातंत्र्य मिळाले ते कष्टकऱ्यांना न्याय मिळवून देण्यासाठी, हा मुद्दा मनी ठसला होता. जातपात मानायची नाही, स्वतः चांगले वागायचे हे वळण मिळाले होते. कॉलेजात बी.ए. ला 'मराठी ऐवजी अर्थशास्त्र घे' असे डॉ. पु.ग. सहस्रबुद्धे यांनी सांगितले. राष्ट्रउभारणीसाठी त्याचीच अधिक गरज आहे, हे त्यांचे वाक्य पक्के लक्षात राहिले. भारतीय अर्थव्यवस्थेवरील, विशेषतः नानावटी आणि अंजारिया यांचे *इंडियन रूरल प्रॉब्लेम* हे पुस्तक मनापासून अभ्यासले. आपला देश खेड्यांचा आहे, त्यांचा विकास व्हायला पाहिजे ह्या गांधीजींच्या सांगण्यातले मर्म थोडेथोडे कळाले. त्या वेळी

अनुक्रमणिका

नुकतेच आचार्य विनोबा भावेंनी भूदान आंदोलन सुरू केले होते. त्यात जावे असे वाटले. जयप्रकाशजींनी जीवनदान दिले होते. बिहारमध्ये सेवादलाचे काम सुरू व्हावे असे त्यांना वाटायचे. दोन तरुण कार्यकर्ते द्या, असे ते एस.एम.ना म्हणाले होते. त्यांनी मला जायला सांगितले. एम.ए. अर्धवट सोडून मी बिहारला गेलो. मागून डॉ. बापू काळदाते आले. १९५५ साली लग्न होऊन वीणाही सोखोदेवरा आश्रमातील दवाखाना चालवायला आली. शेतमजुरांची व शेतकऱ्यांचीही दैना जवळून बघायला मिळाली.

तिकडे जमीनदार व महंत यांचा जुलमी कारभार असायचा. त्याविरुद्ध पाच-दहा वर्षे संघर्ष केलेल्या काही समाजवादी कार्यकर्त्यांचा सहवास घडला. शेतजमिनीच्या फेरवाटपाचा प्रश्न सुटला पाहिजे, पण त्यासाठी सशस्त्र मार्गाचा अवलंब करणे बरोबर नव्हते. भूदानाने अहिंसात्मक मार्ग दाखवला होता. पण पुरेशी जमीन मिळत नव्हती. आणि ज्यांनी गाजावाजा करून दान दिले त्यांतले फार थोडेजण वाटपासाठी प्रत्यक्षात आपली जमीन द्यायला तयार झाले. त्यांची लवाडी पाहून आम्हा तरुण कार्यकर्त्यांचे पित्त खवळायचे. केवळ आवाहन करून भागणार नाही, सत्याग्रहाचे पाऊल उचलले पाहिजे असे आम्ही मांडू लागलो. पण विनोबांना ते मान्य नव्हते. नकार देण्यामागचा त्यांचा युक्तिवाद तर अजबच होता. 'आम्ही सत्याग्रह सुरू केला तर देशात लाख दोन लाख लोक तुरुंगात जातील. सरकारची सगळी शक्ती त्याकडे वळेल. त्या संधीचा फायदा घेऊन चीन किंवा अन्य कुणी शेजाऱ्याने आपल्यावर हल्ला केला तर राष्ट्राचे स्वातंत्र्य कसे टिकेल?' असा प्रश्न त्यांनी गंभीरपणे मांडला. त्यामुळे आम्ही त्यांचा नाद सोडला.

पुढे १९६३ साली त्या वेळच्या प्रजासमाजवादी पक्षाच्या कामात पडलो. राज्यपातळीवरील पदाधिकारी झालो. १९८० पर्यंत सक्रिय राजकारणात होतो. स्वतः सहा निवडणुका लढवल्या. एकदाही यश आले नाही. पण राज्यपातळीवरील पदाधिकारी या नात्याने निवडणूक मोहिमा व्यापक प्रमाणावर चालवण्यात यथाशक्ती भाग घेता आला. १९७७ साली जनता पक्षाला भरघोस यश मिळाले. काही काळ सत्ताधारी पक्षाचा पदाधिकारी म्हणून वावरलो. अनेक बरेवाईट अनुभव आले. १९७५ साली तत्कालीन प्रधानमंत्री इंदिरा गांधी यांनी आणीबाणी पुकारून दडपशाही सुरू केली होती. त्याचा प्रतिकार करण्यासाठी आम्ही भूमिगत चळवळ – पण शांततामय मार्गाने – चालवली होती. तोपर्यंत राजकीय कार्यकर्त्यांत म्हणजे समाजवादी, कम्युनिस्ट, शेकाप, रिपब्लिकन या पक्षांच्या कार्यकर्त्यांत जनतेच्या प्रश्नावर लढण्याची जिद्द होती. प्रश्न सुटणे अवघड आहे याची जाणीव असायची. कष्टकरी जनता आपल्यावरील अन्यायाविरुद्ध लढायला संघटित होते आहे यातच कृतकृत्यता वाटायची. कृषिउत्पन्न बाजार समित्यांच्या आवारात काम करणारे हमाल, गाडीवान, नगरपालिकांचे कर्मचारी, शेतमजूर, शेतकरी, गिरणी-कामगार, एस.टी. कामगार यांच्या अनेक लढ्यांत व संघटनाबांधणीत सहभागी व्हायला मला संधी मिळाली. त्यांचे महत्त्वाचे प्रश्न सुटणे, त्यांच्यात निर्भयपणा येणे, काही चांगले कार्यकर्ते पुढे येणे – हे चळवळीचे यश मनाला समाधान देत राहिले. १९७७ साली समाजवादी पक्ष 'जनता'त विलीन झाला त्यामुळे मात्र आपल्या चळवळीचे मुख्य हत्यार गळून पडले असे तीव्रतेने वाटले. तोपर्यंत तीसतीस वर्षे विरोधी पक्षात काम केलेल्या कार्यकर्त्यांना 'सत्ताधारी पक्षा'चे म्हणवून घ्यायची संधी मिळाली. 'सत्ताधारी पक्षाच्या कार्यकर्त्यांनी असे असे वागायचे असते' असा ढाचा व लोकसमज काँग्रेसवाल्यांनी निर्माण करून ठेवला होता. आमचे कार्यकर्तेही त्या समजांच्या आहारी जाऊ लागले हे पाहून मन व्यथित व्हायचे. पण लोकशाही पद्धतीचे सत्ताकारण असेच धक्के-हिसके सोसत, हेलकावे खात चालणार हे लक्षात येऊ लागले. आपल्या प्रकृतीला मानवेल असे प्रबोधनाचे व रचनात्मक कार्य करण्यात स्वतःला गुंतवून घेत आल्याने निराशा वाटली नाही. देशात लोकशाही टिकणे आवश्यक आहे. त्यासाठी ध्येयनिष्ठ राजकीय पक्षांची गरज आहे. आजच्या तरुणांनी हे आव्हान स्वीकारले पाहिजे. असे कार्यकर्ते धडपडताना दिसले की त्यांना होईल तेवढी मदत करायची अशी सध्याची भूमिका आहे.

गेल्या पन्नास वर्षांत – विशेषतः अलीकडच्या दहा-पंधरा वर्षांत – राजकारणात व समाजजीवनाच्या इतरही क्षेत्रांत स्वार्थी व स्वैराचारी प्रवृत्तींचा धुमाकूळ वाढला आहे. हे पुढील वाटचालीला हानिकारक ठरणार आहे याची जाणीव आहे. पण सगळेच बिघडते आहे असे मात्र वाटत नाही. थोडा लांबचा विचार करता असे जाणवते की, भारतीय जनतेने गेल्या पन्नास वर्षांत काही चांगल्या गोष्टी केल्या आहेत. देशाला स्वातंत्र्य मिळाले त्याचा, म्हणजे सत्तेचा उपयोग विज्ञानाच्या साहाय्याने देशाची प्रगती करण्यासाठी, तसेच वंचितांना विविध सेवा व संधी उपलब्ध करून देण्यासाठी






करायचा आहे हे वळण सुरुवातीच्या सत्ताधाऱ्यांनी घालून दिले. लोकशाही संस्थांची उभारणी केली. नागरिकांच्या मूलभूत हक्कांना घटनेने मान्यता दिली. प्रत्येक प्रौढ स्त्री-पुरुषाला मताचा अधिकार मिळाला. आपल्या म्हणण्याला किंमत आहे याचे भान दलित-कष्टकरी-शोषितांना वाढत्या प्रमाणावर होऊ लागले आहे. त्यामुळे देशाचे राजकारण फार विघडू शकणार नाही. पुनरुज्जीवनवादी राजकीय पक्षांना काही काळ फार मोठा प्रतिसाद मिळाला असे दिसले, तरी तो पाठिंबा फार काळ टिकला नाही. त्यामुळे जनतेच्या खऱ्या प्रश्नांना भिडण्याचे दडपण त्या पक्षांवरही येऊ लागले आहे. हिंसाचार, दहशतवाद यांनी १९६७ ते ७० या काळात नक्षलवादाच्या नावाने थैमान घातले. १९८० नंतर पंजाबात खलिस्तानी व काश्मीरमध्ये 'आजाद कश्मिर' च्या चळवळी सशस्त्र मार्गाने चालवण्याचा प्रयत्न झाला. कैक निरपराध जीव हकनाक मारले गेले. पण त्या वाट चुकलेल्या संतप्त तरुणांना सर्वसामान्य माणसाकडून किंचित सहानुभूती मिळाली तरी साथ मिळाली नाही हे लक्षात घेण्यासारखे आहे. नकोशा वाटणाऱ्या सत्ताधाऱ्यांना मतदानाच्या मार्गाने हटवण्याचा मार्ग देशातला पन्नास-साठ टक्के जागृत झालेला मतदार चोखाळू लागला आहे.

पन्नास वर्षांपूर्वी या देशात एकनागरिकत्व नव्हते. एक-तृतीयांश जनता पाच-साडेपाचशे संस्थानिकांच्या लहरी राज्यकारभारात भरडली जात होती. नाणे वेगळे होते, कायदे वेगवेगळे होते. या सगळ्यांना पाहतापाहता हटवले गेले. देशभर एकनागरिकत्व, एक नाणे, आर्थिक व इतर व्यवहारांविषयीचे समान कायदे झालेले आहेत. इंग्लंडसारखा देश अजूनही औंस-पौंड किंवा पेन्स-शिलिंग-पौंड अशा गुंतागुंतीच्या वजन-माप-नाण्यात अडकून पडला आहे. भारतात मात्र वजनमापापासून तो नाणे व टेलिफोन नंबरपर्यंत दशमान पद्धती रूढ झाली आहे. आर्थिक व्यवहार सुलभ व्हायला त्यामुळे मोठेच साह्य होत आहे. किलोची भाषा भाजीवाल्यांच्या तोंडीही रुळली आहे.

एकोणिसाव्या शतकात स्त्री-शूद्रांना शिक्षण मिळावे यासाठी काही समाजधुरिणांनी प्रयत्न केले. ज्या प्रदेशात ते जन्मले तेथे शिक्षणप्रसार बऱ्यापैकी झाला. उडिसा, राजस्थान, आंध्र, आसाम वगैरे प्रदेश मात्र वंचित राहिले होते. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर शिक्षण व आरोग्य या सेवा सर्वांना उपलब्ध करण्याची जबाबदारी शासनाने स्वीकारली. शंभर टक्के साक्षरतेचे उद्दिष्ट अद्याप गाठता आले नाही हे खरे, पण मागास राज्यांतील दुर्गम भागातल्या खेड्यांपर्यंत प्राथमिक शाळेची सोय झाली किंवा होते आहे. दलित जातीतील मुले-मुलीसुद्धा त्यांचा लाभ घेऊ लागली आहेत. सरकारी नोकऱ्या व इतर उद्योग-व्यवसाय यांत विविध, आतापर्यंत उपेक्षित असलेल्या जातिजमातींचे स्त्री-पुरुष वावरू लागले आहेत. त्यांना स्वत्वाची जाणीव होते आहे. समाजजीवनात बरोबरीच्या नात्याने भाग घ्यायची सवय होऊ लागली आहे. बुजरेपणा कमी होत चालला आहे. समता स्थापायचे शासनसंस्था हे प्रभावी साधन आहे याचा पडताळा येतो आहे.

सामाजिक विषमतेचे उघड समर्थन कुणी करू धजत नाही. पण आपल्या स्वार्थासाठी जातीभेद, धर्मभेद यांचे भांडवल केले जात आहे हेही खरे. त्यामुळे तणाव वाढले आहेत. कुठेकुठे तीव्र संघर्षही होत आहेत. या सगळ्या दिव्यातून जावे लागेल. पण जातीभेद आता फार काळ जोपासता येणार नाहीत हे कट्टर सनातन्यांना व स्वार्थी राजकारण्यांनाही कळून चुकले आहे.

काही अपप्रवृत्तींना अलीकडच्या काळात खतपाणी मिळू लागले आहे. चंगळवादाची अपसंस्कृती झपाट्याने पसरू लागली आहे. सोव्हिएट युनियनच्या विघटनामुळे 'समाजवाद फसला' असे म्हणण्याची फॅशन वाढली आहे. मुक्त बाजारपेठेचे धोरणच आपल्याला आर्थिक सुबत्ता मिळवून देईल, अशी भावना विशेषतः बोलक्या वर्गात बळावली आहे. एकंदरीतच मध्यमवर्गाची मनोवृत्ती हा चिंतेचा विषय बनला आहे. धनिक व सत्ताधारी वर्ग संख्येने छोटा आहे. तो आपले साम्राज्य अबाधित ठेवण्याच्या प्रयत्नात आहे. पण आपल्याला फार उद्धटपणे वागता-बोलता येणार नाही याची त्याला जाणीव आहे. संख्येने पंधरा-सोळा टक्के असलेला मध्यमवर्ग मात्र राष्ट्रीय संपत्तीतला अधिकाधिक वाटा आपल्याला मिळावा यासाठी वाटेल ती अडंगेबाजी करू लागला आहे. कामचुकारपणात तो कमी नाही. शेतमजूर दिवसातले तीन-चार ताससुद्धा काम करत नाही असे म्हणणारा शेतकरीकुटुंबातला तहसील कचेरीतला कारकून किंवा बँक कर्मचारी स्वतः दीड-दोनतास सुद्धा काम करत नाही. एकदा बसमध्ये एक डॉक्टर भेटले. 'मी एक दिवसाआड प्राथमिक आरोग्य केंद्रावर जातो. दुसरा साथीदारही असेच करतो. हजेरी मात्र आम्ही सर्व दिवसांची लावतो,' असे मोठ्या फुशारकीने सांगत होते. चार-चार दिवस शाळेत न जाणारे प्राथमिक






शिक्षक कमी आढळत नाहीत. बनावट केसेस करणे, न्यायाधीशांचे दलाल म्हणून वावरणे – हे काही वकिलांचे धर्मकृत्य बनले आहे. तर किडनीचा चोरटा व्यापार करणारे डॉक्टर पैसा व प्रतिष्ठेपायी कुठलेही अपकृत्य करायला मागेपुढे पाहत नाहीत असेही प्रत्ययाला येत आहे. सरकारी बँकिंग वगैरे संघटित क्षेत्रातला भ्रष्टाचार करणारे सगळेजण उच्चविद्या-विभूषित असतात.

हा वर्ग दलितांच्या राखीव जागांना सात्त्विक संतापाने विरोध करताना दिसतो. विश्वसुंदरी स्पर्धा भरवण्यात तोच पुढे असतो. धार्मिक सण-उत्सवात पुढाकार घेऊन वारेमाप खर्च करतो. पत्रकारितेच्या क्षेत्रातील बोलके ढलपे तर कशाचीच तमा बाळगत नाहीत. आपल्या हाती असलेल्या शक्तीचा वापर समाजाला सुधारण्याऐवजी विघडवण्यासाठी वापरण्यात त्याला कसलाही विधिनिषेध वाटेनासा झाला आहे. लिंगपिसाटपणा व हिंसाचार यांचा पैसा मिळवण्यासाठी बेसुमार वापर करणारा संचारमाध्यमातील सुशिक्षित, कुशल मध्यमवर्ग हे समाजावर ओढवलेले मोठे संकट आहे असे म्हणायची वेळ आली आहे.

न्याय व समता प्रस्थापनेसाठी शोषित-दलित-कष्टकऱ्यांची संघटित शक्तीच प्रभावी ठरत असते. तिला जागृत व संघटित करण्यात मध्यमवर्गाचा महत्त्वपूर्ण हातभार लागू शकतो. तोच आज इतका स्वार्थी व बेगुमान बनला आहे. त्यांच्यातील अपप्रवृत्तींवर निर्भयपणे कोरडे ओढणे व व्यक्तिशः आणि गटागटाने त्यांच्याशी संवाद साधणे, त्यांचा विवेक जागृत करणे हा महत्त्वाचा धागा भावी वाटचालीची आखणी करताना पकडावा लागणार आहे.






# आम्ही आणि ते – मी आणि त्या

**प्रतिभा रानडे**

मी लिहायला लागून आता वीस वर्षे झाली. सुरुवातीला दोन-चार वर्षांच्या काळात मी कथा, ललितलेख, कादंबरी लेखनात रमले होते. या प्रकारचं लेखन सुरू असतानाच अफगाणिस्थानातील 'राज्यक्रांती' आणि त्यानंतर जगातील दोन महासत्तांच्या रस्सीखेचीत हळूहळू बळी जाणारं छोटंसं अफगाणिस्थान, बुद्धिबळाच्या पटावरील प्याद्यांसारखी पटापटा मारली जाणारी तेथील नेतेमंडळी, रोजच्या रोज घडणाऱ्या भयचकित करणाऱ्या घटना, त्यांमध्ये सर्वसामान्य माणसांची होणारी होरपळ यांचं एक वेगळंच विश्वदर्शन मला झालं. ते सर्व बघत असता, अनुभवीत असता, त्याबद्दल लिहायला सुरुवात केल्यावर एक भान येत गेलं की, आपलं लेखन हे आपल्या रमण्यापेक्षाही गंभीर असं फार मोठ्या जबाबदारीचं काम आहे. आणि मग कसल्यातरी उदंड उत्साहानं अफगाणिस्थानबद्दलचं भरपूर वाचन केलं, अफगाण लोकांशी मुद्दामहून ओळखी करून त्यांच्याशी चर्चा केल्या. मी लिहिते हे कळल्यावर लोक आपणहून घरी येऊन मला आपापले अनुभव, आपली मनःस्थिती सांगू लागले. आमच्याबद्दल लिहा, म्हणून आग्रह करू लागले. या लोकांमुळेच माझ्या लिखाणाला प्रगल्भतेचा पाया लाभला. ते लोक, त्यांचं वास्तव, अफगाणिस्थानातील राजकारण यांमध्ये माझी भावनिक गुंतवणूक झाली. त्यांची गाणीबजावणी टेप करून घेतली. तशीच तिथली अजानही टेप करून घेतली. आम्ही राहात होतो तेथून जवळच तिथली सुप्रसिद्ध 'निळी मशीद' होती. तिथून दिली जाणारी अजान अतिशय सुरेल होती. जीव व्याकूळ करणारी, आपल्याकडे बोलावणारी. आपल्याकडे लाऊडस्पीकरवरून दिली जाणारी अजान किती बेसूर असते.

अफगाणिस्थानातून परत येताना सर्वांनाच वाईट वाटायचं. त्याचं मुख्य कारण तिथे पगार बऱ्यापैकी मिळत. अलिगढ विद्यापीठातील इंग्रजीचे प्राध्यापक रिझवान हुसेन परत निघाले तेव्हा त्यांनाही फार वाईट वाटलं. त्याचं कारण वेगळं होतं. ते मला म्हणाले, "अलिगढला गेलो की परत त्यांच्यातच (मुसलमानांच्यात) वावरावं लागेल मला. त्यांच्या म्हणण्याला 'होला हो' करावं लागेल. जरा काही मी वेगळा सूर लावला तर माझ्या कपाळी 'कम्युनिस्ट' हा शिक्का मारतील ते. इथं कम्युनिस्ट







अनुक्रमणिका

राजवटीत राहूनदेखील आपण किती स्वतंत्र आहोत. ते सगळं जाणार परत गेल्यानंतर."

अफगाणिस्थानातील सगळंच राजकारण एकमेकांना जिवे मारण्याचं. 'सफाया' करण्याचं. म्हणजे सगळ्या कुटुंबालाच मारून टाकण्याचं. आणीबाणीनंतर इंदिरा गांधी निवडणुकीत हरल्या तेव्हा गुल अमीरने, आमच्या ड्रायव्हरने, मोठ्या काळजीने विचारले होते की, आता इंदिरा गांधींचा पण 'सफाया' करतील का? 'सफाया' केला नाही तरी त्या, त्यांची मुलंबाळं जगतील कशी? त्यांच्या उदरभरणाची सोय काय?

त्या वेळेस त्या प्रश्नांची उत्तरं देताना मला अभिमान वाटला होता की, आमच्याकडे लोकशाही आहे; आमच्याकडे तुमच्यासारखी मारामारी होत नाही. आम्ही आणि ते हा फरक तेव्हा जाणवला होता.

आज मात्र ठामपणानं तसं काही वाटत नाही. आज असं वाटतं आहे की, सत्तेवर येण्यासाठी कोणी बंदुका आणि रणगाडे वापरतात तर कोणी मतं आणि पैसा यांची कोट्यवधींची गणितं मांडतात. त्यामध्ये आता गुंडगिरीची भर पडत आहे. साधनं कोणतीही असली तरी सर्वसामान्यांच्या आयुष्याची धूळधाणच होते. बंदुका, रणगाड्यांमुळे माणूस मरूनच जातो. गणितांच्या मुळे माणूस जगत राहतो; पण जीवनावरचा त्याचा विश्वास उडतो. साम, न्याय, नेकी हे दूर कुठेतरी फेकले जातात. या खेळामध्ये फक्त राजकीय सत्तेसाठी हपापलेलेच गुंतलेले असतात असं नाही; तर समाजाची सद्सदविवेकबुद्धी जागृत ठेवण्याची जबाबदारी असलेलेही आहेत. सर्वसामान्य माणूस दिशाहीन अवस्थेत, तत्काल फायद्यासाठी चुकीच्या मार्गाने जाऊ लागतो. नाहीतर सर्वच बाबतीत उदासीन, तटस्थ होऊन जातो. हतबल होतो. सत्तासंपादनाची अमर्याद ऊर्मी आणि हतबलता यांची घट्ट वीण तयार होत जाते.

पण कधीकधी त्यामध्ये बारीकशी फट पडू शकते. इच्छा असेल तर या हतबलतेतूनही सुटका होऊ शकते. आठवडाभरापूर्वी बातमी आलीय की, सर्वोच्च न्यायालयाने नूरसबा खातून या घटस्फोटित मुस्लिम स्त्रीच्या, तिच्याकडेच राहणाऱ्या मुलींच्या पालनपोषणाची पूर्ण जबाबदारी मुलींच्या बापानेच उचलली पाहिजे असा निकाल दिला आहे. न्यायालयाने म्हटले आहे की, नवऱ्याने पत्नीला तलाक दिलेला असला, आणि त्याची मुले घटस्फोटित आईकडेच राहत असली तरी, मुलांच्या पोषणाची जबाबदारी नवऱ्यानेच उचलली पाहिजे; पत्नीच्या पोटगीशी त्याचा काहीही संबंध नाही. तो मुलांचा अधिकार आहे. सर्वोच्च न्यायालयाच्या या निर्णयाविरुद्ध, शाहबानो केसच्या वेळेसारखा अजून तरी कोणी आवाज उठवलेला नाही. उलट मुस्लिम पर्सनल लॉ बोर्डने या निर्णयाला संमती दर्शवली आहे. बोर्डाच्या प्रवक्त्याने म्हटले आहे की, शरियतनुसार मूल आईचे दूध पीत असते तोपर्यंतच घटस्फोटित पत्नीची जबाबदारी पतीने उचलायची असते. यामागचा हेतू असा की, मुलाचे भरणपोषण बापाने केले पाहिजे. मग ते दोन वर्षांपर्यंतच्या दूधपित्या मुलाचे जसे असेल तसेच ते वयात येईपर्यंतच्या मुलाचे, आणि लग्न होईपर्यंत मुलीचे असेल. म्हणून सर्वोच्च न्यायालयाचा हा निर्णय आम्हाला मान्य आहे.

न्यायालयाचा निर्णय आणि मुस्लिम पर्सनल लॉ बोर्डाचा हा पाठिंबा स्वागतार्हच आहे. घटस्फोटित मुस्लिम स्त्रियांना त्यामुळे थोडातरी आसरा मिळणार आहे. पण हा टप्पा गाठण्यापूर्वी केवढी वादंगं माजली, हाणामाऱ्या झाल्या! त्या सगळ्याला थोडीफार साक्षीदार मी होते. मुस्लिम स्त्रियांचा अपमान, असहायता मी समजून घेऊ शकले.

भारतामध्ये अनेक धर्म गुण्यागोविंदाने नांदत आहेत असं आपण जगाला अभिमानाने सांगत असतो. पण प्रत्यक्षात आपल्याला एकमेकांबद्दल अत्यंत जुजबी माहिती असते. एकमेकांचे धर्म जाऊ दे, पण इतर धर्मीयांच्या रोजच्या जगण्याबद्दलही आपल्याला फारशी माहिती नसते. मला नव्हती. मुस्लिम समाजाबद्दलची माझी माहिती ही हिंदी चित्रपट पाहून झालेली. प्रचंड रोमँटिक. मोठमोठ्या हवेल्यांतील लांबलचक व्हरांड्यातून गरारेशरारे घातलेल्या, हातापायांवर मेंदी रेखलेल्या, 'हाय अल्ला' करून घडीघडी लाजत, पळत जाणाऱ्या तरुण मुली; रुबाबदार शेरवानी घातलेले, खालच्या नजरेनंच मृदु आवाजात बुरख्याआडच्या मुलींशी बोलणारे देखणे तरुण; मधुर आवाजात गायली जाणारी इष्क-मोहोब्बत-जुदाईची गाणी आणि धडाकेबंद कव्वाल्या... असा दिसला मुस्लिम समाज. शाळा-कॉलेजातही कधी मुस्लिम मुलगी बरोबर नव्हती. दंगेधोपे झाल्यावर रस्त्यावर येणारा, सुरामारी करणारा मुसलमान आणि 'जिहाद'ची घोषणा देणारे त्यांचे नेते. अवतीभोवतीचं वातावरण आणि त्यावेळच्या पूर्वग्रहांमुळे मुस्लिम समाजाबद्दलचा संशय आणि भीती होती मनात. दिल्लीला असताना पाहुणे आल्यावर त्यांना दिल्ली दाखवण्यासाठी, जामा मशिदीच्या परिसरात फिरताना मनावर दडपण यायचं. नंतर मग

अनुक्रमणिका

अफगाणिस्थानात गेल्यावर अफगाण मुस्लिमांच्या बरोबरच भारतीय, पाकिस्तानी, इंडोनेशियाई अशा कितीतरी मुसलमानांशी ओळखी झाल्या. वेगवेगळ्या विषयांवरचे प्राध्यापक, इंजिनिअर, डॉक्टर अशी मंडळी होती ही. त्यांच्याबरोबर असंख्य विषयांवर चर्चा करीत होतो. तेव्हा, 'हिंदू-मुस्लिम' असे तणाव नव्हते आमच्यात. त्यांच्या कुटुंबीयांशी जवळीक झाली होती. भाज्या मिळत नाहीत, या वर्षी लाकडं किती महाग झालीत (तिथे उणे ३० डिग्रीपर्यंत तपमान जात असल्यामुळे, वर्षातले चार महिने घरात सतत शेकोट्या पेटवून ठेवाव्या लागत), मुलांचे अभ्यास, कोणी काय नवीन विकत घेतलं या विषयांवर बायकांशी गप्पा व्हायच्या.

तेव्हा एक गोष्ट ध्यानात आली की, सर्वच बायका आपापल्या नवऱ्यांना थोड्याफार घाबरून असल्या तरी, या मुस्लिम बायकांचं नवऱ्याला घाबरणं अधिक आहे. काबूलमधल्या, सैन्यातून जनरलपदावरून निवृत्त झालेल्या आमच्या घरमालकाची म्हातारी बायको मला अभिमानानं सांगत होती की, अमीर अमानुल्लाच्या काळात, म्हणजे १९२५ च्या दरम्यान, अमीरच्या सांगण्यावरून, तिने आणि तिच्यासारख्या उच्चाधिकाऱ्यांच्या घरच्या बायकांनी मोठ्या हिमतीनं बुरखा वापरणं सोडून दिलं होतं. पण घरमालक दर महिन्याला ४-८ दिवसांसाठी जलालाबादला जायचा याचं तिला दुःख व्हायचं. तिथे त्यांची मोठी इस्टेट होती आणि घरमालकाची दुसरी बायकोही होती. अमीरच्या हुकमावरून पन्नास वर्षांपूर्वीच तिचा बुरखा सुटला होता पण तिच्या नशिबाची सवत सुटली नव्हती. शुक्रियाला वर्षभर शिक्षणासाठी परदेशी जाण्याची संधी ऑफिसकडून मिळाली होती. पण नवरा, सासूसासरे, आईवडील, भाऊ कोणीच परवानगी देणार नाही हे तिला माहीत होतं. म्हणून कुणालाही न सांगताच, आपल्या वर्षभराच्या मुलीला माघारी ठेवून ती निघून जाणार होती. पुढे काय होणार याचा ती विचारच करीत नव्हती. तिची काळजी मी करू लागले होते. असंख्य बंधनं असतानाही, आपण कायम सुंदरच दिसलं पाहिजे म्हणून सतत प्रयत्नशील असणाऱ्या, त्याच विचाराने झपाटलेल्या बायका-मुली बघितल्या आणि सतत सिगरेटी पिणाऱ्या तरुण मुली बघितल्या. अफगाणिस्थानातून आपापल्या गावी परत जाताना कितीतरी जणींनी अश्रू ढाळले होते. अफगाणिस्थानातील चार दिवसांचं स्वप्न संपून आता परत 'अंधेर गलीयोंमें वापस' जाण्याच्या कल्पनेनं त्या दुःखी झाल्या होत्या. कारण आपापल्या घरी, गावी गेल्यावर 'वोभी बदल जायेंगे' हे त्यांना आपापल्या नवऱ्यांबद्दल अनुभवावरून माहीत होतं. मुस्लिम स्त्रियांच्या जगात थोडंसं डोकावून पाहायला मिळालं होतं. तेव्हा असं वाटायचं, 'त्यांच्या'मध्ये आणि 'आमच्या'मध्ये केवढं अंतर आहे!

'त्यांना' आणखी समजून घ्यावंसं वाटू लागलं. पुढे मग मुंबईत आल्यानंतर सर्वप्रथम, जे कुराण मुस्लिम समाजावर अधिसत्ता गाजवते ते कुराण वाचले. सर्व थरांवरच्या मुस्लिम बायका-मुलींशी मुद्दामहून ओळखी करून घेऊन त्यांच्याशी बोलले. त्यांच्या जीवनाबद्दल, त्यांच्या सुखदुःखांबद्दल, आशा-आकांक्षांबद्दल चर्चा केल्या. मन मोकळं करून त्या माझ्याशी बोलल्या. म्हणाल्या, स्वतःबद्दल आम्ही असा विचार पूर्वी कधी केला नव्हता; तुम्ही परत या आमच्याशी बोलायला. मी मात्र त्यांच्या आयुष्यातले ताणतणाव समजून घेतल्यावर अस्वस्थ होत होते. श्रीमती नज्मा हेपतुल्ला यांच्यासारख्या उच्चकोटीतल्या विशेषाधिकारी, आयुष्यात सर्व काही मिळालेल्या स्त्रीची मुलाखत घेतली. आणि संगमरवरी मिनारमध्ये बसलेल्या राजकारणी व्यक्ती जमिनीवरच्या वास्तवाकडे कशा तऱ्हेनं पाठ फिरवतात हे पाहून अतिशय व्यथित झाले. शाहबानो केसमुळे उठलेल्या वादळातील वेगवेगळे पैलू समजावून घेतले. शाहबानो तर आपलं सगळं आयुष्य जगलेली एक वृद्धा होती, परंतु नज्मा, मदिनासारख्या १४-१५ वर्षांच्या मुलींच्या आयुष्याची धूळधाण करणाऱ्या तलाक पद्धतीचं भेदक दर्शन झालं. त्या मुलींची दुःखं माझी दुःखं झाली. त्यांना इतकं एकाकी, असहाय, दीनवाण्या बनवणाऱ्या संपूर्ण व्यवस्थेचा संताप आला आणि आपण त्याबद्दल काहीही करू शकत नाही याचं वैफल्य आलं. त्या मुलींना सर्वतोपरी मदत करणाऱ्या, त्यांच्या आयुष्याला चांगले वळण लावण्यासाठी धडपडणाऱ्या मुस्लिम सत्यशोधक मंडळाने काढलेल्या तलाकमुक्ति मोर्चाच्या एका टप्प्यावर मी त्यात सामील झाले. त्या वेळी धार्मिक श्रद्धेचं निमित्त करून सत्तेचं राजकारण खेळणाऱ्यांमधला हिंस्रपणा अनुभवला. 'मोर्चा'तील लोकांना मारून टाकायला, जाळून टाकायला रस्त्यावर आलेले ते तरुण त्यांच्या कपड्यालत्त्यांवरून अशिक्षित, बेकार, गरीब दिसत होते. त्यांच्या घरातही कोणीतरी नवऱ्याने टाकून दिलेली, तलाक दिली गेलेली असणार होती. तरी ते रस्त्यावर आले होते. सुखवस्तु, सुरक्षित घरांत बसणारे आपलेच लोक आपल्याला वापरून घेत आहेत हे त्यांच्या लक्षात येत नव्हतं.










अनुभव घेत गेले. त्यांच्या प्रश्नांची गुंतागुंत समजावून घेत गेले. त्यांना समजावून घेत असतानाच आपल्याला समजावून घ्यावं म्हणून, १९ व्या शतकातील स्त्री-समस्यांचाही अभ्यास केला. हिंदू समाजाने पापपुण्य, स्वर्ग-नरकाच्या कल्पना, श्रद्धांना हाताशी धरून बायका-मुलींचा केलेला छळ ध्यानात आला. जीवाची तगमग झाली. शंभर-दीडशे वर्षांपूर्वीच्या बायका-मुलींची आयुष्यं मी परत जगले. लक्षात आलं की, 'आम्ही' आणि 'त्या' यांच्यामध्ये फारसं मोठं अंतर नाही. स्त्रियांकडे बघण्याचा पुरुषप्रधान दृष्टिकोण, त्यासाठी धार्मिक श्रद्धेचा केलेला वापर, स्त्रियांच्या परिस्थितीत सुधारणा व्हावी म्हणून धडपडणाऱ्यांचे विचार, त्यांना विरोध करणाऱ्यांचे विचार, राजकीय स्वातंत्र्य-सत्तेसाठी स्त्रियांच्या प्रतिष्ठेचा, स्वातंत्र्याचा बळी देणं या गोष्टी 'आमच्या'त आणि 'त्यांच्या'त सारख्याच आहेत. फरक असलाच तर तो एवढाच आहे की रडतखडत, हाणामाऱ्या करीत का होईना पण आम्ही बदल मान्य करीत गेलो. कारण फुले, लोकहितवादी, आगरकर यांच्यासारख्यांनी स्त्री-पुरुष समानतेचे नवे आदर्श आमच्यासमोर ठेवले. आम्ही त्यांची स्वप्नं पाहिली. ती स्वप्नं पुरी करण्यासाठी झगडत राहिलो.

स्त्री-पुरुष समानतेचे नाते मान्य करताना दोन अडथळे आहेत. मुख्य म्हणजे पुरुषी वृत्ती ही तर आहेच; त्याशिवाय आपापल्या धर्मग्रंथांवर श्रद्धा असणाऱ्यांच्या मनातून ईव्ह (बायबल), हव्वा (कुराण) ला ॲडम-आदमच्या मनोरंजनासाठी ईश्वराने तयार केली ही धारणा पण रुजलेली आहे. पुरुषासाठी तयार केलेली स्त्री त्याच्या बरोबरीची कशी असेल? ती त्याच्यापेक्षा कनिष्ठच असणार.

आणखी एक प्रश्न माझ्या मनाला सतत कुरतडत असतो. ईश्वराने त्या दोघांना सांगितले होते की, स्वर्गाच्या बागेतील ज्ञानवृक्षाचे फळ न खाता अनंत काळपर्यंत सुखाने राहा. परंतु ईव्हने ज्ञानवृक्षाचे फळ खाल्ले. ते तिने ॲडमलाही खायला लावले. त्यामुळे परमेश्वर कोपला. त्याने दोघांना पृथ्वीवर मृत्युलोकात ढकलून दिले. बाळंतपणात स्त्रियांना मरणयातना होतील असा शापही दिला. मग माझ्या मनात प्रश्न येतो, ज्ञान मिळविले म्हणून ही शिक्षा? ईव्हनं ज्ञानवृक्षाचं फळ खाण्याचं 'पाप' केलं, पुरुषाला मोहात पाडण्याचंही पाप केलं. तो चांगला, पवित्र. ती वाईट, पापी. त्या दोघांचे नाते समान कसे असेल?

मानवप्राणी आणि धर्माचे नाते फार विलक्षण आहे. पुरुषाचे धर्माशी असलेले नाते फार लवचीक आहे. तोच धर्मकर्ता आहे. स्वतःच्या स्वार्थासाठी तो धर्म या कल्पनेला, श्रद्धेला त्याला हवे तसे वळवतो, वाकवतो.

स्त्रीचे धर्माशी असलेले नाते बांधिलकीचे आहे. पुरुषनिर्मित धर्माने तिच्यावर असंख्य बंधने घातली. तिला हीन लेखले. धर्मापासून ती स्वतःची सुटका करून घेऊ शकत नाही. आपल्या आयुष्याची गती, आपली बौद्धिक, भावनिक क्षमता, आपल्यापुढे असलेले पर्याय, स्वतःचे निर्णय घेण्यासाठी तिच्यावर असणाऱ्या अंतर्गत आणि बहिर्गत मर्यादा या सर्वांचे गणित मांडण्यासाठी, त्याचे उत्तर शोधण्यासाठी तिच्याजवळची सामग्री फार अपुरी आहे. अशा वेळी देवाधर्मामध्येच ती स्वतःला बांधून घेते. त्यापेक्षा वेगळा पर्याय तिला मिळालेला नाही. मारकुटी आई आणि मुलासारखे हे संबंध आहेत. या आईनं मारलं तर जाणार कुठं? 'नको ग मारू आई' असं म्हणत म्हणत मुलं आईपासून दूर पळतात, पण परत फिरून आईलाच बिलगतात.

मग आपण एका अशा टप्प्यावर येऊन पोचतो की, माणसातील, समाजातील सदसद्विवेकबुद्धीला आवाहन करून त्याच्यातील सत्यनिष्ठा, न्याय, चांगुलपणाने तो वागेल अशी अपेक्षा ठेवायची की माणसातील, समाजातील दुष्टपणा, स्वार्थीपणा, हव्यास यांच्यावर धरबंध घालायचा? व्यक्ती, समाज यांचे व्यवहार न्यायाने, समानतेने चालावेत म्हणून त्यांच्यावर ईश्वराची भीती, नरकाची भीती, यातून निर्माण केल्या गेलेल्या धार्मिकतेचे अधिराज्य असावे की विवेकवादी मानवनिर्मित कायद्याचे?

या मुद्द्यांवर हिंदू-मुस्लिम समाजांत वादंग माजले आहेत. १८८५-१८९० च्या दरम्यान महाराष्ट्रात संमतिवयाच्या कायद्या-निमित्ताने चर्चा झाल्या तेव्हा एका लेखात आगरकर म्हणतात, "सारे शंकराचार्य निःसत्त्व होऊन बसले आहेत. सरकार परधर्माचे आहे. लोकांत आपणहोऊन चळवळ करून नव्या स्मृती घालण्याचे सामर्थ्य नाही. तेव्हा सध्याच्या स्थितीस अनुकूल असे फेरफार कोण करणार? प्रतिपक्षी म्हणतात की, ते लोकांनी करावे आम्ही म्हणतो की, मोठमोठे फेरफार सरकारच्या साहाय्यावाचून व्हावयाचेच नाहीत; निदान आम्ही असल्या स्थितीत आहोत, तसल्या स्थितीत व्हावयाचे नाहीत." (*आगरकर लेखसंग्रह*; संपादक : ग.प्र. प्रधान, साहित्य अकादमी, नवी



अनुक्रमणिका

दिल्ली, पृष्ठ २१६). असा विषाद वाटला तरी दुसऱ्या लेखात आगरकर म्हणतात, "कोणतेही आचार घालण्यास पूर्वीच्या ऋषींस जितका अधिकार होता तितकाच आम्हासही आहे... बऱ्या-वाईटाची निवड करण्याची जितकी बुद्धी त्यांना होती तितकी, किंवा तीहून अधिक आम्हासही आहे." (उपरोक्त, पृष्ठ ८०) आगरकरांच्या या म्हणण्यामागे त्यांचा विचार होता की, "परमेश्वराने एकदा विश्वाची उत्पत्ती केल्यानंतर त्याला त्या जगाशी काहीही देणे-घेणे नसते. या जगातील समस्या माणसाने निर्माण केलेल्या आहेत, त्या माणसानेच सोडवायला हव्यात." त्यामुळेच सरकार परकीय असले तरी त्या सरकारकडून आपल्या समाजाला उपकारक असे कायदे करवून घेण्यास आगरकरांचा कोणताच आक्षेप नव्हता.

टिळकांची भूमिका त्याविरोधी होती. ते म्हणाले होते, "परधर्मी सरकारास आपल्या सामाजिक आणि धर्माबाबतीत हात घालण्यास अधिकार असावा असे म्हणणे म्हणजे, आपल्या घरची एका बाजूची भिंत मोडकळीस आली आहे म्हणून सर्व घराला आग लावून द्या, असे प्रतिपादन करण्याइतकेच शहाणपणाचे आहे." (*समग्र लोकमान्य वाङ्मय*, खंड ५, पृष्ठ ८१८)

आगरकर-टिळकांचेच विचार अलीकडच्या काळात हमीद दलवाई आणि शहाबुद्दीन प्रभृतींनी मांडलेले आहेत. शब्दांचा फेरफार असेल, पण मूळ विचार तसाच. योगायोगाची गोष्ट म्हणजे १८८४ ते १८८७ या काळात रखमाबाई विरुद्ध दादाजी हा खटला महाराष्ट्रात खूप गाजला होता. या खटल्यामुळे विवाहितेला नावडत्या नवऱ्याबरोबर संसार करण्याची सक्ती करता येते का?, हा महत्त्वाचा प्रश्न धसास लागला होता. तर शंभर वर्षांनंतर शाहबानोच्या केसमुळे एकतर्फी, तोंडी तलाक देण्याचा मुस्लिम नवऱ्याचा अधिकार आणि तलाक मिळालेल्या पत्नीचा पोटगीचा अधिकार हे मुद्दे धसास लागले होते. त्या वेळी धर्माच्या कारणे स्त्रियांवर अन्याय होऊ नये म्हणून समान नागरी कायद्याच्या मागणीने जोर धरला होता. स्त्रीप्रश्नांबद्दल आस्था असणाऱ्या सर्वांनीच समान नागरी कायद्याची मागणी सुरू केली होती. त्याविरोधात मुस्लिम पुनरुज्जीवनवादी शक्तींनी समाजामध्ये आणि हिंदू-मुस्लिम संबंधांच्या संदर्भातही प्रचंड दहशत निर्माण केली. परिणामतः 'मुस्लिम वुईमेन प्रोटेक्शन बिल' सरकारला पास करावे लागले होते. त्या दहशतीचा परिणाम मुस्लिम समाजावरही झाला होता. कितीतरी बायका-मुली माझ्याशी बोलायला तयार नसायच्या. एक तर मी हिंदू म्हणून त्यांच्या मनात शंका, संशय असे. परंतु स्त्री-समस्यांबद्दल मी इतरही लिखाण करते हे त्यांना दाखवून दिल्यावर तो अडथळा दूर होई. तरीदेखील आमची नावे प्रसिद्ध करणार नसला तरच आम्ही चर्चा करू, या अटीवरच त्या माझ्याशी बोलल्या होत्या. त्या वेळेस माझ्या ध्यानात आले की, ९५ टक्के बायकांना समान नागरी कायदाच हवा होता, कारण त्यामुळे त्यांना शरियतपासून सुटका मिळणार होती. नंतर मग अयोध्याप्रकरण झाल्यानंतर मात्र त्यांच्या मनाचा फार गोंधळ उडाला होता. त्यांना समान नागरी कायदा नकोसा झाला; पण शरियतही नकोशीच होती.

गेल्याच वर्षी मी गोव्यातील मुस्लिम स्त्रिया आणि तेथील समान नागरी कायदा या संदर्भात एक आढावा घेतला होता. त्या वेळेसदेखील कितीतरी मुस्लिम बायकांनी त्यांची नावे, पत्ते प्रसिद्ध न करण्याच्या अटीवरच माझ्या प्रश्नांना उत्तरे दिली होती. एवढेच नव्हे तर, पणजी येथील एक काझी आणि एका उर्दू शाळेचे मुख्याध्यापक यांनीदेखील त्या अटीवरच माझ्याशी चर्चा केली होती. त्यांचे विचार परंपरागत असूनही त्यांना त्यांच्या वरिष्ठांची धास्ती वाटत होती. तेथील ९२ टक्के बायकांना तिथे चालू असलेला नागरी कायदाच हवा आहे. दोन टक्के बायकांना, शरियतचे त्यांच्या जीवनावर होऊ शकणारे गंभीर परिणाम माहीत असूनही शरियतच हवी आहे, कारण तो त्यांच्या श्रद्धेचा प्रश्न आहे. योगायोगाची गोष्ट म्हणजे या बायकांचे नवरे मध्यपूर्वेत नोकरी करायला लागल्यानंतर, त्यांच्या नवऱ्याच्या सांगण्यावरूनच त्यांची ही मते बनली होती. उरलेल्या सहा टक्के बायकांना शरियतच हवी आहे, पण त्यामध्ये आमूलाग्र बदल करून. चार बायका करायची सवलत, तोंडी तलाकची परवानगी, तलाक दिलेल्या बायकोची, मुलांची जबाबदारी नवऱ्याने न पत्करणं ही तीन कलमे जर बदलली तर त्यांची शरियतला हरकत नाही.

अर्थातच नागरी कायदे लागू केले म्हणून मुस्लिम स्त्रियांसमोरच्या समस्या एकदमच सुटणार आहेत असे नाही. हिंदू स्त्रियांच्या समस्या कुठे सुटल्या आहेत? त्या तर वाढतच चालल्या आहेत. मूळ मुद्दा आहे तो पुरुषांची, समाजाची वृत्ती बदलण्याचा. नागरी कायदा हा त्या दृष्टीने पहिले पाऊल असेल. परंतु हा प्रश्न आता धार्मिक अस्मितेचा बनवला गेल्यामुळे त्याचे संदर्भच बदलले आहेत. कितीतरी स्त्री-संस्थांनी



अनुक्रमणिका

आणि व्यक्तिगत स्वरूपातही कित्येकांनी समान नागरी कायद्याची पूर्वीची त्यांची मागणी 'पुनर्विचार करायला हवा' म्हणून लांबणीवर टाकली आहे. समान नागरी कायद्याबद्दल एकदाच नव्हे तर पुन्हा पुन्हा पुनर्विचार करायला हवा हे सत्य आहे. परंतु त्यामागे एक भीतीदेखील असते की समान नागरी कायद्याची मागणी केली तर आपण जातीयवादी दिसू का? किंवा जातीयवादी लोक त्याचा स्वार्थासाठी फायदा करून घेतील का? म्हणजे, तुम्ही धर्मनिरपेक्ष असून चालत नाही, तर ते तसे दिसायला हवे; तुम्हाला ते सिद्ध करायला हवे. त्याचा फार ताण येतो मनावर.

प्रत्येक लेखकाला त्याच्या लेखनावरच्या चांगल्या-वाईट प्रतिक्रिया मिळत असतात. तशाच त्या मलाही मिळाल्या. *बुरख्याआडच्या स्त्रिया* या पुस्तकामुळे काही वाचकांकडून विखारी प्रतिक्रिया आल्या. शिवीगाळ करून त्यांनी मला धमक्या दिल्या होत्या. त्या पत्रांच्या हस्ताक्षरांवरून कळत होते की, अशी पत्रे लिहिणारे अशिक्षित होते तसेच सुशिक्षितही होते. सुशिक्षितांनी आपल्या डिग्र्याही स्वतःच्या नावापुढे लावलेल्या होत्या. त्या पत्रांचा सूर होता की, आम्ही तुमच्या बायकांच्या भानगडीत पडतो का? मग तुम्हीही आमच्या भानगडीत पडायचे नाही. पडाल तर परिणाम वाईट होतील. त्याचबरोबर बऱ्याच अशिक्षित-सुशिक्षित पत्रलेखकांकडून पुस्तक चांगले झाले आहे, आवडल्याची पत्रेही मिळाली. प्रश्न आहे तो, लेखनाला चांगले की वाईट म्हटले याचा नाही, तर लेखनामुळे वाचकाच्या मनोवृत्तीत, विचारात काही फरक पडतो का? दोन-चार पत्रलेखकांनी म्हटले होते की, ते इंजिनिअर, कॉम्प्युटरशिक्षित, शिक्षकी पेशातले होते, परंतु त्यांचे विचार मात्र परंपरागतच होते. माझे पुस्तक वाचून आपल्या विचारांमध्ये फरक पडल्याची कबुली त्यांनी दिली होती. तसेच काही हिंदू बायका-पुरुषांचीही त्याच अर्थाची पत्रे आली होती. धार्मिक अंधश्रद्धा आणि आजच्या जगाचे वास्तव यांमध्ये मुस्लिम समाजाची होणारी फरपट लक्षात आल्यामुळे, मुस्लिम स्त्रियांच्याच नव्हे तर त्या समाजाच्या प्रश्नांकडे वेगळ्या नजरेने पाहू शकू, असे त्यांनी मला कळवले होते. हे मला पार महत्त्वाचे वाटते. आश्चर्य म्हणजे अजूनपर्यंत एकाही मुस्लिम स्त्रीचे पत्र मला आलेले नाही. कुठे व्याख्यानाला गेले तर क्वचित कोणी मुस्लिम स्त्रिया तिथे येतात, किंवा प्रत्यक्षात कोणी भेटतात, तेव्हा त्या म्हणतात की बाई, तुम्ही आमची बाजू चांगली मांडता वगैरे.... पण पत्र मात्र कोणी लिहिलं नाही. याचा अर्थ एवढाच की, अजूनही मुस्लिम स्त्रियांना आपले मनोगत जाहीर करणे, त्यासाठी मुद्दामहून प्रयत्न करणे ही बाब फार कठीण आहे. नाशिकला कुसुम पटवर्धनांनी त्यांच्या महिला हक्क संरक्षण समिती या संस्थेमध्ये आयोजिलेल्या माझ्या भाषणाला बुरखा घातलेल्या काही बायका आल्या होत्या. व्याख्यानानंतर त्या माझ्याजवळ आल्या, मोठ्या आपुलकीने म्हणाल्या, बाई, तुम्ही बरोबर तेच बोललात... वगैरे. त्यांच्या पाठोपाठच काही मुस्लिम पुरुषही तिथे आले. त्यांनी मात्र माझ्या काही वक्तव्याला विरोध केला. माझ्या बोलण्याला आक्षेप घेतला. बोलता-बोलता वातावरण गरम होऊ लागताच कुसुमताईंनी मध्ये पडून सर्वांची पांगापांग केली. त्या वेळी मुस्लिम स्त्रिया घाबरून गेल्या होत्या.

माझ्या या अभ्यास-लेखनाच्या प्रवासात कितीतरी गोष्टी मला शिकता आल्या. स्त्रियांच्या समस्या प्रचंड गुंतागुंतीच्या असतात, त्यांचे धागेदोरे समाजात खूप खोलवर आणि दूरवर पसरलेले असतात, त्यांची उत्तरं सरळ रेषेत जाणारी नसतात, त्यांना वेडीवाकडी वळणेच जास्त असतात याचं भान आलं. हिंदू-मुस्लिम स्त्री-जीवनाच्या वास्तवाच्या बरंचसं जवळ जाता आलं. व्यक्ती म्हणून मी वैचारिक दृष्ट्या श्रीमंतच झाले. त्याच वेळी जाणीव झाली की, आपल्याला जेवढं कळतं असं आपण समजतो, त्यापेक्षा कितीतरी अधिक अजून आपल्याला कळायचं आहे.

आज या टप्प्यावर माझ्या नजरेसमोर जवळजवळ दोनशे वर्षांचा काळ येतो आहे. उत्तर पेशवाईत सरदार पटवर्धनांची सहा वर्षांची मुलगी विधवा झाली होती. पटवर्धनांनी थेट काशीच्या शास्त्रीपंडितांकडे जाऊन मुलीच्या पुनर्विवाहासाठी परवानगी मिळविण्यासाठी प्रयत्न केले. मुलगी अबोधपणातच विधवा झाल्यामुळे तिच्या पुनर्विवाहाची परवानगी त्यांना मिळाली. परंतु नाना फडणीसाने पटवर्धनांना म्हटले की, एका विधवा मुलीचा पुनर्विवाह झाला तर सर्वच विधवा पुनर्विवाह करू लागतील, तशी वहिवाट पडेल म्हणून पटवर्धनांनी आपला हट्ट सोडावा. फडणीसांच्या इच्छेला पटवर्धनांना मान द्यावा लागला होता. आज स्त्रिया लोकसभेमध्ये तीस टक्के आरक्षणासाठी हरप्रयत्न करीत आहेत. राज्यकर्त्यांवर त्यांचे दडपणही येत आहे. तसेच १९२९ साली 'शारदा' कायदा झाला तेव्हा मौलवींनी त्याला विरोध केला होता. त्यांचे म्हणणे

होते की, मुस्लिम व्यक्तिगत कायद्यानुसार १२ वर्षांच्या नवऱ्या मुलाच्या आणि नऊ वर्षांच्या नवऱ्या मुलीच्या लग्नाला परवानगी आहे. शारदा कायद्यानुसार वयाची मर्यादा १८ आणि १४ अशी वाढवणे म्हणजे मुस्लिम व्यक्तिगत कायद्यात ढवळाढवळ करणे आहे. (ताहीर महमूद : *मुस्लिम पर्सनल लॉ*, १९७४ : पृष्ठ ५१-५२) तर आज कोणी नूरसबा खातून न्याय मागण्यासाठी सर्वोच्च न्यायालयात जाऊ शकते.

हा प्रवास पराकोटीचा खडतर होता. गेल्या वीस वर्षांत मात्र हा प्रवास वेगाने झाला. वेगवेगळे धर्म, जातिजमाती, भाषा, वर्ग, वर्ण, वंश, प्रदेशाच्या स्त्री-पुरुषांचा समाज एकमेकांशी भांडणं-तंडणं करीत पण एकमेकांना अधिकाधिक समजून घेण्याचा प्रयत्न करतो आहे, एकमेकांच्या जवळ येण्याचा प्रयत्न करतो आहे. प्रत्येक पीडिताला आपल्यावरच्या अन्याया-अत्याचाराविरुद्ध आवाज उठविण्याची हिंमत आली आहे. वेगवेगळ्या क्षेत्रांमध्ये मधूनच उफाळणाऱ्या धार्मिक, राजकीय, सामाजिक, आर्थिक दंडेलीमुळे लोक किंकर्तव्यमूढ होतात. वैफल्यग्रस्त होतात. पण पुन्हा त्या दंडेलीला जाब विचारण्याचे धारिष्ट्यही दाखवतात. लोकशाहीने ती संधी आपल्यातल्या प्रत्येकाला दिली आहे. ही फार समाधानाची गोष्ट वाटते मला.





# चुनावतंत्र आले, प्रजातंत्र हरवले

**एकनाथ साळवे**

बाबा बालपणी वारले. एक भाऊ, चार बहिणींचा प्रतिपाळ विधवा शेतकरी आईकडे आला. आईला शेतमजुराहून अधिक कष्ट उपसावे लागत. अल्पभूधारक शेतकऱ्याच्या व्यथा, चिंता आणि कष्टांतही सहभागी होत शिकलो. आईने दारिद्र्याचे चटके खात शिकविले. मागासलेपण-दारिद्र्य या जाळ्यात अडकले की, शिक्षण म्हणजे एक जीवघेणा संघर्ष ठरतो. स्वातंत्र्यानंतरही या परिस्थितीत बदल झाला नाही. शिक्षणासाठी खस्ता खाताना मन उदास व्हायचे. एकदा तर शाळा सोडून निघून गेलो. गुरे राखू लागलो. स्व. फडके गुरुजी धावून घरी आले नसते तर ८ वीतच विद्यार्जनाचे स्वप्न विरून गेले असते!

दारिद्र्य आणि प्रतिकूल परिस्थितीने मन निराश, उदास व्हायचे. पण त्यातूनच जे आपल्यापेक्षा गरीब आहेत, मागासलेले आहेत आणि ज्यांना शेतीचा तुकडाही नाही त्यांच्याबद्दल न कळत सहानुभूती आणि आस्था दृढमूल होत गेली. खेड्यात तिसरी कक्षा पार करून माध्यमिक शिक्षणासाठी पूर्णपणे निराधार स्थितीत चंद्रपूर या जिल्ह्याच्या ठिकाणी दाखल झालो. १९४२चे ते वादळी वर्ष! चंद्रपूर शहरात सेवादल विशेषत्वाने सक्रिय होते. त्याच्या कार्याकडे ओढला गेलो. प्रत्येक वॉर्डात २००-३०० युवक बालबालिकांच्या शाखा लागायच्या! ६ ते ७ वर्षे स्वातंत्र्यासाठी तुरुंगात गेलेले, गुप्त चळवळीत भाग घेणारे आणि इतर कार्यकर्ते त्या वेळी सेवादल शाखा चालवीत. सामाजिक न्यायासाठी, समाजवादासाठी संघटित झाले पाहिजे असे सेवादलात संस्कार घडले.

चंद्रपुरात सेवादलाचे त्या वेळी एक स्वतंत्र वाचनालय होते. बालपणीच्या भावुक मनाचा प्रथम स्व. साने गुरुजींच्या पुस्तकांनी ताबा घेतला. नंतर म. फुले, आगरकर, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची पुस्तके वाचायला मिळाली. स्वातंत्र्यकाळात इतर देशांत नवनिर्माणाचे कार्य सुरू झालेले होते.... या सर्व बौद्धिक प्रक्रियेतून एक मोघम समाजवादी, समतावादी ध्येयवाद अंतर्मनात आकार घेऊ लागला.

विद्यार्थिदशेत मॅट्रिकच्या वर्गाला पोचण्याआधीच एका पावसाळी शुभप्रभाती स्वातंत्र्यसूर्य भारतात उगवला. सेवादलात विजयी-कवायती, समूहगीते, झेंडावंदने झालीत. 'पराधीन राष्ट्रा'च्या विजयी नेत्यांना आम्ही उत्स्फूर्तपणे सलामी दिली. माझा भारत विजयी झाला, हे जगाला सांगा असे गीतातून पक्ष्यांना विनविले. आमचा तिरंगा ध्वज तेव्हापासून 'विजयी विश्व तिरंगा' झाला.

आम्ही आकाशात आनंदभरारी मारणार, तोच कुणी पंखावर कुऱ्हाड हाणली. देशाची फाळणी झाली. नौखालीत द्वेषाचे, दुहीचे वणवे पेटले. म. गांधींनी या वैराग्नीतून पदयात्र








काढली. वणवे विझले. परंतु वैराग्नी धुमसत राहिला. निर्वासितांचे लोंढे भारतात आले. भारतातून पाकिस्तानात गेले. ज्या जीवांनी मातृभूमीला तोडण्याचे स्वप्नदेखील पाहिले नव्हते त्यांना लाजिरवाण्या स्थितीत मातृभूमीचा त्याग करावा लागला. ज्यांच्यासोबत निर्धास्तपणे खेळलो, वागडलो त्यांच्या आईवडिलांच्या डोळ्यांत विषाद, चीड आणि द्वेष दिसला. शेजारचा हुसेनकाका एके संध्याकाळी छोट्या सईदाला आणि सलामला खांद्यावर घेऊन भयग्रस्त मनाने निघून गेला, तेव्हा अंतर्मनात अपराधी भावना जागी झाली. काय झाले, काय होते आहे, का होते आहे याचा पुरता बोध होण्याआधीच शहराच्या रेल्वेस्टेशनात निर्वासितांचे लोंढे धडकू लागले.

स्वातंत्र्य पुरते एक वर्षाचे होण्याआधीच देशाला आणि जगाला शांतीपाठ शिकविणाऱ्या आणि त्याप्रमाणे जगणाऱ्या म. गांधींचा खून झाला. नौखालीच्या वणव्यात त्यांच्या अंगाला आच लागली नाही, परंतु स्वधर्मीय नथुराम गोडसेने त्यांच्यावर प्रार्थनास्थळी गोळ्या झाडल्या. त्या वेळी आमच्या किशोर मनात जे कल्लोळ उठले त्याचे वर्णन शब्दापलीकडचे आहे.

स्वातंत्र्य आले. महात्मा गांधी गेले. पंडित जवाहरलाल नेहरू आले. देशाच्या विद्वान चिंतकांनी संविधानाची रचना केली. मानवी हक्कांची सनद मिळाली. पण तंत्र ब्रिटिशांचेच होते. त्या तंत्रात समाजवादाचा मंत्र ओतण्याचा प्रयत्न पंडित जवाहरलाल, जयप्रकाश, लोहिया, आचार्य जावडेकर, आचार्य नरेंद्र देव वगैरे मंडळी करू लागली. भारतीय स्वातंत्र्य सांसदीय लोकशाहीचा म्हणजे चुनावी तंत्राचा झगा घालून पुढे चालू लागले. प्रचंड जनाधार असलेला काँग्रेस पक्ष आणि त्याचे लोकप्रिय नेते जवाहरलाल! पंडित जवाहरलालजींच्या, समाजवादी वाटेने जाण्याच्या आग्रहाचे आकर्षण माझ्यासारख्या तरुणांना होते. भारतात आर्थिक, सामाजिक न्यायाची स्थापना करावयाची असेल तर काँग्रेसच्या झेंड्याखाली एकवटले पाहिजे असे वाटू लागले. पुनः सेवादलाच्या माध्यमातून मोठ्या आशेने काम करू लागलो. आवडी काँग्रेसमध्ये स्वयंसेवक म्हणून गेलो. ३००० स्वयंसेवकांनी १५ दिवस मातीच्या पाट्या उचलून एक भव्य तलाव बांधला. रचनात्मक कामातून नव्या भारताची निर्मिती होईल ही आशा मनात होती.

आवडी काँग्रेसच्या त्या अधिवेशनात लोकशाही समाजवादावर शिक्कामोर्तब झाले. तेव्हा पुनः हर्षोल्लसित होऊन नाचलो! देशाचे दैन्य दूर होईल, समतेचे पाट सर्वत्र वाहू लागतील, अशा आशा व विश्वासाच्या शिदोऱ्या बांधून आम्ही सैनिक घरी पोचलो.

समाजवादाच्या भावनेने मने पेटलेली होती. परंतु सेवादल कार्य, शिबिरे, काँग्रेसच्या सभा यांमुळे घरची चूल पेटणे शक्य नव्हते. घरचे खाऊन लष्कराच्या भाकरी भाजण्यासारखे ते होते. आई म्हातारपणाने वाकलेली! बहिणी लग्नाला आलेल्या. भावंडांचे शिक्षण राहिलेले. शहरात घर नाही की उत्पन्नाचे साधन नाही! सेवादल-वाचनालयामधून घर उभारणे शक्य नव्हते. बी.ए. झाल्यावर, ६० ते ८० रु. महावारीने मास्तरकी, कारकुनी करीत शिक्षण केले आणि 'घर' सांभाळले, नव्हे परिस्थितीच्या रेट्याने जीवन कसेबसे पुढे ढकलले जात होते. सेवादलकार्याला ओहोटी लागली होती. तरी सेवादलाचे काम सुरूच होते.

देशात चुनावतंत्र जोरात सुरू होते. पंडित जवाहरलाल निघून गेले. लालबहादूर शास्त्रीही अत्यल्प काळ प्रधानमंत्री राहून दिवंगत झाले. दिल्लीला श्रीमती इंदिरा गांधींचे साम्राज्य सुरू झाले. तरी महाराष्ट्रात यशवंतरावजींच्या शब्दाला मान होता. १९६७ मध्ये चव्हाणसाहेब चंद्रपुरात आले. कुणा हितचिंतकाने सांगितले म्हणून म्हणा, किंवा माझ्या 'कुणबी' जातीची संख्या जिल्ह्यात सर्वाधिक होती म्हणून म्हणा, १९६७ सालचे विधानसभेच्या निवडणुकीचे तिकीट मिळाले. चंद्रपूर शहर मतदारसंघ. विरोधात मातब्बर धनाढ्य उमेदवार. घरी अठराविश्वे दारिद्र्य. तिकीट मिळाले खरे; पण निवडणूक लढवायची कशी? सेवादल कार्यकर्त्यांनी वर्गणी काढली. २०००रु. ची एक गाडी घेतली. सेकंड हँड गाडी, चालायची कमी, बंद पडायची अधिक! सेवादलाचे शब्बीरभाई ड्रायव्हर! देवराव दुधलकर सेवादल अधिनायक, दादा पट्टेवाले शहरप्रमुख आणि इतर ५-६ कार्यकर्ते सोबत. गाडी थांबताच ड्रायव्हरसाहेब आदेश द्यायचे, 'उतरो, गाडी ढकेलो. गाडीमें कुछ बिघाड नहीं है.' आणि आम्ही भर रस्त्यात गाडी ढकलायचो. निवडणूक मोहीम एक लाजिरवाणे प्रदर्शन ठरले! परंतु पुढे पक्षाने एक जीप आणि काही रक्कम पाठविली. मोहीम यशस्वी झाली. प्रचंड मताधिक्याने निवडून आलो.

विधानसभेत सक्रिय राहिलो. मतदारसंघातही कामे करू लागलो. आदिवासी भागांकडे, झोपडपट्ट्यांकडे अधिक लक्ष देऊ लागलो, तर शहरातले बडे लोक नाराज! १९७२ ची काँग्रेस उमेदवारी मिळणे कठीण होते. परंतु महाराष्ट्र काँग्रेसमध्ये






त्या वेळी सक्रिय असलेले मोहनभाई धारिया, शरद पवार, नरेंद्र तिडके, बॅरि. शेषराव वानखेडे इ. मित्रांचे प्रेम व विश्वास संपादन करू शकलो होतो. उमेदवारी मिळाली आणि १९७२ सालीदेखील मी चांगल्या मताधिक्याने निवडून आलो. पार्लमेंटरी असोसिएशनच्या महाराष्ट्र विधानसभा शाखेतर्फे मला एक महिन्यासाठी लंडनला जाता आले. तेथे 'हाऊस ऑफ कॉमन्स'चे कामकाज पाहता आले. अभ्यास करता आला. औपचारिकतः तेथले तंत्र वापरून भारतात कामकाज चालते, परंतु गुणात्मक तफावत मोठी आहे.

पंडितजींचे निधन झाल्यानंतर समाजवादाच्या घोषणा वाऱ्यावर विरू लागल्या. म्हणून त्या वेळी शरद पवार, मोहन धारिया वगैरे नेत्यांच्या पुढाकाराने काँग्रेसमध्ये काँग्रेस फोरम फॉर सोशलिस्ट ॲक्शनची स्थापना झाली. माजी पंतप्रधान चंद्रशेखर, गणेशन, चंद्रजित यादव वगैरे मंडळी दिल्लीत सक्रिय होती. महाराष्ट्रात फोरम सक्रिय करावा या बुद्धीने पुण्याला मोठा मेळावा घेतला. मला महाराष्ट्र राज्यस्तरावर अध्यक्ष बनविण्यात आले. परंतु श्रीमती इंदिरा गांधींना काँग्रेसअंतर्गत विसंवाद आवडला नसावा. फोरमचे बरेच नेते श्रीमती इंदिरा गांधी यांच्या मंत्रिमंडळात गेले. श्रीमती इंदिरा गांधी यांचा कल आणि सूचना लक्षात घेऊन दिल्लीस्थित वरिष्ठ नेत्यांनी फोरमचे काम गुंडाळले. श्रीमती इंदिरा गांधीच समाजवाद आणतील असा भास निर्माण करण्यात आला. आणि समाजवादी कृतीसाठी नैतिक दबाव आणू पाहणारी काँग्रेसअंतर्गत आघाडी विलय पावली. पुढे काँग्रेसअंतर्गत बेबनाव वाढत गेला. आम्ही समाजवादी काँग्रेसमध्ये गेलो. विदर्भात श्रीमती इंदिरा गांधी झंझावातासारख्या आल्या. विजयी झाल्या. आम्ही सत्तेच्या राजकारणातून कायमचे मागे पडलो. ते बरेच झाले. कारण संसार मोडकळीस येऊ पाहत होता. मोठ्या प्रयासाने एम.बी.बी.एस. डॉक्टर झालेल्या विवाहित कन्येच्या मृत्यूने घर हादरले. मुलगा कॉलेजात होता. इतर मुली शिकत होत्या. वकिलीचा व्यवसाय सुरू करण्याविना गत्यंतर नव्हते.

वकिलीच्या व्यवसायात एक फायदा झाला. वास्तवाची जाणीव आणि सत्य परिस्थितीचा शोध घेण्यास वाव मिळाला. एक-दोन शिक्षणसंस्था काढलेल्या होत्या. त्यांच्याकडे लक्ष देण्यास वेळ मिळाला. सामाजिक विषमतेचा प्रश्न किती तीव्र व जटिल आहे याची जाणीव झाली. धर्माने माणसांना निरर्थक अवडंबराच्या जाळ्यात कसे अडकविले हे कळू लागले. ज्या देशात अस्पृश्यता खुलेआम विद्यमान आहे तेथे लोकशाही आहे असे कसे म्हणता येईल असे प्रश्न मनात उठू लागले.

११ वर्षे आमदार राहिल्यावर मला काळा कोट चढवून कोर्टात जाताना पाहून कित्येक नेत्यांनी माझी कीव केली. ते विचारू लागले, '११ वर्षे आमदार राहून तुम्हाला एखादी गाडी घेता आली नाही, घर बांधता आले नाही. आणि आता काळा कोट घालून कोर्टात काम करताना लाज कशी वाटत नाही?' मी उत्तरलो, 'तर मी काय करावे? चोऱ्या, भ्रष्टाचार की दलाली करून जगावे?' त्यावर नेते छद्मी पणाने हसले. मार्गी लागले.

१९८१-८२ पासूनच चंद्रपूर – गडचिरोली जिल्ह्यांत नक्षलवादी चळवळीचा प्रादुर्भाव होऊ लागला. १९८५ ला दहशतवादाचा मुकाबला करण्यासाठी देशाच्या काही भागात दहशतवादविरोधी 'टाडा' कायदा लागू करण्यात आला. चंद्रपूर, भंडारा, गडचिरोली, यवतमाळ या जिल्ह्यांतही तो लागू करण्यात आला. नक्षलवादी तरुणांना पिण्याचे पाणी देणे, ते आले तर त्यांच्याशी बोलणे, त्यांना भीतीपोटी अन्न पुरविणे या बाबीदेखील 'दहशतवादी' कारवाया ठरू लागल्या! त्यांना 'टाडा' कायद्याखाली पोलिसांनी मुसक्या बांधून आणावे! आम्ही सोडवावे किंवा त्यांच्यासाठी कोर्टात भांडावे!! असे कित्येक वर्षे सुरू राहिले. १९८३ साली आदिवासी शेतकरी-शेतमजूर अधिवेशन कमलापूर (ता. अहेरी) येथे घेण्याचे ठरले. रीतसर परवानगी मागून अधिवेशन होणार होते. आदिवासींनी मला या अधिवेशनाचा स्वागताध्यक्ष केले. याचा संबंध पोलिसांनी नक्षलवादी चळवळीशी जोडला. शेकडो आदिवासी कार्यकर्त्यांना पोलिस ठाण्यात कोंबले. आम्हाला कोर्टातूनच दोनदा अटक केली. अधिवेशन मंडप मोडला! धान्य, पुस्तके व इतर सामानाची अंदाधुंद नासधूस केली गेली! पोलिसांची गैरमर्जी झाली की, संविधानातले 'भाषण-स्वातंत्र्य', 'सभा-स्वातंत्र्य' यांविषयीच्या कलमांची कशी ऐसीतैसी होते याचा अनुभव आला: दोनतीनदा कुठलाही अपराध नसताना पोलिस कोठडी आणि तुरुंगाची हवा खाता आली. 'टाडा'च्या केसेस चालविताना भयावह अनुभव आले. ४-४, ५-५ वर्षे बिना ट्रायल तुरुंगात खितपत पडलेल्या आदिवासींचे संसार उद्ध्वस्त होताना पाहून मन विषण्ण झाले!

शिक्षक व विद्यार्थ्यांनी मनावर घेतले तर फलोद्यान व वनीकरणाचे फार मोठे काम करता येते. माझ्या शिक्षणसंस्थांतून श्री. मोहनभाई धारिया यांच्या प्रेरणेने आम्ही हे काम राजुरा येथे सुरू केले. १० एकर जागेत कॉलेज-शाळेच्या भोवती हिरवेगार रान, फळझाडे आणि वनीकरण उभे झाले. परिसर सुंदर झाला. शिक्षण आणि सृजनात्मक काम यांची फारकत होत आहे. शिक्षक व तरुणांना श्रमाचे काम करणे अपमानकारक वाटते. इंग्रजी व गणित विषयांत शेकडा ९० मागासवर्गीय मुलामुलींना नापास व्हावे लागते. त्याकडे कुणाचे लक्ष नाही. शिक्षणखाते व शाळा पगारवाटप केंद्रे ठरलेली असून तेथे नवा भारत निर्मिण्याचे प्रयत्न होत नाहीत, हा अनुभव आलेला आहे. शिक्षणव्यवस्थेत आमूलाग्र बदल झाला नाही तर बेकारी, लाचारी आणि हिंसक प्रवृत्तींची वाढ होऊन देश रसातळाला जाईल असे वाटू लागले आहे.

आपल्या सर्व अनर्थाचे कारण अविद्या आहे. आपल्या धर्मात अनावश्यक धार्मिक अवडंबर आहे. अस्पृश्यतेचे मूळ हिंदू धर्मात आहे हे लक्षात आल्यावर मी बुद्ध धम्माचा स्वीकार केला. बुद्ध धम्म का स्वीकारला हे विशद करण्यासाठी एक पुस्तक लिहिले. त्यामुळे मी व माझे कुटुंब सध्या 'बहिष्कारा'ला तोंड देतो आहो. कधी काही लिहितो. ठोकशाहीचा विरोध करतो. मानवी अधिकाराचा मुद्दा घेऊन गोवारी हत्याकांडावर लिहिले. एडका आत्राम, एक निरपराध मध्यमवयीन आदिवासी. त्याला भामरागड पोलिस कोठडीत पोलिसांनी मरेस्तो मारले. हे आणि असे अनेक सामाजिक प्रश्न घेऊन एकाकी संघर्ष फलद्रूप होत नाहीत. बरेचदा हे अंगलट येतात, परंतु रिकामे बसवतही नाही...!

पन्नास वर्षांत सुख-साधने वाढलीत. परंतु गरिबी आणि बेकारीही वाढली. स्वदेशीचे, स्वावलंबनाचे विचार वाऱ्यावर विरले. समाजवादाचाही विचार मागे पडला. खासगीकरण, स्पर्धा, बाजारपेठा यांमध्ये उतरू न शकणाऱ्या लाखो शेतकरी, शेतमजूर व गरिबांनी काय करावयाचे? जमिनी, जंगल, जल यांपासून प्रजा वंचित होत आहे. चुनावतंत्र जोरात सुरू असले तरी, प्रजातंत्र कुठेतरी हरवले. सामान्य माणूस अधिक अगतिक व निराश होत आहे. स्वातंत्र्याच्या ५० वर्षांचा हा व्यक्तिगत लेखाजोखा आहे. ते अनुभवकथन आहे.





# माझी वाटचाल

**वीणा सुराणा**

माझा जन्म १९३३ चा. स्वातंत्र्य मिळाले तेव्हा १४ वे वर्ष चालू झाले होते. सेवादलाच्या बौद्धिकांमधून स्वातंत्र्य चळवळीची ओळख झाली. संपर्क फार थोडा येई. वडिलांची नोकरी शासकीय डिस्टिलरीत नाशिकरोडला; तीही संपण्याचा – पेन्शनचा – काळ जवळ आलेला होता. राष्ट्रसेवादल शाखा चालविणे यापलीकडे प्रत्यक्ष स्वातंत्र्य चळवळीशी काही संधान नव्हते. एक चुलते स्वातंत्र्य चळवळीत कारावास भोगून आले होते. माझी थोरली आत्या बालविधवा पण सकेशा. वडील विचारी, उदार. १९३०-३२ च्या काळातही त्यांनी बालविधवा आत्याला मद्रासच्या संस्थेत शिकवून शारीरिक शिक्षणात अधीक्षक बनविले होते. या पार्श्वभूमीवर घरात स्त्री-पुरुष समता मुरलेली होती. त्यात राष्ट्रसेवादलाच्या लोकशाही समाजवादी विचारांचे बीजारोपण ओघानेच झाले. विषमतेला धक्का देण्यासाठी आपण खेड्यात राहायचे; खेड्यातल्या स्त्रियांची महत्त्वाची गरज म्हणजे स्त्री-डॉक्टर जवळपास मिळणे, म्हणून आपण आयुर्वेदाची पदवी मिळवायची; आयुर्वेद देशी वनस्पती-औषधी वापरतो, ही आकर्षणाची ओढ समजत्या वयापासून होती. म्हणून १९४५ मध्ये नाशिकरोडवरून बार्शीला येणे मला आवडले. बार्शीचे शेणमातीचे घर सारवायला मजा वाटायची. वैद्यकीय पदविका पुण्याच्या आयुर्वेद महाविद्यालयातून घेतली. कॉलेजच्या स्नेह-संमेलनाच्या नाटकात मी क्लार्कची – पुरुषाची – भूमिका वठवली अन् नायक-नायिकेला सारून प्रथम क्रमांकाचे पारितोषिक पटकावले. त्याच्या स्मरणानेही आनंद मोहोरून येतो.

विवाहानंतर नवऱ्याचे – पुरुषी – दबाव मान्य करावे लागतात, अन्यथा घरातले वातावरण कलुषित होते, हा सभोवती दिसणारा अनुभव लग्न न करण्याचा निश्चय वाढवीत होता. प्रत्यक्षात मात्र सामाजिक-आर्थिक समतेचा खंदा सेवादल कार्यकर्ताच जीवनसाथी मिळाल्याने लग्न करून विहारमध्ये जयप्रकाशजींच्या आश्रमात प्रस्थान ठेवले. आमच्या लग्नसमारंभाची एक मजाच होती. त्याची ना खरेदी ना पत्रिका. नोंदणी करून बापूकाकांच्या (चुलते) मार्गदर्शनाखाली परस्परांना हार घालताना, मैत्रिणीची (विमलताई गरूडची!) जुनी खादी सिल्कची साडी परिधान करून हसतखेळत विवाहवेदी सजली. विमलताईला तरी ते आठवते की नाही कोण जाणे!

एकटीने वैद्यकीय व्यवसाय करण्याची हौस आपोआप भागली. कितीतरी वेळा धाकधूक होई की, आपली प्रॅक्टिस चालेल की नाही? पुरेशी कमाई होईल ना? पन्नालालजींच्या मधूनमधूनच्या लेखनधनाच्या आधाराने भागले खरे सगळे. पण त्या वेळी जाळणारी चिंता आजही मी विसरू शकलेली नाही.

तत्त्वचिंतनापेक्षा प्रत्यक्ष आचरणानेच समाजसुधारणा होऊ शकतात, आणि एकट्यादुकट्या उदाहरणातूनसुद्धा ते साधू शकते, म्हणून स्वतःचे वर्तन आपल्या विचारांचे द्योतक ठरलेच पाहिजे हा निश्चय मी कधी नजरेआड केला नाही. उदार, समतावादी लोकशाही समाजव्यवस्थेचा ध्यास घेतल्याशिवाय स्त्रीवर्गाचे परावलंबनाचे आणि दलितांचे अपमानाचे नष्टचर्य संपणार नाही ही काळ्या दगडावरची रेघ. वेळ आलीच तर आर्थिक गरिबी परवडली पण लोकशाही समाजवादी विचारसरणी सोडू नये असे सतत मनात येत होते. महिला मंडळांना हा विषय अद्यापिही वर्ज्य म्हणून मी तिकडे जातच नसे.

माझ्या नणंदा दोन. दोघी मोठ्या. तीनही दीर-जावा मात्र लहान. पुरंदरे-कन्या सुराणा कुटुंबात? काय नि कसे होणार, अशी अनेकांना चिंता आणि प्रश्न. जिथे समजते-उमजते किशोर वय उमलले तिथेच दोन चौकांपलीकडे सासरी ही वेल उभी राहणार? मला कधी अडचण वाटली नाही. प्रेम, समजूतदारपणा हा तर नातेसंबंधांचा खरा आधार. मी सुशिक्षित. मग मी तर अधिक समजुतीने वागायला हवे. सख्ख्या-चुलत सासू-नणंद-दीरांना त्यांचे जुने संस्कार-संवयी असणारच. मी समजून घेतले तर नक्कीच वातावरण आनंदी राहील. माझ्या चारही सासवा अन् आजेसासू यांनी माझ्यावर मनापासून प्रेम केले. मी त्यांना मारवाडी पद्धतीने 'पगा लागून' नमस्काराची रीत पाळली. सगळ्या मारवाडी बायका खूष होत. मी डॉक्टर. प्रसूतीगृह चालविणार. त्यामुळे सर्व जातिजमातींच्या स्त्रियांचा मी विश्वास मिळवू शकले. पूर्ण सचोटी अन् जबाबदारीपूर्ण गांभीर्याचे वातावरण ही तर माझ्या दवाखान्याची खूण. वार्शीत शनीच्या बोळात माझे माहेर – वडिलांचे जुने घर - होते. तिथेच माझी मामे-चुलती राहते. ती निरक्षर. पूर्ण कट्टर धार्मिक वळणाची. फार सासुरवास सोसला तिने. पण ती माझे आनंदाने आगत-स्वागत करते, आजही. 'वीणाचं वागणं खरंय. मानसामानसात कुठं फरकच नाही. आपण धट् असलोत की सगळं जग सूतासारखं राहत.' आजही, कधी गेले घरी, तर पोटभर जेवूनच बाहेर पडते.

मी विनधास्त खांद्यावर पदर ठेवून ताठ मानेने चालणार. नाही मंगळसूत्र, नाही बांगडी, नाही पायात मासोळ्या-पैंजण. फक्त लालचुटुक कुंकवाची टिकली. ना काळी ना जांभळी. नखरेलपणा करणे म्हणजे तर आपणच आपल्या समजूतदार स्त्रीत्वाचा अपमान करणे असे माझे मत. असेल सौंदर्य तर खुलेल, नाही तर नाही. शिक्षण-पदवी हेच आपले खरे सौंदर्य नाही का? या आश्वस्त-पक्क्या विचाराने मी वागत-फिरत असे. काळ्या मध्यरात्रीही अडलेल्या बाईच्या बाळंतपणासाठी खेडोपाडी 'व्हिजिट' करत असे. सरळ-साधे पण पक्क्या विचाराने वागणे; त्यामुळे मारवाडी-ब्राह्मण, शिक्षित-अडाणी, गावठी-शहरी सगळ्यांना माझा विश्वास होता. त्यामुळे मला जाती-पातींची कुठलीही बंधने नव्हती – सगळी माफ! फसलेल्या मुलीबाळींना सन्मार्गाला लावण्याची मला पूर्ण मुभा होती. एवढेच नाही तर मी त्या बाबतीत सर्व स्त्रियांना निर्धास्त आधार होते. माझ्या दवाखान्यात पैशाच्या देवाण-घेवाणीचे व्यवहारही सर्व रुग्ण-बायकाच मोठ्या अभिमानाने करीत. पुरुषांनी आले नाही तरी चालते – कारण सुराणाताईंकडे खोटा गडबडीचा व्यवहारच नाही याची त्यांना पूर्ण खात्री असे.

राजकारण ही समाजात शासनसंस्था निर्माण करू शकणारी सत्शक्ती आहे. तो फार जबाबदारीचा, प्रतिष्ठित, विचारपरिप्लुत असा व्यवसाय आहे. कुणी चारदोन लबाड माणसे स्वार्थाने राजकारण बदनाम करतात, बिघडवितात असे माझे पक्के मत. म्हणून मी आमच्या समाजवादी व जनता पक्षाच्या चौकातल्या जाहीर प्रचारसभाही मनमोकळ्या, प्रामाणिक त्वेषाने पार पाडीत असे. वेळेला दिखाऊ चारित्र्याच्या राजकीय ढोंगांचा,










गुंडगिरीचा पर्दाफाश करीत असे. पण कुणाची आमच्याविरुद्ध 'ब्र' काढायची हिंमत नव्हती. राजकीय सत्ताधारी गुंडांपुढे घावरणे, लाचार होणे ही तर जिल्ह्याची 'आदब' म्हटली जात असे. पण आमच्या नजरेसमोर सगळी नम्र – सुतासारखी सरळ – असत. कितीतरी हमाल-मजूरसंघटना, संप, मोर्चे, सत्याग्रह, मिरवणुका आम्ही काढीत होतो. सरकारी शासन अन जनताही आमचे कार्यक्रम आदराने पण दुरून न्याहाळत असे. गुंडगिरीची प्रवृत्ती तर केव्हाच समूळ नष्ट झाली; पळून गेली. गुंडांचे 'दादा' हात चोळीत, नांग्या टाकून गार झाले.

सर्वसामान्यतः बहुतांश स्त्रिया घरगृहस्थीत – स्वयंपाकघर, माजघर अन् देवघर एवढ्यातच – जगत असतात; संपून जातात. या क्षेत्रात तिला घरातूनही कुणी स्पर्धक नसतात. म्हणजे तिथे तीच पहिली अन् तीच अखेरची. अशा एकाकी कार्यक्षेत्रात तिनेच सगळ्यांची मने राखायची असतात. स्वतःचा – स्वतःच्या स्वभाव वा छंदांचा – शक्यतो विचारही करायचा नाही अशीच रीत तिला दाखवून दिलेली आहे. स्वावलंवन म्हणजे हट्ट-उद्धटपणा, म्हणून तो त्याज्य असतो. स्वतःला विसरणे तिचा सद्‌गुण म्हणतात. सतत दुसऱ्यांचाच प्रथम विचार करण्याने तिचे स्वाश्रयित्व धूसर धूसर होत जाते; हळूहळू ती पूर्णतः परावलंबी होऊन जाते. मग कौटुंबिक कामे करताना सतत दुसऱ्यांना विचारण्याची सवय जडते. कुटुंबव्यवस्थापन करीत करीत आपण कुटुंबातले सर्व घटक घडवीत असतो, त्यांची व्यक्तिमत्त्वे निर्माण करीत असतो; मग आपलेही वैशिष्ट्य आपण का जपू नये, हा विचार बाजूला ढकलला जातो. कुटुंबनिर्मिती व व्यवस्थापन या कर्तव्यक्षेत्रातून वैचारिक भरारी घेत घेत स्वतःची वेगळी महत्त्वाकांक्षा साकारू शकते. त्यातून, त्यामार्फत विश्वदर्शन घेणे शक्य असते. या प्रकारचा स्वयंसिद्धतेचा विचार बायकांनी करावा, यादृष्टीने संपर्क वाढवावा म्हणून गृहिणींची सहकारी संस्था सुरू केली.

घरातल्या छोट्या-मोठ्या गरजा घरगुती जबाबदारीने उचलणारी महिला सहकारी संस्था स्थापन केली तर त्या-मार्फत व्यावसायिक गृहिणींच्या गरजा व घरातच राहणाऱ्या गृहिणींची कुशलता यांचा मिलाफ घडविता येईल, हा विचार. दळलेल्या तिखट-हळदपुडीपासून ते मसाले-शेवया-सांडग्या-पर्यंतच्या खाद्यवस्तू, तद्वत झबली-टोपडी ते पोलकी-पेटिकोट-पर्यंतचे तयार कपडे यांचे उत्पादन करवून मजुरी पुरविणारी आणि नोकरदार गरजूंना घरगुती स्वच्छ खाद्यपदार्थ देणारी महिला सहकारी संस्था १९६९ मध्ये रीतसर नोंदविली. 'सावित्री फुलेबाई औद्योगिक उत्पादक महिला सहकारी संस्था' असे नामकरण बुद्धिपुरस्सर केले – की सावित्रीबाईंच्या तेजाचे स्मरण-दर्शन व्हावे. सव्वाशे गृहिणींचे भागभांडवल गोळा केले. त्यांच्यात दीड-दोन वर्षे हिंडत होते. कोणी सहजतेने तर कोणी संशयास्पद मनाने, घाबरत, पण प्रत्येकी २५/- रुपये दिले. नवऱ्यांच्या कानावर घालून नंतर पैसे देण्याचा सूर होता. दहा टक्के बायका पतिराजाच्या परवानगीची अट घालीत; कारण, आपण कमावीत नाही मग हक्काने खर्चायचे कसे, अशा शंकेत पडत. चोवीस तास घरकाम करणे म्हणजे फार महत्त्वाचे शैक्षणिक मूल्य असलेले काम आहे, हा विचार मला त्यांच्याशी गप्पाचर्चा करून त्यांच्या पचनी पाडावा लागे. घरकामांचे, कुटुंब-व्यवस्थापनाचे बुद्धीशी काही नाते आहे; चारित्र्य, सामाजिकता, जबाबदारपणा हे संस्कार मला माझ्या मुलामुली व घरच्या माणसांवर करायचे आहेत, त्यांचेही सुंदर शास्त्र आहे; स्वतःला या क्षेत्राचा अभ्यास करायचा आहे, ही कल्पना रुजवावी लागे. समजूतदारपणाने, जबाबदारीने कोणी पुढे आले नाही. वस्तूंना नाक मुरडायचीच घाई. कोणी महाग म्हणून तक्रार करीत तर कोणी अस्वच्छतेची शंका घेत. पण कोणी स्वतः वस्तू करवून घेण्याचा उत्साह दाखवीत नसत - फक्त दुरून कौतुक. संस्थेचा माल स्वतः वापरीत नसत.

खरेदी-विक्रीचे दरमहाचे हिशोब ठेवणे हे वेळ घेणारे काम होते. स्वतःला अडाणी म्हणत म्हणत तयार शेवया-मसाला आदी वस्तू परस्पर वापरण्याची शक्कल विक्रेत्या भगिनी सहजतेने दाखवीत. संस्थेचा फायदा वाढावा म्हणून शासकीय रास्तभाव धान्य-दुकान मी चालू करविले. सेक्रेटरीला ते चालविण्याचे काम दिले. गंमत ही की, दुकान संस्थेच्या नावावर म्हणून सर्व निर्णय, जबाबदारी संस्थेच्या नावे; पण हिशोब, शिल्लक धान्य यांचा स्टॉक ठेवणे, तसेच विक्रीच्या रकमा बँकेत भरणे ही कामे दुकान चालविणाऱ्या सेक्रेटरी व्यक्तीच्या हाती. त्यासाठी सेक्रेटरीवर सतत लक्ष ठेवावे लागे. फार मनस्ताप होई. दरमहाची हिशोब-पत्रके काढता काढता मी त्यात हुशार झाले, पण सेक्रेटरीशी फार झुंजावे लागले. आमचा सेक्रेटरी इतरांच्या मानाने प्रामाणिक होता म्हणून सावरले गेले. तरी २७-२८ हजारांची वसुली त्याच्या वेतनातून करून घ्यावी लागली, हे वेगळे! जमा-नावे बाजूंच्या बेरजेतला

एका नव्या पैशाचाही फरक मी शोधीत असे. ते एक वेगळेच दालन मला दिसले. आज चोवीस वर्षांनी संस्था बंद करताना, पूर्वीची डिव्हिडंडची रक्कम सोडून, भागधारकांना भागाच्या दुप्पट किंमत मी देऊ शकले हे समाधानाचे.

स्त्रिया व मुली यांच्यावर माझे खरे प्रेम. त्यांच्या जीवनाशी माझी खरी बांधिलकी. स्त्री-मनाचे परावलंबन संपावे, तिने स्वाश्रयी व्हावे असे मला सातत्याने, तीव्रतेने वाटते. मग तिचे कार्यक्षेत्र कोणते हा प्रश्न गौण आहे. जीवनातल्या कुठल्याही क्षेत्रात आता तिने प्रवेश केला आहेच. तिथे तिचे कर्तृत्व दिसणार याची मला खात्री वाटते. विविध क्षेत्रांत संधी साधताना स्त्री उच्चांकाप्रमाणे नीचांकही गाठते हे आपण पाहत आहोतच.

तरीही सर्व मुलींना शिक्षण मिळणे व त्यासाठी नव्या सोयी करून मिळणे अत्यावश्यक आहे. शिकून लगेच नोकरी केली नाही तरी आत्मविश्वास वाढतो. शिक्षणाशिवाय स्त्री आहोत या जाणिवेमधून उत्पन्न होणारा न्यूनगंड नष्ट होणार नाही. शिक्षण म्हणजे ज्या त्या माणसाची जग पाहण्याची खिडकीच नाही का? ज्ञानाच्या शाखा-उपशाखांची संख्या सतत वाढतच आहे अशी हल्ली ज्ञानाची श्रीमंती आहे. अशा स्थितीत अडाणी राहतील त्या स्त्रिया-मुली पशुसमान. असे दुबळे जिणे काय कामाचे? शिक्षण घेऊ इच्छिणाऱ्या व शकणाऱ्या मुलीबाळींना सुरक्षित, योग्य भाड्याचे व किमान सोयींनी युक्त असे निवासस्थान मिळाले तर त्यांचे शिक्षण पूर्ण होते.

या विचारामधून बार्शी शहरात तालुक्यातील मुलींसाठी वसतिगृह बांधण्याचा प्रकल्प हाती घेतला. उद्याच्या स्त्रीसाठी आजच्या सुशिक्षित नोकरदार भगिनींनी आपल्या कमाईतला दहावा हिस्सा द्यावा असे आवाहन आम्ही केले. संपूर्ण महाराष्ट्रातल्या अनेक मित्र-मैत्रिणींनी यात आपले अर्घ्य मिसळलेले आहे. शासनाने दीड लाख दिलेत तर वंदनीय उत्तरेश्वर दादासाहेब कथले यांनी साडेतीन गुंठे जमिनीच्या रूपाने दीड लाख दिलेत. आम्हा भावंडांचे मिळून लाखभर झालेत. आईच्या पैशातून घेतलेल्या अडीच गुंठे प्लॉटचे पंचेचाळीस हजार यातच आलेत. या सगळ्यामधून 'सौ. सर्वमंगला उत्तरेश्वर कथले कन्या छात्रालय' उभे झाले आहे. पंचाहत्तर मुलींची सोय झाली आहे. आई व सासूबाई यांचे स्मारक 'उमा-जडाव सभागृह' तयार झाले आहे. तिथे यथावकाश वाचनालय साकार व्हावे अशी इच्छा आहे.

अलीकडे आम्ही मागास परांडा तालुक्यातील जगताप वस्ती या खेडेगावी शेती केंद्राचे काम उभारण्यासाठी वस्ती केली आहे. आयुर्वेदातील वनौषधी मौल्यवान आहेत. त्यांच्या अभ्यासार्थ रुई-दुधी या गावाच्या रानात वनौषधी-वनस्पतींचा वृक्षपट्टा तयार करीत आहोत.

अर्थात पन्नालालजींचा 'विचारशेती'चा (शब्दार्थानेही) हा प्रकल्प. सर्वार्थाने आम्ही दोघे पतिपत्नी आहोतच पण आमचे मित्रत्वाचे नाते अधिक जुने व सघन आहे हे पृथ्विमोलाचे आहे.

आज व पुढे शंभर वर्षेसुद्धा शेती व ग्रामीण उद्योग हे प्रश्न आपला कस व परीक्षा घेणारे प्रश्न राहणार आहेत. खेडेगावात राहण्याने सोसाव्या लागणाऱ्या अडचणीच आपल्याला देशसुधारणेची दिशा देतील – निकड दाखवितील – नाही का?

❖❖



# उत्तरार्ध

**वसंत आबाजी डहाके**

देश स्वतंत्र झाला तेव्हा माझं वय पाच वर्षं होतं. स्वातंत्र्य म्हणजे काय हे त्या वेळी समजलं नव्हतं. पुढं शाळामहाविद्यालयांत वरीच वर्षं घालवल्यानंतर वाच्यार्थ समजला. स्वतंत्र होण्याच्या घटनेशी आणखी दोन महत्त्वाच्या घटना निगडित आहेत हे उमजलं. एक म्हणजे फाळणी आणि फाळणीमुळे झालेला हिंसाचार आणि दुसरी घटना म्हणजे महात्मा गांधी यांची हत्या. या दोन घटनांच्या मानसिक आघातांतून हा देश पुरता बाहेर पडलेला आहे असं वाटत नाही. हजारो लोकांच्या






त्यागानं, बलिदानानं हा देश स्वतंत्र झालेला आहे; स्वातंत्र्यासाठी फार मोठी किंमत द्यावी लागली. त्यामुळे हे स्वातंत्र्य अत्यंत मोलाचं आहे, हा एक संस्कार मनावर होत राहिला. शिक्षण पूर्ण होईतो आसपासच्या स्थितीचं भान हळूहळू येऊ लागलं होतं. न पाहिलेला भूतकाळ आणि आता नजरेसमोर असलेला वर्तमानकाळ यांत काहीतरी विसंगती आहे असंही जाणवत होतं.

पं. जवाहरलाल नेहरू यांचं निधन झालं तेव्हा नुकतंच शिक्षण पूर्ण करून मी नोकरीच्या शोधात हिंडत होतो. या काळातच लिहिणं ही एक गंभीर गोष्ट आहे असं मी समजू लागलो होतो. गेली तीसेक वर्षं मी महाविद्यालयांतून शिकवण्याचं काम केलं आणि विविध प्रकारचं लिहिणं केलं. महाविद्यालयांच्या वर्गांतल्या विद्यार्थ्यांसमोर जे काय मी बोललो असेन त्याची नोंद नाही. जे काही लिहिलं ते मुद्रित रूपात शिल्लक आहे. गेल्या तीसेक वर्षांत वेळोवेळी मला कायकाय वाटत होतं हे खरं तर त्यात आलेलं आहेच. सगळ्यांचं तात्पर्य काढायचं तर मी काही विशेष आनंदी नव्हतो असं दिसतं. विशेषतः 'राज्ययंत्रा'चं बदलतं स्वरूप पाहून मी अस्वस्थ असे. व्यक्तीचं आणि समूहाचं वागणं पाहून त्रस्त होत असे. वर्तमानकाळातील सामाजिक-राजकीय-आर्थिक स्थितीविषयीचं असमाधान ही एक गोष्ट आहेच; परंतु त्याहूनही अधिक व्यग्र करून टाकणारी गोष्ट म्हणजे माणसाचं विचार करणं/न करणं आणि वागणं/न वागणं. सगळ्या व्यक्ती आणि व्यक्तींचे सगळे समूह अंतर्विरोधांनी ग्रस्त आहेत असं वाटत होतं.

बीज रुजणं, रोप येणं, वाढणं, बहरणं हे जर झाडाचं स्वातंत्र्य असेल तर ते किडणं, खुडून टाकणं, उपटणं हे स्वातंत्र्य नाही. दुसऱ्या गोष्टी समजून घेत, टक्कर देत वाढत राहणं हाच स्वातंत्र्याचा अर्थ असू शकेल. हा एक सामान्य दृष्टान्त आहे. व्यक्तीचं, समूहांचं वागणं-विचारणं वरंच गुंतागुंतीचं असतं. प्रत्येक घटिताच्या मागे कोणत्या वृत्तिप्रवृत्ती असू शकतील याचा उलगडा करता येईलच असंही नाही. परंतु कोणत्याही स्वतंत्र देशातील प्रत्येक व्यक्तीच्या प्राथमिक गरजा पूर्ण व्हाव्यात आणि तिच्यातल्या शारीरिक व बौद्धिक ऊर्जेचा सदुपयोग व्हावा एवढं किमान म्हणता येईल असं वातावरण निर्माण करणं हे त्या देशातील कर्त्या मंडळींचं कर्तव्य असतं. या दृष्टीनं विचार करीत असताना मला असमाधान वाटत राहिलं.

आता ५० वर्षं झालेली असताना मागच्या काळाकडे आणि त्या काळात मी जे काही लिहिलं त्याकडे एकाच वेळी पाहिलं, तर मी किती असमाधानी होतो आणि तसा का होतो हे माझंच मला समजून आलं. १९६५ ते ७०, ७१ ते ७५, ७५ ते ८०, ८१ ते ८५ या काळांतल्या खुणा माझ्या लिहिण्यात उमटलेल्या दिसतात.

हा देश एखाद्या दूरस्थ शहरासारखा, भव्य कीटकगृहासारखा असून त्यात आपण कोंडले गेलेलो आहोत, इथं कॅपिटॅलिस्ट ज्यूकबॉक्समधून भोंगळ न्यायतत्त्वांच्या ध्वनिमुद्रिका वाजताहेत असं मला कधीतरी वाटलेलं होतं. इथली समकालीन पिढी सामान्य सामाजिक व आर्थिक हक्कांपासून वंचित आहे, युद्ध, भूक, बेकारी या गोष्टी अटळपणे या पिढीच्या वाट्याला आलेल्या आहेत आणि हे वास्तव निमूटपणे स्वीकारण्याशिवाय गत्यंतर नाही ही भावना होती. समकालीन शिक्षित मस्तकांच्या चिंधड्या उडताहेत असंही वाटत होतं. असंख्य सांगाड्यांचे उंच उभारलेले हडकुळे हात, साखळदंडांनी जखडलेले हडकुळे पाय आणि कुणाच्या तरी जयजयकाराचा सैतानी जल्लोष असं लोकशाहीचं चित्र माझ्या मनात उमटलेलं होतं. पुढंपुढं तर ही लोकशाही नसून छुपी हुकुमशाहीच आहे की काय अशा संभ्रमात मी होतो. बंद, मोर्चे, संप, आंदोलनं, गोळीबार, दगडफेक, लुटालूट, हत्या, जाळपोळ इत्यादी गोष्टी नियमित झाल्या तेव्हा आपला देश भयंकर अपराधांच्या टाचांखाली मालवत चाललाय असं वाटून अस्वस्थता येत राहिली.

एकीकडे राज्ययंत्र होतं, शासक होते, सत्ता होती तर दुसरीकडे सामान्य लोक होते. भाषा, धर्म, जात यांपैकी कोणतंही कारण लोकांमधल्या संतापाला चिथावणी देण्यासाठी पुरत असे. कधीकधी कोणतंही ठोस असं कारणही नसे. अभाव आणि दडपण यांतून रागाचा डोंब उसळत असे. सत्तानीतीला कदाचित या गोष्टी उपयुक्त ठरल्या असतील. हळूहळू जुन्याच, वाचलेल्या, ढोबळ गोष्टी प्रत्यक्ष व्यवहारात काम करीत आहेत अशी जाणीव झाली. राजकारणी लोक आणि भांडवलदार, कारखानदार लोक यांची एकजूट होते आणि राजकीय सत्ता, आर्थिक सत्ता मिळवली, टिकवली जाते. समाजात वैज्ञानिक, तत्त्वज्ञ, कलावंत असतात, शेतकरी-कामकरी असतात, शिक्षक-डॉक्टर-वकील असतात. पण या सर्वांहून राजकारणातला मनुष्य जास्त महत्त्वाचा आहे असं दिवसेंदिवस लक्षात येत गेलं. सरकार बनवून राज्य करणारा पक्ष असो की विरोधात असलेले पक्ष असोत – सगळ्यांचं राजकारण सत्तेशी निगडित आहे असा अनुभव येत गेला.

अनुक्रमणिका

१९४७ नंतर, सुरुवातीच्या काही वर्षांत, राजकारण करणारे लोक हे जनतेचे सेवक आहेत, जनतेच्या वतीनं ते कारभार करीत असतात, या स्वतंत्र देशाचा विकास घडवण्यासाठी हे लोक कामं करीत आहेत असा संस्कार झालेला होता.

१९६५ पासून आजतागायत जे काही थोडंफार लिहिणं मी केलेलं आहे त्यातून आपल्या समाजजीवनाचं प्रसन्न असं चित्र दिसत नाही. वर्तमानकाळात व्यक्तीची, व्यक्तिसमूहाची नियती राजकीय-सामाजिक सत्ता आहे. जगण्यातल्या सर्वसाधारण गोष्टीदेखील राजकीय-सामाजिक शक्तीनं नियंत्रित केलेल्या असतात असा प्रत्यय येतो.

साठच्या दशकात वाढलेल्या आमच्या पिढीतल्या अनेकांना हे वास्तव जाणवलेलं होतं. स्वातंत्र्य मिळाल्यानंतर अल्प अवधीतच सुस्थापित होऊन बसलेल्या आणि सर्वसाधारण जनतेच्या समस्यांकडे दुर्लक्ष करीत असलेल्या लोकांविषयी संतापही मनात असे. मात्र हा संताप कुणा व्यक्तींविरुद्ध नसून एकंदरीत प्रस्थापिततेविषयीचा होता. साठच्या दशकाच्या उत्तरार्धात आणि सत्तरच्या पूर्वार्धात ठिकठिकाणी युवकांची आंदोलनं झाली. शिक्षण, जातीभेद, धर्मभेद, लिंगभेद, सामाजिक आणि राजकीय व्यवस्था यांविषयीचा विरोध युवकांनी व्यक्त केला. बंगाल, बिहार, गुजरात, उत्तर प्रदेश, आंध्र या प्रदेशांतल्या युवकांची अधिकतम आंदोलनं याच काळात झालेली आहेत. महाराष्ट्रातही महागाई, दुष्काळात अन्न आणि पाण्याचा अभाव, भाववाढ, बेकारी या प्रश्नांवरून मोर्चे निघाले. देश स्वतंत्र होऊन पंचवीस वर्षं झालेली होती तरी अन्नाचा प्रश्न सुटला नव्हता की अस्पृश्यतेचा.

हे सगळं वातावरण भोवती असताना आपण स्वतंत्र झालो म्हणजे नेमके काय झालो हा प्रश्न भेडसावत असे.

जगण्याशी निगडित विविध प्रश्न डोक्यात घेऊन आमची पिढी लिहायला लागली. त्यात कुणी उत्तम प्रकारचं लिहिलं, कुणी मध्यम, कुणाचं अस्पष्ट-अव्यक्त राहिलं.

एखाद्या देशाची पन्नास वर्षं म्हणजे खरं तर काहीच नाहीत. या पन्नास वर्षांत काहीच चांगलं घडलं नाही असंही नाही. मुख्य म्हणजे शिक्षणाचा प्रसार झाला. खेड्यातदेखील वैद्यकीय मदत पोचेल अशी व्यवस्था झाली. रस्ते झाले. वाहतुकीची साधनं झाली. तालुक्याच्या ठिकाणापासून लहानशा खेड्यात जाण्यासाठी लक्झरी बसेस आल्या. वेगवेगळी पिकं आली, रसायनं आली, पिकांच्या संरक्षणाची साधनं आली. आभाळातल्या पाण्यावर अवलंबून राहण्याची स्थिती गेली. धरणं झाली. रोखीची पिकं, कारखाने, फळबागा, रासायनिक प्रक्रिया करणारे कारखाने आले. औद्योगिक क्षेत्रांचा विकास झाला, परकीय सहकार्यानं अद्ययावत यंत्रांचं, सुविधासाधनांचं उत्पादन करणारे कारखाने आले. मुंबईपासून चांदूरबाजारपर्यंत बहुवाहिनी असलेल्या टीव्हीची सोय झाली. संगणक आले. संगणकांच्या शाळा निघाल्या. लोकांच्या हाती पैसा आला. बांधकामव्यवसाय वधारला. गंगोत्रीपासून गोमुखपर्यंत पेप्सी पुरवणाऱ्या टपऱ्या आल्या. ट्रांझिस्टर जुने होऊन 'टू इन वन' आले. खेड्यापाड्यांत इंग्रजी माध्यमाच्या शाळा आल्या. हॉटेलं तर गल्लोगल्ली झाली. वीज आली. नळ आले. गावागावांतल्या लोकांना राजकारण समजू लागलं. सहकारी सोसायट्या, पतसंस्था, भूविकास बँका, ग्रामपंचायती, खरेदीविक्री संघ यांविषयी आता कुणी अज्ञ राहिलं नाही. खासगी महाविद्यालयं आली, त्यांचं जाळं आलं. खासगी विद्यापीठं आली. तंत्रज्ञानाची, वैद्यकीय विद्येची महाविद्यालयं निघाली. निसर्गातल्या शक्ती खेचून घेऊन माणसाचं जगणं समृद्ध करण्याचे विविध प्रयत्न झाले.

व्यक्ती आणि व्यक्तींचे समूह समृद्ध झाले. पैशांच्या, म्हणजे पैसे मिळवण्याच्या बाबतीत वाईट पायंडेही पडले. लाच ही गोष्ट लांछन राहिली नाही. भ्रष्टाचार ही नेहमीच्या वागण्याचीच एक शैली ठरली. लोकांना सिनेमा दाखवावा यासाठी चित्रपटगृहात ऑपरेटर असतो. तो त्याच्या नोकरीचा भाग झाला. परंतु तुमचा सिनेमा नीट दिसावा यासाठी तुम्ही त्याचा काहीच आदरसत्कार केला नाही तर तो नीट दिसणार नाही. ऑफिसमधलं एखादं काम करून घ्यायचं असलं तर त्या टेबलाशी बसणाऱ्याशी तुम्ही नीट बोलणं केलं पाहिजे. तुमचं शिक्षण चांगलं आहे, उत्तम आहे. पण एखाद्या ठिकाणी नोकरी करायची तर ती सेवाभावानं केली पाहिजे. एखाद्या वर्षाचं वेतन संस्थेला किंवा संस्थाचालकाला परत केलं पाहिजे. गेल्या पन्नास वर्षांत वागण्याच्या पद्धती बदललेल्या आहेत असं वाटतं.

आपण लिहिण्या-पुसण्याच्या क्षेत्रात काम करीत असलो तर यांसारख्या गोष्टी खुपत राहतात. खेडी उद्‌ध्वस्त होतात, शहरं सुजत जातात, नरकातलं जगणं अशा झोपडपट्ट्या वाढत जातात हे आवडत नाही असं होत जातं. व्यक्ती विरुद्ध व्यक्ती, समूह विरुद्ध समूह यांच्यातल्या अमानुष हिंसेची







अनुक्रमणिका

अभिव्यक्ती अस्वस्थता निर्माण करते. माणसामाणसांत पडलेलं अंतर भयावह वाटतं. विद्वज्जनांच्या मुसक्या बांधलेल्या पाहून असहाय वाटतं. लांडग्यांचे हक्क आणि कोकरांची कर्तव्यं शिकवणारी 'वर्तमान'पत्रं नकोशी वाटतात. या आपल्या आसपासच्या काळाला नेमकं काय झालेलं आहे हेच पुष्कळदा समजत नाही. याचं दुखणं काय, याला कसली व्याधी जडलेली आहे, ते शोधलं पाहिजे. त्यापासून आपली सुटका नाही हेही कळतं.

पुष्कळदा, आत काय बाहेर काय, काळोखाचीच राजवट आहे असं वाटतं. मात्र सूर्यावरचा विश्वास अजून तडकलेला नाही. त्यामुळे प्रार्थनाही करतो.

*या माझ्या देशासाठी*
*अंगावरच्या जखमा सांभाळत*
*कण्हत पडलेल्या माझ्या देशासाठी.*

जाळलेल्या घरांसाठी, उद्ध्वस्त वस्त्यांसाठी, निपचित पडलेल्या रस्त्यांसाठी, चिरडून टाकलेल्या कोवळ्या जिवांसाठी, पशूंसाठी, पक्ष्यांसाठी, कीटकांसाठी, गोठ्यातल्या गोठ्यात जळून गेलेल्या जनावरांसाठी मी प्रार्थना करतो.

गेल्या पन्नास वर्षांतल्या मराठी साहित्यातलं वास्तवाचं चित्रण पाहिल्यास त्यातून आनंददायक जाणिवा क्वचितच व्यक्त झालेल्या दिसतात. नवसाहित्य, लघुनियतकालिकांतलं लेखन, ग्रामीण साहित्य, दलित साहित्य, स्त्रीवादी साहित्य – मराठी साहित्याच्या प्रांतात वेगवेगळ्या चळवळी आल्या. त्यांतल्या ठळक कृतींकडे पाहिलं तरी अगतिकता, असुरक्षितता, असहायता, एकाकीपण, त्रुटितता, क्षणभंगुरता, विसंगती, परकेपणा, उपरेपणा इत्यादी भाव व्यक्त झालेले दिसतात. महानगरांतील संवादहीनतेपासून खेड्यापाड्यांतील भावनिक निष्ठुरतेपर्यंतच्या अनेक स्थिती या साहित्यांतून अभिव्यक्त झालेल्या दिसतात. पाश्चात्त्य प्रभावातून अजून आपण मुक्त झालो नाही असं मानलं तरी, जीवन आणि साहित्यविषयक आनंदवादी दृष्टिकोणाचा स्वीकार आपण करू शकत नाही. लेखकांनी व्यक्तिगततेच्या मर्यादा ओलांडून समूहाशी एकरूप झालं पाहिजे, समूहाचे संघर्ष, समूहाच्या वेदना आणि समूहाच्या आशाआकांक्षा साहित्यातून प्रकट केल्या पाहिजेत हा विचारही मान्य केला तरी, बहुतांश साहित्यात विविध पातळ्यांवरील शोषणाच्या कथा येतात. हे वास्तव आहे आणि ते आपण नाकारू शकत नाही. गेल्या पन्नास वर्षांतल्या, अगदी शास्त्रकाट्याच्या कसोटीवर उतरलेल्या, मोजक्या साहित्यकृती पाहिल्या तरी आपल्याला वेढून असलेल्या राजकीय-सामाजिक- आर्थिक-धार्मिक वास्तवाची भेडसावणारी रूपं त्यांतून चित्रित झालेली दिसतात.

कदाचित साहित्याचं हेच काम असेल. माणसाच्या जगण्यातली अर्थशून्यता, अतार्किकता, दुःखगर्भता दाखवणं हे साहित्यात अपरिहार्यपणे होत असेल. तरीदेखील आपली जबाबदारी आपल्याला टाळता येत नाही.

गेल्या पन्नास वर्षांत लेखक-कवी-कलावंत-विचारवंत जबाबदारीचा घोष करीत असले तरी दिवसेंदिवस जबाबदारी झटकण्याकडे, टाळण्याकडेच एकंदरीत या युगाचा कल आहे की काय असं वाटतं. त्यात आपणही आलोच. पन्नास वर्षं आपण पाहिली म्हणजे या पन्नास वर्षांत जीवनाच्या वेगवेगळ्या क्षेत्रांत आपण काही ना काही करीत आहोतच. मग आपण काय केलं? पंचवीस वर्षांची एक पिढी मानली तर आपली स्वातंत्र्यातली दुसरी पिढी. या दुसऱ्या पिढीचं योगदान काय? सत्तरच्या पूर्वार्धात ही लोकशाही की हुकुमशाही असा प्रश्न पडत असे. त्या पंचवीस वर्षांचं खापर पहिल्या पिढीच्या डोक्यावर फोडता येत असे. आता? की पहिल्या पिढीचीच सावली अजून लांबवर पसरलेली आहे?

साठोत्तरी पिढी गेली पंचवीसेक वर्षं या समाजाच्या वेगवेगळ्या क्षेत्रांत काम करीत आहे. जबाबदारी टाळणं अशक्यच आहे. पुढच्या पिढीला उत्तर काय द्यायचं? सिद्धींची भूल पडली आणि योगाचा विसर पडला, असं?
















# मानवेंद्रनाथ रॉय यांचा मार्गच योग्य

**विश्वास नाईकनवरे**

सोलापुरला मी अजून कॉलेजचे शिक्षण घेत होतो तेव्हा भारत स्वतंत्र झाला. आमच्या कॉलेजमधल्या मित्रमंडळीत अनेक राजकीय पक्षांचे प्रतिनिधी असले तरी दोस्त असल्यामुळे साहित्य, नाट्य, काव्य यांच्याबद्दल जशी कडाक्याची चर्चा आमची होत असे तशीच ती राजकीय, आर्थिक वगैरे प्रश्नांचीही होत असे. आम्ही सगळेच जबर वाचक आणि आपापली मते आग्रहीपणाने व्यक्त करणारे असल्याने भरपूर वितंडवाद झडत असत. माझी मते तर सर्वांत वादग्रस्त होती. मानवेंद्रनाथ रॉय यांची रॅडिकल डेमोक्रॅटिक पार्टी हा माझा पक्ष. आणि आज या विचारांच्या मंडळींची जी एकांडी शिलेदारी चालू असते तशीच ती तेव्हाही चालत असे.

भारताच्या स्वातंत्र्यासाठी उतावीळ होऊन १९४२ साली महात्मा गांधींनी 'करेंगे या मरेंगे' असा लढा सुरू केला तेव्हा आम्हाला हा लढा अगदी नापसंत होता. कारण दुसरे महायुद्ध तेव्हा सुरू होते आणि त्या महायुद्धामध्ये आमच्या दृष्टीने सगळ्या जगाचे स्वातंत्र्य टिकणार की फॅसिझमच्या विजयानंतर जगावर एक अंधारयुग येणार, असा प्रश्न उत्पन्न झालेला होता. अशा पार्श्वभूमीवर जी राष्ट्रवादी अटीतटीची चळवळ उभी राहिली ती अयोग्य होती, अशी आमची प्रामाणिक भूमिका होती. आम्ही युद्धप्रयत्नात सरकारशी सहकार्य करण्यातच अंती आपले स्वराज्य येणार आहे अशी बाजू मांडत होतो. सर्वसामान्य राष्ट्रवादी जनतेपुढे हे अरण्यरुदन ठरले आणि रॉयवादी मंडळी मुख्य प्रवाहावाहेर फेकली गेली. अर्थात आम्हाला त्याची पर्वा नव्हती.

आमच्या भूमिकेमध्ये आणखी एक महत्त्वाची गोष्ट होती. स्वातंत्र्य कशासाठी? हा प्रश्न आम्ही आवर्जून पुढे मांडत होतो. केवळ इंग्रजांची राजवट गेली आणि भारतीयांची आली म्हणजे स्वातंत्र्य आले असे नव्हे; तर भारतातल्या दरिद्री, निरक्षर, पददलित बहुसंख्य लोकांच्या जीवनात नवीन पान उघडले जाणारे ऊर्फ जनतेचे व जनतेने चालवलेले राज्य म्हणजे स्वराज्य; जनतेसाठी, तिच्या नावाने भांडवलदार वर्गाने सत्ताधीश वर्ग बनून राज्य करणे म्हणजे स्वराज्य नव्हे, असे आमचे मत होते.

स्वराज्याचे राजकीय आणि आर्थिक स्वरूप कसे असले पाहिजे हे स्पष्ट चित्र लोकांपुढे ठेवण्याचा प्रयत्न आम्ही केला होता. स्वतंत्र भारताचे आर्थिक नियोजन कसे असले पाहिजे हे आराखड्याच्या रूपाने दाखवणारी जनता योजना प्रा. गोवर्धनदास पारीख, बॅ. तारकुंडे अशा मंडळींनी तयार केलेली होती तर राजकीय स्वातंत्र्याची रूपरेषा दर्शविणारी भारताच्या राज्यघटनेची एक संकल्पना रॉय यांनी स्वतःच तपशीलवार तयार केलेली होती. आधुनिक तंत्रविज्ञानाच्या उपयोगाने शेतीची समृद्धी निर्माण करून त्या समृद्ध शेतीवर अवलंबून असलेली उद्योगधंद्यांची वाढ हा आर्थिक नियोजनाचा पाया असा आमचा दृष्टिकोण होता. लोकसमित्यांच्या हाती सर्व सत्ता देणारी राज्यघटना तयार करून रॉय राजकीय प्रश्नाची सोडवणूक करू पाहत होते.

अशा रीतीने जनता योजना आणि लोकसमित्यांच्या आधारावर उभारलेल्या राज्याची संकल्पना मांडणारा राज्यघटनेचा मसुदा या दोन आयुधांच्या जोरावर जनतेपुढे १९४६ च्या निवडणुकीत आम्ही कौल मागितला. जनतेत काही स्थान नसल्यामुळे इतर डाव्या पक्षांचे झाले तेच निवडणुकीत आमचेही झाले आणि आमचा पक्ष पराभूत झाला. गांधींच्या जनमानसातल्या लोकप्रियतेचा फायदा घेऊन काँग्रेस पक्ष सत्तेत आला. पण सत्ता राबवताना गांधीवादी अर्थशास्त्र किंवा सर्वोदयवादी ग्रामरचनेचा अंगीकार नेहरू-पटेल वगैरे मंडळींनी केला नाही. मिश्र अर्थनीती सुरू झाली आणि राजकीय सत्ता पक्षाच्या, पक्षाच्या भांडवलदारांच्या आणि सत्ताधारी पक्षप्रमुखांच्या हाती राहिली. राजकीय आणि आर्थिक धोरणांमध्ये या मिश्र अर्थनीतीमुळे श्रीमंतांची श्रीमंती वाढत गेली आणि गरीब अधिकाधिक गरीब होत राहिले.

पन्नास वर्षांनंतर मागे वळून पाहताना मला असे वाटते की, काळाने आमची भूमिका बरोबर होती असाच निर्णय










दिला आहे. देशाची आजची आर्थिक परिस्थिती पाहिली म्हणजे प्रकर्षाने जाणवते ते हे की, भारताने आम्ही सुचवीत होतो तसे शेतीचे तंत्र आधुनिक करण्याला प्राधान्य दिले असते तर सामान्य शेतकरी चार पैसे मिळवून सधन झाला असता. आणि त्याच्या हातात पैसा खेळला असता तर त्याच्या क्रयशक्तीवर आधारलेले नवे औद्योगिक जग निर्माण झाले असते. तसे न होता सामान्य शेतकरी तसाच हलाखीच्या अवस्थेत ठेवून काही मूठभर शेतकऱ्यांची हरित-क्रांती होऊन भरभराट झाली आणि, देश अन्नधान्यनिर्मितीत स्वयंपूर्ण झाला असला तरी, भूमिहीन शेतकरी आणि शेतमजूर हा जो बहुसंख्य ग्रामीण समाज आहे तो उपाशीच राहिला आहे. पुरेसे अन्न विकत घेण्यासाठी पैसा त्याच्या हातात येत नाही. त्यामुळे त्यांचे लोंढे जगण्यासाठी शहरांकडे लोटत असून शहरांची कफल्लकता आणि प्रदूषणाच्या समस्या असे नवेच प्रश्न निर्माण झाले आहेत.

बरे, मूलभूत उद्योगांवर प्रथम भर देण्याचा जो प्रा. महालनवीसांचा नियोजनाचा ढाचा सरकारने निग्रहाने अमलात आणला त्यातून उद्योगधंदे वाढले खरे; पण सार्वजनिक उद्योगांचा पसारा अत्यंत गलथान पद्धतीने चालवला गेल्यामुळे तो बव्हंशी तोट्यात चालला. जे औद्योगिक उत्पादन होत राहिले त्याला देशात आणि परदेशांत ग्राहकवर्ग मिळेना; कारण आमचा माल महाग आणि आयात केलेल्या वस्तू अधिक स्वस्त आणि अधिक चांगल्या प्रतीच्या ठरल्या. मग आमचे उत्पादन कसे वाढावे आणि जागतिक बाजारपेठेच्या स्पर्धेत कसे टिकावे? असे होता होता परिस्थिती इतकी बिघडत गेली की, अखेर समाजवादी नियोजनाला राम राम करून मुक्त अर्थविचारांची कास धरावी लागली. अर्थात हा नवा प्रयोगही अजून फलदायी होत नाहीच. मुळात उत्पादन उत्तम प्रतीचे आणि कमी खर्चाचे झाल्याशिवाय जागतिक स्पर्धेत ते टिकणार नाही.

राजकीय क्षेत्रात तर लोकशाहीची थट्टाच चाललेली दिसते. पाच वर्षांनी एकदा लोकमताचा कौल घेतला की राजकारणात लोकांचा सहभाग शिल्लकच राहत नाही. मग पाच वर्षे रोज वृत्तपत्र उघडून नव्या भ्रष्टाचारांची प्रकरणे वाचण्यापलीकडे लोकांच्या हाती काहीच उरत नाही. सर्व सत्ता ग्रामीण स्तरावर ठेवणारी राज्यघटना असती तर अशी असहाय अवस्था कदापि झाली नसती. नुसत्या पंचायत राज्याच्या घोषणा करून काय उपयोग? त्या ग्रामस्वराज्यासाठी पंचायतींच्या हाती सर्व निर्णय सोपवून त्यांच्या पसंतीच्या विकासकामासाठी सर्व ती आर्थिक तरतूद केल्याशिवाय पंचायतींचा प्रयोग खरोखरीच्या लोकशाहीचा कसा होणार?

भरमसाठ लोकसंख्यावाढीचा प्रश्न आज भेडसावत आहे. लोकसंख्या वाढली आणि वाढत चालली आहे. याला जबाबदार जर काही असेल तर ती गोष्ट म्हणजे प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचे करण्याचे राज्यघटनेत नमूद केलेले धोरण राज्यकर्त्यांनी पाळले नाही ही आहे. कारण मुलांना आणि विशेषतः मुलींना सुशिक्षित केल्याबरोबर त्या समाजाची लोकसंख्या वाढायची थांबते असाच अनुभव केरळ, तामिळनाडू आणि गोवा राज्यांत आलेला आहे. उलट बिहार, मध्यप्रदेश, उत्तरप्रदेश, राज्यस्थान वगैरे राज्यांत शिक्षणाची टक्केवारी कमी आणि त्याचा अटळ परिणाम जबर लोकसंख्यावाढीत होतो असे उघड दिसते.

स्वतंत्र भारतात पन्नास वर्षांत काहीच प्रगती झाली नाही असे म्हणता येणार नाही. पण हरहुन्नरी, तल्लख बुद्धीचा जो भारतीय माणूस जगभर दिसतो आणि अमेरिकेतला सर्वांत सधन वर्ग म्हणून उदयाला येतो आहे त्याच्या हुशारीचा उपयोग भारतामध्ये मात्र अद्याप करून घेता आलेला नाही असे जाणवल्यावाचून राहत नाही. पन्नास वर्षे झाली तरी अजूनही बहुसंख्य लोकांना खरे स्वातंत्र्य लाभलेले नाही असे दुःखाने नमूद करावे लागते.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या पन्नास वर्षांच्या कालखंडापैकी पहिली सात वर्षे वजा करता बाकीचा काळ म्हणजे, मानवेन्द्रनाथ रॉय यांच्याअभावी, तसा नेतृत्वहीन काळ म्हटला पाहिजे. कारण १९५४ साली २५ जानेवारीला रॉय यांचे डेहराडूनला निधन झाले. रॅडिकल डेमोक्रॅटिक पार्टी या राजकीय पक्षाचे १९४८ साली कलकत्त्याच्या अधिवेशनात (तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या अध्यक्षतेखाली) विसर्जन झालेले होते. कारण परिवर्तनाचे साधन म्हणून राजकीय पक्षावरचा आमचा विश्वास उडाला होता. पक्षविहीन लोकशाही निर्माण व्हावी या विचाराने स्वपक्षापासून सुरुवात करावी म्हणून पक्ष संपवून टाकला. या निर्णयामुळे आमच्यापैकी अनेक मंडळी व्यथित होती. अगदी अध्यक्ष शास्त्रीबुवाही नाराज होते.

पक्षविसर्जन झाल्यावर आपली एखादी संघटना असावी की कसलीही संघटनाच नको याचा वाद सुरू झाला. संघटनेची

काही आवश्यकता नाही असे अनेकांचे मत होते. कारण सत्तेचे राजकारण सोडून लोकशिक्षणाचे व नवमानवतावादाच्या प्रसाराचे काम करण्यासाठी संघटनेची आवश्यकता नाही असे मत प्रचलित होते. पक्षविसर्जन ज्यांना पटलेले नव्हते असे काही लोक मग अन्य राजकीय पक्षांत जाऊन राजकीय कार्य करत राहिले. शास्त्रीबुवांनी काँग्रेसमध्ये प्रवेश केला. मात्र बहुसंख्य लोक इतर पक्षांत गेले नाहीत. तत्त्वज्ञानाची मांडणी मानवेन्द्रनाथ रॉय यांनी केली होती व त्याचे पद्धतशीर शिक्षण रॉयवाद्यांना देऊन जनतेचे शिक्षण करू शकणारे कार्यकर्ते तयार करण्याचा रॉय यांचा विचार होता. त्या दृष्टीने वैचारिक शिक्षण देणारे अभ्यासवर्गही त्यांनी डेहराडून, मसुरी वगैरे गावी घेण्याचा क्रम चालू ठेवला. पण रॉय यांच्या देहावसानानंतर ते बंद पडले.

जी विसाव्या शतकातली वैचारिक, सांस्कृतिक नवजीवनाची चळवळ आम्हाला करावयाची होती तिची काही कामे या काळामध्ये वैयक्तिक उपक्रमांतून केली गेली. ज्यांचा कल प्रत्यक्ष कार्याद्वारे नवजीवन घडवून आणण्याकडे होता अशा काही मंडळींनी तशा प्रकारचे कार्य सुरू केले. पण राजकीय पक्ष म्हणून जो उत्साह आमच्या चळवळीत होता तो मात्र आता संपुष्टात आलेला होता.

या काळातल्या चटकन दृष्टोत्पत्तीस येण्यासारख्या काही उपक्रमांचा निर्देश करता येईल. तसे फार मोठ्या प्रमाणात किंवा ज्यामध्ये बरेच लोक सामील झाले होते असे हे काम अर्थातच नव्हते. पण वैयक्तिक उपक्रमांतून आपल्या जीवनविषयक तत्त्वज्ञानाशी सुसंगत असे कार्य काही थोड्या लोकांनी निश्चितच चालू ठेवले.

पहिले महत्त्वाचे काम म्हणजे आमच्या विचारांची मांडणी करणारे व नवनवीन प्रश्नांचा ऊहापोह करणारे आमचे मुखपत्र 'रॅडिकल ह्युमॅनिस्ट' हे मासिक म्हणून सातत्याने प्रकाशित होत राहिले. नुकताच या नियतकालिकाने सतत ६० वर्षे प्रकाशित होण्याचा विक्रम केला आहे. असे प्रदीर्घ प्रकाशन वैचारिक मासिकांचे होणे हे कठीण. ते कार्य पार पाडण्यात वॅ. वि.म. तारकुंडे यांचा सिंहाचा वाटा आहे. वाई येथे तर्कतीर्थ जोशी यांनी जी ग्रंथनिर्मिती केली व धर्मकोशाचे संपादन केले ते, त्यांची व्याख्याने वगैरे सर्व या नवविचारप्रसाराचे व संशोधनाचेच काम होते. पुण्यात श्री. स.मा. गर्गे व श्री. बा.रं. सुंठणकर यांनी काही संशोधनपर व नवमानवतावादाशी संबद्ध विषयावर ग्रंथनिर्मिती या काळात केली. कलकत्त्याला शिवनारायण रे यांनी मानवेन्द्रनाथ रॉय यांच्या प्रकाशित व अप्रकाशित साहित्याचे संकलन असलेले ग्रंथ प्रकाशित केले (Collected works of M.N. Roy). स्वतः तारकुंडे यांचीही काही महत्त्वाची पुस्तके प्रकाशित झाली. शिवाय आणीबाणीच्या काळाशी मुकाबला करणारी संपूर्ण क्रांतीची चळवळ जी जयप्रकाश नारायण यांनी करून दाखविली त्या चळवळीतही भाऊसाहेब तारकुंडे जयप्रकाशांच्या बरोबर सतत होते. साधारणतः १९६९ पासून रॉय यांच्या अनुयायांना संघटित करून अल्पस्वल्प कामगिरी काही केन्द्रांतून चालू ठेवण्याचेही काम तारकुंडे यांच्यामुळे चालू असते. अशी काही ठिकाणे म्हणजे दिल्ली, मुंबई, पुणे, हैद्राबाद, अहमदाबाद व कलकत्ता अशी आहेत.

डॉ. इन्दुमती पारीख यांचे स्त्रीहितकारिणी सभा या संस्थेमार्फत झोपडपट्टीतील महिलावर्गात शिक्षण व आरोग्य या क्षेत्रात चाललेले कार्य जसे सर्वपरिचित आहे तसेच कलकत्त्यात कल्याणी कार्लेकर यांचेही त्याच स्वरूपाचे कार्य सुरू आहे. बाकी उरलेले कार्य म्हणजे नवमानवतावादाचा प्रसार व त्यात नव्या प्रश्नांविषयी संशोधन आपापल्या कुवतीनुसार अनेक ठिकाणी अभ्यासशिबिरे वगैरे स्वरूपात सुरू आहे.

❖❖





अनुक्रमणिका



# चतुर्विध धारणा आणि समोरील आव्हाने

श्यामला वनारसे

मला मध्यंतरी काही वर्षे एक स्वप्न नेहमी पडत असे. त्यात, आपल्या स्वप्नातल्या जाणिवा अध्याहृत असतात तशी, एका विराट प्रवासाला आपण जाणार अशी जाणीव असे. त्या प्रवासाची जय्यत तयारी करून एका घाटरस्त्याच्या वळणावर मी वसलेली आहे, आणि पुढच्या कठीण प्रवासासाठी जाणकार पथदर्शक येणार आणि मी कसून तो प्रवास पार करण्याचा विराट अनुभव घेणार.... पण असे काही घडत नाही. कोणीतरी अनोळखी इसम माझ्याकडे बघून हसतो आणि सांगतो, 'ते केव्हाच गेले. तू परत जा.' मी रागारागाने काहीतरी बोलायचा प्रयत्न करते.... बऱ्याच असंबद्ध प्रतिमा उमटून जातात.... मी एका यात्रा कंपनीच्या बसमधून... कोठे ते माहीत नाही..., पण पोचते – आणि.... कशी माहित नाही, पण घोड्यावरून एकटीच त्या उंच बर्फाच्छादित डोंगरावरच्या वाटेवरून जाते... मध्येच घोडा आणि घोडेवालाही नाहीसा होतो. माझी वाचा गोठत असतानाच मला माझ्या मुलाचा नाटक करून दाखवणारा आवाज कानी येतो... जाग येते. आपण पोचलो नाही ही रुखरुख मनाला पोखरत राहते.

या स्वप्नाचे व्यक्तिगत अन्वय काय असतील ते असोत, पण त्याची बोच मला अजून जाणवते. आज बऱ्याच वर्षांनी मला त्यामध्ये काही अधिक अर्थ जाणवू लागला आहे. त्याचाच शोध घेण्याचा हा प्रयत्न आहे.



नेहरूंचे Tryst with Destiny हे भाषण वाचण्याचे किंवा कळण्याचे वय नव्हते. शिवाय शाळांमधून ५ वी ते ७ वी इंग्रजी हटवण्याचे धोरणही अंमलात आले. पुढे केव्हातरी उतारापठण स्पर्धेसाठी ते भाषण वाचनात आले. पण 'सूरज डूब गया!' हे भाषण रेडिओवर ऐकत बसल्याचे दृश्य मात्र अजून आठवते. पुढे हे भाषण हिंदीच्या पाठ्यपुस्तकात आले. यापैकी पहिले भाषण दिल्लीत चालू असेल, तेव्हा मंडईपासून निघणाऱ्या मशाल मोर्चासाठी सेवादल सैनिकांच्या मेळ्यात जाऊन मी 'लिंबूटिंबू' ठरून घरी परत पाठवली गेले होते. खरे तर डोळ्यांवर झोपही होतीच. फाळणी, दंगली, कत्तली, गांधीजींचा उपास आणि शेवटी राजकारणाला सत्यस्पर्श ठेवू बघणाराचा खून असा क्रम कोसळत होता – तसे दैनंदिन जीवन लहानपणाच्या सुखाने चालू होते. ही मालिका साने गुरुजींच्या अंतापर्यंत पोचली. मी दहाव्या वर्षी एक पूर्ण दिवस उपास करण्याचे 'आत्मक्लेश' (!) अनुभवले.

पन्नास साल आले. शाळेत एसेम जोशींचे भाषण झाले. उत्साहाने उसळणारे एसेम हातात घटनेचे पुस्तक घेऊन भाषण देत आहेत, आता प्रजासत्ताक, गणराज्य हे शब्द जिभेवर रुळताहेत हेही दृश्य मनावर टिकून आहे. 'राष्ट्रबांधणी', मजवूत निर्धार, निवडणुका, योजना हे सर्व रोजच्या भाषणांमधून, बौद्धिकांमधून, जयंती-पुण्यतिथीसारख्या उत्सवी कार्यक्रमांमधून कानावर येऊ लागले. शिवाय सेवादलाचे कलापथक, सेवापथक, शिबिरे हेही चालू होतेच. शाळेत अभ्यासाप्रमाणेच अभ्यासेतर कार्यक्रमांची अक्षरशः गर्दी होती. सर्व ठिकाणी धावून धावून काहीतरी करून दाखवण्याची धडपड चालू होती. कमीअधिक यश मिळत होते. कौशल्ये आत्मसात होत होती.

शाळेच्या या चिमुकल्या वर्षांमध्ये घरात दिल्लीचे वारे आले. वहीण दिल्लीला शिकायला गेली. काकासाहेब गाडगीळ तिचे 'स्थानिक पालक' होते. ती सुटीवर आली की दिल्लीच्या अनेकानेक कार्यक्रमांचा 'आँखो देखा हाल' ऐकायला मिळे आणि तिच्या एकूण वागण्यात उच्चवर्गीय शिस्त आणि अभिरुचीचे तपशील कळूनं येत, जाणवत. ती, आणि डॉक्टर होऊन खेड्यात दवाखाना चालवायचा या कल्पनेने शिक्षण घेणारी माझी सर्वात मोठी बहीण पुण्यात मराठी कुमार साहित्य मंडळ चालवत. त्याचे 'कुमार' या मासिकाचे अंक निघत, त्यात लिंबूटिंबूपणा करून मी कधी नाटकात काम कर, कधी अंक मोज, पोस्टात नेऊन पोचव अशी कामेही करत असे. वडलांमुळे क्रिकेट, सिनेमा आणि वाचन, आणखी दोन बहिणींमुळे खेळ आणि गायन, आईमुळे वाचन, अभ्यास, शिवण, स्वैंपाक,

अनुक्रमणिका

कलापथकात गेल्यामुळे नृत्य, लोककला, लोकजीवन अशा वर्तुळांची उघडणी चालू होती.

हे सारे काही Tryst with Destiny होते का? हा परिसर, त्यातले स्वातंत्र्य आणि उदारमतवाद निश्चितच एकीकडे घरामधील पाश्चात्त्य शिक्षण, नातलगांचा स्वातंत्र्यलढ्यात सहभाग, सेवादल यांच्यामुळे घडलेला होता. पण यामधला बराच भाग यदृच्छेने माझ्या वाट्याला आला. त्यात कोणी जाणिवपूर्वक 'मला घडवले' असे म्हणता येणार नाही. अशाच सैलपणाने एखादी कर्मठ घरातील मैत्रीण कुळाचार, कर्मकांड, उपासतापास यात राहिली, एखादी खेळात किंवा कलांमध्ये कुशल असूनही घरच्यांनी परवानगी नाकारल्याने चडफडत बसली, तर एखादी लौकर लग्न होऊन शिक्षणातून बाहेरही पडली. देशामधल्या शाळेबाहेरच्या मुलींचे आम्हाला भान होते असे म्हणता येणार नाही. माझ्यासारख्या विशेष संधी मिळालेल्या व्यक्तीला ते पुसट होते. एवढेच नव्हे तर, त्याबाबत आपण काही करू शकत नाही अशा हताशपणाचेही त्यावर आवरण होते. चांगल्या वागणुकीबद्दल पालक-शिक्षकांमध्ये काही प्रमाणात एकमत होते, आणि वेळोवेळी दोन्हीकडून थापटणी लागतच होती. पण श्वास मोकळा होता. हा मोकळा श्वास आणि एकूण समाजावर विश्वास या तयारीमुळे शाळा संपेपर्यंत आपण करून दाखवायचे आणि कौतुकाची थाप पाठीवर पडायची हाच क्रम होता. यातून एक भ्रमही निर्माण झाला. हे goody goody तसेच चालू राहील, आपल्या वाट्याचे आपल्याला मिळत जाईल, आपण करू त्याचे रास्त माप पदरात पडत राहील असे त्या भ्रमाचे आशय होते.

पहिल्या सार्वत्रिक निवडणुकीच्या वेळी जेव्हा बूथवर गेले तेव्हा मतदारयादीमधील कितीतरी आडनावे मी कधी ऐकलेलीही नव्हती. झोपड्यांमधून, वाड्यांमधून लोकांना मतदानाला चला असे सांगण्यात गंमत वाटण्याचा भागच मोठा होता. पुढच्या निवडणुकीपर्यंत संयुक्त महाराष्ट्राची चळवळ आली आणि शाळकरी वयात 'विद्यार्थी आणि राजकारण' याविषयी केलेली स्पर्धांमधील भाषणे, ऐकलेली बौद्धिके सरळ पुढे आली. संस्थानांचे विलिनीकरण, गोव्याचा मुक्तिसंग्राम आणि संयुक्त महाराष्ट्र यांच्या निमित्ताने वरकरणी नियतीचे वाटावेत असे खेळ राजकारणी कसे खेळतात हे थेंबाथेंबाने ठिबकू लागले. भावड्या आशावादाचे रूपांतर निर्धारपूर्वक स्वीकारण्याच्या ध्येयवादात होईना. त्यातील उज्ज्वलता झाकोळल्यासारखी दिसू लागली. या अंधाराची बोटे वेगवेगळी होती. पुष्कळसा ध्येयवाद 'स्वप्नीचे हे धन, हाती न, पदरी न।' असा वाटू लागला, कारण चळवळीमधल्या दुसऱ्या-तिसऱ्या फळीला मानाचे जीवन जगण्याचा प्रश्न डाग देऊ लागला, त्यांची मुले चिडू लागली. जात्यंधतेचे ब्राह्मणविरोधी रूप, शहरी-ग्रामीण या फरकाला वादाचे, वादंगाचे, संघर्षाचे दिलेले रूप, राष्ट्रीय पातळीवर इंग्रजीचे महत्त्व तिळमात्रही कमी न करता स्थानिक पातळीवर 'इंग्रजी हटाव' मोहीम आणून बालकांचे आणि तरुणांचे भविष्य खोड्यात टाकण्याचे प्रयत्न, शालान्त परीक्षेपर्यंत मातृभाषेचा वापर आणल्यानंतर महाविद्यालये व विद्यापीठे यांनी इंग्रजीची तळी उचलून दिलेली लढत यातून नियतीचे विकट रूप सामोरे येत होते. अशा वेळी पुढे जायचे असेल तर इंग्रजी शिका, ध्येयवादाचा बावळटपणा करू नका, राजकारण हा संधीसाधूंचा बाजार आहे, हुशार असाल तर खरा वाव परदेशातच मिळतो, इथे शास्त्रज्ञ आत्महत्या करण्याकडे लोटले जातात असा विचारव्यूह घेरू लागला. यापासून उपहासवृत्ती चार हातावर उभीच होती. यातून वाचण्यासाठी मग इंग्रजीही उत्तम करू, साधे राहू, नेकीने काम करू, मराठीतून शिकवू, मराठी लिहू, राजकारणापासून दूर राहू, आणि मध्येच परदेशी शिष्यवृत्तीसाठी किंवा नोकरीसाठी अर्जही करू असला एक बेचव मध्यममार्ग गोंधळातल्या गोंधळात निघत होता. ज्याला जी वाट जमली ती धरून जायला सुरुवात झाली. मध्यममार्गाखेरीज, भ्रष्टाचाराचे, सत्तेच्या पायऱ्या चढण्याचे, दादागिरीचे मार्ग प्रत्यही उघडत होतेच. त्यावरून वाटचाल करणारे, त्यांच्यापुढे हात चोळत बसणारे, कुठल्याही प्रश्नाचे भांडवलात रूपांतर करणारे महाभाग रस्त्यावर आणि वर्तमानपत्रात भेटत होतेच. 'धडपडणारी मुले' विभागली गेली होती. उद्योजक वेगळे, कार्यकर्ते वेगळे, कलावंत वेगळे, कल्पक वेगळे. व्यवस्थेत प्रतिष्ठित झालेले या सर्वांना वरचढ ठरत होते. संस्थाजीवन काम करण्यापेक्षा अधिकाराच्या श्रेणीतील तांत्रिकतेवर विसंबून चालत होते. क्रीडासंस्था खेळाडूनिरपेक्ष, शिक्षणसंस्था विद्यार्थि-निरपेक्ष, फार कशाला, समाजकार्यकारी संस्था लाभार्थीनिरपेक्ष पद्धतीने चालू लागल्या तेव्हा अंतर्गत राजकारणात पुष्कळसे काम आणि कितीतरी आयुष्ये होरपळली. शिक्षण संपले तेव्हा





आम्ही जय्यत तयारीनिशी घाटरस्त्याच्या वळणावर उभे होतो आणि कुणीतरी अनोळखी इसम 'तुम्हाला इथे कोणी बोलावलं? चला जा तिकडे सपाटीकडे' असे सांगत होता!

– २ –

या आणि अशा घटितांचा एका आयुष्याच्या आधारे अर्थ लावणे हा खरे तर एक अव्यापारेषु व्यापारच ठरण्याची शक्यता आहे. त्यातून प्रातिनिधिक स्वरूपात किंवा प्रतीकात्मक स्वरूपात सांगावे असे एक क्षेत्र मी निवडले नाही. कदाचित त्यामुळे असेल, पण एक प्रश्न गेली अनेक वर्षे माझ्या मनात वेगवेगळे आकार घेत असतो. आपण भारतीय लोक जसे वागतो तसे का वागतो? भारतीय व्यक्तिमत्त्व अशी काही चीज आहे का? ती कशी आकाराला येते? त्यामध्ये बदल करायला हवा का? कोणता? कसा? (आता मी लहान तोंडी चांगलाच मोठा घास घेतला आहे.) मी मानसशास्त्राची विद्यार्थिनी म्हणून घेतलेल्या शिक्षणाचा त्यासाठी कितपत उपयोग होईल? हा प्रश्नही मला चांगलाच सतावतो. आधीच मनोविज्ञान आणि मानसशास्त्र याबद्दलचा गोंधळ आहेच, त्यात प्राचीन भारतीयांच्या विचारव्यूहाचे वेगळेपणही सांभाळण्याचा प्रश्न उभा राहतो. पण या सगळ्या कडबोळ्यातून मला कळते ते काय, एवढ्यावरच लक्ष ठेवणे बरे.

आपण मुळात आत्मनिष्ठेच्या बाजूचे आहोत. या निष्ठेतूनच आयुष्याचे ध्येय आणि साधने ठरली जातात. परिसराशी व्यवहार करताना अनुभवनिष्ठ पद्धत आणि मोजमाप धरूनच आकलनाच्या व्यवस्था तयार होतात. साक्षात्कार किंवा मोक्ष हे ध्येय आणि तपस्या व प्रचीती ही साधने ठरतात, याखेरीजच्या गोष्टी दुय्यम होतात. व्यवहारतः अध्यात ना मध्यात ही उत्तम धारणा मानली जाते; वेगवेगळ्या तऱ्हा सामावून घेतल्या जातात. कलंदर कलावंत, एककल्ली संशोधक चालवून घेतले जातात. राजांचा लहरीपणा निसर्गाच्या लहरीइतकाच 'अपरिहार्य' समजला जातो. स्वतःला जे कळले त्याची नोंद, लेखन, इतरांशी संवाद हे दुय्यम; कळणे महत्त्वाचे. वेगवेगळ्या पातळ्यांवरची ही व इतर वैशिष्ट्ये 'आत्मनिष्ठे'तून उद्‌भवतात. एक संकल्पना म्हणून 'आत्मनिष्ठा' या धारणेकडे पाहिल्यास आध्यात्मिक आशयापासून तो प्रत्यक्ष संवेदनापर्यंत निदान चार प्रकार दिसतात – मूल्ये, अभिवृत्ती, सवयी, संवेदना. एवढ्यावर ते संपेल असेही नाही. या पातळ्यांवर जो लोकव्यवहार विकसित होतो त्यामध्ये प्रश्नांची सोडवणूक साधण्यासाठी उतरंडीची, अधिकाराच्या वाटणीची व्यवस्थात्मक निर्मिती दिसते, परंतु अधिकारी व्यक्तीच्या सदसद्विवेकावरही भर येतो. स्वातंत्र्यानंतर या वैशिष्ट्याकडून वस्तुनिष्ठतेकडे जाण्याचा दबाव निर्माण झाला.

वस्तुनिष्ठा हा आधुनिक विज्ञानाचा परवलीचा शब्द, मूलाधार. वैज्ञानिक दृष्टिकोनाचा स्वीकार ही नवराष्ट्र उभारणीची गरज, बुद्धिप्रामाण्यवाद ही न्यायाची, कायद्याच्या राज्याची गरज, व्यक्तीच्या प्रगतीमध्ये तंत्रविद्या, विज्ञान यांना साधन म्हणून महत्त्व, पुरावा, पडताळा यांच्या आधारे सार्वत्रिक, एकमाप, सिद्धसत्य ज्ञानाचे ध्येय अशी रचना तयार होते. एकेका क्षेत्रातील संपर्काला, संवादाला राष्ट्रीय-आंतरराष्ट्रीय परिमाण प्राप्त होते. संपूर्ण मानवजातीसाठी एकच एक आकलन स्थापित करण्यावर भर येतो. समाजविज्ञानात, विशेषतः मनोविज्ञानात, ही प्रक्रिया मुळातच संथ होते. भारतीय विद्यापीठांच्या याबाबतीतील पारतंत्र्याचे जोखड अजूनही निघालेले नाही. मनोविज्ञानाची शिक्षणक्षेत्रातील जागा कलाशाखेत, पदवी, पदव्युत्तर शिक्षण आणि संशोधन या पातळ्यांवर मुक्रर झाली; परंतु हे शिक्षण घेऊन बाहेर पडलेले तरुण-तरुणी म्हणजे त्रिशंकू ठरले. एवढे उच्चशिक्षण घेऊनही त्यांना एक प्रकारचे बेघर व्हावे लागले. इथल्या समाजासाठी असंबद्ध आणि परदेशी विद्यापीठांच्या तुलनेत अतिसामान्य अशी पोतडी भरून ते घाटरस्त्यावर आले. त्यांना कुणी विचारलेही नाही. ते पुन्हा तीच पोतडी पुढच्या पोरांना देण्याचे 'कार्य' करू लागले. सपाटीवर चालणे सोपे असतेच.

मूळच्या आत्मनिष्ठेला आणि वैज्ञानिक वस्तुनिष्ठेला हे सारेच पूर्णतया नामंजूर होते. मनोविज्ञानाबाबत, मुळातच एक प्रकारचे गाभ्यामधले गूढ आणि त्याचे प्रातिभ स्वरूपाचे आकलन या संकल्पनांमुळे आधीच एक अढी होती. पण पूर्वापार स्टाउर, थाउलेस, मॅक्डूगल आणि फ्रॉईड, पुढे वॉटसन, पाव्हलॉव्ह, स्किनर यांनी केलेली मांडणी महाविद्यालयीन शिक्षणक्रमात दाखल झाली आणि एकूण केंब्रिज, कोलंबिया, येल, पुर्डू, विस्कॉन्सिन वगैरे विद्यापीठांकडून आयात होणाऱ्या सामग्रीवर येथे गुजराण सुरू झाली. याच्यापायी पोकळ अभ्यासाला ऊत आला. तेथील संशोधनाची पुनरावृत्ती, तेथील मापनसाधने, मूळ गृहीते इथे प्रस्तुत आहेत की नाहीत याची विचक्षणा न करता, पदवीच्या शेपटीला गोंडा लावू लागली.

हे चित्र फार न रंगवता आत्मनिष्ठेकडून वस्तुनिष्ठेकडे या प्रवासाची फलिते पाहू. काहींनी वस्तुनिष्ठेचा जाणिवपूर्वक स्वीकार केला. त्यात बुद्धिप्रामाण्यवाद स्वीकारून कर्मकांडाला फाटा देऊन नव्या जीवनरीतीचा आरंभ झाला. यातही दोन तट दिसतात. एक सरळसरळ पाश्चिमात्यांच्या पावलावर पाऊल टाकून इंग्रजी शिक्षण, परदेशी शिक्षण, उच्चभ्रू 'साहेबी' राहणी अशा मार्गाला जाणारा, जाऊ इच्छिणारा. दुसरा देशीपणा न सोडता परिवर्तनासाठी प्रयत्नशील असणारा. कर्मकांड नको असे निकराने म्हटले, तरी श्रद्धेचे स्थान उखडण्याची उचापत न करणारा. मूळच्या सुसंस्कृत माणुसकीची देशी कल्पना ज्या अनिष्ट रूढींच्या कचाट्यात सापडली होती तिला मुक्त करण्यावर या गटाचा भर होता. त्यांना 'ग्यानवा'मध्ये रस होता. या दोन गटांनी परिवर्तनाचा प्रवाह वाहता ठेवला. यांच्याखेरीज आहे ते ठीक आहे; अगदीच गळ्याशी आले तर बदलू, असे करत जागच्याजागी राहू पाहणारा वर्ग आणि प्राचीन सनातन धर्माचे पुनरुज्जीवन करून पूजा, कर्मकांड, यज्ञ, धर्मपीठ यांच्या आक्रमक वापरासाठी सिद्ध झालेला गट. ही चतुर्विधता निर्माण झाल्यावर त्यामधून वेगवेगळे विस्तार आणि गुंतागुंत गेल्या ५० वर्षांत दिसून आली आहे, पहिल्या आणि चौथ्या गटाची संख्यात्मक वाढ बहुसंख्येवर चालणाऱ्या लोकशाही व्यवस्थेत महत्त्वाची ठरत गेली आहे.

वस्तुनिष्ठतेवर आधारलेले विज्ञान आणि आर्थिक व्यवहार यांचा सामना आपल्या आणखी एका वैशिष्ट्याशी झाला. ते वैशिष्ट्य म्हणजे नातेसंबंध जपण्याच्या आस्थेचे. माणूस तोडणे अगदी जिवावर येणे, त्याचा भावनिक ताण व ताप होणे याची अनेक उदाहरणे आहेत. महाराष्ट्रातले उत्तुंग उदाहरण न्यायमूर्ती रानड्यांचेच आहे. ज्या आर्थिक व्यवहारात गती, फिरती आणि चलती यांना महत्त्व आहे तिथे नात्यांच्या गुंत्यात अडकून पडणारा माणूस पुढे जाणे कठीणच. याही बाबतीत, कौटुंबिक संबंधात पैशामुळे वितुष्टे येणे, विभक्त होऊन वाटण्या घेणे यांचे ताण स्वातंत्र्यापूर्वीच सुरू झाले होते, ते नंतरच्या आर्थिक गतीमध्ये वाढत गेले. पण त्यातही दाटीवाटीने राहणारी, गावाकडच्यांना बोलावून घेऊन नोकरीला लावणारी माणसे दिसतील. ओळखीने कामाला लावून घेणे, गरजू म्हणून कामावर घेणे, आपल्याकडे नोकरीवर ठेवलेल्या माणसांना सांभाळून घेणे हे वागण्याचे प्रकार इथल्या शोषणाची धार कमी करताना दिसतात. यंत्रावर काम करणारा माणूस त्या कामाच्या संस्काराने 'आधुनिक' व्हावा या प्रकारे विचार करणारे पहिल्या पिढीतील उद्योजक आर्थिक व्यवहारापलीकडे माणूस घडवण्याचा विचार करत होते; आतिथ्य-दाक्षिण्य-आपुलकीच्या वळणाने विचार सांगत होते. अर्थकारणातील ही 'देशी' परंपरा जोपासण्याचा किंवा अभ्यासण्याचा विचार इथे फारसा विकसित झाला नाही. अर्थकारणावर आणि व्यवस्थापनावर प्रगत राष्ट्रांच्या विचार-उच्चार-आचारांचा दबाव राहिला. १९६० सालाच्या आसपास डॉ. धनंजयराव गाडगीळ सहकारी संस्था उभारण्यात अग्रणी मार्गदर्शकाचे काम करीत होते. परंतु त्यांच्या निकटवर्ती शैक्षणिक-विद्यापीठीय वर्तुळातून सहकाराचे विशेष अभ्यासक वा समाज-वैज्ञानिक समर्थपणे उभे राहिलेले दिसत नाहीत. इथली माणसे कोणती माहिती कशी देतात याचे निरीक्षण करण्याऐवजी लायकर्ट किंवा थर्स्टन यांच्या साधनांचा वापर सुरू झाला. आकडेवारी चलनी नाण्याप्रमाणे झाली. कोणताही पुरावा आकडेवारीत आला की त्याचा वेष वस्तुनिष्ठ होई. याचा वावर भूसंपादन, पशुधनगणती, साक्षरतेचे प्रमाण किंवा जनगणना यांच्यापासून सर्वेक्षणे, मतदानपूर्व अंदाज, लोकसभेत किंवा विधानसभेत विचारले जाणारे प्रश्न आणि उत्तरे असा सर्वत्र पसरला. आकडा, काहीही करून आकडा मिळाला की, वस्तुनिष्ठा प्राप्त झाली असे भ्रामक समीकरण संशोधनात तर धुमाकूळ माजवते.

मानवी नातेसंबंधांना प्राथमिकता देण्याचे वैशिष्ट्य हे एक दुधारी साधन आहे. ते तीव्र भावनिक अनुभव देते; सुखमय तसेच यातनामयही. त्याग आणि स्वार्थ याही दोन टोकाच्या गोष्टी त्यातून येतात. ज्याला 'आपला' म्हटले त्याला सर्व प्रसंगी सांभाळण्याने वस्तुनिष्ठदृष्ट्या कितीतरी चुकीच्या गोष्टी समाजजीवनात दिसू लागतात. सामाजिक पातळीवर गेल्या पन्नास वर्षांत नातेसंबंध आणि कौटुंबिकता हा भ्रष्टाचाराची यंत्रणा उभारणारा आणि राबवणारा घटक झालेला दिसतो. कायद्याचे राज्य आणि नेकी, सचोटी, निःस्पृहता ही मूल्ये बाजूला सारणारा हा 'संबंधी' आस्थेचा प्रकार सर्वत्र अपवाद निर्माण करायला लागतो. गेल्या पन्नास वर्षांत या वैशिष्ट्याने एकीकडे कहर उडवला पण दुसरीकडे त्याची पीछेहाट झाली. व्यक्तिवादी विचाराचे पाय फक्त पाश्चिमात्य वळणावर भिस्त ठेवणाऱ्या वर्गातच पक्के रोवले गेले असे नव्हे. त्यावर आधारलेल्या शिक्षणामार्फत ते इतर वर्गांमध्येही पोचले. मातीपासून दुरावा हा संस्कृतिभक्षक शिक्षणाचे रूप घेऊन

अनुक्रमणिका








आला आणि आम्ही चांगली चूड दाखवून त्याला घरात घेतला. यामुळे नातेसंबंधात व्यक्तिगत मतलबीपणाचा वावर वाढला. एरवी जो तो आपापला आणि वेळप्रसंगी कामापुरता मामा हा प्रकार शहरांमध्ये जास्त प्रमाणात दिसू लागला. हे प्रकार चालू असतानाच वागण्याच्या रीती सैल पडून प्रत्येकच गोष्ट सापेक्ष असल्याने सोयशास्त्राने ठरवणे शक्य होऊ लागले. एका रीतीच्या जागी दुसरी रीत आली तर त्यात काही समान भूमी निर्माण होण्याची शक्यता असते. परंतु रीती नुसत्याच सैल पडल्या की कुटुंबात ना स्वातंत्र्य ना आज्ञाधारकपणा; कामाच्या अथवा व्यवसायाच्या जागी ना स्वामिनिष्ठा ना तांत्रिक शिस्त; समाजात ना कायदा ना माणुसकी अशी दुहेरी ढासळणी सुरू होते. आजच्या आपल्या बालसंगोपनात, कार्यसंस्कृतीत, समाजजीवनात हे सारे प्रकार दिसत आहेत. त्यामध्ये वर उल्लेख केलेला चतुर्विध समाज अधिकाधिक विस्कळीत आणि अनुशासनहीन झालेला दिसतो. या मानसिक घडणीला वेगवेगळ्या भूतकालीन टप्प्यांचे स्मृतिरंजन आणि वेगवेगळ्या भविष्यकालीन ध्येयांचे आकर्षण आहे. या सर्वांना काबूत ठेवणारे समंजस विकेंद्रीकरण ही गरज ओळखून पावले टाकण्याची वेळ आली आहे.

वस्तुनिष्ठा आणि उदारमतवाद यांना छेद देणाऱ्या या दोनच मुद्यांना धरून बघितले तरी त्यातील एवढी गुंतागुंत पुढे येते. यात कोणता बदल हवा? तो कसा आणता येईल याकडे आता लक्ष देऊ.

– ३ –

समंजस विकेंद्रीकरण असे वर म्हटले. व्यक्तिगत पातळीवर याचा अर्थ कोणता? ज्या चतुर्विध मनोधारणांचा उल्लेख केला, त्या सर्वांनाच समंजस विकेंद्रीकरणाच्या सामाईक पायावर उभे राहता येईल. कदाचित प्रत्येकच मनोधारणेत काही बदल आवश्यक ठरतील. भविष्यकालीन ध्येयांपैकी 'सर्वांना समान' अशी ध्येये कोणती आणि वैयक्तिक पृथकरीत्या साधण्याची ध्येये कोणती याची चर्चा एरवी शक्य नाही.

जेवढ्या जलद गतीने आपण 'प्रगत' राष्ट्रांच्या बरोबरीने जाऊ तेवढे बरे असे मानणारा गट मुख्यत्वेकरून व्यक्तिवादी इहवादी धारणांचा स्वीकार केलेला आहे. त्यांच्यापैकी काहींना भारताच्या प्राचीन भूतकाळाविषयी विचार करण्याची गरज वाटत नाही. त्यांना बुद्धिप्रामाण्याचे, वैज्ञानिक विजिगीषेचे आकर्षण आहे. त्यासाठी लागते ती शिस्त, व्यक्तिनिरपेक्षता, तंत्रविद्येची उपासना या गोष्टी त्यांच्या लेखी प्राथमिक महत्त्वाच्या आहेत. जलद गतीने 'पुढे' जाण्यासाठी तंत्रज्ञान 'आयात' करण्याविषयी साधकबाधक विचार करत बसणे त्यांना मान्य नाही. त्यांना सबुरी नको आहे. बरेचसे जुने 'मरणालागी' जाण्याच्याच लायकीचे आहे, पुढचे पाहा ही वृत्ती त्यांनी अंगिकारली आहे. या गटाच्या दृष्टीने आजच्या स्पर्धेत टिकायचे तर 'त्या खेळा'चे 'नियम' आपण अंगिकारलेच पाहिजेत. ह्या प्रकारे विचार करणारा गट समाजातील उच्चस्तरीयांत, निर्णय घेणाऱ्या स्तरांत गेल्या वीस वर्षांत अधिकाधिक बलिष्ठ झाला आहे. विज्ञान, तंत्रज्ञान, उद्योग यांच्या अंगाने गरज आणि उत्पादन यांचा विचार, भांडवलशाहीचे अर्थकारण आणि सत्तेच्या केंद्रीकरणाकडे ओढ असणारे राजकारण या तिन्हीच्या पाठीशी असणारी मनोरचना आज 'स्पर्धा' या एकाच कल्पनेभोवती उभारली जात आहे. समाजातील उतरंडीत आर्थिक प्रश्नाच्या तातडीमुळे आणि प्राथमिकतेमुळे ही मानसिकता पसरण्याचा वेग वाढत आहे. समंजस विकेंद्रीकरणाचा मनुष्य घडवण्याचा गर्भितार्थ या गटाला मनापासून स्वीकारणे जड जाते, कारण 'कायदा पाळा गतीचा' या मुख्य भानातून घाई होते; सबुरी आणि मागे पडलेल्यांसाठी पुढे गेलेल्यांनी थांबणे त्यांना सहन होत नाही. या दोन गटांचे ध्रुवीकरण अद्याप म्हणावे तेवढे झालेले नाही. म्हणूनच आशेला, समता-बंधुतेला जागा आहे. या सबुरीसाठी संयमाची साधना या मनोरचनेला करावी लागेल, गतीलाही मानुषी बनवावे लागेल. अर्थकारणात आणि राजकारणात ज्या जबाबदारीने विकेंद्रीकरण यायला हवे, त्या जबाबदारीची जाणीव घडवण्यासाठीही प्रयत्न आवश्यक आहेत – आणि ही तर मनुष्यबळ विकासाची निरगाठ आहे. निर्णय घेणारांच्याबाबतचा निर्णय कोणी घ्यायचा? त्यांनाच तर पहिली घडाई हवी आहे.

दुसरा गट देशी परिवर्तनवाद्यांचा, 'ग्यानबा' मध्ये रस असणारांचा. या गटाला स्वातंत्र्यलढ्याची प्रत्यक्ष किंवा जवळून किंवा काठावरून मिळालेली विचारप्रवणता लाभली. त्यांचा पाय निश्चितपणे समन्वयात, आपल्या परंपरेतील चांगले ते टिकवण्यात आणि आचाराच्या पातळीवर रूढ कर्मकांडाचा त्याग करून जीवनातील धर्मनिरपेक्ष प्रांत वाढवणाऱ्या धारणेत होता. विज्ञानाचे महत्त्व ओळखून त्याला साधन म्हणून वागवण्यावर त्यांचा भर होता. भारतीय समाजातील अन्यायाने

पिळलेल्यांची सोडवणूक हा अग्रक्रमाचा मुद्दा होता, त्यामुळे भाकरीचा प्रश्न सुटल्याशिवाय आण्विक विज्ञानाची उठाठेव उपयोगाची नाही, अशी भूमिका या गटात तयार झालेली होती. याच्या जोडीला आत्मिक उन्नतीची भाषाही त्यांच्या साधेपणाची पारंपरिक भक्ती-मुक्तीच्या कल्पनांशी सांगड घालत होती. हा गट मनोधारणेच्या दृष्टीने अंधश्रद्ध नव्हे पण टोकाचा विज्ञाननिष्ठही नव्हे, अशा 'चर्चिक'वृत्तीचा होता. उत्पादन व्यवस्था आपण काबीज करावी अशी आकांक्षा त्यांना नव्हती; गरजा कमी ठेवण्यावर भर होता. राजकारणात हा गट चळवळी करणारा विरोधी पक्ष राहिला – निदान पहिली पंचवीस वर्षे दुर्बलही राहिला – आणि सत्ताधारी पक्षाने त्यांचीच भाषा वापरून घोडे दामटत ठेवले. लोकशाही समाजवाद, धर्मनिरपेक्षता यांच्या बळावर राजकारणात विभागणीसुद्धा झाली नाही, ध्रुवीकरण तर दूरच. सहकार आणि विकेंद्रित सत्तासंकल्पना यांचा पाठपुरावा केला तरी समोर चित्र आले ते सहकारी मुखवट्याने वावरणाऱ्या एकाधिकारी वृत्तीचेच. त्यामुळे हताशमनस्कता आणि वैफल्य यांचा धस लागून या गटाची आत्मिक ताकदही क्षीण होऊ लागली. या गटासमोर आव्हान आहे ते गतिमान आर्थिक ताकदीला संयमाचा अंकुश लावण्याचे, गरजा कमी राखूनही समृद्धीची दिशा उघडण्याचे. एरवी त्यांना शक्य असलेल्या समंजसपणाला आशय राहत नाही, आणि विकेंद्रीकरण शेवटच्या माणसापर्यंत पोचतही नाही. या गटाला मनुष्यबळ विकासात निर्णयशक्ती कमावण्याचा दीर्घोद्योग सत्तेबाहेरून करण्याचे महाकर्म करायला हवे – सत्ता हाती आल्यावर त्यांना स्वतःच्या कच्चेपणाचे जे पोपडे कळले, ते बघता सत्ताधारी होऊन असे काही करणे महाकठीण होते हेही कळलेच आहे, कारण पुन्हा मनुष्यबळ विकासातील तीच निरगाठ. हा गट सत्तेत सहभागी झाला तेव्हा समन्वयाचीच 'ऐसी तैसी' झाली, बाकी मग फुकाच्या चर्चा ठरतात.

याच गटाचे बळ कमी करणारी आणखी एक गोष्ट बाहेरच्या आर्थिक उलाढालीतून घडली. हे काहीही बोलत असले तरी स्पर्धेच्या अर्थकारणात त्यांच्यापैकीच काही सामील झाले. त्यात चढले, वाढले. मग या गटातल्या गटात उंबऱ्याबाहेरचा 'तळागाळातला माणूस' उंबऱ्याच्या आत समृद्ध सुप्रतिष्ठित दिसू लागला, त्याची पुढची पिढी साधेपणाला नकार देऊ लागली. (हा आत्ताचा विषय नसल्याने त्यात पडत नाही, पण हे 'घरचे आहेर' तपासायला हवेत हे मात्र खरे.)

तिसऱ्या गटात आपला ग्यानबा. मूळ पिंड म्हणावा असा भारतीय व्यक्तिमत्त्वाचा गाभा. अटळपणे सामाजिक-धार्मिक, कमीअधिक श्रद्धाळू, कमीअधिक चतुर पण निश्चितपणे आत्मनिष्ठ आणि नात्यांनी बांधलेला. बदलाला फारसा अनुकूल नव्हे, पण जरा 'दमानं घ्या', 'सरकून घ्या', 'माणुसकीनं घ्या' आणि 'समजून घ्या', 'जाऊन द्यात', 'सोडून द्या' अशा धोरणाने वागून कोणतीच गोष्ट फार अटीतटीला येणार नाही याची काळजी घेणारा. तजवीज करणारा. एकमत झाल्याची खात्री असताना लावून धरणारा आणि त्यापोटी परंपरेची कास धरणारा, चालत आलेले पुढे चालवणारा, या गटाला हलवले पाहिजे ही गरज प्रत्येकच ऐतिहासिक वळणावर वाटली, आणि अशा नेतृत्वाच्या प्रेरणेने ग्यानबाची वाटचाल चालू राहिली. पण स्वतःहून पुढे होऊन लक्ष आकर्षून घेणे, रीत मोडण्याचा अफाटपणा करणे त्यामध्ये नव्हते. आयुष्याची मार्गदर्शक तत्त्वे म्हणून 'हे इथलं काही बरोबर येत नाही' अशा पारलौकिकाच्या पारंपरिक मांडणीतून आलेली, कर्म-पुनर्जन्म आणि वर्णाश्रम यांच्या आधारावर चालणारी, शिवाय प्रादेशिक सांस्कृतिक वैशिष्ट्यांनी घडवलेली एक लोकसंहिता ग्यानबाच्या गाठी होती. त्याला आर्थिक भान फारसे स्पष्ट नव्हते. यंत्रयुगाबरोबर ते येऊ लागले तसे शेती आणि उद्योग यातील तफावत ग्यानबाच्या जीवनावर ताण आणू लागली. त्याचबरोबर राजकीय जागृती आणि लोकशाही चौकटीतील सत्ताकांक्षा त्याच्या कधी नव्हे एवढी निकट आली. यातून ग्यानबाच्या घडणीवर परिणाम होऊ लागला आहे. त्याच्यात समंजस विकेंद्रीकरणाची जी मूळ बीजे आहेत त्याची जोपासना नव्या हिकमतखोरीशी टक्कर देऊन करायला हवी आहे. एका अर्थी हा चळवळीचा विषय आहे, दुसऱ्या अर्थी तो स्वतःची कुशलता आणि क्षमता बहुअंगी करण्याचा विषय आहे, आणि, पुढे जाऊन समंजस विकेंद्रीकरणातून जबाबदार समृद्धीकडे जाण्याशीही निगडित आहे. परिवर्तन आपल्याला नकोसे असले तरी आपल्यावर कोसळते हे कळून चुकले आहे. आता गरज आहे ती या परिवर्तनाच्या प्रक्रियेत नियामक भूमिका बजावण्यासाठी तयारी करण्याची.

चौथ्या गटाची निर्मिती बहुसंख्येतील रूढिप्रियतेचा फायदा घेणाऱ्या सवर्णांमधून झाली आहे. 'ग्यानबा'ला उपभोगाच्या आमिषाने ओढणारा पहिला गट आणि पापपुण्याच्या कल्पनांनी, आत्मश्रेष्ठत्वी मग्न असणाऱ्या अस्मितेच्या कल्पनांनी ओढणारा



अनुक्रमणिका

हा गट यांच्यात एक विचित्र हातमिळवणी दिसते. दोन्ही गट ग्यानवाला 'वापरू' पाहतात. त्याला समंजस करण्याकडे दोघांचेही लक्ष नाही. या गटाला धर्माचे आकर्षण माहीत आहे आणि वर उल्लेखिलेल्या दुसऱ्या गटाशी त्यांची वैचारिक लढाई आहे. बुद्धिप्रामाण्यातून येणारी प्रश्नकर्ती वृत्ती त्यांना पसंत नाही. त्यांचा भर आज्ञापालनावर आणि उतरंडी कायम ठेवण्यावर आहे. धार्मिक बहुसंख्येच्या जोराचा किंवा अल्पसंख्येच्या एकगठ्ठा धाकाचा त्यांना श्रेष्ठत्व टिकवण्यासाठी, सिद्ध करण्यासाठी वापर करायचा आहे. पारंपरिक श्रेष्ठतेचा आधार भक्कम ठेवून नव्या व्यापारवादी रचनेतही हे स्थान कायम ठेवण्यावर त्यांचा भर आहे.

या गटाला निःपातवादाचे आकर्षण विशेषच आहे. त्यामुळे पहिल्या गटातील स्पर्धेच्या तत्त्वातून येणारी वृत्ती काही बाबतीत त्यांना सोयीची वाटते. फाळणीच्या घटिताने जे काही अमानुष आणि अघटित घडले, ते समजून ओलांडण्याऐवजी ते जळते ठेवून सूड पेटते ठेवण्यात या गटाचे काही प्रेरणास्रोत आहेत. स्वातंत्र्यपूर्व काळातील हिटलरच्या आकर्षणाची प्रेरणा, वंशश्रेष्ठत्वाची कल्पना, प्राचीन भारतात सर्व विद्या होत्याच, आधुनिक काळातील शास्त्राचे किंवा विज्ञानाचे शोध फोल आहेत, आध्यात्मिकतेत आपण सर्व जगात वरचढ आहोत इत्यादी विश्वासांची चौकट घेऊन राजकारणात मूलतत्त्ववादी, अर्थकारणात मौनवादी आणि बौद्धिकदृष्ट्या व्यक्तिनिष्ठता आणि विज्ञान यांना सोयीनुसार एकत्र बांधणारी ही मनोरचना आहे. त्यांना समंजसपणा मान्य होणे कठीण आहे. कारण धर्माधिष्ठित विचाराने त्यांची गृहीतेच त्याआड येतील. श्रेष्ठींना सर्वाधिकार देण्याची आणि नंतर आज्ञापालनाची सवय लागल्यावर विकेंद्रीकरण कदाचित अधिक जड जाईल. पण 'सर्वांसाठी' त्रिकालाबाधित आणि श्रेष्ठीप्रणीत सूत्रे दिल्यानंतर गटवार काम यालाच विकेंद्रीकरण म्हणणे ते अधिक पसंत करतील. जबाबदार समृद्धी हे ध्येय मान्य करताना सामाजिक न्यायाविषयीची त्यांची धारणा भिन्न असेल. प्रत्यक्ष सत्ता हाती आल्यावर उतरंडीची नखे लागून याही गटात चलबिचल दिसून येते. ती पाहता याही गटात आशेला जागा आहे, कारण तेथे प्रश्न विचारणारी माणसे उभी राहू लागली आहेत. गृहीते तपासण्याच्या तयारीचे हे पहिले पाऊल ठरू शकते.

अशा प्रकारे सर्वच गटांमध्ये बदलाची आशा धरणे शक्य आहे. तो प्रत्यक्षात घडण्यासाठी व्यापक सहमतीची, वैचारिक तसदी घेण्याची गरज आहे. म्हणजे मतभिन्नता राहूनही समृद्धी आणि जबाबदारी या दोन्ही ध्येयसिद्धी प्राप्त होतील. यासाठी राजकीय साधने, आर्थिक दबाव या गोष्टी उपयोगी पडणार नाहीत. व्यक्तिगत म्हणता येतील इतके या प्रयत्नांचे विकेंद्रीकरण शक्य आहे. सामूहिक प्रयत्नांचे स्वरूपही मुख्यत्वेकरून एका आत्मपरीक्षणाच्या भूमिकेतूनच ठरवावे लागेल. याला टोलेजंग चळवळीचे, प्रचंड संख्येच्या पंथाचे कर्मकांडनिष्ठ स्वरूप नकोच आहे. जबाबदार वर्तनासाठी आवश्यक असलेला मूल्यविवेक, समृद्धीसाठी आवश्यक असलेले शिस्तबद्ध कष्ट, समंजस विकेंद्रीकरणासाठी आवश्यक असलेली परस्पर विश्वासाची आणि निःस्पृहतेची प्रत ज्याची त्यानेच वाढवायची बाब आहे. ते शक्य आहे, इष्ट तर आहेच आहे.

– ४ –

हे सारे करायचे ते कोणी, कुठे, कसे, केव्हा आणि का याची उत्तरे माझ्या व्यावसायिक कामात मला नेहमीच द्यावी लागतात. ती देतानाचे संदर्भ त्या त्या संस्थेचे, त्या त्या समूहाचे त्या त्या पातळीवरच्या कर्मचारीवर्गाचे असतात. मग कधी 'माझ्या कंपनीत बाराशे गाढवे आहेत' असे म्हणणारा मालक माझ्यापुढे असतो, तर कधी पंचतारांकित हॉटेलात कंपनीच्या खर्चाने होते म्हणून मोज्यांसकट सर्व 'धुलाई' करणारा उच्चपदस्थ व्यवस्थापक असतो, तर कधी 'अब तो हम बन चुके' तेव्हा आमच्या मुलांसाठी काही कराल का, असे विचारणारा प्रशासकीय अधिकारी असतो. या सर्वांनाच आत्मपरीक्षणाची कौशल्ये व तंत्रे समजावून सांगता येतात. तेव्हा आपल्या आयुष्यात आपण काय करतो आहोत आणि ते शुभंकर आहे का, याची तपासणी करायला 'अनधिकारी' माणूस मला अजून भेटला नाही. तेव्हा या दहाबारा हजार शितांवरून कोट्यवधींची आशा धरायला हरकत नाही असे मनाने घेतले आहे.

एखाद्या प्रशिक्षण कार्यक्रमाच्या शेवटी धोतर-सदऱ्यात वावरणारा, कोन करून गांधी टोपी घालणारा माणूस निरोपाचे भाषण करायला उठतो. 'मी आजपावतर कधी चार लोकात बोललेला न्हाई. पण आज या कार्यक्रमामुळे मला धीर आलाय. उद्या कुणी सांगावं, मी पन्नास लोकात बोलंन् आन सा म्हैन्यानी सभेत बी बोलंन'... तो जमिनीवर ठाम उभा असतो आणि माझ्या आशेला जागा करून देत असतो.

❖❖

वाद-संवाद

# रावसाहेब कसबे यांची विवेचनशैली आणि मे.पुं. रेगे

**रावसाहेब कसबे**

*नवभारत* मासिकाच्या मे-जून १९९७च्या अंकात प्रा. मे.पुं. रेगे यांनी *मानव आणि धर्मचिंतन* या ग्रंथाच्या निमित्ताने माझ्या विवेचनशैलीबद्दल सविस्तर लिहिले आहे. जाता जाता त्यांनी या ग्रंथाचे महत्त्व आणि त्याच्या शैलीतील दोष त्यांच्या 'खास पद्धती'ने दाखविले आहेत. त्याबरोबरच प्राचीन भारतीय तत्त्वचिंतनातील काही मूलभूत समस्यांनाही त्यांनी स्पर्श केलेला आहे. मला अनेक प्रश्न विचारून हैराण केलेले आहे. माझ्यावर काही आरोपही केलेले आहेत आणि काही आळही घेतलेले आहेत. प्रा. रेगे यांनी हे कोणत्याही हेतूने केलेले असले, तरी मी त्यांचे स्वागत करतो आणि त्यांना मनःपूर्वक धन्यवाद देतो. आभारही मानतो.

वास्तविक पाहता प्रा. रेगे यांनी *नवभारत*मध्ये लिहिलेल्या लेखासारखा लेख एखाद्या वृत्तपत्रीय समीक्षकाने लिहिला असता, तर मी त्याला उत्तर लिहिण्याच्या भानगडीत पडलो नसतो. परंतु प्रा. मे.पुं. रेगे हे महाराष्ट्राचे एक मान्यवर आणि ज्येष्ठ विचारवंत आहेत. त्यांच्या मार्गदर्शनाने लेखकांची एक पिढी मराठी साहित्यात उभी राहिलेली आहे. त्यांनी मराठी वाचकांना पाश्चिमात्य तत्त्वज्ञानाची ओळख करून देण्याचे मौलिक कार्य पार पाडलेले आहे. त्यामुळे ते माझ्या पिढीचे एक आदराचे स्थान आहेत. त्यांनी त्यांच्या या लेखात उपस्थित केलेल्या प्रश्नांपैकी काही महत्त्वाचे आहेत, काही खिल्ली उडविणारे आहेत तर काही खोडसाळपणाचे आहेत. याची जशी मला कल्पना आहे तशी अनेक वाचकांनाही आहे. त्यामुळे त्यांच्या लेखाला उत्तर म्हणून नव्हे, तर त्याला प्रतिसाद देणे हे एक लेखक म्हणून मी माझे कर्तव्य मानतो. अशा प्रकारचे प्रतिसाद मराठीचे मरगळलेले विचारविश्व चैतन्यशील बनविण्यासाठी उपयोगी पडावेत, अशी आशा बाळगणे अगदीच निरर्थक ठरू नये.

या ठिकाणी सुरुवातीलाच हे कबूल केले पाहिजे की, *मानव आणि धर्मचिंतन* हा ग्रंथ प्रकाशकांनी देखणा आणि जास्तीत जास्त निर्दोष काढण्याचा प्रयत्न केला आहे. त्यामुळे त्यात काही चुका राहून गेल्याच असतील तर त्याची जबाबदारी पूर्णपणे माझ्यावर आहे. प्रा. रेगे यांनी माझ्या अध्ययनपद्धतीवर, मी दिलेल्या इंग्रजी शब्दांच्या मराठी भाषांतरावर, माझ्या बिनधास्तपणे विधाने करण्यावर, वैचारिक लेखनातील तंत्राच्या बाजूने काही आक्षेप घेतले आहेत. त्यांतील एक आरोप 'चोरीचा' किंवा 'उचलेगिरीचा' आहे. परंतु तो संदिग्ध स्वरूपाचा आहे. प्रा. रेगे यांनी तो आरोप संदिग्धपणे न करता थेट आणि स्पष्टपणे केला असता, तर मला अधिक आनंद झाला असता. कारण त्या आरोपांचे मूळ माझ्या लेखनपद्धतीत नसून, ती पद्धती रेगे यांनी नीट समजून न घेतल्याने आणि शैलीचिकित्सेची किमान शिस्त त्यांना पाळता न आल्याने त्यांच्या स्वभावातच कसे सापडते, त्याची सविस्तर चर्चा पुढे येईल. रेगे एकीकडे *नासदीयसूक्तभाष्या*तील "विवेचन स्वतःचे म्हणून कसबे देतात. त्यांनी ज्यातून हे विवेचन उद्धृत केलेले असते, ते पुस्तक जर मराठी असेल तर ही जवळ जवळ चोरी असते" (*नवभारत* पृ. ४९) असे म्हणतात. तर दुसरीकडे लगेच "कसबे प्रामाणिक आहेत. कोणत्या ग्रंथातून त्यांनी उचल केलेली आहे ह्याची स्पष्ट कल्पना ते वाचकांना ग्रंथनामावलीत देतात." (*नवभारत* पृ. ५०) असाही पोचारा फिरवितात. ही आत्मविसंगत भूमिका कशासाठी? ही पळवाट कशासाठी? कसब्यांनी फक्त ग्रंथनामावली दिली आहे की संदर्भटीपाही दिल्या आहेत? अशा पळवाटा ठेवलेल्या लेखनाला विवेचनशैलीची समीक्षा म्हणत नसतात. शैलीचिकित्सा ही इतकी सवंग गोष्ट नाही. तिचा वापर वैचारिक वाङ्मयाकडे इतक्या थिल्लरपणे बघण्यासाठी होऊ नये. प्रा. रेगे यांच्या सर्वच आक्षेपांना उत्तर देण्यापूर्वी काही गोष्टी मला नोंदविणे आवश्यक वाटते. त्यांचा पार्श्वभूमी म्हणून उपयोग होऊ शकेल.

### शैलीचिकित्सा : एक गंभीर जोखीम

कोणत्याही लेखकाची शैली हा त्याच्या व्यक्तिमत्त्वाचा एक अविभाज्य भाग असतो. ती लेखकाला आनुवंशिकतेने लाभलेली किंवा कोण्या अलौकिक शक्तीने बहाल केलेली गोष्ट नसते. लेखकाला लेखनासाठी आवश्यक असलेल्या इतर अनेक








बाबींबरोबरच तीही कमवावी लागते. या अर्थाने ती मानवी प्रयत्नातून साकार झालेली एक अर्जित कला (acquired skill) असते. लेखकाच्या या प्रयत्नांना त्याच्या जीवन-अस्तित्वाच्या परिस्थितीचे संदर्भ असतात. लेखक ज्या अनुकूल-प्रतिकूल परिस्थितीत स्वतःचे व्यक्तिमत्त्व घडवीत असतो, त्यातून त्याच्या व्यक्तिमत्त्वाला जसे त्याचे स्वतःचे एक वैशिष्ट्य प्राप्त होते, तशीच काही वैशिष्ट्ये त्याच्या शैलीलाही प्राप्त होत असतात. त्यामुळे एखाद्या लेखकाच्या विवेचनशैलीची समीक्षा करताना टीकाकाराला पहिल्यांदा त्या लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाचा, तो ज्या परिस्थितीत विकसित झाला त्या परिस्थितीच्या वैशिष्ट्यांचा, तो जो विषय अभिव्यक्त करू इच्छितो त्या विषयाचा, त्या विषयाच्या मूळ गाभ्याचा, आणि त्या संदर्भात येणाऱ्या अनेक आनुषंगिक विषयांचा (निदान त्यांतील काहींचा तरी) गांभीर्याने विचार करणे आवश्यक असते. असा गांभीर्याने विचार करून केलेली शैलीची चिकित्सा ही केवळ वाचकांनाच त्या लेखकाचे लेखन समजून घेण्यास उपयोगी पडते असे नाही, तर ती लेखकालाही त्याच्या पुढील लेखनासाठी मार्गदर्शक ठरू शकते. विवेचनशैलीच्या समीक्षेचे प्रयोजन लेखकाचे लेखन वाचकांना समजण्यास मदत करण्याचे असते. ते लेखक आणि लेखनाबद्दल गैरसमज किंवा अज्ञान पसरविण्याचे नसते. हे प्रयोजन साध्य करणारी शैलीचिकित्सा ही स्वतःच एका वाङ्मयीन निर्मितीचे रूप घेऊ शकते. परंतु तिचा खिल्लीसाठी, उपहासासाठी किंवा बदनामीसाठीही जाणीवपूर्वक अतिरिक्त वापर केला, तर ती बाजारगप्पांना किंवा गावगप्पांना ऊत आणण्याचे एक साधन बनू शकते. म्हणूनच शैलीचिकित्सा ही एक जोखीम असते आणि तिच्याकडे गांभीर्याने पाहिल्याशिवाय टीकाकाराला ती पेलताही येत नसते.

मराठी विचारविश्वात दुर्दैवाने शैलीकडे इतक्या गांभीर्याने अभावानेच पाहिले जाते. तिथे अनेक पीठे आपापले बस्तान मजबूत करण्यात मग्न असल्यामुळे, तिथे आपापसात कमालीची तुच्छता आणि द्वेषभावना असल्यामुळे, नवनवे लेखक तिथे रमू शकत नाहीत. त्यांना तिथे असुरक्षित वाटते. कारण त्यांच्या सुप्त गुणांचा नैसर्गिक विकास व्हावा असे कुणाला वाटत नाही आणि तशी परिस्थितीही कोणी निर्माण करीत नाही. उलट, गेल्या वीस-पंचवीस वर्षांत महाराष्ट्राच्या विविध विभागांतून पुढे आलेल्या लेखकांना प्रस्थापित पीठांनी शैलीचिकित्सेच्या नावाने बरेच सतावल्याचा इतिहास सर्वश्रुत आहे. कधी त्यांच्या लेखनातील मुद्रणदोष एकत्रित करून, कधी त्यांना संस्कृत किंवा इंग्रजी येतच नाही असे सूचित करून, कधी त्यांना अनाठायी आणि अनावश्यक प्रश्न विचारून, कधी त्यांचा तेजोभंग करून, कधी त्यांना नाउमेद करून तर कधी त्यांना खिजवून ही पीठे आपापली स्थाने सुरक्षित ठेवण्यात यशस्वी झालेली आहेत. या साऱ्या प्रकारात जे खिजले, त्यांची सारी शक्ती शैलीचिकित्सा करणाऱ्या टीकाकाराला उत्तरे देण्यात खर्च झाली. जे नाउमेद झाले, त्यांनी लेखन थांबविले. परंतु अशा प्रतिकूल परिस्थितीतही काहीजण लिहीतच आहेत ही मराठी विचारविश्वाच्या भवितव्याच्या दृष्टीने आश्वासक अशी गोष्ट आहे, असे मी मानतो.

ज्या वाचकांना या 'आतल्या' भानगडी माहीत नसतात, त्यांना या वरवर दिसणाऱ्या गोष्टींचा नीट अर्थ कळत नसतो. प्रा. मे. पुं. रेगे यांनी माझ्या ग्रंथाविषयी त्यांच्या लेखात अगोदर पाच-पन्नास विचारवंतांची, शास्त्रज्ञ आणि लेखकांची नावे उद्धृत करून उपहासाने लिहिले आहे, "ह्या वैचारिक गलबल्यात मराठी भाषेचा इतिहास आणि तिच्या विकासाची भावी दिशा याविषयीचे मूलगामी विचार येतात. हे सारे थक्क करून सोडणारे पांडित्य आहे." यावरून *मानव आणि धर्मचिंतन* या ग्रंथातील 'मराठी भाषेपुढील आव्हाने' (पृ. ७ ते ११) आणि 'सांस्कृतिक नेतृत्वातील संघर्ष' (पृ. २४ ते २८) या उपशीर्षकाखालील मजकूर प्रा. रेगे यांच्या किती जिव्हारी लागला, हे स्पष्ट होते. त्याचाच परिणाम म्हणून रेगे अनेकदा कसे बेभान होत गेले आणि लेखनात अगदी किरकोळ तांत्रिक स्वरुपाच्या चुकांकडेही त्यांचे कसे दुर्लक्ष झाले, हे पुढे स्पष्ट होईलच. याचा अर्थ प्रा. रेगे यांनी हा लेख केवळ माझी खिल्ली उडविण्यासाठी लिहिलेला आहे असा समज कृपया कोणी करून घेऊ नये. त्यांच्या लेखातील खिल्ली, उपरोध आणि हातचलाखी या गोष्टी केवळ हिमनगाचा वरचा दृश्य भाग आहेत. त्याखाली प्रचंड अशी मानसिक खळबळ आहे. त्या खळबळीत 'तत्त्वज्ञान' आणि 'तत्त्वज्ञानी' ज्या मूलभूत आवर्तात स्वतःहोऊन अडकले आहेत, त्यापुढची हतबलता आहे. त्याखाली आत्मप्रस्थापनेसाठी सर्वशक्तिनिशी केलेली धडपड आहे. त्याखाली 'तत्त्वज्ञाना'ची स्वायत्तता व शुद्धी टिकविण्यासाठी, त्यावर होणाऱ्या आक्रमणाची गंभीर दखल आहे. हे मुळात प्रा. रेगे यांचे प्रश्न नाहीतच. ते तत्त्वज्ञानाच्या इतिहासाने त्यांना विचारायला लावलेले प्रश्न आहेत.

प्रा. मे.पुं. रेगे यांची या ठिकाणची भूमिका एका प्रवक्त्याची आहे. त्यांची अडचण एवढीच आहे की, त्यांना ती भूमिका सडेतोडपणे पार पाडता येत नाही. त्यांना जे म्हणायचे आहे ते ठोसपणे म्हणता येत नाही. त्यांची अवस्था 'ताकाला जाऊन गाडगे लपविण्याची' झाली आहे. ही अवस्था केविलवाणी आहे. म्हणून ती गंभीर आहे. हे प्रकरण नेमके काय प्रकरण आहे, याचा उलगडा या लेखाच्या शेवटी होईल. तूर्त प्रा. रेगे यांच्या दोन-तीन किरकोळ आरोपांचा विचार करू.

**माझी लेखनपद्धती**

प्रा. मे.पुं. रेगे यांनी यानिमित्ताने मी एखाद्या ग्रंथापुढे शरणागत कसा होतो, हे त्यांच्या 'खास शैलीत' स्पष्ट केले हे चांगलेच झाले. त्यांची ही टीका मला मान्य आहे आणि ती मी यापूर्वीही अनेकदा मान्य केलेली आहे. परंतु शरणागती पत्करलेल्या लेखकांत अहिताग्नि राजवाडे आणि ग्रंथात *नासदीयसूक्तभाष्या*चा समावेश मात्र निश्चितच नाही. त्यांत कदाचित कार्ल मार्क्स, कोन्राड लोरेन्त्झ, सिग्मंड फ्राईड, एरिक फ्रॉम, इ.एच. कार, जे. ब्रोनोवस्की किंवा कोसंबी पितापुत्र, रोमिला थापर, गुरुदेव रा.द. रानडे, आचार्य नरेन्द्र देव इत्यादींच्या काही ग्रंथांचा मात्र निश्चित समावेश आहे. सुजाण वाचकाला त्याच्या अनेक खुणा माझ्या अन्य लेखनात आणि *मानव आणि धर्मचिंतन* मध्येही दिसतील. मी काही 'व्युत्पन्न' वगैरे असा कोणी पंडित नाही. माझ्या सतरा पिढ्यांना पुस्तके निषिद्ध असल्याने तशा प्रकारचा परंपरागत वारसाही मला लाभलेला नाही. तत्कालीन परिस्थितीच्या काही जखमा उरात जरूर आहेत, परंतु त्याबद्दल आज माझी काही तक्रारही नाही किंवा त्याचे भांडवल करण्याचा साधा विचारही मनाला कधी शिवला नाही. त्याचप्रमाणे, माझे वाचनही वेताचेच आहे. परंतु जे थोडेफार आहे ते अभिजात ग्रंथांचे आहे. आणि अभिजात वाङ्मयीन कलाकृतींचेही आहे. प्रा. रेगे कल्पनाशक्तीने काही इंग्रजी उताऱ्यांचा वगैरे जो तुच्छतेने उल्लेख करतात, त्यामागे त्यांचा या क्षेत्रातील अहंकार आणि इतरांना तुच्छ लेखण्याची हौस आहे. प्रा. रेगे त्याला 'शरणागती' भलेही म्हणोत, मी त्याला 'प्रेमात पडणे' असेच म्हणतो. कारण त्या ग्रंथांनीच जीवनअस्तित्वाचा अर्थ लावण्याचे, आणि जीवनातील जटिल गुंते सोडविण्याचे बळ दिले. रेगे ज्याला 'शरणागती' म्हणतात, तिच्यातून बाहेर पडण्याची चिकित्सक दृष्टीही त्या ग्रंथांनीच दिली. ते सारेच ग्रंथ मला समजले आहेत असा माझा कधीच दावा नव्हता आणि आजही नाही. स्वतःसंबंधी असे फार लिहू नये, असा सुसंस्कृत समाजाचा संकेत आहे. परंतु प्रा. रेगे एकदम खिजविण्याच्या पातळीवर गेल्याने तो संकेत मोडल्याचे दुःखही आहे.

प्रा. रेगे यांचा माझ्यावर दुसरा आरोप असा आहे की, अधूनमधून मला लेखनात इंग्रजी शब्द पेरण्याची 'हौस' आहे. माझी हौस इतक्या सामान्यप्रतीची नाही हे बहुधा त्यांना माहीत नसावे असे दिसते. कारण त्यांनी माझे साहित्य वाचलेले नसावे. एखाद्या सामान्य किंवा इवलासा जीव असलेल्या विषयाला मी स्पर्श करीत नाही. एखादा विषय जेव्हा प्रत्यक्ष जगण्यालाच आव्हान म्हणून समोर उभा राहतो, त्या वेळी मी माझ्या कुवतीप्रमाणे परंतु पूर्ण सामर्थ्यानिशी त्याच्या नादी लागतो. त्यात स्वतःला झोकून देतो. त्या विषयासंबंधी स्वतःला जे उत्कटपणे आणि प्रामाणिकपणे सांगावे वाटते ते कोणतीही तडजोड न करता ठामपणे सांगत जातो. त्यामुळेच रेगे म्हणतात तशी माझ्या लिखाणात "काही विधाने विनधास्तपणे केलेली आढळतात." हा त्यांचा तिसरा आरोप. हा आरोपही मला मान्य आहे; कारण त्यातून पळून जाण्याच्या वाटा मी स्वतःच बंद केलेल्या असतात. आपल्याकडे अनेक गोष्टी हातच्या राखून, कोण काय म्हणेल याचा अंदाज घेऊन, स्वतःची मान्यता धोक्यात येणार नाही याची काळजी घेऊन लिहिणाऱ्या-बोलणाऱ्याला समतोल विचारवंत म्हणून आणि त्या दृष्टीने खास तंत्राचा उपयोग करून लिहिल्या गेलेल्या साहित्याला 'वैचारिक साहित्य' मानण्याची प्रथा आहे. अशा प्रकारचे तंत्र मला अवगत करता आले नाही किंवा मला त्या प्रकारच्या तंत्राची आवश्यकताही वाटली नाही असे कोणी म्हणाले तर ती मर्यादाही मला मान्यच होईल. अर्थात या मर्यादेचा मानसिक त्रास मात्र मी अनेकदा भोगलेला आहे. लेखक ज्या जीवनमूल्यांशी आणि विचारधारेशी बांधिलकी स्वीकारीत असतो त्यांच्याशी केवळ मान्यतेसाठी तडजोडी होऊ नयेत. असा अप्रामाणिकपणा करण्यापेक्षा माझ्या लेखनातील विनधास्त वाटणाऱ्या विधानावर जेव्हा टीकाकार आक्षेप घेतात, तेव्हा त्या आक्षेपांना साधार उत्तरे देणे मी पसंत करतो. ती जबाबदारी मी हौसेने स्वीकारतो. माझ्या हौसेचे स्वरूप या प्रकारचे आहे.

आपले मराठी वैचारिक लेखन दिवसेंदिवस अधिक तांत्रिक होत आहे आणि ते त्याहीपेक्षा अधिक तांत्रिक होणार असे

दिसते. एखाद्या क्षेत्रातील प्रस्थापितांना जेव्हा त्यांच्याबाहेरील समूहाचे आव्हान स्पष्ट दिसू लागते, तेव्हा त्या क्षेत्रातील मूलभूत कर्तृत्वापेक्षा त्यातील तंत्रालाच अधिक महत्त्व दिले जाते आणि ते अधिक तांत्रिक बनते. आपल्याला ही परंपरा वेदकाळापासूनच लाभलेली आहे. त्याचा परिणाम वैदिक कवि-ऋषींचे कर्तृत्व गौण ठरले आणि ब्राह्मण-ग्रंथांचे यज्ञतंत्र प्रतिष्ठित झाले. मराठी विचारविश्वात हीच परंपरा पुढे चालवायची असे ठरलेले दिसते. आपण अन्य भाषांतील ग्रंथांची किंवा मजकुराची सोपी, ओघवती भाषांतरे करूच शकत नाही का? त्यासाठी तांत्रिक शब्दांऐवजी बरोबर अर्थ सांगणाऱ्या लोकभाषेतील रूढ शब्दांचा वापर करूच शकत नाही का? या तंत्राने पार ताळतंत्र सोडल्यामुळे, कोणाला पटो अथवा न पटो, परंतु वैचारिक लेखन हा कुचेष्टेचा विषय बनला आहे आणि 'झोप येत नसेल तर वैचारिक पुस्तक उशाला ठेवावे' अशी व्यंग्यचित्रेही प्रसिद्ध होत आहेत. यातून बाहेर कसे पडायचे? बाहेर पडण्याचा मार्ग कोणता? यावर गंभीरपणे विचार करण्याची वेळ आलेली आहे.

या प्रश्नाचा विचार प्रस्थापित करू शकतील असे दिसत नाही. त्यांना त्यांच्या मान्यतेलाच आव्हान देणाऱ्या नव्या शक्तींनी हैराण केलेले आहे. त्यांना मराठी साहित्य आणि त्यातील विचारविश्व संपन्न आणि समृद्ध करण्यापेक्षा स्वतःची मान्यता टिकविणे अधिक महत्त्वाचे वाटते. मराठी विचारविश्वाची संपन्नता त्यांच्या जगण्याच्या प्रयोजनाचा भागच राहिलेला दिसत नाही. म्हणून ज्यांच्या जगण्याच्या प्रयोजनाचा तो भाग कालौघात बनलेला आहे, त्यांनाच त्याची आच लागणार हे उघड आहे. त्यांनाच संस्कृतीच्या मुळांचा आणि परंपरेच्या स्रोतांचा उगम नव्याने शोधण्याची आवश्यकता वाटणार. कारण हे प्रश्न त्यांच्या प्रत्यक्ष जगण्याशी, जीवनाच्या प्रयोजनाशी, स्वतःचे स्थान शोधण्याशी निगडित आहेत. म्हणून आता ही जबाबदारीही त्यांचीच आहे आणि ती पेलण्यासाठी बळ कमावणेही त्यांनाच भाग आहे. त्यासाठी त्यांना मारक तंत्रे झुगारून द्यावी लागतील आणि पोषक तंत्रांचा विकास करीत पुढे जावे लागेल. माझ्या लेखनावर तंत्राच्या मोडतोडीची टीका होत आली आणि ती पुढेही होत राहील. माझ्या अधिकाराला अनेकांनी आव्हान दिले आणि पुढेही देत राहतील. परंतु पोषक तंत्राला मी अद्याप तरी अव्हेरलेले दिसत नाही आणि आव्हान देणाऱ्यापुढे कधी शरणागतही झालो नाही.

ज्या वेळी मी एखाद्या विषयाच्या विवेचनासाठी एका किंवा एकापेक्षा जास्त लेखकांच्या लेखनाचा आधार घेत असतो त्या वेळी सुरुवातीलाच एक तळटीप/संदर्भटीप देऊन त्या विवेचनासाठी कोणकोणत्या ग्रंथांचा आधार घेतला आहे ते ग्रंथकारांच्या नावानिशी नोंदवीत असतो. त्या विषयाच्या सर्वसाधारण विवेचनात जसा त्या संदर्भग्रंथांच्या कर्त्यांच्या विचारांचा अंश असतो तसाच त्यांच्याबद्दलच्या माझ्या आकलनाचा आणि त्यातून सुचलेल्या विचारांचाही भाग असतो. ते आकलन चूक अथवा बरोबर असू शकते, परंतु ते माझे असते म्हणूनच त्याची जबाबदारीही मी स्वीकारलेली असते. जेव्हा ते सर्वसाधारण विवेचन एखाद्या विशिष्ट मुद्याला स्पर्श करते, तेव्हा मी आणखी एक तळटीप संदर्भटीप देऊन ते विवेचन कोणत्या संदर्भग्रंथाच्या कोणत्या प्रकरणांच्या किंवा पृष्ठक्रमांकांच्या आधारे चाललेले असते हे नोंदवीत असतो. एखाद्या ग्रंथकर्त्याचा एखादा विचार मला जेव्हा विशेष किंवा नवीन वाटतो, तेव्हाच मी तो अवतरणात उद्धृत करतो. तो अन्य भाषेतील असेल, तर त्याचे भाषांतर त्या प्रकरणात येते आणि मूळ भाषेतील विचार तळटीप/संदर्भटीपेत अवतरणात येतो. माझ्या या पद्धतीमुळे वाचकाला माझे लिखाण सलगपणे वाचीतच पुढे जावे लागते. त्याच्यासाठी अन्य पर्याय शिल्लक नसतो. अधूनमधून पाने चाळणारे वाचक एक तर चकतात किंवा निराश होतात आणि काही अवतरणे दिली नाहीत म्हणून कातवतात. त्यातूनच 'चोरी' किंवा 'उचलेगिरी'चा आरोप करून स्वतःचे समाधान करून घेतात. त्यांनी माझे लिखाण सलग वाचले तर त्यांच्या वर ही अशी वेळ येणार नाही. मुळात चूक त्यांची, आरोप मात्र माझ्यावर.

प्रा. रेगे यांनी हा ग्रंथ सलग वाचला असता, तर त्यांच्यावरही याप्रकारे कातवण्याची पाळी आली नसती. प्रा. रेगे यांनी त्यांचे सारे लक्ष माझ्या ग्रंथातील राजवाडे यांच्या *नासदीयसूक्तभाष्या*चा जिथे संदर्भ आहे तिथेच केन्द्रित केल्यामुळे त्यांनी तेवढाच भाग वाचला आणि ते चकले. मुळात ऋग्वेदाच्या नासदीयसूक्ताची चर्चा या ग्रंथात कुठे कुठे आलेली आहे याची त्यांनी नोंदच घेतलेली नाही. आणि ते विनाकारण प्रश्न उपस्थित करीत बसले. त्यांचीही उत्तरे पुढे येतीलच. या ठिकाणी फक्त *नासदीयसूक्तभाष्या*तील 'चोरी' किंवा 'उचलेगिरीचा'च विचार करू. माझ्या ग्रंथात राजवाडे यांच्या *नासदीयसूक्तभाष्या*चा संदर्भ पृ. १९१ पासून सुरू होतो.



अनुक्रमणिका

त्याच पृष्ठावर संदर्भ टीप ४ ची नोंद करून प्रकरणाच्या शेवटी म्हणजे पृ. २३५ वर याच ४ क्रमांकाच्या टीपेचा तपशील देताना 'नासदीयसूक्ताच्या निरूपणासाठी पाहा – शंकर रामचंद्र राजवाडेकृत *नासदीयसूक्तभाष्य* (पूर्वार्ध)' असा मजकूर लिहिलेला आहे. याचा अर्थ तेथून पुढे जे विवेचन चालू आहे ते अर्थातच राजवाडे यांच्या भाष्याला अनुसरून चाललेले आहे. रेगे यांनी त्याच पृष्ठाशी संबंधित असलेला मजकूर मध्येच तोडून, "निर्द्वंद्व स्थितीचे वर्णन कसे करावे हे कोडे सोडविण्याचा एकच मार्ग प्राचीन भारतीय तत्त्वचिंतनाने उपलब्ध करून दिलेला आहे तो म्हणजे ज्या कालाच्या (Time) योगे जगत्पूर्वकाल व जगत्काल असा भेद होतो, त्या कालाचाच त्याग करणे हा होय." हा एवढा मधलाच भाग उद्धृत करून रेगे पुढे लिहितात. "कसवे अवतरणचिन्हे दिल्याशिवाय राजवाड्यांच्या शब्दांत राजवाडे यांनी मांडलेला मुद्दा मांडतात" असा माझ्यावर चोरीचा आळ घेतात. प्रा. रेगे यांना अशी वाक्ये तोडायची सवय आहे. तसेच हे तोडलेले वाक्य कशाच्या संदर्भात आणि कोणत्या विषयासंबंधी आहे याची काळजी घेण्याचीही आवश्यकता वाटत नाही. हे रेगे यांच्या कोणीतरी लक्षात आणून देणे मला आवश्यक वाटू लागले आहे.

वस्तुस्थिती काय आहे? *मानव आणि धर्मचिंतन* या ग्रंथाच्या पृ. १९१ वरील विषय आहे, नासदीयसूक्तातील 'तदानीम्'चा अर्थ काय आहे हा. तिथे जे लिहिलेले आहे ते सलग उद्धृत केले तर रेगे किती निष्काळजीपणे शैलीवर लिहितात आणि किती बेछूटपणे आरोप करतात हे समजू शकते. तिथे लिहिलेला मजकूर पुढीलप्रमाणे आहे – " 'तदानीम्' म्हणजे त्या वेळी, म्हणजे मुळारंभी, जगत् निर्माण होण्यापूर्वी, ज्या वेळी जगत् नव्हते किंवा त्याचा आरंभही झाला नव्हता अशा वेळी. त्या वेळी सत् असणे किंवा असत् नसणे यांपैकी काहीच नव्हते. मग काय होते? याचे भाष्यकारांनी दिलेले उत्तर असे आहे की, 'असणे' किंवा 'नसणे' हे द्वंद्व विश्व निर्माण झाल्यानंतरचे आहे, ते जगतातीलच आहे. परंतु (या ठिकाणी पृ. १९१ संपले व १९२ सुरू झाले.) जेव्हा जगच नव्हते तेव्हा 'असणे' किंवा 'नसणे' हे जगतातील द्वंद्व जगाच्या उत्पत्तीपूर्वीच्या निर्द्वंद्व अवस्थेला कसे लावता येईल? हे कोडे मुळी शब्दांत सुटणारे नाहीच. कारण शब्द हीसुद्धा द्वंद्वात्मक जगाची निर्मिती आहे. त्यामुळे निर्द्वंद्व स्थितीचे वर्णन करण्यास ते असमर्थ आहेत. हे कोडे सोडविण्याचा एक मार्ग प्राचीन भारतीय तत्त्वचिंतनाने उपलब्ध करून दिलेला आहे. तो म्हणजे ज्या कालाच्या (Time) योगे जगत्पूर्वकाल व जगत्काल असा भेद होतो, त्या कालाचाच त्याग करणे हा होय." (*मानव आणि धर्मचिंतन* पृ. १९१-९२) या उताऱ्यातील विचार माझे आहेत असे सूचित करणारे वाक्य रेगेंना कोणते आढळले? तसे मी कुठे म्हटले आहे काय? मी तर ते उत्तर *भाष्यकारां*नी दिलेले आहे असे स्पष्टच म्हटलेले आहे आणि त्याच पृष्ठावरील संदर्भटीप ४ प्रमाणे ते भाष्यकार तर राजवाडे आहेत. या ठिकाणी कसवे अवतरणचिन्हे दिल्याशिवाय राजवाड्यांच्या शब्दात राजवाडे यांनी मांडलेला मुद्दा कोणाच्या नावाने मांडतात? कसव्यांच्या की *नासदीयसूक्तभाष्य*कार राजवाडे यांच्या? तो स्पष्टपणे भाष्यकाराच्या नावाने मांडलेला दिसत असूनही रेगे 'चोरी'चा, 'उचलेगिरी'चा आरोप कशासाठी करतात? प्रा. रेगे यांच्या लेखनातील एखादे वाक्य किंवा काही मजकूर छापताना गाळला गेला तर रेगे किती अस्वस्थ होतात, त्यांना किती मनःस्ताप होतो हे सर्वश्रुत आहे. त्यासाठी 'महाराष्ट्र टाईम्स'च्या संपादकांना जाहीर दिलगिरी व्यक्त करणे भाग पडून अद्याप सहा महिनेही उलटलेले नाहीत. रेगे स्वतःबद्दल इतके जागरूक आणि दुसऱ्याबद्दल मात्र इतके निष्काळजी कसे बनू शकतात? विवेचनाचा विषय काय आहे हे रेगे समजून घेत नाहीत, तो विषय कुठे सुरू होतो, त्यासाठी मागचा-पुढचा पानभर मजकूरसुद्धा वाचण्याची त्यांची इच्छा नसते, तरीही ते अधिकारवाणीने विवेचनशैलीवर कसे लिहू शकतात? वय झाले आणि नाव आहे म्हणून? वयपरत्वे आणि अधिकारपरत्वे रेगे यांच्या काही गोष्टी दुर्लक्षित करता येऊ शकतीलही, परंतु त्यांनी जाणीवपूर्वक केलेल्या प्रत्येक चुकीकडे तहहयात दुर्लक्ष व्हावे असे रेगे यांना वाटते काय?

**माझ्या लेखनप्रकल्पाचे स्वरूप**

प्रा. मे.पुं. रेगे यांनी *नवभारत* मध्ये लिहिलेल्या या लेखाचे मी दोन भागांत विभाजन करू इच्छितो. पहिला भाग हा या लेखनप्रकल्पासाठी लिहिलेल्या, आणि या लेखनप्रकल्पातील *मानव आणि धर्मचिंतन* हा पहिला ग्रंथ असल्याने, त्यात समाविष्ट केलेल्या 'उपोद्घाता'च्या संदर्भातील असेल, तर दुसरा भाग *मानव आणि धर्मचिंतन* या ग्रंथाशी संबंधित असेल. प्रा. रेगे यांनी या ग्रंथाचा विषय काय आहे हे सांगताना त्यांच्या लेखाच्या सुरुवातीच्या परिच्छेदाच्या शेवटी म्हटले

आहे, "*मानव आणि धर्मचिंतन* असे पुस्तकाचे नाव असले, तरी त्यात मुख्यत: वेद, उपनिषदे, बौद्ध तत्त्वज्ञान, *महाभारत* इ. भारतीय परंपरेत विकसित झालेले ग्रंथ आणि धर्मविषयक विचार आणि आचार ह्यांचाच प्रामुख्याने परामर्श घेतलेला आहे. ह्या ग्रंथाच्या प्रत्येक प्रकरणावर संबंधित क्षेत्रातील अधिकारी पंडितांनी परीक्षण लिहिणे योग्य ठरेल. समग्र ग्रंथाचे परीक्षण करू शकेल असा विद्वान आज महाराष्ट्रात सहजी दिसत नाही. प्रस्तुत परीक्षणात मी मुख्यत: कसब्यांच्या विवेचनशैलीचे विश्लेषण करणार आहे." त्यांच्या लेखाच्या शेवटच्या परिच्छेदातही थोडा फार तोच आशय आहे. मला वाटते, या लेखनप्रकल्पाचा आणि त्या अनुषंगाने या ग्रंथाचा जो मूळ विषय आहे, त्याऐवजी भलताच विषय गृहीत धरून त्यावर भाष्ये केली जाण्याची शक्यता दिसते. म्हणून या लेखनप्रकल्पाचा आणि त्याचा पहिला भाग म्हणून *मानव आणि धर्मचिंतन* या ग्रंथाचा नेमका विषय काय आहे ते सुरुवातीलाच स्पष्ट करणे आवश्यक आहे.

*मानव आणि धर्मचिंतन* हा एक स्वतंत्र ग्रंथ असला तरी मुळात तो एका व्यापक विषयावरील लेखनप्रकल्पाचा एक भाग आहे, हे मी 'उपोद्घाता'त सुरुवातीलाच स्पष्ट केलेले आहे. मुळात त्याचा विषय धर्मविषयक विचार किंवा तत्त्वज्ञान नाही. या लेखनप्रकल्पाचा विषय व्यापक असला तरी तो अगदी साधा आहे. तो विषय म्हणजे 'माणूस'. हा आजचा माणूस एकेकाळी प्राणी होता आणि त्याचे वास्तव्य निसर्गातील प्राणिसृष्टीतच होते. अशा अवस्थेत हा 'प्राणी' प्राणिसृष्टीतून आणि निसर्गातून बाहेर का आणि कसा पडला? त्याला एकट्यालाच स्वत:ची अशी स्वतंत्र 'मानवी सृष्टी' निर्माण करावीशी का वाटली? इतर प्राण्यांना तसे वाटले नाही का? या माणूस नावाच्या प्राण्याला प्राणिसृष्टीतून बाहेर पडण्याचे आणि स्वतंत्र अशी मानवी सृष्टी स्थापन करण्याचे बळ कोठून आणि कसे मिळाले? त्यासाठी निसर्ग किती प्रतिकूल होता आणि किती अनुकूल होता? त्याला हे बळ मिळावे म्हणून माणसाबाहेरील कोण्या अलौकिक शक्तीने काही मदत केली का? की त्याने हे बळ स्वप्रयत्नाने अर्जित केले? तो प्राणिसृष्टीतून मानवी सृष्टीत येत असताना त्याला कोणकोणत्या संकटांशी सामना करावा लागला? तो जेव्हा प्राणिसृष्टीतून मानवी सृष्टीत येण्याची प्रक्रिया चालू होती, त्या वेळी त्याला काय गमवावे लागले आणि मानवी सृष्टीने त्याला नवीन काय दिले? आज तो किती प्रमाणात 'प्राणी' आहे आणि किती प्रमाणात 'माणूस' बनला आहे? 'माणूस' म्हणून त्याने कोणकोणत्या गोष्टींची निर्मिती केली आणि कोणकोणत्या जीवन-अस्तित्वाच्या द्वैतांना जन्माला घातले? त्याने काय काय घडविले आणि काय काय मोडले? या जडणघडणीवर आणि मोडतोडीवर कोणकोणत्या घटकांचा प्रभाव होता? या साऱ्या घडामोडीत त्याने जी रूपे धारण केली त्यांचा तपशील काय आहे? त्याच्या अनंत, अगाध आणि विविध रूपांना समजावून घेण्यासाठी आज आपल्याला कोणकोणती साधने उपलब्ध आहेत? त्यासाठी इतिहास, प्राचीन धर्मग्रंथ, मध्ययुगीन धर्मशास्त्रे आणि आधुनिक ललित साहित्य किती प्रमाणात उपयोगी पडू शकते? मानवविज्ञान, तत्त्वज्ञान आणि मनोविज्ञानासारख्या काही ज्ञानशाखा त्याच्या विकासक्रमातील विशिष्ट टप्प्यावरील विशिष्ट रूपाचे अंतरंग समजावून घेण्यास काही मदत करू शकतील का? आपल्याला त्यांचा उपयोग किती प्रमाणात आणि कशा प्रकारे करता येणे शक्य आहे? परंतु मानवप्राणी 'माणूस' होणे म्हणजे तरी नेमके काय 'होणे' असते? त्याचा निवास फक्त बाह्यविश्वात असतो की त्याला एक अंतर्विश्वही असते? असेल, तर त्याचे स्वरूप काय? बाह्यविश्वाप्रमाणे त्याचाही काही विकास माणसाने केला आहे काय? या दोन्हीही विश्वांच्या विकासांचा तपशील देऊ शकतील अशी आज उपलब्ध साधने कोणती? तो 'माणूस' झाल्यापासून ते थेट एकविसाव्या शतकाच्या उंबरठ्यापर्यंत त्याच्या बाह्य आणि अंतर्विश्वात कोणकोणती आंदोलने उठत आली? त्यांना प्रतिसाद देण्याच्या निमित्ताने त्याने कोणकोणते मार्ग अनुसरले? आज त्याच्या समोरील मुख्य समस्या कोणती आहे? तिच्यातून मुक्तीसाठी तो कोणते मार्ग शोधीत आहे? ह्या आणि या अनुषंगाने उपस्थित होणाऱ्या इतर अनेक प्रश्नांची चर्चा या लेखनप्रकल्पात करावयाची आहे. आणि हाच त्याचा मुख्य विषय आहे. हा लेखनप्रकल्प माझ्या मनात कसा आकारत गेला याची संक्षिप्त रूपरेषा मी 'ऋणनिर्देशा'त मांडलेली आहे.

मी काही विविध ज्ञानशाखांचा तज्ज्ञ नाही. परंतु विविध ज्ञानशाखांतील तज्ज्ञांचे निवडक साहित्य तर मी समजावून घेऊ शकतो. त्यामुळे चार्लस डार्विन, कोन्राड लोरेन्त्झ, जे. ब्रोनोवस्की इ. च्या साहित्याची मदत घेणे क्रमप्राप्त होते. त्यातून अनेक प्रश्न सोपे झाले. वेदांच्या ऋचा गाणाऱ्या, उपनिषदांचे मंत्र म्हणणाऱ्या, बुद्धासारख्या मानवमुक्तीचा संदेश








अनुक्रमणिका

देणाऱ्या आणि विविध ज्ञानशाखांना खजिना वाटावा अशा महाभारतकारांचे माणसाबद्दलचे आकलन कसे होते हे निवडक प्राचीन वाङ्मयातून शोधता येऊ शकते, याची खात्री झाली. परंतु भाषेचा प्रश्न अवघड होता. तो अर्थातच सिद्धेश्वरशास्त्री चित्राव आणि इंग्रजी व हिन्दी भाषांतरकारांनी काहीसा सोपा केला. मॅक्समुल्लर, ओल्डेनवर्ग, व्हिस डेविड्स दाम्पत्य, कोसंबी पिता-पुत्र, गुरुदेव रानडे, डॉ. चिं.ग. काशीकर वगैरेंच्या निवडक साहित्याचीही या दृष्टीने मदत झाली. खरं म्हणजे या मंडळींच्या साहित्याने एक आत्मविश्वास दिला. त्याच क्षणी या लेखनप्रकल्पातील *मानव आणि धर्मचिंतन* या पहिल्या ग्रंथाचा आराखडा सिद्ध झाला.

या लेखनप्रकल्पाचा मुख्य विषय हा प्राचीन वाङ्मय आणि धर्मशास्त्रात माणूस कसा प्रतिबिंबित झालेला आहे हा जसा आहे, तसाच या माणसाने त्याच्या बाह्य आणि अंतर्विश्वाला कसे समजून घेतले हाही आहे. या सबंध लेखनप्रकल्पातून माणसे धर्मसंस्थांना झुगारून देतील आणि धर्मसंस्था कालबाह्य ठरून कदाचित नामशेषही होतील अशी दृष्टी अभिव्यक्त होणारी असली, तरी माणसांना धार्मिकतेची, Religiousness किंवा Religiosity ची सतत आवश्यकता भासेल, याकडेही दुर्लक्ष केलेले नाही. जोपर्यंत आणि जिथपर्यंत मानवप्राणी हा 'माणूस' असेल तिथपर्यंत त्याला या प्रकारच्या धर्मचिंतनाची गरज भासेलच. तो त्याच्या बाह्य जीवनात जसजशा विविध संस्था, संघटना स्थापील, त्यांतल्या काही मोडील आणि काहींचा विकास करील, त्या प्रयत्नांतून मानवी नात्यांना अधिक अर्थपूर्ण करीत जाईल तसाच तो धर्मसंस्था मोडीत काढून निखळ धार्मिकतेचाही विकास करील. त्यामुळे माझ्यासमोर निश्चित असा वाचकांचा गट किंवा वर्ग नाही. मी वाचक डोळ्यासमोर ठेवून लिहीत नसतो. ऋग्वेदाची काही सूक्ते वाचताना आणि उपनिषदातील अंतर्विश्वाची थोरवी समजून घेताना धर्मशास्त्रांनी त्यांना किती विकृत स्वरूप दिले याची जाणीव झाली. या निखळ मानवी धर्मचिंतनाला हितसंबंधी धर्मसंस्थेत ज्या *ब्राह्मण*ग्रंथांनी, मीमांसक आणि धर्मसूत्रांनी जखडून टाकण्याचे जाणीवपूर्वक प्रयत्न केले, त्यांनीच हे धर्मचिंतन बदनाम केले. ज्यावर अखिल मानवजातीने हक्क सांगावा अशा प्राचीन प्रतिभेला धर्मशास्त्रांच्या दास्यातून मुक्त करता येणार नाही का? तिने ज्या ज्या जागी या जगाबद्दल, माणूस आणि त्याच्या जगण्याबद्दल, माणसा-माणसांतील नात्याबद्दल, त्याच्या जीवन आणि मृत्यूबद्दल जे जे विचार अभिव्यक्त केले आहेत त्या जागा आणि ते विचार शोधून काढता येणार नाहीत का? तसा अल्पसा प्रयत्न या लेखनप्रकल्पात आहे.

या सबंध लेखनप्रकल्पात मी तत्त्वज्ञानाची चर्चा वर्ज्य मानली नाही. परंतु माणूस केवळ तत्त्वज्ञानाच्या चर्चेनेच समजतो असेही मानले नाही. त्यामुळेच, या प्राचीन वाङ्मयावरील, काही अपवाद वगळता झालेली तत्त्वज्ञानकेन्द्री भाष्ये मला एकारलेली दिसतात. कारण एकतर ती प्रत्यक्ष जीवनाचे समग्र दर्शन घडवू शकत नाहीत आणि दुसरे म्हणजे ती अवाजवी तांत्रिक आहेत. या ग्रंथात तत्त्वज्ञानाला, त्याच्या चर्चेला स्थान जरूर आहे, परंतु ते आनुषंगिक आहे. माणसाच्या रूपाचा, त्याच्या घडण्याच्या प्रक्रियेचा, त्याच्या विचार करण्याच्या कृतीचा जिथे मुख्य विषय असतो तिथे तत्त्वज्ञानाची जागा आनुषंगिक, दुय्यम असते. महाभारताचा विचार करताना इरावतीबाई कर्वे यांचा Kinship Organization in India, किंवा रोमिला थापर यांच्या अन्य साहित्याबरोबरच From Lineage to State सारख्या ग्रंथांच्या किंवा कोसंबी आणि एंगल्स यांच्या ग्रंथांच्या पार्श्वभूमीवर विचार केला तर महाभारताची अधिक चांगल्याप्रकारे उकल होऊ शकते. यांपैकी कोणताही ग्रंथ तत्त्वज्ञानपर नाही हे लक्षात घेतले पाहिजे. '*मानव आणि धर्मचिंतन*' हा या लेखनप्रकल्पाचा पहिला भाग या दृष्टिकोणातून लिहिला गेलेला आहे.

या लेखनप्रकल्पातील पुढील भागासंबंधी लगेचच फारसे काही बोलू नये असे मी ठरविले होते. परंतु प्रा. मे.पुं. रेगे यांच्या लेखामुळे बोलणे भाग पडत आहे. *मानव आणि धर्मचिंतन*चा प्रवास माणूस मानवी सृष्टीत आल्यापासून ते कुलसमाजाच्या विध्वंसापर्यंत आणि राज्यसंस्थेच्या उदयाच्या सूचनेपर्यंत झालेला आहे. त्याच्या पुढच्या भागाचा मुख्य विषय राज्ययंत्रणेच्या दमनात अडकलेल्या माणसाने स्वतःची मुक्ती कोणकोणत्या मार्गांनी आणि कोणकोणत्या पद्धतींनी शोधली हा आहे. राज्ययंत्रणा आणि धर्मसंस्था यांच्या युतीने त्याच्या बाह्य आणि अंतर्विश्वावर कोणते आघात केले आणि त्यातून बाहेर पडण्यासाठी भक्ती आणि प्रबोधन चळवळीने काय योगदान केले याचा तपशीलही त्यात असेल. भगवद्गीतेने माणसासमोरील कोणत्या प्रश्नांना हात घातला आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी मानवी जीवनातील कोणते द्वैत कशाप्रकारे सोडविण्याचा प्रयत्न केला, याचाही विचार त्यात असेल. एका अर्थाने हा दुसरा

अनुक्रमणिका

ग्रंथ भगवद्गीतेवरील माझ्या भाष्याने सुरू होईल आणि आंबेडकरांच्या *बुद्ध आणि त्याचा धम्म* या ग्रंथाच्या विवेचनाने संपेल. या दोन टोकांत भक्ती चळवळ, प्रबोधन चळवळ, सामंती शोषण आणि भांडवलशाही यांचा माणसावर, त्याच्या बाह्य आणि अंतर्विश्वावर, त्याच्या सामाजिक-राजकीय वास्तवावर पडलेल्या प्रभावाची चर्चा असेल. त्याचे नाव 'भक्ती आणि धम्म' असे असेल.

या लेखनप्रकल्पातील तिसरा ग्रंथ हा आजचा माणूस 'व्यक्ती' (Individual) का आणि कसा बनला याच्या चर्चेने सुरू होईल. त्यात भांडवलशाहीने निर्माण केलेल्या विश्वव्यापी आधुनिक संस्कृतीची विस्ताराने चर्चा करण्याचा मानस आहे. त्याचप्रमाणे त्यात माणसाबद्दलचे कार्ल मार्क्स यांचे आकलन काय होते आणि त्यांची माणसाची संकल्पना नेमकी काय होती याची जशी चर्चा आहे तशीच मार्क्सच्या या विचाराने जीवनाची कोणकोणती क्षेत्रे प्रभावित केली याचीही चर्चा आहे. त्यांपैकी विशेषतः वाङ्मयीन चळवळीवर या विचाराचा कसा प्रभाव पडला आणि विविध वाङ्मयीन चळवळींनी माणसाला कसे समजून घेतले हे मला आवडलेल्या काही वाङ्मयीन कलाकृतींच्या आधारे स्पष्ट करण्याचा मानस आहे. ही या लेखनप्रकल्पाची रूपरेषा आहे. ती मी 'उपोद्घाता'त स्पष्ट केलेली आहे. प्रा. रेगे यांनी हा ग्रंथ सलग आणि गांभीर्यपूर्वक न वाचल्यामुळे ती मला या ठिकाणी सांगावी लागली. हा लेखनप्रकल्प सिद्धीस जाईल अशी आशा आहे; परंतु अडचणीही अनंत आहेत.

### इंग्रजी शब्दांची भाषांतरे

आता आपण प्रा. मे.पुं. रेगे यांनी उपस्थित केलेल्या काही महत्त्वाच्या आक्षेपांची/प्रश्नांची चर्चा सुरू करू. प्रा. रेगे यांनी मी केलेल्या काही इंग्रजी शब्दांचे मराठी भाषांतर चुकीचे आहे हे स्पष्ट केलेले आहे. त्यांच्या मताप्रमाणे, Abstract चे 'निराशय' हे भाषांतर चूक असून त्यासाठी अमूर्त हा शब्द वापरण्याची मराठीत प्रथा आहे. किंवा त्यासाठी अपकृष्ट, अवकृष्ट असेही मराठी शब्द आहेत. Ad hominem चे 'खास हितसंबंध' हे भाषांतर चूक असून ते 'मानवी व्यक्तीला, तिच्या भावनांना इ. उद्देशून केलेला युक्तिवाद' असे असावयास पाहिजे. मी वापरलेला Archimedical Point मधील Archimedical असा शब्द इंग्रजीत नसून असलाच तर तो Archimedean असा असू शकेल. रेगे माझी खिल्ली उडविताना, मला इंग्रजी शब्द वापरायची किती हौस आहे हे दाखवून देण्यासाठी 'चांभार' या मराठी शब्दालासुद्धा मी इंग्रजी 'Tanner' हा शब्द कंसात देतो, याचे उदाहरण देतात. वरवर पाहता प्रा. रेगे यांचे म्हणणे खरे आहे; कारण कोणताही इंग्रजी-मराठी शब्दकोश उघडला तर या शब्दांना रेगे यांनी सुचविलेले शब्दच त्यात सापडतील. प्रा. रेगे यांच्याकडे अभिजात इंग्रजी ग्रंथांचा मराठी अनुवाद करण्याचा अनुभव असल्यामुळे त्यांच्या या क्षेत्रातील तंत्राच्या अधिकाराबाबत फालतू वाद घालण्यात मला मुळीच स्वारस्य वाटत नाही. कारण आमच्या पिढीचा वैचारिक पिंड घडविण्यात जसा प्रा. रेगे यांच्या लिखाणाचा वाटा आहे तसाच त्यांनी केलेल्या अनुवादांचाही आहे. त्यांनी दाखविलेल्या चुका मान्य करून त्यांची पुनरावृत्ती होणार नाही याची काळजी घेणेच मी अधिक उचित समजतो.

परंतु, त्यासंबंधी माझेही काही म्हणणे आहे, तेवढेच या ठिकाणी नोंदवितो. Abstract या इंग्रजी शब्दाला मराठीत 'निराशय' हा शब्द वापरण्याची प्रथा होती आणि दि.के. बेडेकरांनीच त्यांच्या *हेगेल-जीवन आणि तत्त्वज्ञान* या ग्रंथाच्या चौथ्या परिशिष्टात जी पारिभाषिक शब्दसूची दिलेली आहे (पृ. ३७५) त्यात Abstract साठी 'निराशय' हाच मराठी शब्द योजलेला आहे. प्रा. दि.के. बेडेकर आज हयात असते तर कदाचित रेग्यांनी जसे त्रिकोणाचे उदाहरण दिले तसे त्यांनी चौकोनाचे उदाहरण देऊन निराशय शब्दाचे समर्थनही केले असते. Ad ho-mi-nem या लॅटिन शब्दाचा Random House च्या शब्दकोशात (१) Appealing to a person's prejudices, emotions, or special interest rather than to his intellect or reason आणि (2) attacking on opponent's character rather than answering his argument असाही दिलेला आहे. अनेक वेळा शब्दकोश आपल्याला चकवा देत असतात. Archimedical असा शब्द शब्दकोशात नाही हे खरे आणि 'आर्किमीडिस' वरून विशेषण साधले तर Archimedean होते हे कोणत्याही शब्दकोशावरून खरेच आहे. परंतु Archimedic असा शब्दसुद्धा इंग्रजी लेखनात वापरला जातो. माझ्याकडून याच Archemedic point चे पेन मिस्टेकमुळे Archimedical point झाले एवढेच. रेगेंना मी एवढेच सांगू इच्छितो की, हा शब्द वापरताना कसव्यांच्यापुढे








कुठला तरी सामान्य इंग्रजी उतारा नव्हता, तर एरिक फ्रॉम या जगन्मान्य लेखकाचा The Sane Society हा अभिजात ग्रंथ होता. प्रा. रेगे यांनी सामान्य वाचकाप्रमाणेच Tanner म्हणजे चांभार अशी समजूत करून घेतलेली दिसते. Tanner या शब्दात ज्या अर्थच्छटा आहेत त्यांचे मराठी भाषांतर चांभार असे खासच नाही. Tanner चा अर्थ 'A craftsman who tans hides to make leather' असा आहे. अगदी Tanning या शब्दाची Leather या शीर्षकाखाली *एन्सायक्लोपिडिया अमेरिकना*तील नोंद पाहिली तरी Tanner ला 'चांभार' म्हणता येणार नाही. ज्याला भारतीय जातीसंस्थेच्या बारकाव्यांची थोडीफार माहिती आहे, (आणि ती रेग्यांना अजिबातच दिसत नाही) त्याला, कातडी कमावणाऱ्याला, कमावलेल्या कातड्याच्या वस्तू बनविणाऱ्याला आणि बनविलेल्या वस्तू कालांतराने दुरुस्त करणाऱ्याला अनुक्रमे ढोर, चांभार आणि मोची म्हणतात हे माहीत असते. मी *मानव आणि धर्मचिंतन* च्या पृ. १५१ वर "कातडी कमावून त्याच्या वस्तू आणि वस्त्रे बनविणारे चांभार (Tanner) अशी समाजात श्रमविभागणी झाली" असे लिहिले आहे. Tanner या शब्दातून ढोर आणि चांभार या दोन्हीही जाती सूचित व्हाव्यात एवढ्याच हेतूने Tanner हा शब्द मी वापरलेला आहे आणि मुळात ॲडम स्मिथलाही तेच अभिप्रेत असावे अशी माझी समजूत आहे. त्यात माझी काही चूक झाली का?

### हेगेल, मार्क्स आणि फ्राईड

माझ्या या लेखनप्रकल्पात कोणकोणत्या विषयांचे विवेचन अपेक्षित आहे याची वाचकांना ओळख करून देण्यासाठी मी 'उपोद्घाता'ची १ ते ५८ ही पृष्ठे खर्च केलेली आहेत. तो लिहिताना प्रामुख्याने एरिक फ्रॉम यांनी माणसाबद्दल आणि इ.एच. कार यांनी इतिहासाबद्दल मांडलेले विचार माझ्यासमोर होते. तशी नोंद 'उपोद्घाता'च्या सुरुवातीलाच केलेली आहे. त्यांतील पहिली १ ते ४२ ही पृष्ठे प्रामुख्याने या सबंध लेखनप्रकल्पाचे सर्वसाधारण स्वरूप स्पष्ट करणारी असून ४२ ते ५८ ही पृष्ठे या लेखनप्रकल्पाचा पहिला भाग म्हणून *मानव आणि धर्मचिंतन* या ग्रंथाची ओळख करून देणारी आहेत. या 'उपोद्घाता'ची उपशीर्षके वाचली तरी, या लेखनप्रकल्पात कोणकोणत्या विषयांचे विवेचन येणार आहे याची वाचकांना जाणीव होऊ शकेल.

प्रा. मे.पुं. रेगे यांनी माझी विवेचनपद्धती गढूळ, अपारदर्शक (opaque) आहे हे सिद्ध करण्यासाठी याच 'उपोद्घाता'तील पृ. ३३ वरील 'पश्चिमेकडील प्रबोधनचळवळीचे योगदान' या उपशीर्षकाखालील पृ. ३४ ते ३६ वरील मजकूर उद्धृत करून पुढील प्रश्न विचारले आहेत. कसबे हे हेगेलने "काय केले हे सांगत नाहीत. दैवी नियम म्हणजे काय? कसबे सांगत नाहीत. दैवी नियमाचे एखादे उदाहरण देत नाहीत. विवेक (Reason) म्हणजे काय? हेगेलची Reason विषयीची संकल्पना काय आहे कसबे सांगत नाहीत. विवेकाधिष्ठित नियमांचे एखादे उदाहरण देत नाहीत. एखादा दैवी नियम घेऊन त्याचे विवेकाधिष्ठित नियमात हेगेल कसे रूपांतर करतात हे सांगत नाहीत. विश्वचैतन्याविषयी हेगेलची संकल्पना काय आहे? कसबे सांगत नाहीत... हेगेल काही सांकेतिक शब्दांच्या साहाय्याने क्रांतीविषयी काही समीकरणे मांडतात असे कसबे म्हणतात. कोणते सांकेतिक शब्द? कसबे सांगत नाहीत. कोणती क्रांती? क्रांतीचे एखादे उदाहरण?" इ. प्रश्न विचारून रेगे 'कसबे यांचे विवेचन अपारदर्शक आहे' या निष्कर्षापर्यंत पोहोचतात. आणि पुढे लिहितात, "पण खरी गोष्ट अशी आहे की, येथे विवेचन नाही, विवेचनाचा आव आहे. पाश्चिमात्य प्रबोधनाच्या चळवळीची अपत्ये मानलेल्या फ्रेडरिक हेगेल, कार्ल मार्क्स आणि सिग्मंड फ्राईड या मंडळींनी केलेल्या योगदानाची माहिती कसबे देत नाहीत." (*नवभारत*, पृ. ४६) अशीही तक्रार रेगे करतात. त्याचप्रमाणे, "कार्ल मार्क्स यांचे सर्वांत मोठे दुर्दैव हे आहे की, त्यांच्या विचाराबद्दल पाश्चिमात्य जगात विशेषतः अमेरिकेत प्रचारी यंत्रणांनी प्रचंड असे अज्ञान पेरून ठेवले आहे" (*मानव आणि धर्मचिंतन*, उपोद्घात, पृ. ३४) या विधानावरही आक्षेप घेताना "अज्ञान कसे पेरता येते? ज्ञान पेरता येईल... अमेरिकन प्रचारयंत्रणांनी मार्क्सवादाविषयी 'प्रचंड असे अज्ञान' कसे काय पेरले? ह्या पेरलेल्या प्रचंड अज्ञानाचे एखादे तरी उदाहरण त्यांनी द्यायचे", असे म्हटलेले आहे.

प्रा. रेगे यांनी विचारलेले प्रश्न एका दमात वाचले तर वाचकांना धाप लागण्याची आणि तत्त्वज्ञानाचे विश्व किती गहन आहे असे वाटण्याची शक्यता आहे. वस्तुस्थिती अशी आहे की, आता हे फार सामान्य प्रश्न झालेले आहेत आणि रेग्यांनी विचारलेले प्रश्न कोणाला फार महत्त्वाचे वाटले तरी ते या ठिकाणी मुळातच अनाठायी आहेत. हे सर्व प्रश्न त्यांनी

'उपोद्घाता'वरून विचारलेले आहेत आणि 'उपोद्घाता'त मी कोणकोणत्या विषयांचे विवेचन या लेखनप्रकल्पात पुढे करणार आहे याची सूत्ररूपाने रूपरेषा सांगितलेली आहे. कोणताही लेखक 'उपोद्घात' कशासाठी लिहीत असतो? 'उपोद्घाता'त सर्व प्रश्नांची उत्तरे दिली जातात काय? एखाद्या विषयाचे सविस्तर विवेचन करण्यासाठी ग्रंथलेखनाऐवजी केवळ 'उपोद्घात'च लिहावा असे रेगे यांचे म्हणणे आहे काय? रेगे म्हणतात, "इथे विवेचन नाही, विवेचनाचा आव आहे." मुळात इथे केवळ रूपरेषा आहे. तिथे विवेचन कसे असेल? पाश्चिमात्य प्रबोधनचळवळीवर आणि तिच्या भारतावर पडलेल्या प्रभावावर 'भक्ती आणि धम्म' या येणाऱ्या ग्रंथात एक स्वतंत्र प्रकरणच आहे. तिथे हेगेल, मार्क्स आणि फ्राईडची चर्चा यथावकाश येणारच आहे. मार्क्सचे माणसाबद्दलचे चिंतन आणि त्याचा ललित वाङ्मयावरील प्रभाव हा विषय तर या लेखनप्रकल्पातील शेवटच्या ग्रंथाचा विषय आहे. तिथे मार्क्सच्या भौतिकवादी इतिहासमीमांसेवर विस्ताराने चर्चा होईल आणि अमेरिकन प्रचारमाध्यमांनी मार्क्सबद्दल अज्ञान कसे पेरले याचा तपशीलही येईल. या माध्यमांनी अतिशय असंस्कृतपणे केलेल्या प्रकाशनांपैकी एक म्हणजे त्यांनी (मार्क्सची On Jewish Problems ही मूळ पुस्तिका) The World without Jews या शीर्षकाखाली छापलेले पुस्तक. हेतू हा की, मार्क्स जणू काय सोविएत anti-semitism चा आणि नाझींचा संस्थापक होता असे वाटावे. मला वाटते, रेगे यांच्यासाठी तूर्त एवढे उदाहरण पुरेसे आहे. मग प्रश्न असा आहे की, प्रा. मे.पुं. रेगे एका दमात एवढे प्रश्न का विचारतात? त्यांना माझी परीक्षा घ्यायची आहे काय? प्रा. रेगे यांना आपल्यापेक्षा वयाने आणि अनुभवाने लहान असलेल्या लेखकांचे ग्रंथ सलग आणि गांभीर्यपूर्वक वाचण्याची आवश्यकताच दिसत नाही. रेगेंची फसगत त्यामुळेच झाली आणि ते एका दमात प्रश्न विचारत गेले. रेगेंची फसगत होण्याचे मुख्य कारण आपण कोणते प्रकरण वाचीत आहोत, त्याचे शीर्षकच त्यांनी पाहिलेले नाही. आणि ज्यातून हे प्रश्न विचारीत आहेत ते प्रकरणही सलग वाचलेले दिसत नाही. हा ग्रंथच नव्हे तर माझे कोणतेही लिखाण सलग वाचले नाही तर काय अनर्थ होऊ शकतात याची नोंद मी यापूर्वी केलीच आहे. प्रा. रेगे यांच्याकडून साऱ्या अर्थाचा अनर्थ झाला; कारण 'उपोद्घाता'च्या सुरुवातीलाच "**.... म्हणून या ग्रंथातील (मानव आणि धर्मचिंतन) तपशिलाची थोडक्यात ओळख करून घेण्यापूर्वी मूळ लेखनप्रकल्पाची रूपरेषा आणि त्यामागील दृष्टीची रूपरेषा स्पष्ट करणे आवश्यक वाटते. या उपोद्घाताचा हाच प्रमुख उद्देश आहे.**" असे लिहिलेले आहे. हे 'उपोद्घाता'तील दुसरेच वाक्य आहे. रेगेंनी ते वाचले असावे किंवा नाही याबद्दल मला जबरदस्त शंका आहे. वाचले असावे असे म्हणावे तर, वाचूनही रेगे या प्रकारे आणि इतके वाहत जाणाऱ्यांपैकी नाहीत, अशी माझी समजूत आहे. कारण कोणत्याही लेखक-समीक्षकाला उपोद्घात म्हणजे काय असते याची कल्पना असतेच. वाचले नसावे म्हणावे तर ते न वाचताच निष्कर्षवजा बिनधास्त विधाने कशी करू शकतात? याचा उलगडा होत नाही. की, वाचूनही अशा प्रकारचे लेखन करण्यामागे त्यांचा काही अन्य उद्देश असावा, याचाही पत्ता लागत नाही.

प्रा. मे.पुं. रेगे हे पाश्चिमात्य तत्त्वज्ञानाचे पंडित आहेत आणि त्यांचे पांडित्य आमच्या पिढीने आदराने मान्यही केलेले आहे. परंतु त्यांनी तेच तेच प्रश्न एखाद्याची खिल्ली उडविण्यासाठी किती काळ आणि किती वेळा विचारत बसावे याला काही धरबंध आहे की नाही? पाश्चात्त्य तत्त्वज्ञानातील याच प्रकारचे प्रश्न, माझ्या आठवणीप्रमाणे, प्रा. रेगे तीस वर्षांपासून विचारत आहेत. ज्या काळात सार्वत्रिक शिक्षणाच्या प्रयोगातून अभ्यासकांची नवी पिढी उदय पावलेली नव्हती, तोपर्यंत हेगेल, मार्क्स, फ्राईड, कान्ट वगैरे पाश्चिमात्य तत्त्ववेत्ते हे फक्त काही मोजक्याच अभ्यासकांचा आणि विशेषज्ञांचा विषय होते. त्यामुळे पूर्वी त्यांची नावे घेणाऱ्या विचारवंताबद्दल मनात एक दहशत वाटत होती. परंतु, आजही ती नावे घेतली म्हणजे दहशत निर्माण होते असे मानण्याचे कोणतेही कारण मला दिसत नाही. मी रेगेंना नम्रपणे एवढेच सांगू इच्छितो की, आज तशा प्रकारची दहशत वगैरे काहीही राहिलेली नाही. गेल्या तीस वर्षांत सर्वच क्षेत्रांतील बंदिस्त वातावरण बरेच खुले झालेले आहे. उलट-सुलट, चुकीची-बरोबर, वाजवी-अवाजवी सर्वप्रकारची चर्चा चालू आहे. अशी चर्चा आज विस्तारत आणि वेगवान होत गेली, तर ती मराठी विचारविश्व समृद्ध करण्यास उपयुक्त ठरेल अशी आशा निर्माण होत आहे. अशा चर्चेचे चिकित्सक स्वागत करावयाचे की ती करणाऱ्यांना नाउमेद करून ती चर्चाच बंद पाडायची? याचा एकदा ज्येष्ठ मंडळींनी अंतर्मुख होऊन विचार करण्याची वेळ आलेली आहे. माझ्यापुरतेच बोलायचे ठरले, तर प्रा. रेगे






अनुक्रमणिका

यांनी कोणत्याही हेतूने का होईना, उपस्थित केलेल्या प्रश्नांकडे मी गांभीर्याने पाहत आहे. एवढेच जर त्यांचे प्रश्न असतील, तर माझ्या लेखनप्रकल्पाच्या रूपरेषेप्रमाणे त्यांपैकी जेवढ्यांचा विचार करणे विवेचनाच्या ओघात मला शक्य होईल तेवढ्यांचा विचार अवश्य केला जाईल. मला हा संपूर्ण लेखनप्रकल्प लवकर पूर्ण करण्याची घाई आहे, हे खरेच आहे. त्याला कारणेही आहेत. परंतु त्या सर्व प्रश्नांची उत्तरे उपोद्घातातूनच मिळावीत इतकी रेगेंना घाई का झालेली आहे हे मात्र मला समजत नाही.

**नासदीयसूक्त आणि अहिताग्नि राजवाडे**

आता प्रा. रेगे यांनी *मानव आणि धर्मचिंतन* या ग्रंथांतील विवेचनासंबंधी जी मते व्यक्त केलेली आहेत त्याचा विचार करावयाचा आहे. प्रा. रेगे यांनी मी अहिताग्नि राजवाडे यांच्या *नासदीयसूक्तभाष्या*वरून उचल किंवा चोरी वगैरेचा जो आरोप केलेला आहे त्याबद्दलचे माझे म्हणणे यापूर्वी थोडक्यात मांडलेले आहेच. ज्या ग्रंथावर आपण मतप्रदर्शन करू इच्छितो, तो ग्रंथ सलग वाचायचा नाही, त्यातील विशिष्ट ठिकाणच्या विवेचनाचा मूळ विषय काय आहे आणि त्यासाठी पुरविला गेलेला आनुषंगिक तपशील काय आहे याकडे गांभीर्याने पाहायचे नाही, तो विषय त्याच ग्रंथात कुठे कुठे आणि कोणकोणत्या संदर्भांत चर्चिला गेला आहे याकडे पुरेसे लक्ष द्यायचे नाही आणि ग्रंथलेखकाच्या विवेचनशैलीवर लिहून ती 'गढूळ', 'अपारदर्शक' वगैरे कशी आहे असा उत्साहपूर्वक अंतिम निकाल द्यायचा ही सर्वसाधारणपणे प्रा. रेगे यांची शैलीवरील लेखनपद्धती आहे असे दिसते. तिच्यातील गांभीर्याचा अभाव आणि खिल्ली उडविण्याची खोड, समजूतदारपणाचा अभाव आणि उपहास करण्याची हौस, यांमुळे रेगे कसे चकत गेले ते पाहणेही मनोरंजक ठरेल असेच आहे. त्यांनी *नवभारत*च्या पृ. ४६-४७ वर *मानव आणि धर्मचिंतन* मधील पृ. १९१-९२ वरून एक दीर्घ उतारा अवतरणात देऊन "आता कसबे सबंध नासदीयसूक्त उद्धृत करीत नाहीत किंवा सबंध नासदीयसूक्ताचे मराठी भाषांतर देत नाहीत" असा माझ्यावर आरोप केला आहे. आता ह्याला काय म्हणावे? वाचकांच्या गैरसमजाला जागा राहू नये म्हणून *मानव आणि धर्मचिंतन*च्या पृ. ६७-६८ वर मी दिलेले संपूर्ण नासदीय-सूक्ताचे भाषांतर पुढे देत आहे.

"काहीच नव्हते अस्तित्वात प्रारंभी
सत्, असत्, अंतरिक्ष आणि आकाश.
अथांग जल तरी अस्तित्वात होते काय?
हे घडले खरे,
परंतु कोणाच्या सुखासाठी? ।।१।।
जेव्हा नाशवंत मृत्युचं नव्हता
तेव्हा अमर अमृतही कसे असेल अस्तित्वात?
तेव्हाची सृष्टी स्वबळानेच स्फुरत होती,
करीत श्वासोच्छ्वास वायुशिवाय.
काहीच नव्हते अस्तित्वात त्यावेळी,
त्या-खेरीज अथवा त्यापल्याड ।।२।।
तमाने व्याप्त होते समस्त जल
परंतु
त्यानंतर मात्र, झाले प्रकट सर्वव्यापी 'एक'
तपमहिम्याने.
परंतु तेही होते आवरणात फोल मायेच्या ।।३।।
अवतरला सर्वप्रथम काम
त्याच्या मनोबीजात
त्यानेच दिले बळ उत्पत्तीच्या प्रवृत्तीला
आणि घडला पहिला वहिला संबंध ।।४।।
त्याच संबंधांचा धागा,
खालपासून वरपर्यंत झाला आडवा
आणि
त्याचाच काही भाग निर्मितिक्षम वीर्य होऊन
झाला विशाल. अन् गेला विस्फारत दोन दिशांनी
अलिकडील 'स्वशक्ति' आणि
पलिकडील 'प्रभाव' बनून ।।५।।
विश्वोत्पत्तीसंबंधी
फक्त एवढेच सांगता येते.
यापेक्षा अधिक कोणीच काहीच सांगू शकत नाही,
अगदी देवसुद्धा,
विश्वाचा हा पसारा कोठून आणि
कसा उत्पन्न झाला याबद्दल ।।६।।
आकाशनिवासी सर्वसाक्षीलाही
कदाचित
असेल अथवा नसेलही ज्ञात
या विश्वाच्या उत्पत्तीचे स्थान ।।७।।

नासदीय-सूक्ताचे जर यापेक्षा अधिक चांगले भाषांतर कोणाला करावेसे वाटले, तर त्याची अडचण होऊ नये म्हणून मी ५व्या संदर्भ टीपेत पृ. ११० वर *ऋग्वेदा*तील संपूर्ण नासदीयसूक्त उद्‌धृत केले आहे.

आता अहिताग्नि राजवाडे यांच्याबद्दलही लिहिले पाहिजे. प्रा. रेगे यांनी *नवभारत* (पृ. ४८ वर) मध्ये राजवाड्यांसंबंधी जे लिहिले आहे ते जणू काय त्यांच्या जन्मकुंडलीवरून पत्रिका तयार करावी असे वाटावे. "राजवाडे भारतीय दार्शनिक परंपरेचे किंवा तिच्यांतील अद्वैतासारख्या संप्रदायाचे प्रतिनिधित्व करीत नव्हते. ते वैदिक साहित्याचे, श्रुतिस्मृति इ. चे अव्वल दर्जाचे पंडित होते. ग्रीक, रोमन आणि आधुनिक युरोपीय इतिहास त्यांना चांगला अवगत होता. ते स्वतःला निट्शेचे अनुयायी मानीत आणि निट्शेच्या दृष्टिकोणातून ते आधुनिक युरोपीय तत्त्वज्ञानाकडे पाहत आणि भारतीय धार्मिक आणि दार्शनिक परंपरेकडेही ते त्याच दृष्टीने पाहत, ह्या अर्थाने ते आधुनिक होते; पारंपरिक पंडित नव्हते. शंकराचार्य इ. आचार्यांना ते अमान्य करीत. कसब्यांना भारतीय दर्शनांचे मामुली ज्ञानही नसल्यामुळे त्यांनी राजवाड्यांवर भिस्त ठेवली आणि कसबे चकले", असे रेगे यांचे म्हणणे आहे. वास्तविक पाहता रेगे यांनी राजवाड्यांची जन्मकुंडलीही नीट पाहिलेली दिसत नाही. राजवाड्यांच्या जन्मानंतर ज्या ज्योतिषाने त्यांची पत्रिका तयार केली होती, त्यानेच राजवाड्यांच्या कुंडलीवरून त्यांच्या वडिलांना हा त्यांच्या पोटी आलेला पुत्र (म्हणजे शंकर म्हणजे अहिताग्नि) हा 'तारकपुत्र' असून त्यामुळेच ते (म्हणजे राजवाड्यांचे वडील रामचंद्र) कंदाहारच्या लढाईतून सुखरूप बचावले, असे सांगितले होते. इतकेच नव्हे तर राजवाडे मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर आपल्या घरात कोणी 'बृहस्पती' अवतरला आहे अशी त्या वेळी त्यांच्या वडिलांची समजूत होती. ही गोष्ट अहिताग्नि राजवाडे यांनी स्वतःच त्यांच्या आत्मवृत्तात नोंदवून ठेवली आहे. (पृ. १०४) रेग्यांनी त्यांच्या लेखात याही गोष्टीचा उल्लेख केला असता तर राजवाडे अधिक चमकून दिसले असते. असो. मला राजवाड्यांबद्दल रेगे यांच्याइतकी माहिती नसली तरी, त्यांचा योगायोगावरील विश्वास, चित्पावनांबद्दलचे त्यांचे प्रेम, स्त्रियांविषयीची त्यांची मते, गांधी-सावरकर-आंबेडकर यांच्याबद्दलच्या त्यांच्या भावना, अस्पृश्यांची चळवळ ब्राह्मणांचा कसा नाश करील यासंबंधीची त्यांनी दाखविलेली दूरदृष्टी, समाजवादावरील टीका आणि फॅसिझमचे आकर्षण, इतकेच काय अगदी महार जातीबद्दलच्या त्यांच्या मनातील भावना याबद्दल मात्र बरीचशी माहिती आहे. त्यामुळे राजवाडे हे भारतीय दार्शनिक परंपरेचे प्रतिनिधित्व करीत नव्हते हे प्रा. रेगे यांचे व्यक्तिगत मत असू शकते; माझे मत मात्र तसे नाही. मी माझ्या गीताभाष्यात राजवाडे यांच्यासंबंधी लिहीन त्या वेळी ते अधिक स्पष्ट होईल.

अहिताग्नि राजवाडे यांनी 'काला'संबंधी घेतलेली भूमिका ही त्यांची व्यक्तिगत भूमिका होती; ती सर्वच प्राचीन भारतीय तत्त्वचिंतकांनी घेतलेली भूमिका नव्हती, हे रेगे यांचे म्हणणे मान्य केले तरी, "प्राचीन भारतीयांनी विश्वोत्पत्ती हा व्यक्तिगत अनुभूतीचा विषय केला होता" या माझ्या मतावर, "प्राचीन भारतीयांनी असे काहीही केलेले नाही. वस्तुस्थिती अशी आहे की, कसब्यांना हा विषय माहीत नाही. परंतु त्यावर लिहायची हौस आहे. त्यांनी राजवाड्यांची कास धरली आणि ते चकले", असा जो अभिप्राय रेगे देतात, (त्यातील कसब्यांसंबंधीचा मजकूर बाजूला ठेवू, कारण ते भारतीय तत्त्वज्ञानाबद्दल पूर्ण अज्ञानी आहेत असे समजू.) तो मात्र पुरेसा वादग्रस्त आहे. एक तर हा वाद कदाचित प्राचीन भारतीय दर्शनांकडे बघण्याच्या आपापल्या दृष्टिकोणांतूनही उद्‌भवू शकेल. आणि रेगे यांनी मुळात, नेहमीप्रमाणेच, माझे म्हणणे पूर्णपणे उद्‌धृत केलेले नाही. माझे म्हणणे असे आहे की, "जिथे कालाचाच विचार नसतो, तिथे उत्पत्तीचा विचार असण्याचे कोणतेही कारण उरत नाही. म्हणूनच प्राचीन भारतीयांनी विश्वोत्पत्ती हा व्यक्तिगत अनुभूतीचा विषय मानला. (केला नव्हे.) तिच्या संबंधी त्यांनी विविध तर्क केले हे खरे, परंतु त्या तर्कांच्या मर्यादाही त्यांनी मान्य केल्या होत्या." (*मानव आणि धर्मचिंतन* पृ. १९२) या माझ्या विधानातून विविध दर्शनांनी विविध तर्क केले होते असे सुचित होत नाही काय? प्रश्न असा आहे की, ते तर्क कोणते होते आणि त्याच्या मर्यादा त्यांनीच कशा मान्य केल्या होत्या? हा विश्लेषणाचा भाग आहे. त्यामुळे तो मतभेदांचाही मुद्दा आहे. प्राचीन भारतीय दर्शनांनी विश्वोत्पत्तीसंबंधीच्या केलेल्या विविध तर्कांची एकत्रित माहिती देणारा ग्रंथ *श्वेताश्वेतर* उपनिषद हा आहे. त्याच्या पहिल्या अध्यायातील पहिले दोन मंत्र आणि त्यावर शंकराचार्यांनी केलेले भाष्य बघितले, तरी या दृष्टीने बऱ्याच गोष्टींचा उलगडा होऊ शकतो. *श्वेताश्वेतर* उपनिषदाच्या पहिल्या अध्यायातील, "ते ध्यानयोगानुगता अपश्यन्देवात्मशक्तिं स्वगुणैर्निगूढाम् । यः कारणानि निखिलानि





तानि कालात्मयुक्तान्यधितिष्ठत्येकः ।।३।। तमेकनेमिं त्रिवृत्तं षोडशान्तं शतार्धारं विंशतिप्रत्यराभिः। षड्भिर्विश्वरूपैकपाशं त्रिमार्गभेदं द्विनित्तैकमोहम् ।।४।। पञ्चस्योतोऽम्बुं पञ्चयोन्युग्रवक्रां पञ्चप्राणोर्मिं पञ्चबुद्ध्यादिमूलाम्। पञ्चावर्तां पञ्चदुःखौधवेगां पञ्चाशद्‌भेदां पञ्चपर्वामधीमः।।५।।" या मंत्रातून विश्वोत्पत्तीमागील कारणे आणि तिचे स्वरूप जाणून घेण्यात ध्यानयोगाच्या आधारे प्राप्त केलेली व्यक्तिगत अनुभूती नाही काय? मला वाटते ती आहे. नसेल तर ती कशी नाही हे कोणी या मंत्राच्या आधारे सिद्ध केल्यास त्यांचेही म्हणणे स्वीकारण्यात कमीपणा वाटण्याचे कोणतेही कारण मला दिसत नाही.

प्रा. रेगे यांनी माझ्या ग्रंथातील पृ. २२३ वरील एक उतारा उद्‌धृत केला आहे तो असा "..... म्हणून वैदिक धर्माभिमानी मंडळींचा उपनिषदावरील सर्व राग या निमित्ताने (जाबालोपनिषदाच्या निमित्ताने) उफाळून आला... उपनिषदांचा एकीकडून श्रुती म्हणून गौरव करायचा .... तर दुसरीकडून श्रुतिश्रुतींमध्येही शास्त्रतः श्रेष्ठ-कनिष्ठ भाव आहे असे प्रतिपादन करावयाचे. हा श्रेष्ठ-कनिष्ठ भाव उपनिषदांना वैदिक धर्माभिमान्यांच्या मनात कोणते स्थान आहे, यावर प्रकाश टाकणारा आहे. त्यांच्या दृष्टीने उपनिषदांपेक्षा अरण्यके श्रेष्ठ, अरण्यकापेक्षा ब्राह्मणे श्रेष्ठ व ब्राह्मणांपेक्षा संहिता श्रेष्ठ आहे. पुन्हा उपनिषदांतही श्रेष्ठकनिष्ठ भाव आहेच. त्यात बृहदारण्यकापेक्षा तैत्तेरीयं (तैत्तिरीय) श्रेष्ठ आणि तैत्तिरीयापेक्षा ईशावास्योपनिषद श्रेष्ठ असा क्रम लावलेला आहे. जाबालोपनिषद तर त्यांच्या दृष्टीने महाविषारी आहे. त्यानेच वैदिक धर्माच्या नाशाचे व बौद्धधर्माच्या उदयाचे बीज पेरले. पुढे त्यातून जो विषवृक्ष फोफावला त्याचे परिपक्व फल शकपूर्वकाली गौतम बुद्ध आणि शकोत्तर काली शंकराचार्य आहेत." (*नवभारत* पृ. ४८) वास्तविक पाहता हा क्रम राजवाड्यांनी लावलेला आहे आणि रेग्यांनी अवतरण जिथे संपविलेले आहे, त्या 'आहेत' या शब्दावर ५८ क्रमाकांची संदर्भटीप देऊन *नासदीयसूक्तभाष्या*चा पृ. क्र. १७७ नोंदविलेला आहे. त्यापुढील वाक्य आहे "असा त्यांनी (म्हणजे वैदिक धर्माभिमान्यांनी, कसब्यांनी नव्हे) समज करून घेतलेला दिसतो." रेग्यांनी हे पुढचे वाक्य का गाळले? गौतमबुद्ध आणि शंकराचार्य विषवृक्ष आहेत हे जणू काय माझेच म्हणणे आहे हे सूचित करण्यासाठी? की अन्य कारणासाठी? रेगे एवढ्यावरच थांबले नाहीत, त्यांनी पुढील वाक्य गाळून, हा क्रम मीच लावलेला आहे असे सूचित करून खिल्ली उडवितानां लिहिले आहे, "एखाद्या अद्वैतवादी 'वैदिक धर्माभिमान्याने' हे सर्व वाचले, तर हसावे की रडावे हे त्याला कळणार नाही." त्याला हसायचे असेल किंवा रडायचे असेल तर त्याने हा क्रम लावणाऱ्या अहिताग्नि राजवाडे किंवा संदर्भटीपेकडे दुर्लक्ष करून जाणीवपूर्वक पुढील वाक्य गाळणाऱ्या प्रा. मे.पुं. रेगे यांच्याकडे पाहूनच हसावे किंवा रडावे. कसब्यांच्याकडे बघून नव्हे. कारण कसब्यांची यासंबंधीची भूमिका ठाम आहे. ती अशी की, रेगे म्हणतात तसा खरोखरच एखादा सच्चा अद्वैतवादी 'वैदिक धर्माभिमानी' कोणी आहे काय? जर तो असलाच तर त्याच्यापुढे तीनच पर्याय असतील. एक तर त्याला आत्महत्या करावी लागेल किंवा वेडे होऊन उर्वरित जीवन मरेपर्यंत जगावे लागेल किंवा ब्राह्मण ग्रंथांसहित पूर्वमीमांसेच्या दोन्हीही संप्रदायांचे उपलब्ध वाङ्मय जाळून टाकावे लागेल. यांव्यतिरिक्त चौथा पर्याय त्याच्यापुढे असणार नाही. मी तर गेल्या अनेक वर्षांपासून अशा सच्च्या अद्वैतवादी 'वैदिक धर्माभिमान्या'च्या शोधात आहे. तसा रेग्यांना एखादा सापडलेला असेल तर तो त्यांनी जाहीर करावा. मात्र तो सच्चा असला पाहिजे. कोणी स्वतःला नित्सेचा शिष्य म्हणवून घेतल्याने तो नित्सेचा शिष्य असतोच असे नाही. तो फार तर 'अहंकारी ब्राह्मण' आणि 'विक्षिप्त परंपरावादी' असू शकतो. रेगे म्हणतात, राजवाडे नित्सेचे शिष्य होते, परंतु स्वतः नित्सेच या संदर्भात मनूचा शिष्य होता आणि त्याने *मनुस्मृती*ची भलावण कोणत्या कारणासाठी केली, हे रेग्यांना माहीत नाही काय? (त्यासाठी पाहा – रावसाहेब कसबे – *हिन्दु-मुस्लिम प्रश्न आणि सावरकरांचा हिंदुराष्ट्रवाद*, पृ. ३३२ ते ३३७) त्याचप्रमाणे, कोणी स्वतःला अद्वैतवादी 'वैदिक धर्माभिमानी' म्हणून जाहीर केल्यानेही ते तसे ठरत नाहीत. जे भेटतात ते आपापल्या सोयीनुसार, मतलबानुसार, स्वार्थ आणि श्रेष्ठत्वाच्या अहंकारानुसार शब्दचमत्कृती करून श्रेष्ठत्व टिकविणारे भोंदूच निघतात.

### वेद आणि पूर्वमीमांसा यांचे संबंध

प्रा. रेगे याच परिच्छेदात (पृ. ४९) पुढे म्हणतात, "वैदिक परंपरेने श्रुतीमध्ये श्रेष्ठ-कनिष्ठ भाव मानलेला नाही. कोणतेही श्रुतिवाक्य घेतले तर त्याला प्रयोजन असते आणि ते प्रमाण असते. सर्व श्रुतिवाक्ये परस्परांशी सुसंगत आहेत. दोन








श्रुतिवाक्यांत सकृद्दर्शनी विसंगती आढळल्यास त्यांची 'व्यवस्था' कशी लावायची म्हणजे ही विसंगती दूर कशी करावयाची, ह्याची तत्त्वे पूर्वमीमांसेमध्ये स्पष्ट केलेली आहेत. त्यांना अनुसरून श्रुतिवाक्याचा अर्थ लावला की विसंगती उरत नाही अशी वैदिकांची भूमिका आहे. सर्व श्रुतिवाक्ये प्रमाण आहेत, त्यांतली कोणती वाक्ये इतर कोणत्या वाक्यापेक्षा अधिक प्रमाण आहेत हा अर्थशून्य प्रश्न आहे." (*नवभारत* पृ. ४८-४९) प्रा. रेगे या परिच्छेदात श्रुतिवाक्याला कशाचे प्रयोजन असते हे सांगत नाहीत. त्याच्या प्रयोजनाचे स्वरूप स्पष्ट करीत नाहीत. हे प्रयोजन प्रमाण का असते हे सांगत नाहीत. श्रुतिवाक्ये परस्परांशी सुसंगत असतानाही दोन श्रुतिवाक्यांत सकृद्दर्शनी विसंगती का आढळते हे रेगे सांगत नाहीत. त्यांची 'व्यवस्था' लावण्याची वेळ का आली याची कारणे रेगे देत नाहीत. ही विसंगती दूर करण्यासाठी कोणकोणत्या लटपटी, खटपटी कराव्या लागल्या हे रेगे स्पष्ट करीत नाहीत. प्रमाण श्रुतिवाक्याचे एखादे उदाहरण देत नाहीत. सकृद्दर्शनी विसंगती आढळणारी दोन श्रुतिवाक्ये उद्धृत करीत नाहीत. त्यांच्यातील सकृद्दर्शनी विसंगतीवर सुसंगतीची 'व्यवस्था' लादून कशी मात केली जाते याचे स्पष्टीकरण रेगे करीत नाहीत. त्यांचे म्हणणे फक्त एवढेच आहे की श्रुतिवाक्यांचा अर्थ लावण्याची 'व्यवस्था' पूर्वमीमांसेत आहे. ती प्रमाण मानली की, श्रुतीमधील श्रेष्ठ-कनिष्ठ भावाचा प्रश्न अर्थशून्य होतो. या प्रकारे रेगे वैदिकांच्या भूमिकेला शरण जातात.

प्रा. रेगे यांचे (पृ. ४८-४९) वरील, वर अवतरणात दिलेले विवेचन वाचून मला जशी गम्मत वाटली तसाच संतापही आला. गम्मत याच्यासाठी की रेगे यांच्यासारखा तत्त्वज्ञसुद्धा एखादा जटिल विषय किती बालबोध रूपात निरूपतो! आणि संताप याच्यासाठी की पूर्वमीमांसेची भूमिका ही रेग्यांची स्वतःची भूमिका आहे काय? ते तिच्याशी प्रामाणिक आहेत काय? या प्रश्नाने मनात थैमान घातले म्हणून.

श्रुतीमध्ये श्रेष्ठ-कनिष्ठ भाव नाही, हे सिद्ध करणारी आणि तशी 'व्यवस्था' लावणारी 'पूर्वमीमांसा' ही काय बला आहे? तिचे सामान्य वाचकांना ज्ञान असण्याची सुतराम शक्यता नाही. ती वेदांशी तरी प्रामाणिक आहे काय? ती घरोबा सांगते वेदांचा परंतु व्यभिचार करते *ब्राह्मण*ग्रंथांशी. तिच्यात तर वेदमंत्रापेक्षा *ब्राह्मण* ग्रंथांनाच अधिक महत्त्व दिलेले आहे. ती तर *ब्राह्मण* ग्रंथांच्या पूर्वीचे प्राचीन मंत्र गौण मानणारी आहे. तिने तर *ब्राह्मण* ग्रंथांनंतर लिहिली गेलेली उपनिषदेही गौण मानलेली आहेत. मुळात खुद्द *ब्राह्मण* ग्रंथांचाच वेदांच्या मूळ आशयाशी कितपत संबंध आहे? जी पूर्वमीमांसा *ब्राह्मण* ग्रंथांपूर्वीच्या प्राचीन वेदमंत्रांना गौण मानते आणि *ब्राह्मणो*त्तर उपनिषदांनाही गौण लेखते ती सर्व श्रुतिवाक्ये प्रमाण कशी मानू शकते? तिला वैदिक परंपरा कोणत्या तोंडाने म्हणायचे? ती स्वतः म्हणते म्हणून? की रेगे सांगतात म्हणून? वास्तविक पाहता वेदमंत्र आणि *ब्राह्मण*ग्रंथांच्या संबंधाबद्दल मी *मानव आणि धर्मचिंतन* च्या पृ. १४६-४७ वर माझे म्हणणे नोंदविलेले आहे. प्रा. रेगे यांनी दुर्दैवाने हा ग्रंथ सलग न वाचल्यामुळे ते पूर्वमीमांसेच्या आधारे विनधास्त विधाने करीत गेले. मीमांसेचा फार थोडा भाग आणि तिच्यातील अगदी गौण सिद्धान्त वेदाच्या मूळ प्रतिपादनाशी जुळणारे आहेत आणि तिने ज्या विशेष उपपत्तीला जन्म दिला असे मानले जाते त्या उपपत्तीचाच जन्म वेदबाह्य आहे याचे भान रेग्यांना राहिले नाही. श्रुतीमध्ये जर श्रेष्ठ-कनिष्ठ भाव नसेल आणि तशी 'व्यवस्था' मीमांसेने लावलेली असेल तर खुद्द पूर्वमीमांसेतच कुमारील आणि प्राभाकर हे दोन संप्रदाय त्यांच्यात पूर्ण एकमत होते म्हणून निर्माण झाले असे रेगे यांना म्हणावयाचे आहे काय? भारतीय तत्त्वज्ञानाची अगदी जुजबी ओळख असणाऱ्या वाचकाच्याही मनात प्रश्न येईल की, पूर्वमीमांसेचे हे स्वरूप प्रा. रेगे यांना खरोखरच माहीत नसेल काय?

प्रा. रेगे यांना या सर्व गोष्टी माहीत आहेत, परंतु खिल्ली उडविण्याच्या नादात रेगे इतके वाहत जातात की, आपण स्वतःच आत्मविसंगत भूमिका घेत आहोत याचेही भान ते हरपून बसतात. आणि आपला एक वाचकवर्ग आहे, तो आपले लिखाण गांभीर्यपूर्वक वाचतो, याचीही आठवण त्यांना अशा प्रसंगी राहत नाही असे दिसते. ते स्वतःलाही फसवतात आणि वाचकांशीही अप्रामाणिक बनतात. हा संताप केवळ रेगेप्रेमापोटी आहे. कारण ज्या काळात रेगेंनी 'प्रा. रावसाहेब कसबे यांची विवेचन शैली' हा लेख लिहिला त्याच काळात त्यांनी Liberalism, Fundamentalism and Writer या विषयावर देवळाली, नाशिक येथे दि. २६ व २७ जुलै १९९७ रोजी झालेल्या चर्चासत्रासाठी Writer and Freedom of Expression या नावाचा एक निबंधही लिहिलेला आहे. (त्यांचे हे दोन्हीही लेख माझ्या हातात एकाच दिवशी पडले.) त्यात त्यांनी अनेक गोष्टींचा ऊहापोह केलेला

असला तरी, भारतात हिन्दू मूलतत्त्ववाद का उभारू शकत नाही याची त्यांनी नोंदविलेली कारणमीमांसा, त्यांच्या ह्याच विषयाच्या संबंधी स्वतःच्याच विचारातील आत्मविसंगतीवर अधिक चांगल्या प्रकारे प्रकाशझोत टाकणारी आहे. त्या निबंधात पृ. ९ वर प्रा. रेगे लिहितात, 'The significant question rather is : why is it that the Hindu community cannot throw up a fundamentalist movement. One reason for this is that there is no common doctrine enshrined in a holy text which all Hindus share. If any such doctrine is to be identified it can only be the Vedic doctrine, but the Vedas speak with many voices. The rituals and ceremonies they prescribe have since a long time fallen into disuse so that even the most orthodox Brahmins of today do not practise them and the theology they contain has been interpreted in diverse ways by different sects. Secondly, the Hindu *Dharma-Sastra* is pluralist in its attitude," आहे की नाही गम्मत? प्रा. रेगे रावसाहेब कसबे यांना *नवभारत*च्या व्यासपीठावरून एकीकडे पूर्वमीमांसेच्या आधाराने सर्व श्रुतिवाक्ये परस्परांशी कशी सुसंगत आहेत, हे सर्व-सामर्थ्यानिशी उपदेशितात; तर दुसरीकडे देवळालीच्या लेस्ली सोनी सेंटरमध्ये विचारवंत मंडळींना वेद अनेक आवाजांत कसे बोलतात, वेदांनी सुचविलेले कर्मकांड आणि उत्सव अगदी कर्मठ ब्राह्मणसुद्धा कसे पाळत नाहीत, हिंदूचे वेगवेगळे धर्मपंथ त्यांच्या धर्मशास्त्राचे विवरण अगदी उलट-सुलट पद्धतींनी कसे करतात हेही पटवून देतात. यांतले खरे मे.पुं. रेगे कोणते? हे दोन्हीही मे.पुं. रेगेच आहेत. फक्त ते नटाच्या भूमिकेत आहेत. एका मंचावर ते एक भूमिका वठबितात तर दुसऱ्यावर दुसरी. नट कोणती भूमिका वठवितो याला महत्त्व नसते तर तो ती भूमिका किती तन्मयतेने, किती सामर्थ्याने वठवितो, याला अधिक किंमत असते.

### धर्मचिंतन आणि विश्वरचनाशास्त्र

प्रा. रेगे यांनी *मानव आणि धर्मचिंतन* या ग्रंथातील पृ. १८२ ते १९० या पृष्ठांवरील, न्युटनपासून ते आजपर्यंत विश्वरचनाशास्त्रातील ज्या वैज्ञानिक उपपत्ती मांडण्यात आलेल्या आहेत, त्यांच्या विवेचनावर आक्षेप घेताना "आता हा काही कसब्यांचा प्रांत नाही मग हे विवेचन ते का करतात? त्यांची सबब अशी की, 'आपल्याला उपनिषद्‌कर्त्या ऋषींच्या विश्वोत्पत्तीसंबंधी विविध तर्क आणि सिद्धान्तांचा विचार करावयाचा आहे. परंतु त्यापूर्वी आजचे विज्ञान विश्वोत्पत्ती आणि विश्वरचनेबद्दल कोणती माहिती उपलब्ध करून देते, याचा विचार केला तर प्राचीन तत्त्वचिंतकांच्या विचारांची ओळख आपल्याला अधिक चांगल्या प्रकारे होऊ शकेल.' (पृ. १८२) आता हे म्हणणे केवळ हास्यास्पद आहे." ते हास्यास्पद का आहे याचे स्पष्टीकरण करताना रेगे लिहितात, "जडद्रव्याची घडण आणि त्यात होणारे बदल ह्याविषयीच्या नेमक्या, गणिती परिभाषेत मांडलेल्या आणि अति सूक्ष्म निरीक्षणावर आधारलेल्या वैज्ञानिक उपपत्तींची माहिती करून घेतली तर त्यापासून भौतिक विश्वाची रचना आणि उत्पत्ती ह्यांविषयीचे उपनिषदकालीन ऋषींचे तर्कवितर्क समजून घ्यायला मदत होईल हे बुद्धीला भोवळ आणणारे विधान आहे. आमच्या ऋषींना सर्व माहीत होते, पण प्राचीन संस्कृत ग्रंथ इंग्रजांनी व जर्मनांनी चोरून नेले आणि त्यावरून वैज्ञानिक शोध लावले असे मानणारा एखादा हे विधान स्वीकारील." याच कारणामुळे जर ते म्हणणे हास्यास्पद ठरणार असेल किंवा बुद्धीला भोवळ येणार असेल तर त्यासंबंधी रेगेंची आणि माझी भूमिका सारखीच आहे. रेग्यांना संदर्भविरहित वाक्ये उचलण्याची किंवा ती मध्येच तोडण्याची खोड कशी आहे याचे हे दुसरे उदाहरण. त्या ठिकाणी मी काय लिहिले आहे आणि त्यातले रेगे किती उद्‌धृत करीत आहेत? मी लिहिले आहे, "... प्राचीन तत्त्वचिंतकांच्या विचारांची ओळख चांगल्या प्रकारे होऊ शकेल. कारण आपल्या प्राचीन वाङ्मयाचा अभ्यास धार्मिक भावनेने आणि श्रद्धेने केला जातो. ज्या विषयांची चर्चा प्राचीन वाङ्मयाने केली त्याच विषयांच्या ज्ञानात धर्माचे प्राचीन वाङ्मय फारच झाले तर पाठ करून म्हणून दाखविता येऊ शकेल. हा प्रकार तर शेकडो वर्षे चालूच आहे. त्यातून पाठ केलेले, जे समजले आणि जे समजले नाही, ते सर्व चिरंतन आणि अंतिम सत्य मानण्याची अंधश्रद्धा निर्माण होणे साहजिक असते. या अंधश्रद्धेमुळेच प्राचीन वाङ्मयाचा अभ्यास करण्याची प्रवृत्ती कमी होत आहे. त्यामुळे एका अर्थाने धर्म पांगळे होत आहेत. ते विश्व आणि माणूस यांच्या अस्तित्वाच्या प्रयोजनावर प्रकाश टाकू शकत

अनुक्रमणिका

नाहीत. परंतु ज्यांना कुणाला वास्तवाचे स्वरूप आणि त्यातील माणसाचे स्थान व्यवस्थित समजून घ्यावयाचे असेल, त्यांनी त्यांच्या अभ्यासाचा प्रारंभ वैज्ञानिकदृष्टीच्या पायावरच केला पाहिजे. आज कोणालाही एक धर्म तें ज्ञान उपलब्ध करून देऊ शकत नाही. त्यासाठी विज्ञानाची मदत घेणे अनिवार्य आहे. धर्मनिष्ठांनी विज्ञानाबाबत विनाकारण अनेक गैरसमज निर्माण करून ठेवलेले आहेत. त्यांना कदाचित विज्ञान हे त्यांच्या आत्मप्रस्थापनाला उखडून टाकील अशी भीती वाटत असावी. या भयग्रस्ततेमुळेच धार्मिक नेते विज्ञानासंबंधी नेहमीच आक्रमक भूमिका घेत असतात. वास्तविक पाहता विज्ञानाने अस्तित्वापलीकडील अर्थाला कधीच विरोध केलेला नाही. उलट, विज्ञानाने त्या अर्थाच्या विविध पैलूंचा अविरत शोध घेतलेला आहे. म्हणून जिथे विज्ञान अधिक प्रगत असेल आणि जेथील माणसांनी वैज्ञानिकदृष्टी संपादन केलेली असेल, त्याच प्रदेशात धार्मिकता (Religiousness) अधिक मूळ धरण्याची शक्यता नाकारता येणार नाही. परंतु ज्या प्रदेशातील समाज अविकसित असेल आणि त्याला वैज्ञानिकदृष्टी नसेल, अशा समाजात धर्माच्या नावाखाली अंधश्रद्धा जोपासल्या जातील आणि तेथील धर्म हा शोषणाचे एक हत्यार बनेल. आल्बर्ट आइन्स्टाईन एकदा असे म्हणाले होते की, 'विज्ञानाशिवाय अस्तित्वात असलेला धर्म पांगळा असतो.' (Religion without science is lame.) या त्यांच्या म्हणण्याचा अर्थ नीट समजून घेतला, तर विज्ञान आणि धर्म यांतील संघर्षाकडे बघण्याची एक नवी दृष्टी प्राप्त होईल असे वाटते." (*मानव आणि धर्मचिंतन,* पृ. १८२-८३)

प्रा. रेगे माझ्या भूमिकेतील एक वाक्य आणि तेही सुटे काढून उद्धृत करतात आणि एकूण भूमिकेलाच हास्यास्पद ठरवितात हा काय प्रकार आहे? धर्म आणि विज्ञान यांच्यासंबंधी जी भूमिका मी वर अवतरणात उद्धृत केली आहे तिने रेगे यांच्या बुद्धीला खरोखरच भोवळ आलेली आहे काय? त्या भूमिकेत "आमच्या ऋषींना सर्व माहीत होते, पण प्राचीन संस्कृत ग्रंथ इंग्रजांनी व जर्मनांनी चोरून नेले आणि त्यावरून वैज्ञानिक शोध लावले" हा रेगेंनी काढलेला विपर्यस्त निष्कर्ष सूचित होतो काय? मग या बुद्धीच्या भोवळीचे कारण कोणते आहे? ती कशासाठी आहे? *मानव आणि धर्मचिंतन* च्या पृ. १८२ ते १९० या पृष्ठांवरील विवेचन विस्ताराने येण्याचे कारण, या लेखनप्रकल्पाच्या पुढील दोन्हीही ग्रंथांत विश्वोत्पत्तीचा विषय पुन्हा येणार नाही. प्राचीन माणसांनी विश्वोत्पत्तीसंबंधी जे तर्क केले त्याचाच विज्ञानाच्या साहाय्याने त्यांच्याच वंशजांनी किती वस्तुनिष्ठपणे विकास केला हे वाचकांना समजावे आणि प्राचीन ऋषि-मुनींची प्रतिभाही, काही लोक आक्रमकपणे ठरवितात तशी, हास्यास्पद ठरू नये, तशी ती नाही, हाही या विवेचनामागील एक हेतू होता.

'हा माझा प्रांत नाही' असे जरी रेगे म्हणत असले, तरी 'विश्वोत्पत्ती' हा विषय तर त्यांचाच प्रांत आहे. हा तर तत्त्वज्ञानाचा मूळ विषय. मग तत्त्वज्ञान तो विषय गमावून का बसले? या प्रश्नाचे विवेचनही मी *मानव आणि धर्मचिंतन*च्या पृ. १८० ते ८३ या पृष्ठांवर अन्य ज्ञानशाखांच्या उपेक्षेचे दुष्परिणाम या उपशीर्षकाखाली केले आहे. परंतु त्याचे आणखी एक कारण मला प्रा. रेगे यांच्या या लेखात सापडले. तत्त्वज्ञानीच जर 'चोवीसच शून्य का द्यायचे? पंचवीस का नाही?" असे प्रश्न वैज्ञानिकांना विचारीत असतील तर सगळाच आनंदीआनंद आहे. त्यांनी विज्ञानाचीही अशीच खिल्ली एकेकाळी उडविलेली असणार आणि ते स्वतःच टाळ्या वाजवीत आत्मरत (Narcissist) झालेले असणार. त्यांचे आत्मप्रस्थापन धोक्यात आल्याने ते इतरांकडे असेच तुच्छतेने आणि दौर्षेकदृष्टीने (Cynical) पाहत राहिलेले असणार. या त्यांच्या वृत्तीमुळे, जे 'तत्त्वज्ञान' एकेकाळी विज्ञानाच्या क्षेत्रातसुद्धा सहज संचार करू शकत होते, ते ती संचारशक्तीच गमावून बसले. आणि या शतकातील व्हिट्गेन्स्टाइनसारख्या महान तत्त्वज्ञालासुद्धा 'The sole remaining task for philosophy is the analysis of language' असे खेदाने म्हणावे लागले. म्हणूनच अलीकडे तत्त्वज्ञ मंडळी 'शैली' या क्षेत्राकडे वळलेली असावी. निदान ते क्षेत्र तरी त्यांच्याकडून नीट सांभाळले जावे यासाठी त्यांना विविध ज्ञानशाखांनी शुभेच्छा देण्याची यापूर्वी कधी नव्हती इतकी आज गरज निर्माण झालेली दिसते.

**'तत्त्वज्ञाना'पुढील मुख्य समस्या**

कोणत्याही ज्ञानशाखेची प्रतिष्ठा ही तीं मानवी जीवनाच्या बाह्य आणि अंतर्विश्वात किती डुब मारू शकते, माणसाच्या प्रत्यक्ष जगण्याला ती किती अर्थपूर्ण बनवू शकते आणि त्याच्या जाणिवा किती व्यापक आणि समृद्ध बनवू शकते यावर ठरत असते.

कमालीच्या संशयग्रस्ततेमुळे आणि जीवनव्यवहाराशी फारकत घेतल्यामुळे तत्त्वज्ञान हा टिंगलीचा विषय बनणे ही






अनुक्रमणिका

माझ्या दृष्टीने अतिशय क्लेशकारी गोष्ट आहे. सामान्य मुलेही जेव्हा "व्यवहार बोला, तत्त्वज्ञान पाजळू नका" असे सहज बोलून जातात, तेव्हा मनस्वी दुःख होते. तत्त्वज्ञानाला इतक्या खालच्या पातळीवर कोणी आणि का आणले? हा विस्तृत चर्चेचा मुद्दा असला, तरी त्यामागे आत्मप्रस्थापनाची केविलवाणी धडपड आणि त्यासाठी चोखाळले गेलेले विपर्यस्त आणि सवंग मार्ग हेही एक कारण दिसते. हे काही प्रा. मे.पुं. रेगे यांना उद्देशून मी लिहीत नाही. याला काही जागतिक संदर्भ आहेत. म्हणूनच मला रेगे यांनी विचारलेले प्रश्न महत्त्वाचे वाटतात. कारण त्यांच्या प्रश्नांना केवळ *मानव आणि धर्मचिंतन* या ग्रंथाच्या मर्यादेतच महत्त्व आहे असे नाही, तर त्याला धर्मचिंतनाच्या क्षेत्रातील जागतिक पातळीवरील दृष्टीचेही संदर्भ आहेत. रेगे जेव्हा "मुख्य म्हणजे ह्या सर्व (वैज्ञानिक) उपपत्तींचा वैदिक साहित्याशी काय संबंध आहे?" किंवा ॲडम स्मिथचा संदर्भ घेऊन, त्याच्या श्रमविभागणीच्या सिद्धान्ताच्या अनुषंगाने "ह्या सर्वांचा वैदिक धर्मचिंतनाशी काय संबंध आहे?" असे प्रश्न विचारतात, तेव्हा ते प्रश्न केवळ प्रा. मे.पुं. रेगे यांचे व्यक्तिगत प्रश्न नसतात. ते तत्त्वज्ञान या शाखेने अन्य ज्ञानशाखांना विचारलेले प्रश्न असतात. म्हणूनच मला ते प्रश्न मूलगामी वाटतात. 'प्रा. रावसाहेब कसबे यांची विवेचनशैली' या मे.पुं. रेगे यांच्या संपूर्ण लेखात एखाद्या तत्त्वज्ञाला शोभेल असा एकच प्रश्न आहे आणि तो म्हणजे वैज्ञानिक शोधांचा आणि अर्थशास्त्रीय विश्लेषणाचा वैदिक साहित्याशी आणि वैदिक धर्मचिंतनाशी काय संबंध आहे?, हा होय. वास्तविक पाहता, ते हाच प्रश्न या ग्रंथातील ऐतिहासिक, समाजशास्त्रीय, मानववैज्ञानिक (Anthropological) आणि जीवशास्त्रीय विवेचनासंबंधीही विचारू शकले असते. परंतु ते विचारण्याचे धाडस त्यांच्याकडून झाले नाही.

प्रा. रेगे यांच्याकडून विचारलेल्या प्रश्नांना माझे स्पष्ट उत्तर 'होय, आहे' असेच आहे. प्रा. रेगे यांना या दशकातील वैज्ञानिकांनी अन्य ज्ञानशाखांत खोलवर मारलेल्या मुसंडीची आणि त्यांना आजवरच्या संशोधनाच्या मर्यादांच्या झालेल्या खोल जाणिवेची फारशी माहिती दिसत नाही. या दशकात विज्ञानाच्या क्षेत्रातील प्रकाशित झालेले असे अनेक ग्रंथ आहेत की ज्यांत 'माणसा'बद्दल मूलभूत चिंतन करण्याची अंतरीची तळमळ जाणवते. (माझ्या संग्रहातील त्यांपैकी काहींची नावे या ठिकाणी दिली असती, परंतु रेगे म्हणाले असते अबब! काय हे थक्क करून सोडणारे पांडित्य!) तिथे धर्मचिंतनाकडेही बघण्याची एक नवी दृष्टी आकार घेताना दिसत आहे. जागतिक पातळीवरील नामवंत वैज्ञानिकांच्या ग्रंथांतही पहिल्याच पानावर 'नासदीयसूक्त' झळकू लागलेले आहे. हा ऋग्वेदाचा अत्युच्च सन्मान आहे, असे मी मानतो. आपण मात्र त्यातील वाक्यांच्या अर्थातील सुसंगती शोधण्यासाठी *ब्राह्मणे* आणि पूर्वमीमांसेतच अडकून पडलेलो आहोत, ही खेदकारक आणि संतापजनक बाब आहे. आपले खरे धर्मचिंतन धर्मशास्त्रे किंवा धर्मसूत्रांनी बंदिस्त करून ठेवले आहे. त्याला यातून मुक्त करण्याचा एक मार्ग धर्मशास्त्रे किंवा मीमांसेऐवजी माणसाबद्दल विचार करणाऱ्या अन्य ज्ञानशाखांच्या मदतीने ते समजावून घेणे आणि देणे हा आहे. या घुसळणीतूनच सत्याच्या अधिक जवळ जाता येणे शक्य आहे. त्यातून तत्त्वज्ञानाचे महत्त्व कमी होणार नाही तर त्यामुळे त्याला त्याची पूर्वीची संचारशक्ती लाभण्याचीच अधिक शक्यता आहे.

*मानव आणि धर्मचिंतन* हा ग्रंथ आपले वैदिक धर्मचिंतन कोणकोणत्या अंगांनी विकसित झाले याची पुरेशी माहिती देतो. अगदी ऋग्वेदाचे पुरुषसूक्त घेतले तरी त्याचा विषय एकीकडून विश्वोत्पत्तीला आणि दुसरीकडून चातुर्वर्ण्य समाजव्यवस्थेला भिडणारा आहे. चातुर्वर्ण्य व्यवस्था हे काही धर्मचिंतन नाही परंतु त्याच्या स्पष्टीकरणासाठी आणि अम्मलबजावणीसाठी आपल्या वैदिक धर्मचिंतनाचा बहुतांशी भाग अक्षरशः वेठीला धरलेला दिसतो. चातुर्वर्ण्य जर धर्मचिंतन नसेल, तर ते काय आहे? त्याचे वस्तुनिष्ठ रूप कोणते? त्याचा धर्मचिंतनाशी संबंध कितपत? याचा उलगडा अर्थशास्त्रच करू शकते. आणि त्याचे स्पष्टीकरण ॲडम स्मिथचा श्रमविभागणीचा सिद्धान्तच अधिक चांगल्या प्रकारे देऊ शकतो. रिकार्डो नव्हे; तो नंतरचा. ॲडम स्मिथ हा पहिला अर्थशास्त्रज्ञ असावा की ज्याने पशुसृष्टी आणि मानवीसृष्टी यांतील विभाजक रेषा अधिक स्पष्ट केली. ती त्याने वस्तुविनिमयाच्या प्रवृत्तीत पाहिली. त्यानेच मानवी जीवनातील विनिमयाच्या गरजेच्या भूमिकेला अर्थशास्त्रीय परिभाषेत पहिल्यांदा स्पष्ट केले. त्याने माणसा-माणसांतील विनिमयप्रक्रियेला माणसाची एक मूलभूत प्रेरणा मानले. वैदिक माणूस पशू होता की माणूस? तो माणूस असेल तर त्यात ही प्रेरणा नव्हती काय? वैदिक समाजात प्राथमिक स्वरूपाच्या श्रमविभागणीचे तत्त्व नव्हते काय? या प्रेरणेचे विश्लेषण ब्राह्मण ग्रंथ किंवा मीमांसकांनी कोणत्या

प्रकारे दिले आहे? म्हणून वैदिक धर्मचिंतन समजावून घेताना ॲडम स्मिथ आणि इतर अनेकांची मदत घ्यावी लागते. त्याचप्रमाणे श्रमविभागणीची प्रवृत्ती फक्त माणसांतच कशी असते आणि ती प्राण्यांत कशी नसते हे समजून घेण्यासाठी शिकारी कुत्र्याचे उदाहरण उपयोगी पडते. त्यात कमीपणा मानण्याचे मला तरी कोणतेही कारण दिसत नाही. ज्यांना वैदिक धर्मचिंतनातील अस्सल मानवी भाग निवडून काढायचा असेल त्यांना विविध ज्ञानशाखांच्या मदतीशिवाय अन्य पर्याय नाही. त्यासाठी एखाद्या विषयावरील अधिकार कमावण्याचा बागूलबोवा उभा करण्याचे आणि त्याला घाबरून प्रयत्न सोडण्याचे कोणतेही कारण नाही. हे विश्व आणि त्यातील विषय इतके अनंत आणि असीम आहेत की, त्यावर अधिकाराची भाषा करणे ही एकतर दर्पोक्ती असू शकते किंवा ती हास्यास्पद ठरू शकते. अधिकार ही फार व्यक्तिसापेक्ष गोष्ट असते. त्यामुळे तिच्याबद्दल फार अहंकारी भूमिका घेण्यात अर्थ नसतो.

अधिकारासंबंधी माझा मुद्दा एवढाच आहे की, श्रेष्ठ दर्जाच्या अधिकारी विचारवंताला स्वतःच्या विषयाच्या मर्यादांची जाणीव 'आतून' होत असते. अशा वेळी तो इतर विषयांकडे नितळ आणि निर्मळ दृष्टीने पाहत असतो. इतर विषयांकडे आदराने आणि नम्रपणे बघण्याची ती पूर्वअट असते. तत्त्वज्ञान्यांनी आजवर ज्या ज्या विषयांवर अधिकार गाजविला ते बहुतेक विषय त्यांच्या हातून निसटत गेले. याचे कारण त्यांच्याकडे अधिकार नव्हता हे नाही, तर त्या अधिकाराबरोबरच अन्य ज्ञानशाखांकडे बघण्याची उपहासात्मक आणि तुच्छतादर्शक वृत्तीही त्यांनी जोपासली होती हे आहे. ही गोष्ट प्राचीन भारतीय धर्मचिंतनावर आणि साहित्यावर भाष्य करणाऱ्या विचारवंतांच्या बाबतीत अधिक स्पष्टपणे जाणवते. त्याला काही सन्माननीय अपवाद आहेत याची मला जाणीव आहे. परंतु त्यांची इतिहासातील नगण्य संख्या भविष्यात वाढणे ही उद्याच्या मानवजातीच्या संस्कृतीच्या समंजस, निकोप आणि व्यापक विकासासाठी आवश्यक आहे असे वाटते. प्रा. रेग्यांचा माझ्यावरील राग 'तत्त्वज्ञान' हा माझा प्रांत नसतानाही मी तत्त्वज्ञानाबद्दल इतकी आक्रमक भूमिका का घेतो याबद्दलचा आहे, आणि तो रास्तही आहे. लौकिक अर्थाने तत्त्वज्ञान हा माझा विषय नसेलही; परंतु त्यावर मी माझ्या विषयाइतकेच प्रेम करणारा एक सामान्य अभ्यासक आहे. जेव्हा आजूबाजूचे वास्तव आक्रमक बनून मानवी जीवनाला सर्वांगांनी उद्ध्वस्त आणि भेसूर बनविताना आपण स्पष्ट पाहत आहोत अशा वेळी मानवजातीची एकात्म असलेली मुळे आपण शोधण्याचा प्रयत्न का करू नये? या एकेकाळच्या एकात्म मुळांना कोणी, कसे आणि का विभक्त केले हे मानवजातीला सांगण्याची जबाबदारी कोणाची आहे? ही जबाबदारी इतिहासाने तत्त्वचिंतकांवर टाकलेली असूनही ती जबाबदारी ते का स्वीकारीत नाहीत? आपापल्या विषयातील अधिकार कुरवाळीत बसल्याने ते किती वांझोटे बनलेले आहेत याची कल्पना त्यांना देण्याचे कोणी साधे धाडसही करू शकत नाही इतकी त्यांच्या अधिकाराची दहशत आहे. म्हणून त्यासंबंधी माझे म्हणणे एवढेच आहे की, तो अधिकार वांझोटा न राहता सर्जनशील बनावा; अर्थात तसा तो बनल्याने संपूर्ण जग बदलेल किंवा मानवजातीत आमूलाग्र परिवर्तन होईल अशी भंपक कल्पना मनात मुळीच नाही. परंतु, त्यामुळे समाजात वादविवाद तर झडतील, किमान एक नवे चैतन्य तरी अवतरेल. असे झाले तरच ते अधिकार सार्थकी लागतील. ते सार्थकी लागावेत, म्हणून ही आक्रमक भूमिका आहे.

वास्तविक पाहता हे सारे मी *मानव आणि धर्मचिंतन* मध्ये सूचित केले आहे. परंतु त्यातील मजकुराला रेगे यांच्या डोळ्यांखालून जाण्याचे भाग्य न लाभल्याने माझ्या तत्त्वज्ञानावरील आक्रमक भूमिकेचे निमित्त करून ते काहीबाही लिहीत गेले. म्हणून या लेखाचा शेवट तत्त्वज्ञानासंबंधी माझ्या भूमिकेच्या तपशिलानेच केलेला अधिक उचित ठरेल. मी लिहिले आहे :

"सर्व ज्ञानाच्या आरंभी एक मूळ प्रश्न असतो आणि तो म्हणजे या विश्वाची उत्पत्ती कशी झाली आणि विश्वोत्पत्ती-पूर्वी काय अस्तित्वात होते? Metaphysics या शब्दाला आपण मराठीत अध्यात्मशास्त्र असा शब्द वापरतो परंतु Metaphysics म्हणजे 'that which comes after physics' असा आहे. म्हणून, अध्यात्माचा प्रांत हा पदार्थ-विज्ञानानंतर सुरू होणारा प्रांत असला, तरी त्याच्यातही पदार्थविज्ञान किंवा सामान्यविज्ञान ह्यांच्यांत अंतर्भूत असणाऱ्या विषयांचाच अभ्यास असतो. त्याच्या अनाकलनीय स्वरूपामुळे तो शास्त्रीय पद्धतीच्या विरुद्ध दिसतो. पारंपरिक अध्यात्म विश्वाच्या उत्पत्तीचा, स्वरूपाचा आणि उद्देशांचा विचार शेकडो वर्षे करीत होते. त्याचाही विषय जडपदार्थ (matter) आणि मन (mind); अस्तित्व (existence) आणि स्वतंत्र इच्छा (free will) हेच होते. विज्ञानाचेही तेच विषय असून विज्ञान

त्यांचा खोलवर चिकित्सकपणे विचार करते. परंतु विज्ञानाचे वैशिष्ट्य हे आहे की, त्याने जीवनाच्या अर्थाबद्दलच्या कोणत्याही प्रश्नाला आपण एकटे उत्तर देऊ आणि आपण दिलेले उत्तर हेच अंतिम असेल, असा दावा कधीच केला नाही. विज्ञानाने आपापल्या क्षेत्रातील प्रगतीसाठी आवश्यक त्यावेळी विविध ज्ञानशाखांचे सहकार्य घेतले म्हणून ते गतिमान राहिले आहे." (*मानव आणि धर्मचिंतन* पृ. १८०-८१) तत्त्वज्ञानाने याच प्रकारचे सहकार्य घेतले तर तेही गतिमान राहील आणि त्याचाही भविष्यकाळ उज्ज्वल ठरेल. तसा तो ठरावा.








# BHARATI VIDYAPEETH PUNE

## Founder : Dr. Patangrao Kadam

**Institutional network of its multi-dimensional and multi-locational activities and programmes**

- **Bharati Vidyapeeth Deemed University, Pune** (Member, Association of Indian Universities) with its 12 constituent units in the area of Higher Education, Advanced Studies and Research in following disciplines : **Medicine, Dentistry, Homoeopathic and Ayurvedic medicines, Nursing, Environmental Science, Arts and Humanities, Physical and Natural Sciences, Social work, Law, Physical Education**
- **Colleges and Institutions** in professional and non-professional disciplines located at different places :

**PUNE**
- Institute of Management and Entrepreneurship Development and Post-Graduate Research Centre
- College of Engineering
- Poona College of Pharmacy
- College of Architecture
- Jawaharlal Nehru Institute of Technology (Polytechnic)
- Institute of Pharmacy (Polytechnic)
- Institute of Hotel Management & Catering Technology
- Bharati Kala Mahavidyalaya

**NEW MUMBAI**
- Institute of Management Studies & Research
- College of Engineering
- College of Architecture
- College of Pharmacy
- Institute of Pharmacy (Poly)
- Institute of Technology (Poly)
- Institute of Hotel Management & Catering Technology

**NEW DELHI**
- Institute of Management & Research

**SOLAPUR**
- Bharati Vidyapeeth Institute of Management
- College of Social Work

**KOLHAPUR**
- Institute of Management
- College of Pharmacy
- New Law College

**SANGLI**
- Institute of Management & Rural Development
- Bharati Vidyapeeth Arts, Science & Commerce College (Jr., Sr., PG)
- Bharati Vidyapeeth Kanya Mahavidyalaya, Kadegaon

**SATARA**
- Institute of Management, Karad

- **Schools** Pune 11, New Mumbai 5, Solapur 3, Kolhapur 4, Sangli 11, Satara 2, Thane (Jawhar) 3.
- **Specialised Institutions and Centres in Human Resource Development (6)**
  - Bharati Vidyapeeth Academy, Panchgani
  - Adivasi Vikas Shala, Jawhar (Thane)
  - English-Mathematics Quality Improvement and External Examination Programme : 1.70 lakh students in 900 centres, throughout Maharashtra
  - Bharati Kala Academy, Pune
  - Bharati Krida Pratisthan, Pune
  - Think Tank and Intellectual Forum, Pune
- **Educational Support Service Units (5)**
  - Bharati Printing Press, Pune
  - Vichar Bharati, Pune (Publication Section)
  - Bharati Advertising and Publicity, Pune
  - Central Reference Library and Information Centre, Pune
  - Rural Development Foundation, Sangli
- **Health Education Service and Medical Research Units (9)**
  - Bharati Hospital and Medical College Research Centre
  - Mahatma Gandhi Hospital and Research Centre
  - Eye Bank
  - Mobile health care Unit and Ambulance
  - Rural Health Services Units / Camps. (4)
- **Associate Institutions and Branches (9)**
  - Bharati Sahakari Bank Ltd., Pune 11 branches/extension counters at various places
  - Bharati Central Co-op Consumers Stores Ltd., Pune 11 branches including Bazars, Turnover above Rs. 10 Crores
  - Khanapur Taluka Milk Producers and allied agro Co-op. Society Ltd., Kadegaon
  - Bharati Vidyapeeth Medical Foundation, Pune
  - Khanapur Taluka Co-op. Poultry Society Ltd., Kadegaon
  - Sonhira Sahakari Sakhar Karkhana Ltd., Wangi
  - Sagareshwar Sahakari Soot Girni Ltd., Kadegaon
  - Krishna Verala Sahakari Soot Girni Ltd., Kundal-Palus
  - The Sonhira Foundation for Rural Development

अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

# लेखक-परिचय

* **अम्लान दत्त** : अर्थशास्त्र विषयाचे नामवंत निवृत्त प्राध्यापक; शांतिनिकेतन (प. बंगाल) येथील विश्वभारती विश्वविद्यालयाचे भूतपूर्व कुलगुरू; आर्थिक विकास, धर्म, शिक्षण, लोकशाही, समाजवाद अशा विविध विषयांवर मौलिक लेखन; या विषयांवरील अनेक ग्रंथांचे कर्ते; *धि गांधियन वे, बियाँड सोशलिझम, धि थर्ड मूव्हमेंट, फॉर ए क्वाएट रेव्होल्यूशन* ही अलीकडील पुस्तके. **पत्ता** : पूर्व पल्ली (नॉर्थ), शांतिनिकेतन, ७३१ २३५, प. बंगाल.

* **रत्नाकर पटवर्धन** : एम.एस्सी (जिऑलजी), एल्एल्.बी.; अभियांत्रिकी संशोधन संस्थेत शासकीय नोकरी; ज्युदो, व्यायाम, शरीरशास्त्र, मानसशास्त्र, लेखन, शेती या विषयांमध्ये रस व व्यासंग; *होलपट व सोपान, गर्भालय व लंघनमूर्ती* या कादंबऱ्या, लघुकथा, तसेच विविध विषयांवर लेखन. **पत्ता** : नारायण सदन, गोळे कॉलनी, आग्रा रोड (जुना), नाशिक ४२२ ००२.

* **कुसुम कर्णिक** : एम.ए. (मानसशास्त्र); कौटुंबिक परस्परसंबंधांमध्ये, सामाजिक-आर्थिक परिस्थितीमध्ये, संगोपनाच्या रीतींमध्ये मनोरुग्णतेच्या असलेल्या मुळांच्या अभ्यासात रस; आदिवासी व ग्रामीण भागातील स्त्रियांची स्थिती, आदिवासी संस्कृती व जीवनशैली यांचे, त्यांच्यासोबत जगत सहभागी अध्ययन; गेली काही वर्षे अभयारण्यांच्या लोकजीवनावरील आघातांचा देशव्यापी विशेष अभ्यास व त्यावर आधारित अभयारण्यविषयक शासकीय धोरण, योजना व त्यांची अंमलबजावणी या संबंधात प्रबोधन, जागरण व संघटन कार्य; लोक-अभयारण्य चळवळीच्या राष्ट्रव्यापी उभारणीत महत्त्वपूर्ण योगदान; प्रासंगिक मौलिक लेखन. **पत्ता** : मु. पो. मंचर, ता. आंबेगाव, जि. पुणे ४१० ५०३.

* **शिवाजी कागणीकर** : बेळगावजवळील कंडोली गावात धनगर जमातीत जन्म; सर्वोदय विचारांच्या प्रभावाखाली जडणघडण; महाविद्यालयीन शिक्षणास रामराम ठोकून सर्वोदयाच्या कामात सहभाग; बेळगाव जिल्हा खादी ग्रामोद्योग संघातर्फे गोबर गॅस संयंत्र उभारणीच्या क्षेत्रात लक्षणीय कार्य; १९७७-७८ पॉवरलूम कामगार संघटनेत सक्रिय कार्य; १९७८ पासून प्रौढ साक्षरता, बालवाड्या, स्त्रियांसाठी व्यवसाय प्रशिक्षण वर्ग, धनगरांच्यात संघटनात्मक व (बकऱ्या-मेंढ्यांच्या) औषधोपचाराचे तसेच प्रबोधनाचे कार्य, पाणलोट क्षेत्र विकास, गोबर गॅस संयंत्र उभारणी अशी विविध कार्ये करणाऱ्या जनजागरण संस्थेत कार्य. **पत्ता** : मु. कट्टणभावी, पो. वंबरगा, ता. व जि. बेळगाव ५९१ १४३ (कर्नाटक).

* **विठ्ठल पटवर्धन** (दिवंगत) : स्काऊट चळवळीतले कार्यकर्ते; बेचाळीसच्या चलेजाव चळवळीत सक्रिय सहभाग; बंगालमधील १९४३ सालच्या कुविख्यात, कृत्रिम कारणांनी उत्पन्न झालेल्या अन्न-दुर्भिक्ष्याच्या प्रसंगी मदतकार्यासाठी स्वयंसेवक म्हणून कार्य; महाराष्ट्रातील समाजवादी चळवळीतले व पक्षातले ज्येष्ठ कार्यकर्ते; सहकारी संस्थांच्या उभारणीमध्ये दांडगे कार्य; खादी ग्रामोद्योग आयोगाच्या सघन क्षेत्र विकास योजनेअंतर्गत प्रादेशिक अधिकारी; नाशिक जिल्ह्यातील अनेक रचनात्मक कार्यांचे प्रवर्तक व मार्गदर्शक; चतुरस्र, सुजाण व्यक्तित्व.

* **दत्ता सावळे** : तरुणपणी मूलगामी परिवर्तनवादी राजकीय चळवळीत पदार्पण; लोकजागृती व संघटन या स्वरूपाचे कष्टकरी व कारागीर यांच्यात कार्य; दीर्घकाळ शिक्षक, त्यापैकी काही काळ दलितपीडित समाजातील मुलांच्या शाळेत मुख्याध्यापक; गेली सुमारे वीसबावीस वर्षे देशभरच्या, परिवर्तनाची बांधिलकी मानणाऱ्या, रचनात्मक तसेच संघर्षात्मक कार्य करणाऱ्या जनसंघटनांच्या सभासदांचे व कार्यकर्त्यांचे प्रशिक्षण व मार्गदर्शन; प्रशिक्षणाच्या पद्धती व तंत्रे याबाबतीत मूलभूत चिंतन व अभिनव प्रयोग. **पत्ता** : 'पार्वती', सहयोगनगर, पंढरपूर (जि. सोलापूर) ४१३ ३०४.

अनुक्रमणिका

※ **वेणू पळशीकर** : अर्थशास्त्र विषयाच्या निवृत्त प्राध्यापिका, 'नैसर्गिक शेती'चे प्रणेते मासानोवु फुकुमोवा यांच्या *वन स्ट्रॉ रेव्होल्यूशन* या जगविख्यात ग्रंथाचे मराठी भाषांतर (*एका काडातून क्रांती*); अन्य प्रासंगिक लेखन. **पत्ता** : १५० गंगापुरी, वाई, ४१२ ८०३ (जि. सातारा)

※ **म.द. हातकणंगलेकर** : एम.ए. (इंग्रजी, मराठी); इंग्रजीचे प्राध्यापक; प्राचार्य, विलिंग्डन महाविद्यालय, सांगली (१९७४-१९७९); मराठीतील एक ज्येष्ठ साहित्य-समीक्षक; *साहित्यातील अधोरेखिते*, *मराठी कथा*, *साहित्यसोबती*, *V.S. Khandekar* इत्यादी पुस्तकांचे कर्ते; *मराठी साहित्य – प्रेरणा व स्वरूप*, *डोहकाळिमा*, *पानवलकरांची कथा* आदि अनेक ग्रंथांचे संपादन; महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ आणि महाराष्ट्र राज्य विश्वकोश निर्मिती मंडळ यांचे सदस्य. **पत्ता** : 'निर्वेद', कुपवाड रस्ता, विश्रामबाग, सांगली ४१६ ४१५.

※ **नरेंद्र डेंगळे** : व्यावसायिक वास्तुशिल्पी; स्कूल ऑफ प्लॅनिंग अँड आर्किटेक्चर, नवी दिल्ली, या संस्थेत अध्यापन; १९७४-८३ या काळात दिल्ली येथे आणि १९८७ पासून पुण्यात स्वतंत्र व्यवसाय; इंडियन नॅशनल ट्रस्ट फॉर आर्ट अँड कल्चरल हेरिटेज (इंटॅक) च्या पुणे शाखेचे सहनिमंत्रक. मराठी व इंग्रजीतून वास्तुकला, कला, कला-संस्कृती यांचा वारसा या विषयांवर लेखन. **पत्ता** : ७+८ पाखरबाग, ६/६/१ वावधन-खुर्द, एन.डी.ए. रस्ता, पुणे ४११ ०२१.

※ **दिगंबर पाध्ये** : साठ्ये महाविद्यालय, पार्ले येथे मराठी विषयाचे प्राध्यापक; समीक्षक; *आलोचना*, *समाज प्रबोधन पत्रिका*, *म.सा. पत्रिका* यांसारख्या नियतकालिकांतून समीक्षालेखन, *नारायण सुर्वे यांची कविता* हे पुस्तक; अभिनव शिक्षण प्रसारक मंडळ या शिक्षणसंस्थेशी १९७३ पासून संबंधित, सध्या कार्याध्यक्ष. **पत्ता** : ५ पद्मरेखा, जयप्रकाश नगर, रस्ता क्र. ३, गोरेगाव (पूर्व), ४०० ०६३, मुंबई.








※ **विश्वास नाईकनवरे :** एम.ए. (अर्थशास्त्र व राज्यशास्त्र); राजकीय, आर्थिक व सामाजिक विषयांचा व्यासंग व समाजपरिवर्तनाच्या कार्यात सहभाग; शालेय व महाविद्यालयीन जीवनात वक्तृत्व स्पर्धांमधून सहभाग; योजना आयोगामध्ये एक दशकभर महाराष्ट्रातील खेडोपाडी सर्वेक्षणाच्या कामामुळे दारिद्र्याच्या समस्येचा अभ्यास. टाटा इकॉनॉमिक कन्सल्टन्सी या संस्थेतून अर्थतज्ज्ञ म्हणून निवृत्त झाल्यानंतर नवमानवतावादी चळवळीत संघटक म्हणून कार्य. **पत्ता :** १३/४, सकाळनगर वसाहत, बाणेर रोड, औंध, पुणे ४११ ००७.

※ **कुसुम पटवर्धन :** एम.ए., बी.एड; राष्ट्र सेवादलामध्ये सक्रिय, आजपावेतो; बेचाळीसच्या 'चलेजाव' चळवळीत सक्रिय सहभाग; सहकारी चळवळीत अण्णासाहेब सहस्रबुद्धे यांच्यासमवेत कार्य; नाशिक जिल्ह्यात उत्कर्ष समिती या संस्थेमार्फत दीर्घकाळ विधायक कार्य; माध्यमिक शिक्षक; रचना विद्यालय या नामवंत शिक्षणसंस्थेची उभारणी; गेली अनेक वर्षे नाशिक येथील महिला हक्क संरक्षण समितीच्या वतीने विविध स्वरूपाची कामे व अध्ययन. **पत्ता :** नारायण सदन, गोळे कॉलनी, आग्रा रोड (जुना), नाशिक ४२२ ००२.

※ **पन्नालाल सुराणा :** राष्ट्रसेवादलात जडणघडण व कार्य; बिहार राज्यात जयप्रकाश नारायण यांच्या सोखोदेवरा (जि. गया) आश्रमपरिसरात भूदान आंदोलनात सहभाग; प्रथम समाजवादी पक्षात व पुढे जनता पक्ष यात कार्य व विविध पातळ्यांवर पदाधिकारी; विविध कामगार संघटनांमध्ये कार्य; राष्ट्रसेवादलाचे भूतपूर्व अध्यक्ष; औरंगाबाद येथून प्रसिद्ध होणाऱ्या दै. 'मराठवाडा'चे सहा वर्षे संपादक; राजकीय, सामाजिक, आर्थिक विषयांवर लेखन. *आपला महाराष्ट्र*, *समाजवादी क्रांतीची दिशा* इत्यादी पुस्तकांचे कर्ते; अलिकडे पाणलोट क्षेत्र विकास कार्यक्रमात विशेष सहभाग. **पत्ता :** शेती केंद्र, जगतापवस्ती, पो. आसू, ता. परंडा, जि. उस्मानाबाद ४१३ ५०२.







※ **वीणा सुराणा** : राष्ट्रसेवादलात जडणघडण व कार्य; डी.ए.एस.एफ. (आयुर्वेद-ॲलोपथी मिश्र अभ्यासक्रम); बार्शी शहरी तीस वर्षे प्रसूतीगृह व दवाखाना या मार्फत सेवाकार्य; समाजवादी पक्षात सक्रिय; बार्शी येथील मार्केट यार्डातील हमालांची युनियन, हमाल-मजूर सहकारी सोसायटी, भूमिहीन शेतमजुरांची सामुदायिक सहकारी शेती सोसायटी, सावित्रीबाई फुले महिला औद्योगिक सहकारी सोसायटी यांची उभारणी व कार्य; बार्शीत मुलींसाठी वसतिगृहाची उभारणी; गृहिणींच्या प्रश्नांत विशेष रस; प्रासंगिक लेखन. **पत्ता** : शेती केंद्र, जगताप वस्ती, पो. आसू, ता. परंडा (जि. उस्मानाबाद), ४१३ ५०२.

※ **चिं.मो. पंडित** : १९५६ साली बी.ई. (सिव्हिल); १९६३ साली 'पूल' हा विषय घेऊन जर्मनीतून पीएच.डी. प्रत्यक्ष बांधकाम, संशोधन व सल्लागार असा अनुभव. मराठी विज्ञान परिषदेबरोबर २० वर्षे संबंध व पदाधिकारी. गेली १० वर्षे जमीन-पाणी-वनस्पती-शेती असा अभ्यास व प्रत्यक्ष अनुभव घेणे चालू. **पत्ता** : 'मैत्र', २३ विद्याविहार सोसायटी, चाकण रोड, तळेगांव-दाभाडे, ४१० ५०७ (जि. पुणे).

※ **फ्रान्सिस दिब्रिटो** : रोमन कॅथलिक चर्चअंतर्गत धर्मगुरू; वसई क्षेत्रातील पर्यावरण संरक्षण लढ्याचे नेतृत्व व हरित वसई संरक्षण समितीचे अध्यक्ष; अण्णा हजारे ह्यांच्या भ्रष्टाचार विरोधी आंदोलन न्यासाचे सदस्य; महाराष्ट्र राज्य मराठी विकास संस्थेचे सदस्य; *सुवार्ता* मासिकाचे संपादक; *परिवर्तनासाठी धर्म*, *तेजाची पाऊले*, *ओॲसिसच्या शोधात* या पुस्तकांचे कर्ते. **पत्ता** : गिरीज, वसई ४०१ २०१ (जि. ठाणे).

※ **हुसेन जमादार** : बी.ए., एल्एल्.बी.; १९७१-८० मुस्लिम सत्यशोधक मंडळाचे पूर्णवेळ कार्यकर्ते; सरचिटणीस, मुस्लिम सत्यशोधक मंडळ; अध्यक्ष, मुस्लिम समाज प्रबोधन संस्था; १९८५ साली 'तलाक मुक्ति मोर्चा'चे संयोजन; *जिहाद* हे आत्मचरित्रपर पुस्तक; महाराष्ट्र फाऊंडेशन व फाय पाऊंडेशन पुरस्कार; **पत्ता** : ३१ विक्रमनगर, कोल्हापूर ४१६ ००५.



अनुक्रमणिका

※ **प्रभा श्रीनिवास** : बी.ए. (तत्त्वज्ञान), एम.ए. (उपयोजित मानसशास्त्र); १९५० पासून सार्वजनिक जीवनातील विविध चळवळींशी जवळून संपर्क; शिक्षणक्षेत्र, आदिवासी व स्त्रिया यांच्यामध्ये प्रत्यक्ष कार्य; वैचारिक, ललित व अनुवादात्मक लेखन; महाश्वेतादेवी यांच्या *अरण्येर अधिकार* या कादंबरीचा मराठी अनुवाद प्रसिद्ध (१९८२); गेली १२-१३ वर्षे स्त्रीचळवळीशी संलग्न 'स्वाधार' संस्थेत मुख्यतः मानसशास्त्रीय सल्ला व कार्यकर्ता प्रशिक्षण हे कार्य; १९८८ पासून मानवी नाती या विषयाचा संवाद पद्धतीने अभ्यास; सध्या महिला आरक्षणाबाबत पुरुषवर्गाच्या प्रतिक्रियांचा 'स्वाधार' तर्फे अभ्यास चालू. **पत्ता** : ४६/बी ३, बचानीनगर, मालाड (पूर्व), मुंबई ४०० ०९७.

※ **मिलिंद बोकील** : एम.ए., पीएच.डी. (समाजशास्त्र); समाजशास्त्राचे अभ्यासक; नैसर्गिक साधनसंपत्ती, आदिवासी व दुर्लक्षित मानवी समूह आणि सामाजिक संस्था हे संशोधनाचे विषय. *उदकाचिया आर्ती* हा कथासंग्रह प्रकाशित. महाराष्ट्र फाऊंडेशनचा साहित्यिक पुरस्कार. **पत्ता** : १ ए/४, कृत्तिका हाऊसिंग कॉम्प्लेक्स, कोथरूड, पुणे ४११ ०२९.

※ **अविनाश बि.जे.** : बाबा आमटे यांच्या 'भारत जोडो' यात्रेत सहभाग; अंध मुलांच्या शिक्षणाचे कार्य; नर्मदा बचाव आंदोलनासह विविध संघर्षात्मक जनआंदोलनांमध्ये सक्रिय सहभाग; कोयना खोऱ्यातील धरणग्रस्त व अभयारण्यग्रस्त यांच्या संघटनेचे कार्यकर्ते; 'सत्यशोध' संस्थेचे कार्यवाह; शोषित जन आंदोलन या महाराष्ट्रातील विविध संघर्षप्रवण परिवर्तनवादी संघटनांच्या आघाडीचे निमंत्रक; *दवंडी* या लोकजागरण व प्रबोधन यांना वाहिलेल्या अभिनव ग्रामीण पाक्षिकाचे संपादन व प्रकाशन; *ग्रामीण दारिद्र्याविरुद्धचा लढा* या पुस्तकाचे संपादन; **पत्ता** : 'सत्यशोध', कोरेगाव (जि. सातारा) ४१५ ५०१.












※ **प्रतिभा रानडे** : विविध विषयांवर वैचारिक व ललित लेखन. अफगाणिस्थानामध्ये राजकीय उलथापालथीच्या काळात वास्तव्य; त्यातून एका पुस्तकाचे लेखन; मुस्लिम स्त्रियांच्या स्थितीच्या अभ्यासावर आधारित *बुरख्याआडच्या स्त्रिया* हा ग्रंथ प्रकाशित; दै. लोकसत्ता (मुंबई) मधील स्फुट लेखांचे पुस्तक *शुक्रवारची कहाणी* प्रकाशित; अनेक साहित्यिक पुरस्कार. **पत्ता** : बी-१०, मेदिनी निकेतन, बामणवाडा, विलेपार्ले (पूर्व), मुंबई ४०० ०९९.

※ **रंगनाथ पठारे** : संगमनेर महाविद्यालयात भौतिकी विषयाचे प्राध्यापक; मराठी भाषेतील एक आघाडीचे कादंबरीकार; *ताम्रपट*, *दुःखाचे श्वापद* या अलीकडील गाजलेल्या कादंबऱ्या; समाजस्थिती, वाङ्मयीन संस्कृती व चळवळी, साहित्यसमीक्षा यांवरील लेख-भाषणे यांचा संग्रह *सत्त्वाची भाषा* प्रसिद्ध; **पत्ता** : ५ समता सोसायटी, संगमनेर (जि. अ.नगर) ४२२ ६०५.

※ **श्यामला वनारसे** : मानसशास्त्र विषयाचे काही वर्षे अध्यापन; व्यक्तिमत्व विकास, मानवी-औद्योगिक संस्थांचे सुयोग्य व्यवस्थापन या क्षेत्रात प्रशिक्षण व सल्लामसलत या स्वरूपाचे सध्या कार्य; ललित साहित्य, नाटक, चित्रपट आदि ललित कला यांचा अभ्यास-व्यासंग व या विषयांवर लेखन, व अनुवाद; **पत्ता** : ५, 'आवर्तन' हिलव्ह्यू सोसायटी, ४६/४ पौड रस्ता, पुणे ४११ ०३८.

※ **एकनाथ साळवे** : एम.ए. (मराठी), एलएल.बी.; व्यवसाय वकीली; अकरा वर्षे महाराष्ट्र राज्य विधानसभेचे काँग्रेसपक्षीय सदस्य; पक्षांतर्गत 'सोशलिस्ट फोरम'चे महाराष्ट्र राज्य शाखेचे अध्यक्ष; टाडा कायद्याखाली ज्यांच्यावर अन्याय, अत्याचार होतात, ज्यांना तुरुंगात बंद केले जाते अशा 'नक्षलवादी' गणल्या जाणाऱ्या आदिवासी व इतर गोरगरीव नागरिकांचे वकीलपत्र घेऊन न्याय मिळवून देण्याचे महत्त्वपूर्ण कार्य; विचारपूर्वक डॉ. बाबासाहेबांना अनुसरून बौद्ध धम्माची दीक्षा; **पत्ता** : विठ्ठल मंदिर वॉर्ड, चंद्रपूर ४४२ ४०२.

※ **वसंत आबाजी डहाके** : मराठी विषयाचे अध्यापन; महाविद्यालयीन प्राध्यापक या नात्याने शासकीय सेवेत; सध्या महाराष्ट्र राज्य मराठी विकास संस्थेच्या उप-संचालक पदावरून कार्य; मराठी साहित्यातील एक नामवंत कवी, कादंबरीकार व समीक्षक; *योगभ्रष्ट*, *शुभवर्तमान* हे कवितासंग्रह, *अधोलोक प्रतिबद्ध व मर्त्य* या कादंबऱ्या आणि *कविता म्हणजे काय*, *समकालीन साहित्य* आदि समीक्षात्मक ग्रंथांचे कर्ते; *शुनःशेप* हा त्यांचा अलीकडचा कवितासंग्रह; **पत्ता** : २४ सागर, वी-रोड, चर्चगेट, मुंबई ४०० ०२०.

※ **रावसाहेब कसबे** : राज्यशास्त्राचे प्राध्यापक, संगमनेर महाविद्यालय; संगमनेर महाविद्यालयाचे उप-प्राचार्य; महाराष्ट्रातील पुरोगामी परिवर्तनवादी चळवळीतले एक ज्येष्ठ व प्रभावी वक्ते व विचारवंत; आंबेडकर अकादमी (सातारा) यांच्या विद्यमाने आयोजित लातूर येथील २ऱ्या विचारवेध संमेलनाचे अध्यक्ष; *झोत*, *हिंदु-मुस्लिम प्रश्न आणि सावरकरांचा राष्ट्रवाद* इत्यादी ग्रंथांचे कर्ते. **पत्ता** : समता सोसायटी, संगमनेर ४२२ ६०५ (जि. अहमदनगर).

❖❖













राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका



अनुक्रमणिका



